

# भारताचा इतिहास



वाजीरावाच्या मित्रमंडळास उत्तर भारत जिंकण्याची त्याची कल्पना आवडली नाहीं. परंतु शाहू छत्रपतींना त्यानें ती गोष्ट पटवून दिली. आपली महत्वाकांक्षा पुरी करण्याच्या प्रयत्नांत हिंदू राजांची मदत मिळावी या साठीं त्यानें 'हिंदू पदपादशाही' या नांवानें मोहीम सुरू केली.

१७२३ च्या डिसेंबर महिन्यांत त्यानें माळवा प्रांतावर स्वारी केली तेव्हां हिंदू राजांनीं पुष्कळ कष्ट सहन करून त्याला मदत केली. गुजराथच्या सुलतानांमध्यें भाऊबंदकी चालू असल्यामुळें तो प्रांत मराठ्यांच्या हातीं आला. परंतु मराठा सैन्यांत बाजीरावाविरुद्ध एक गट उभा झाला. त्यापक्षाचा पुढारी होता, त्र्यंबकराव दाभाडे. तो गुजराथचा सेनापति होता. बाजिरावाच्या लौकिकाचा हेवा वाटूं लागल्यामुळें कोल्हापूरच्या शिवाजीचा वंशज दुसरा संभाजी यानें व निजामुल्मुल्कनें त्र्यंबकरावाला पाठिंबा दिला. परंतु बाजिरावानें त्यांचीं सर्व कारस्थानें उलथून पाडलीं. १ एप्रिल १७३१ या रोजीं युद्ध झालें त्यांत त्र्यंबकरावाचा पराभव झाला व त्यांत तो ठार पण झाला. पेशव्यांच्या इतिहासांत बाजिरावाचा हा जय फार महत्वाचा आहे. त्यानंतर त्याची बरोबरी करणारा कोणी शत्रु उरला नाहीं. १७३१ च्या आगस्ट महिन्यांत निजामुल्मुल्क याच्याशीं तह करून घेतला. त्या तहाप्रमाणें दक्षिणेकडे त्याला वाटेल तसें राज्य वाढविण्याची मुभा मिळाली आणि मराठ्यांना उत्तरेकडे आपलें साम्राज्य वाढविण्यास स्वतंत्रता मिळाली.

सुदैवानें बाजीरावाची अंबेर राजा द्वितीय जयसिंह आणि छत्रसाल बुंदेला यांच्याशीं मैत्री झाली. तो १७३७ मध्यें दिल्लीच्या परिसरांत आपलें सैन्य घेऊन गेला. परंतु त्यानें दिल्लीवर स्वारी केली नाहीं. कारण बादशहाला त्रास देण्याची त्याच्या मनांत मुळींच इच्छा नव्हती. परंतु बादशहानें मराठ्यांच्या दडपणाखालून आपली सुटका करून घेण्यासाठीं निजामुल्मुल्क याच्याकडे मदत मागितली. सहा वर्षांपूर्वी केलेला तह धुडकावून निजामुल्मुल्क मराठ्यांविरुद्ध बादशहाला मदत करण्यासाठीं निघाला. भोपाळ नजीक दोन्हीं सैन्यांचें युद्ध झालें निजामुल्मुल्कचा पराभव झाला. त्यानें बाजीरावाशीं पुन्हां तह केला. त्या तहाच्या अटीप्रमाणें सर्व माळवा प्रांत बाजिरावाच्या हातीं आला. बादशहानें पण या तहाला मान्यता दिली आणि मोंगलांना नुकसान भरपाई म्हणून पेशव्यांना ५० लाख रुपये द्यावे लागले. या तहामुळें मराठ्यांची सत्ता देशाच्या या भागावर जास्त बळकट झाली.

१७३७ मध्यें पश्चिमेकडील साल्सेट व वसई हीं पोर्तुगीज ठाणीं मराठ्यांनीं स्वाधीन करून घेतलीं. परंतु उत्तरेकडे दिल्लीवर नादिरशहाच्या स्वारीचें वर्णन ऐकून बाजीराव काळजींत पडला. त्यानें लहान लहान



मुसलमान राज्यांशीं वैर सोडून दिलें व तो त्यांच्याशीं सख्य करून नादिरशहाला तोंड देण्याची तयारी करूं लागला. परंतु त्याच्या प्रयत्नाला यश येण्यापूर्वींच वयाच्या अवघ्या ४२ व्या वर्षीं त्याचा मृत्यू झाला. त्याच्या मृत्यूमुळें वाढत्या मराठा राज्यावर वज्रपात झाला. मराठा राज्य वाढविणारे जे शूर पराक्रमी होऊन गेले त्यांच्या पंक्तींत बाजिरावाला मोठ्या मानाची जागा मिळते.

बाजिरावाच्या काळांत मराठा राज्याची शक्ति व कीर्ति शिखरास पोंचली होती. यांत शंका नाहीं. परंतु मराठा जातींत जें ऐक्य

होतें त्याला तडा पडला. याला कारण पुन्हा सुरू झालेली जहागीरदारी देण्याची प्रथा. जागोजागी अर्धस्वतंत्र अशीं राज्यें कायम झालीं आणि केंद्रीय सत्ता कुमकुवत होत गेली व शेवटीं ती नष्ट पण झाली.

सर्वांत प्रथम स्वतंत्र होणारें राज्य म्हणजे वराडचें राज्य व तेथील प्रमुख रघुजी भोसले. त्याच प्रमाणें बडोद्याचे गायकवाड स्वतंत्र झाले. बाजिरावाच्या सैन्यांतला राणोजी शिंदे यानें माळव्यांत स्वतंत्र राज्य कायम केलें. माळव्याच्या दक्षिणेकडील प्रांतांत मल्हारराव होळकर यांनीं स्वतंत्र राज्य स्थापन केलें. बाजिरावाच्या सैन्यांत प्रमुख अधिकारी म्हणून या सर्वांनीं काम केलें होतें.

बाजीराव वारल्यावर त्याचा मुलगा बाळाजी बाजीराव हा पेशवा झाला. मराठा सरदारांनी या गोष्टीला विरोध केला. कारण त्याचें वय अवघें अठरा वर्षांचें होतें. त्याच्या अंगांत त्याच्या वडिलांची कर्तबगारी नसली तरी तो अगदींच निरुपयोगी व असमर्थ नव्हता. सैन्यव्यवस्था व युद्धतंत्र त्यानें आपल्या वडिलांच्या धोरणाप्रमाणें चालू ठेवलें.

१७४९ मध्यें शाहूनें मरणसमयीं मराठा राज्याची सर्व व्यवस्था पेशव्यांच्या हातीं दिली. शिवाजीच्या वंशीयांपैकीं ताराबाईच्या नातवाला वारस नेमण्यांत आलें. परंतु ताराबाईनें त्या गोष्टीस नकार देऊन त्याला विरोध केला. एवढेंच नव्हे तर तिनें पेशव्यांविरुद्ध युद्ध सुरू केलें. तिनें बालक राजाला कैदेंत ठेवलें. परंतु शेवटीं पेशव्यांचाच जय आला. त्यानंतर मराठा राज्यांत पेशवाच मुख्य शासनकर्ता झाला.



# नेहरू चरित्र

[ २९ ]



१९३० च्या २६ जानेवारी या रोजीं स्वातंत्र्यदिवस साजरा झाला. या उत्सवावरून देशांत जागृती आहे व देश चळवळीला तयार आहे हें कळलें. देशभर शहरांत व खेडोपाडीं मोठमोठ्या सभा झाल्या आणि स्वातंत्र्यप्राप्तीची प्रतिज्ञा लोकांनीं केली. यावरून गांधीजींनीं देश चळवळ सुरू करण्यास तयार असल्याचें ओळखलें.

१९२१-२२ सालचा सत्याग्रह चौरीचौरा येथील दंग्यामुळें गांधीजींनीं बंद केला होता. तसेंच कांहीं तरी गांधीजी करतील कीं काय अशी धाकधूक जवाहरलालजींना वाटत होती. गांधीजींचें असें ठाम मत होतें कीं सत्याग्रहाचा कार्यक्रम निर्मलपणें पार पडला तर त्यांत कधीं अपयश येणार नाहीं. या शिवाय तेंच एक साधन होतें. हिंसा हा चळवळींतला एक भाग किंवा कार्यक्रम म्हणून जोपर्यंत मानला जात नाहीं तोपर्यंत चळवळ बंद करणार नाहीं असेंदेखील त्यांनी आपलें मत प्रगट केलें. त्यामुळें जवाहरलालजी वगैरेंस बरें वाटलें.

असहकारितेची ही चळवळ कशी सुरू होणार या गोष्टीचा लोक विचार करीत होते. त्याच वेळीं गांधीजींनीं मिठाच्या सत्याग्रहाचा मंत्रोपदेश दिला. मिठाचा कायदा मोडून त्याचा धिक्कार करावा असें त्यांनीं जाहीर केलें.

जवाहरलालजी वगैरेंना मिठाचा सत्याग्रह आणि स्वातंत्र्य यांचा परस्पर संबंध काय हें कळेना. गांधीजींनी जाहीर केलेला स्वराज्याचा अकरा सूत्री अर्थ पण जवाहर-

जवाहरलालजींच्या पत्नी कमला व बहीण कृष्णा यांनींदेखील पुरुष गणवेष धारण करून स्वयंसेवकांचें शिक्षण घेतलें.

६ एप्रिल या रोजीं राष्ट्रीय सप्ताहाचा पहिला दिवस होता. त्या दिवशीं गांधीजींनीं मिठाचा कायदा भंग केला. त्यानंतर तीन चार दिवसाच्या आंत कांग्रेसनें मिठाचा कायदा भंग करण्याची आज्ञा दिली. पण मीठ कसें करतात हें जवाहरलालजींना किंवा त्यांच्या इतर साथीदारांपैकीं कोणाला माहीत नव्हतें. एक दोन पुस्तकें वाचून मीठ करण्याची रीत प्रसिद्ध करण्यांत आली. कढईत किंवा मातीच्या मडक्यांत पाणी आटवलें तेव्हां मिठासारखा एक पदार्थ अवश्य तयार झाला व तो लिलाव करून विकण्यांत पण आला. अशा तऱ्हेनें तयार केलेलें मीठ खाण्या जोगें आहे की नाहीं हा प्रश्न समोर नव्हता. मुख्य प्रश्न मिठाचा कायदा मोडणें हा होता. चळवळीचा जसा जसा जोम चढत गेला, तो पाहून जवाहरलालजी चकित झाले. प्रजेंत उत्साह व चैतन्य उत्पन्न करण्याच्या कामांत गांधीजींचा हात धरणारा दुसरा पुढारी एकहि नव्हता.

१४ एप्रिल या रोजीं जवाहरलालजींना अटक झाली. त्यांनीं प्रथमच, स्वतः तुरुंगांत गेल्यावर कांग्रेसचे अध्यक्ष म्हणून गांधीजींची किंवा स्वतःचे वडील मोतीलाल यांची नेमणूक करून ठेवली होती. गांधीजी तयार झाले नाहींत. म्हणून मोतीलालजींना अध्यक्ष व्हावें लागलें.

अटक झाली त्याच दिवशीं कोर्टांत विचारणा होऊन जवाहरलालजींना सहा महिन्यांची शिक्षा झाली.






# पाताळ कोट

[७]

[सैनिकांना गुहेंत कालशंबर किंवा कुंभीर यांपैकीं कोणीच आढळलें नाहीं. एका गुहेंत दोन सैनिक अजगराच्या पाशांत सांपडले, धूमकला कालशंबराचा मंत्रदंड सांपडला. त्याच वेळीं कदंब देशाचा जखमी झालेला मंत्री घोड्यावरून आला. तो आपल्या राजासमोर—"महाराज! सर्वनाश!" असें म्हणत जमिनीवर पडला. पुढें—]

गंगाधरनें वैद्याला बोलावून कदंब देशाच्या मंत्र्याचा औषधोपचार करायला सांगितलें. दोघां सैनिकांनीं मंत्र्याला एका दगडाला टेंकून बसविलें. औषधोपचार झाल्यावर गंगाधरनें त्याला विचारलें—"अमात्य! आतां बोला, कदंब देशावर शत्रूनें स्वारी का केली आहे?" कदंब देशाच्या मंत्र्यानें प्यायला पाणी हवें आहे अशी खूण केली. एका सैनिकानें पाणी प्यायला दिलें. पाणी पिऊन मंत्री जिवांत जीव आल्यासारखा म्हणाला—"हें कुंतल देशाचे मंत्री वाटतें?" असें म्हणत त्यानें गंगाधरकडे पाहून आपल्या राजाला विचारलें व पुढें म्हणाला—"कदंब देशावर शत्रूनें स्वारी केल्याचें कळतांच मला वाटलें की तें कुंतल देशाचेंच सैन्य असावें."



राजा उग्रसेन रागाच्या भरांत म्हणाला—"कदंबची राजधानी शत्रूनें हस्तगत केली आहे, हेंच तुला सांगावयाचें आहे वाटतें?"

"महाराज! आपण शांत असावें!" असें म्हणत गंगाधरनें विचारलें—"हे शत्रु कोण असावेत असें तुम्हांला वाटतें?"

"बाहेर शत्रु असता तर राजधानीवर त्यांना स्वारी करणें शक्य झालें नसतें. हे शत्रू बाहेरचे नसून घरांतलेच आहेत. ते कोठून केव्हां आले, कळलें नाहीं. हा सर्व दगा आहे! राजधानींतले नागरीक पण त्यांना सामील झाले आहेत. त्यांनीं राजवाड्यावर हल्ला केला आणि खजिना लुटला." कदंबचा मंत्री म्हणाला.

"खजिना लुटला? माझा खजिना लुटला? पिढ्यान पिढ्या वाढविलेला तो खजिना! सोनें, चांदी, रत्नें....सर्व?" म्हणत उग्रसेन चवताळून विचारूं लागला—"होय, पण त्यांचा पुढारी कोण होता? मी सर्वांची डोकीं उडवितों! कोठें आहे माझा घोडा?" तलवार उपसून तो दूर घोडा चरत होता तिकडे धावूं लागला!

गंगाधरनें उग्रसेनचा हात धरून विचारलें—"महाराज, मला हें सांगा कीं तुम्हांला तुमची मुलगी हवी आहे कीं खजिना? थोडा धीर धरा! अशी घाई करून काम नाहीं भागणार!"

नंतर त्यानें कदंब देशाच्या मंत्र्याला विचारलें—"या बंडखोरांचा कोणी पुढारी आहे का? कीं दंगेखोरांनीं उचल केली?"

"महामंत्री? पुढारी कां नाहींत? धूमक व सोमक आहेत कीं! एक मातृहंतक व एक पितृहंतक! लुटा खजिना! त्यांत आपल्या जवळून लुटलेलें धनच आहे! असे ओरडत त्यांनीं लोकांना खजिन्यावर हल्ला चढवायला प्रोत्साहन दिलें." कदंबचा मंत्री म्हणाला.



सोमक दांतओठ चावून तलवार उपसणार होता. परंतु धूमकनें त्याला डोळ्यानें खूण करून अडविलें.

गंगाधरच्या समोर येऊन हात जोडून तो म्हणाला—"प्रभो! असाच आहे महाराजांचा आणि या मंत्र्याचा न्यायविचार! गेले दोन दिवस आम्ही कदंब नगरानजीक देखील गेलों नाहीं. कदंब देशांत बंडाळी होण्याचें कारण तेथले अत्याचारी शासकच आहेत हें निराळें सांगण्याची गरजच नाहीं."



गंगाधरनें डोळे वटारून कदंब मंत्र्याकडे पाहिलें आणि म्हणाला—"मी गेले अठ्ठेचाळीस तास पाहतों आहें, कदंबच्या शासकांनीं एकदेखील सत्य उच्चारल्याचें माझ्या नजरेस आलें नाहीं. युवराणीला राक्षस उचलून घेऊन गेला आहे. खजिना लुटला गेला आहे. राज्य शत्रूच्या हातीं गेलें आहे. दोघे शासक मृत्यूच्या जबड्यांत सांपडले आहेत. पापांचें आणि खोटें बोलल्याचें प्रायश्चित्त याच जन्मीं भोगावें लागत आहे, त्यांत नवल काय?"

राजा उग्रसेन लज्जित होऊन म्हणाला—"मंत्री! जें झालें त्याबद्दल मी आतां काय उत्तर देऊं. या सर्वाला कारण मीच आहें. क्षमा करावी! माझें राज्य गेलें याबद्दल मला दुःख नाहीं. परंतु मुलीला राक्षस उचलून घेऊन गेला आहे. तिचें रक्षण तुमचें सहाय्य मिळेल तरच शक्य होईल."

"महाराज! सहाय्य? मला असें वाटत आहे कीं शशिकांतला तो मांत्रिक उचलून घेऊन गेला आहे." नंतर कांहीं वेळ थांबून गंगाधर पुन्हां म्हणाला—"पण हा गलका कसला? तुम्हांला नाहीं ऐकूं येत?" त्यानें सैनिकांकडे वळून विचारलें.



दोन तीन सैनिक एका उंच दगडावर उभे राहून टाळ्यांचा आवाज ज्या बाजूनें ऐकूं येत होता त्या बाजूला पाहूं लागले. म्हणाले–"मालक! लोकांचे थवेच्या थवे याच बाजूला येत आहेत. त्यांच्यापैकीं कांहीं तालावर नाचत आहेत."

इतक्यांत एक घोडेस्वार सरळ उग्रसेना-जवळ येऊन खालीं उतरला. त्याचे कपडे जागोजागीं जळलेले होते. त्याची म्यान रिकामी होती आणि तलवार हातांत नव्हती. तो उग्रसेनाचा खजिनदार होता. "महाराज! खजिना लुटला गेला. मी कसाबसा जीव वांचवून आपणांला कळ-विण्यासाठीं आलों आहें. ते सर्व लोक आपला शोध काढीत इकडेच येत आहेत. पळा! नाहीं तर आपल्या जिवाला धोका आहे!" असें म्हणत खजिनदार उग्रसेनाचे पाय धरून रडूं लागला.

"कोठें पळ म्हणतोस व कसे पळ-णार?" गंगाधरनें त्याला विचारलें व धूमक आणि सोमक दोघांना जवळ यायला खूण केली.

"सैन्याची जमवाजमव करून त्या बंडखोरांना चिरडून टाकावें महाराज!" कदंबचा मंत्री आपल्या राजाला म्हणाला.

"सैन्य!" गंगाधर थट्टेंत हंसला. "प्रजेनेंच बंड केल्यावर सैन्य आकाशांतून का येणार आहे, मंत्री?" मंत्र्याला गप्प करून गंगाधर म्हणाला–"आतां तुमचें रक्षण हे सोमक व धूमकच करूं शकतील. सोमक आणि धूमक! हें काम करायची आहे का तयारी?" त्यानें दोघांना संबोधन करून विचारलें.

"या राजाचें व मंत्र्याचें रक्षण आम्हांला करतां येईल. परंतु यांचें राज्य नाहीं परत करतां येणार याला!" दोघे म्हणाले.



"धूमक! राजाशिवाय राज्य कसें? विचार करून बोलशील कीं नाहीं जरा!" गंगाधरनें दरडावून विचारलें.

"महामंत्री! मला राज्याचा मोह नाहीं. मी आपल्या मुलीच्या शोधार्थ रानोमाळ हिंडायला तयार आहें." उग्रसेन म्हणाला.

"राजा असेल तरच मंत्री!" कदंबचा मंत्री म्हणाला.

"राज्यच नसेल तर खजिना कशाला? मीदेखील आपणांबरोबरच येतों महाराज!" खजीनदार उग्रसेनाला म्हणाला.

"तुमच्या पैकीं एकहि त्या लोकांच्या समोरून जिवंत सुटणें शक्य नाहीं." सोमक दरडावून म्हणाला.

"येथें आज्ञा करणारा फक्त मी आहें! कोणी मध्यें कांहीं बोललेलें मला खपणार नाहीं." गंगाधर डोळे वटारून म्हणाला. उग्रसेन महाराज व त्यांचा मंत्री कुंतल देशाच्या आश्रयाला आले आहेत. त्यांचें रक्षण करण्याचा भार माझ्या शिरावर आहे. धूमक आणि सोमक! जा तुम्ही दोघे, त्या लोकांना परत राजधानीकडे समजावून पाठवून द्या! ते पुढें आले तर रक्तपात होईल!" असें सांगून त्यानें आपल्या सैन्याला तयार राहण्यास हुकूम सोडला.

कुंतल देशाच्या मंत्र्याचा हुकूम ऐकून सोमक व धूमक दोघांना आश्चर्य वाटलें व राग पण आला. सोमक रागाच्या भरांत कांहीं बोलणार तेवढ्यांत धूमक त्याला आवरून त्याच्या खांद्यावर हात ठेवून त्याला दूर घेऊन गेला. म्हणाला—"सोमू! अशी घाई कशाला, आपण गंगाधरशीं वैर केलें तर तो आपल्या सर्व अनुयायांची कत्तल करील व कदंबच्या गादीवर उग्रसेनाला बसवील. म्हणून तूर्त त्यांच्या मताप्रमाणें करण्यांतच आपलें व सर्वांचें हित आहे." धूमकनें सोमकला समजावून सांगितलें.

सोमक थोडा वेळ मागें पुढें करून शेवटीं धूमकनें सुचविल्याप्रमाणें त्याच्याबरोबर निघाला. दोघे घोड्यावर बसून विजयनाद करीत कदंबचे नागरिक येत होते तिकडे गेले.

नागरिकांपैकीं कांहींनीं त्यांना ओळखलें. ते ओरडले—"अरे ते पहा, धूमक आणि सोमक! त्यांचें नेतृत्व मिळालें तर कुंतल देशाच्या शतयानु राजाला देखील गादीवरून काढून टाकतां येईल!"

धूमक पुढें गेला व सर्वांना शांत रहायला सांगून म्हणाला—"नागरीक हो! आतां तुम्ही कदंबच्या राजधानीस परत जावें यांतच आपलें सर्वांचें हित आहे. उग्रसेन व त्याचा मंत्री कुंतल देशाचा मंत्री गंगाधर याला शरण गेले आहेत. तुम्ही त्या दोघांवर सूड उगवण्यासाठीं पुढें गेलांत तर कुंतल देशाच्या सशस्त्र व ताज्या दमाच्या सैन्याशीं युद्ध करावें लागेल. या युद्धांत आपल्याला यश येईल कीं नाहीं, मला तरी शंका आहे. समजा, आपण जिंकलों तर कुंतल देशाचा राजा आपलें सर्व सैन्य घेऊन



आपल्या राज्यावर स्वारी करील. त्याच्यासमोर आपला टिकाव लागणें अशक्य!

"आतां आम्हांला राजाचें राज्यच नको आहे. आम्ही त्याचा शेवट करण्यासाठीं आवश्यक असेल तर कुंतल देशाशीं पण युद्धाला तयार आहों." गर्दीतून एक तरुण म्हणाला.

"आत्मार्पण व आत्महत्या यांतला भेद तुला कळत नसेल असें नाहीं मला वाटत." असें म्हणत धूमक थोडा हंसला व म्हणाला—"प्रजेचें राज्य स्थापन करणारीं ही तरणीं मुलें आपापल्या घरीं जाऊन

कांहीं दिवस खेळत राहाली तर त्यांचें व त्यांच्या देशाचें जास्त हित होईल. मी कदंब नगराच्या प्रमुख नाकरिकांना पुढें यायला विनंति करीत आहें." धूमक म्हणाला.

चार पांच वृद्ध नागरिक गर्दींतून वाट काढीत पुढें आले. धूमक घोड्यावरून खालीं उतरला व त्यांना नमस्कार करून म्हणाला—"आतां नेतृत्व तुम्ही वडीलधाऱ्या लोकांनीं हातीं घ्यावें अशी माझी विनंति आहे. या तरुण मंडळीला वस्तुस्थितीची कल्पना असणें शक्य नाहीं. गंगाधरनें सांगितल्याप्रमाणें राजाशिवाय राज्य कसें? पण उग्रसेनाला कदंब देशाचा राजा होतां येणार नाहीं. पण त्याची मुलगी गादीवर बसली तर आपल्याला हरकत कां असावी!" तो म्हणाला.

"कांतिसेनेला आमची राणी करावें, आम्हांला तेंच पाहिजे आहे!" लोक ओरडूं लागले. वृद्ध नागरिकांनीं पण त्याला सहमती दिली.

"असें असेल तर सर्वांनीं शांतपणें परत कदंब नगरास जावें. युवराणीला जो राक्षस उचलून घेऊन गेला आहे त्याचें पारिपत्य करून आपल्या राणीला सोडवून आणण्याची जबाबदारी मी घेतों." धूमक म्हणाला.

लोकांनीं धूमकचा जयजयकार केला आणि कदंब नगराकडे परतले. धूमक व सोमक गंगाधर मंत्री उभा होता तिकडे आले. त्याच वेळीं धूमकच्या कमरेला लोंबत असलेला कालशंबर याचा मंत्रदंड 'जय' म्हणत दोरी तोडून आकाशांत उडूं लागला. सोमकनें तो धरण्यासाठीं उडी मारली.

[पुढील गोष्ट पुढील अंकीं]



# अर्थलोभी

त्रिक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला आणि झाडावरून प्रेत खांद्यावर काढून घेऊन मौनपणें स्मशानाच्या दिशेनें निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तुझ्या-सारखे चिकाटीनें परिश्रम करणारे क्वचित आढळतात. सामान्य मनुष्य अर्थलोभीसारखा अल्प प्रयत्नानें जास्त लाभ व्हावा हीच अपेक्षा ठेवून काम करतो. परंतु अशा लोकांना यशपण क्वचित मिळतें. तुला कंटाळा येऊं नये म्हणून अर्थलोभीची गोष्ट सांगतों. लक्ष देऊन ऐक." असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

कांची नगरींत बाहुबली राज्य करीत असतां राजधानींत अर्थलोभी नांवाचा एक व्यापारी रहात असे. बंधुबांधव कदाचित

वेताळाच्या गोष्टी



फंसवून बुडवितील असा विचार करून त्यानें कामाची देखरेख ठेवण्यासाठीं आपल्या बायकोलाच नेमलें.

त्याच्या बायकोचें नांव मानपरा असें होतें. ती एक अपूर्व रूपवतीच नव्हें तर व्यवहार कुशल आणि बोलण्यांत आणि काम साधून घेण्यांत पण फार हुशार होती. नवऱ्याला व्यापारांत फायदा करून देण्याच्या कामीं तिला चांगलेंच यश आलें.

एकदां सुखधन नांवाचा एक परदेशी व्यापारी आपल्याबरोबर निरनिराळ्या प्रकारचें सुंदर घोडे व सुती, रेशमी आणि लोकरीचे निरनिराळ्या प्रकारचें कापड घेऊन व्यापारासाठीं कांची नगरींत आला. तेव्हां अर्थलोभीनें बायकोला त्याच्याकडे जाऊन पांचशें घोडे व पांच हजार रुपयांचें चीन देशांतलें रेशमी कापड विकत घेऊन यायला सांगितलें. नंतर तें आपण आपल्या राजाला विकलें तर पुष्कळ फायदा होईल असें पण म्हणाला.

नवऱ्यानें सांगितल्याप्रमाणें मानपरा सुखधन उतरला होता त्या जागीं गेली. घोडे व कापड विकत घ्यायचें आहे असें सांगून तिनें किंमत विचारली. सुखधन तिचें सौंदर्य पाहून म्हणाला- "मी तुला घोडे किंवा रेशमी कापड विकायला तयार नाहीं. फक्त एक रात्र माझ्याबरोबर येऊन राहालीस तर तुला हवे असलेले पांचशें घोडे व पांच हजार रेशमी वस्त्रें मी बक्षिस देईन."

"हें मी पतीला जाऊन सांगतें." असें उत्तर देऊन मानपरा स्वतःच्या घरीं निघून गेली. सुखधन जें म्हणाला तें ऐकून अर्थलोभीला राग आला नाहीं. शांतपणें म्हणाला—"पांचशें घोडे व पांच हजार वस्त्रें! एक रात्रभर त्याच्याकडे राहायला हरकत काय? आज रात्रीं जा त्याच्याकडे आणि उद्यां सकाळीं ये परत."



मानपरा त्या प्रमाणें सुखधनच्या घरीं गेली. सुखधननें अर्थलोभीकडे घोडे व रेशमी वस्त्रें पाठवून दिलीं.

उजाडल्यावर अर्थलोभीनें बायकोला बोलावून आणण्यासाठीं आपल्या नोकरांना सुखधनच्या घरीं पाठविलें.

त्यांना पाहून मानपरा म्हणाली—"तुमच्या धन्यानें मला विकलें आहे. तुमच्या मालकाला एक वेळ लाजलज्जा नसेल. पण मला स्वतःचा स्वाभिमान आहे. मी येत नाहीं! तुम्ही आपल्या मालकाला जाऊन सांगा."

नोकरांनीं येऊन बायकोचा निरोप कळवल्यावर अर्थलोभीला भयंकर राग आला व त्यानें बळजबरीनें बायकोला घेऊन जायचें मनांत योजलें आणि आपला मित्र हरचल याचा सल्ला घेतला. हरचलानें तसें करणें बरोबर होणार नाहीं असा सल्ला दिला.

"तूं बायकोला विकायला मागें पुढें पाहिलें नाहींस व त्यानें तिच्यासाठीं आपल्या ऐश्वर्याचा त्याग केला. तो शूर ठरला व तूं लोभी. त्याच्या सारख्या त्यागी पुरुषासाठीं आपला प्राण द्यायला लोक धांवतील. तुझ्यासारख्या लोभ्याकडे कोणी ढुंकूनदेखील पाहणार नाहीं. म्हणून त्याच्याकडून



बायकोला घेऊन येण्याचा तुझा प्रयत्न व्यर्थ आहे." मित्र म्हणाला.

तेव्हां अर्थलोभी राजाकडे गेला आणि सुखधन बायकोला अपहरण करून घेऊन गेला असें सांगून तिला सोडवून आणावी अशी विनंति केली. पण घडलेली खरी गोष्ट मुळींच सांगितली नाहीं.

हा केवढा अन्याय झाला. अपराध्याला योग्य शिक्षा केलीच पाहिजे असें राजानें ठरविलें. परंतु त्याच्या मंत्र्याला मात्र तें बरोबर वाटलें नाहीं. म्हणाला—"महाराज! सुखधन हा एक परदेशी व्यापारी आहे. सर्व



गोष्टीची चवकशी केल्याशिवाय त्याला शिक्षा करणें अन्यायाचें ठरेल."

मंत्र्याचा सल्ला ऐकून राजानें एक दूत सुखधनच्या घरीं पाठविला आणि घडलेली सर्व हकीकत विचारून यायला त्याला सांगितलें. दूत आलेला पाहून मानपरानें घडलेलें वृत्त त्याला सांगितलें. राजाला तें सर्व ऐकून आश्चर्यच वाटलें. राजा अर्थ-लोभीला बरोबर घेऊन सुखधनच्या घरीं गेला.

राजाला आलेला पाहून मानपरानें त्याच्या पायावर लोटांगण घालून घडलेलें सर्व वृत्त अथपासून इतिपर्यंत सांगितलें व म्हणाली—

"या दोघांपैकीं माझा खरा पति कोण हें आतां आपणच सांगावें."

राजानें अर्थलोभीकडे वळून पाहिलें. पण तो काय बोलणार? त्याची वाचाच बंद झाली होती. मानपरा जें बोलली तें बरोबर आहे असा विचार करून राजा म्हणाला—

"बाई! तुम्ही म्हणतां तें बरोबर आहे असें मी सुद्धां म्हणेन. तुमच्यासाठीं सर्व ऐश्वर्याचा त्याग करणाराच तुमचा खरा पति!"

तें ऐकून अर्थलोभीला इतका अपमान वाटला कीं रागाच्या भरांत तो राजाला म्हणाला—"महाराज! तें सर्व सोडा! तर मग मी व माझ्या कुटुंबांतले सर्वलोक एका बाजूला आणि सुखधन व त्याच्या कुटुंबांतले लोक दुसऱ्या बाजूला उभे राहून युद्ध करतों. ज्याचा पक्ष जिंकेल, मानपरा त्याची बायको होईल. आपण या द्वंद्वयुद्धास परवानगी द्यावी."

"असल्या शुभ कार्यासाठीं कुटुंबांतल्या सर्वांनीं युद्ध करण्याची गरजच काय? आपण दोघे द्वंद्वयुद्ध करूं या. जो जिंकेल मानपरा त्याची बायको होईल. आपणच दोघे ही शपथ घेऊन राजाला साक्षी ठेवून द्वंद्वयुद्ध करूं या." सुखधन म्हणाला.



राजाची परवानगी मिळतांच दोघे राजा व मानपरा या दोघांसमक्ष घोड्यावर बसून व शस्त्रास्त्र घेऊन द्वंद्वयुद्ध करूं लागले. सुखधननें आपला भाला अर्थलोभीच्या घोड्याला मारल्याबरोबर घोड्यानें अर्थलोभीला खालीं पाडलें. तरी त्याला सुखधननें ठार केलें नाहीं, उलट त्याला पुन्हां घोड्यावर बसूं दिलें. अर्थलोभी चारदां जमिनीवर पडला तरी सुखधननें त्याला प्रत्येक वेळीं पुन्हां घोड्यावर बसायला अवधी दिला. एवढेंच नव्हेतर नव्या दमानें द्वंद्वयुद्ध करण्या-साठीं प्रोत्साहन पण दिलें. अर्थलोभीचें एक आयुध एकदां जमिनीवर पडलें तें घेण्यासाठीं अर्थलोभी खालीं उतरला असतां घोड्यानें त्याला लाथ मारली. अर्थलोभी बेशुद्ध होऊन पडला. अर्थलोभीच्या नोकरांनीं त्याला उचलून बाजूला केलें.

राजानें सुखधनचें अभिनंदन केलें व सर्व प्रकारें त्याचा गौरव केला. नंतर त्यानें सर्व चवकशी करून अर्थलोभी कडून सुखधन यानें मिळविलेलें ऐश्वर्य अन्यायानें व अधर्म-पणानें मिळविलें असल्याचें सांगून तें स्वतःकडे जमा केलें आणि सुखधनला हद्‌पारीची शिक्षा केली.



वेथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– राजा ! मला एक गोष्ट कळत नाहीं राजानें सुखधन व अर्थलोभी यांच्या द्वंद्वयुद्धाला परवानगी कां दिली ? कारण द्वंद्वयुद्धापूर्वीच राजानें मानपरा ही सुखधन याची बायको आहे हें मान्य केलें होतें. अर्थलोभी हारला. पण राजानें त्याचें सर्व धन स्वतःच्या स्वाधीन करून घेतलें हें कसें काय हें नाहीं कळलें मला. त्याला तसें करावयाचें होतें तर द्वंद्वयुद्धाला परवानगी देण्याची गरजच काय होती ? तूं या प्रश्नांचीं उत्तरें माहीत असून दिली नाहींस तर तुला परिणाम माहीतच आहे, तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांतर लोळूं लागतील."

तें ऐकून विक्रमार्क म्हणाला– "अर्थलोभी पैशासाठी काय वाटेल तें करायला तयार झाला होता हें स्पष्टच दिसत होतें. द्वंद्वयुद्धास त्यानें परवानगी दिली त्यांत हेतू एवढाच की त्याच्या अंगांत शौर्य व पराक्रम आहे कीं नाहीं हें राजाला पहावयाचें होतें. अर्थलोभी जिंकला असता तर राजानें मानपरा त्याचीच बायको आहे असें सांगून तिला घेऊन जायला त्याला सांगितलें असतें. एवढेंच नव्हे, तर त्याला आपल्या पदरीं कदाचित नोकरी पण दिली असती. पण अर्थलोभींत वैश्यधर्म व क्षात्रतेज यांपैकीं कांहींच आढळलें नाहीं. असल्या निरुपयोगी माणसाकडे संपत्ति राहणें समाजाच्या हिताचें नाहीं हें ओळखून राजानें त्याला तो दंडच दिला."

अशातऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ अदृश्य झाला व पुन्हां झाडाच्या फांदीला जाऊन लोंबकळूं लागला.





# चिंचेची मोट

एका गांवीं एक व्यापारी रहात असे. त्याचें कुटुंब फार मोठें होतें. व व्यापार बेताचा. म्हणून त्याला फुकटचा खर्च करणें परवडत नसे. तो बाजारपेठेच्या गांवीं दर आठवड्याला जाई व माल विकत घेऊन आपल्या गांवीं येई. परंतु कधीं मोठ्या रस्त्यानें गाडींत सामान भरून येत नसे. नेहमीं आडवाटेनेंच येई. कारण जकात नाका आडवाटेवर नव्हता. अशा तऱ्हेनें गाडीचे व जकातीचे पैसे तो वांचवी. म्हणून जेवढें ओझें स्वतः उचलून नेतां येईल एवढाच माल तो विकत घेई.

आडवाट एका रानांतून जात असे. जास्त चालावें लागे. चोरांची व रानटी श्वापदांची भीति होती ती निराळीच. त्या रानांत भुतें पण होती. तरी तो त्याच वाटेनें पायीं येई.

एकदां तो त्या रानांतल्या वाटेनें पोतें उचलून जात असतां एका मोठ्या वडाच्या झाडावरून उडी मारून एक भूत त्याच्या-समोर दत्त म्हणून उभें राहालें. "मी तुला खाणार !" असें म्हणत भूत त्याच्या जवळ येऊं लागलें.

व्यापारी काय करावें हें न सुचल्यानें घाबरला. पण स्वतःला सावरून म्हणाला– "असें होय ! तूं भूतच आहेस नाहीं का ? मला प्रथम वाटलें कीं दाभणतर नाहींस तूं !"

तें ऐकून भुताला आश्चर्य वाटलें. या माणसाला भुतांचें भय दिसत नाहीं म्हणावयाचें ! दाभणाला भितो हा !

"दाभण ? कसा रे असतो ? मी नाहीं पाहिला त्याला ! त्याचें नांवदेखील ऐकलें

नाहीं मी! माझ्याहून जास्त भयंकर आहे वाटतें?" भुतानें विचारलें.

"दाभण सामान्यपणें या जंगलांत नाहीं रहात. तरी त्याच्या वाटेला जातां कामा नये. कारण तूं तर नुसतें भूतच आहेस. तूं आमच्या सारख्यांना फक्त गिळूं शकतोस. पण तो आमचे तुकडे तुकडे करून खातो. भयंकर दुष्ट जात आहे त्याची." व्यापारी म्हणाला.

भुताला तें ऐकून राग आला कीं व्यापारी त्याला मुळींच भीत नव्हता व दाभणाचें वर्णन करून त्यालाच भीति दाखवीत होता. म्हणालें—"दाखव मला तो दाभण कोठें आहे तो."

"तो एका बाजारपेठेंत रहातो. त्यानें तुला पाहिलें तर तत्काळ तुझी कुट्टी करून टाकील! काय वाटलें काय तुला? म्हणून तूं माझ्या या पोत्यांत बस. मी तुला त्याच्याकडे घेऊन जातो. तूं पोत्यांत बसून गंमत पहा! हालूं नकोस!" व्यापारी म्हणाला.

त्यानें पोत्यांत ठेवलेला माल बाहेर काढला. भुताला त्यांत बसविलें आणि पोत्याचें तोंड बंद केलें. नंतर तो पोतें



खांद्यावर उचलून घेऊन हमरस्त्यानें जकातीच्या नाक्यावर आला. त्याला पाहून जकात नाक्याच्या अधिकाऱ्यानें त्याला अडवून विचारलें—"काय आहे पोत्यांत? थांब!" व्यापारी थांबला व म्हणाला—"कांहीं नाहीं! चिंच आहे!"

अधिकाऱ्यानें पोत्याला चाचपून व दाभणानें दोन तीनदां टोंचून पाहिलें आणि म्हणाला—"तराजूंत ठेव पोतें, चिंच दिसते आहे. चार मण आहे. तर जकातीचा एक रुपया काढ!"

व्यापाऱ्यानें एक रुपया दिला पुन्हां पोतें उचलून घेऊन दुसऱ्याच वाटेनें गेला आणि त्यानें आपला माल काढून ठेवला होता त्या जागीं जाऊन पोतें सोडून भुताला म्हणाला—"पाहिलास का दाभणाचा पराक्रम? मी एक रुपया देऊन तुझा जीव वांचविला. नाहीतर तुझ्या अंगाची चाळणी करून टाकली असती त्यानें."

"खरेंच! जीव मुठींत धरून बसलो होतो मी आंत! तूं चिंच आहे म्हणालास म्हणून जीव वांचला. बरें मग सांग या उपकाराची फेड कशी करूं?" भुतानें विचारलें.

"माझें कुटुंब मोठें आहे. अर्धे पोटीं सर्वांना दिवस कंठावे लागत आहेत." व्यापारी म्हणाला.

"एवढेंच ना? या झाडाच्या मुळांत पैसे पुरून ठेवले आहेत. खणून घेऊन जा!" भूत म्हणालें आणि झाडावर चढून जाऊन बसलें.

व्यापाऱ्यानें खणून पाहिलें तर खरोखरच त्याला तेथें ठेवा सांपडला. सर्व धन पोत्यांत भरून घेऊन तो आनंदानें आपल्या घरीं निघून गेला.







# परोपकारी गोपाळ

एकदां गोपाळकडे सामन्याचा निरोप आला. कांहीं कामानिमित्तें सकुटुंब सासुरवाडीं जावें लागलें. म्हणून त्यानें आपल्या शेजाऱ्याला म्हशीकडे व गाईकडे जरा लक्ष ठेवा म्हणून सांगितलें व एक पाडा होता तो कांहीं दिवस ठेवून घ्यायला त्यानें विठू गवळ्याला सांगितलें.

कांहीं दिवसांनीं घरीं आल्यावर गोपाळ पाड्याला सोडून घेऊन जाऊं लागला तेव्हां विठूची मुलगी सखू पाड्याकडे पहात उभी होती. तिचे डोळे डबडबले होते. गोपाळच्या तें लक्षांत आल्याशिवाय राहिलें नाहीं. म्हणाला—“ विठू! पाड्यावर तुझ्या घरच्या सर्वांचीच माया दिसते आहे!”

“होय, धनी!” विठू म्हणाला.

“मग घे ठेवून!” गोपाळ म्हणाला.

“गरिबाकडे इतके पैसे कोठें येणार धनी, पाडा विकत घ्यायला?” विठू म्हणाला.

“अरे मी मागितले का पैसे? ठेवून घे; आज पासून हा पाडा तुझा! तुझा आणि सखूचा!” असें सांगून गोपाळ निघून गेला.

दोन वर्षें लोटलीं. सखू लहानाची मोठी झाली, विवाह योग्य झाली. पण जवळ पैसे नव्हते. पाडा चांगला मोठा बैल झाला होता. विकला तर पुष्कळ पैसे मिळतील व सखूचें लग्न थाटामाटानें करतां येईल असा विचार करून विठूनें गोपाळला विचारलें. त्यानें होकार दिला.

विठू पाडा विकणार आहे हें ऐकून लखूनें तो विकत घ्यायचें ठरविलें. त्याची गोपाळशीं ओळख होती. गोपाळतर्फे हा सौदा पटविला तर बैल स्वस्तांत मिळेल अशी त्याची कल्पना होती. म्हणून तो गोपाळकडे गेला व म्हणाला—“ गोपाळ! विठू पाडा विकायला निघाला आहे. विकत घ्यावा, म्हणता!”

“मग घे ना! माझी ना नाहीं. मी पाडा त्याला दिला. ठेवायचा कीं विकायचा हें आपलें त्यानेंच ठरवावें.” गोपाळ म्हणाला.

“मग चल कीं माझ्याबरोबर त्याच्याशीं बोलायला! तूं मध्यस्थ असलास कीं दोघांना बरें!” लखूनें सुचविलें.

गोपाळ त्याच्याबरोबर जायला तयार झाला. समोर सौदा पटला तर विठूला पण बरें वाटेल असें त्याला वाटलें. दोघे विठू-कडे गेले. ते कोणत्या कामासाठीं आले आहेत हें कळल्यावर विठू गोपाळला म्हणाला—“ तुम्ही सांगाल ती किंमत कबूल मला!”

“मी कशाला रे मध्यें? तूं विकणार व तो विकत घेणार? काय किंमत मिळावी असें वाटतें तुला? वाटेल तर घेईल लखू नाहीं तर नाहीं!” गोपाळ म्हणाला.

“शंभर रुपये मिळावे असें वाटत होतें मला. चार चौघांना विचारून पाहिलें आहे



मी! सर्व शंभर रुपये कमींत कमी मिळतील असे म्हणाले. आतां तुम्हांला जें वाटेल तें ठरवा. मी डोळे मिटून जें मिळेल तें घेईन.” विठू गोपाळला म्हणाला.

लखू गोपाळला एका बाजूला घेऊन जाऊन म्हणाला—“ सांग, पन्नास रुपये रास्त किंमत आहे. तूं सांगशील ती किंमत त्याला मान्य आहे!”

“तुला शंभर रुपये जास्त वाटत असतील तर सोडून दे! पण मी कसा काय सांगूं कीं अर्ध्या किमतीवर दे म्हणून?” गोपाळनें विचारलें.



"तरमग तूं आल्यानें मला काय फायदा झाला?" लखूनें विचारलें.

"हें पहा, हें तुलाच कळायला हवें! मी आलो नसतो तर त्यानें याहून जास्तच किंमत मागितली असती. तुला नको असेल तर नको म्हणून सांग त्याला!" गोपाळ म्हणाला.

"मला वाटलें होतें की तूं माझ्या बतीनें शब्द टाकशील! कळलें मला!" लखू गोपाळला लागेल अशा तऱ्हेनें बोलला.

गोपाळ विठूजवळ जाऊन म्हणाला—"लखूला तूं सांगितलेली किंमत जास्त वाटत आहे. तूं एक काम कर! तूं हा पाडा मला दे शंभर रुपयाला आणि मुलीचें लग्न टाक करून."

"तुमचा पाडा, तुम्हांलाच विकूं? छे! तें नाहीं होणार माझ्या हातून! तुम्ही तो सोडून घेऊन जा. तो तुमचा आहे! मी एक पैदेखील घेणार नाहीं. मुलीचें लग्न होईल. आणखी करीन कांहीं तरी खटपट. तशी लग्नाची गर्दीपण नाहीं. अजून स्थळ पाहिलें सुद्धां नाहीं. हातांत पैसे असले म्हणजे स्थळ पाहायला बरें होईल असा विचार केला होता. या पाड्याला विकून मुलीचें लग्न उरकायचा विचार होता एवढेंच." विठू म्हणाला.

दोघांचें बोलणें चालू असतां रामू तिकडे आला. त्यानें विचारलें—"कसला विचार चालू आहे?" गोपाळनें सर्व सांगितलें.

रामू म्हणाला—"हा पाडा आहेच शंभर रुपयांचा. इतर कोणाला देण्याची गरजच काय? मी घेतों तो शंभर रुपयाला. हे घे दहा रुपये! ठरलें. मी बाकी पैसे उद्यां देऊन पाडा घेऊन जातों." असें सांगून त्यानें विठूला दहा रुपये दिले.

लखूला तो सौदा पटल्याचें कळलें. शंभर रुपये घेऊन विठूकडे उजाडतांच गेला



व म्हणाला—"हे घे, तूं मागितलीस ती किंमत! घेऊन जातों पाडा!"

विठू म्हणाला—"गोपाळरावांनीं मला सांगितलें कीं तुम्हांला किंमत जास्त वाटते व तुम्हांला बैल नको आहे. म्हणून मी तो रामूला विकला व बोली ठरल्याचे दहा रुपये पण घेतले."

"आपलें बोलणें चालू असतां तूं रामूला बैल विकूनदेखील टाकलास? तुझ्या तोंडांतून वाक्य निघाल्याबरोबर मी शंभर रुपये पुढें केले असते म्हणजेच सौदा पटला असें वाटलें होय तुला? मी तुझा पाडा नको असें तोंडानें बदलों का?" लखूनें विचारलें.

"तूं आणि गोपाळराव बाजूला जाऊन काय बोललांत हें आतां मला काय ठाऊक? नंतर तुम्ही निघून गेलांत म्हणून गोपाळ-रावांनीं तुम्हांला किंमत जास्त वाटते म्हणून सांगितलें. तुम्हांला पाडा आवडला व तुम्ही मी मागितलेली किंमत द्यायला तयार आहां हें मला कसें काय कळणार?" विठूनें विचारलें.

"कोठें आहे तो गोपाळ?" असें लखूनें विठूला रागाच्या सुरांत विचारलें. त्याच वेळीं रामूबरोबर गोपाळ त्या जागीं आले.





"काय रे गोपाळ ! तूं विठ्ठला म्हणालास कीं मला त्या किंमतीवर पाडा नको आहे ! मी शंभर रुपये आणले आहेत. पाडा मला मिळाला पाहिजे !" लखू म्हणाला.

"तूं उलट माझ्यावर आग पाखडून निघून गेलास आणि पाडा घ्यायचा विचार करीत आहेस हें सांगितलेंस देखील नाहीं. तुला पाडा हवा आहे हें मला कसें काय कळणार ! रामू किंमत सांगितल्याबरोबर दहा रुपये आगाऊ म्हणून देऊन गेला. त्याच्यासारखा मनुष्य दहा दिवस थांबून पैसे द्यायला आला तर कांहीं गैर नाहीं. पण तूं ज्या तऱ्हेनें सौदेबाजी चालवलीस ती मात्र विचित्रच होती. तुला किंमत जास्त वाटली व तूं निघून गेलास. तूं अर्ध्या किंमतीवर मागूं लागला होतास व निघून गेलास तेव्हां एका शब्दानें तरी मला कांहीं म्हणाला होतास का ?" गोपाळनें विचारलें.

"बरें बाबा ! तूं म्हणतोस तेंच खरें ! अजून कोणी घेतला नाहीं ना पाडा ? वर आणखी दहा रुपये मी देतों. पाडा मलाच मिळाला पाहिजे !" लखू म्हणाला.

रामूला राग आला. तो गोपाळला म्हणाला—"गोपाळ तूं ही काय थट्टा चालवली आहेस रे ! आमचें दोघांचें भांडण लावून तूं गंमत पाहणार आहेस होय ना ?"

"असें होय !" लखू म्हणाला.

"हें पहा, मला माझा हा पाडा विकायचाच नाहीं. रामू उगाच गोपाळरावांवर राग कशाला काढतोस ? तूं दिलेले दहा रुपये मी परत करतों. दोघे चालं लागा." असें सांगून त्यानें घरांतून दहा रुपये आणून रामूला दिले.



लखू व रामू गोपाळकडे रागानें डोळे वटारून पहात निघून गेले. इतक्यांत सखू येऊन म्हणाली—"बाबा ! आपल्या गोठ्यांत एक मुलगा पळत येऊन लपला आहे व म्हणाला कीं कोणी विचारलें तर सांगूं नका मी येथें आहे, म्हणून !" इतक्यांत एक जण आला व गोपाळला विचारूं लागला— "काय हो ! तुम्ही पाहिलेंत का माझ्या मुलाला इकडे येतांना ?"

"त्यानें असें केलें काय पळून यायला इकडे ? सांगाल कीं नाहीं ?" गोपाळनें विचारलें.

"माझा मुलगा आहे हट्टी, घरून पैसे घेऊन निघाला आहे. मी त्याच्या पाठोपाठ आलों आहें." तो मनुष्य म्हणाला.

विठ्ठ एका मुलाला हात धरून घेऊन आला.

त्याचें नांव होतें शिनू. त्याचा बाप मजुरी करून पोट भरीत असे आणि त्याच्या बापाच्या म्हणण्याप्रमाणें मुलगा होता उडाणटप्पू. एक पैसा मिळविण्याची लायकी नाहीं आणि निघाला होता लग्न करायला. लग्न केलें आणि नंतर स्वतःचें पोट भरण्याची ज्याच्यांत लायकी नाहीं तो



बायकोचें पोट काय भरणार ! म्हणून बाप खूप रागावला होता. त्या रागाच्या भरांत मुलगा बापाला म्हणाला होता—"मी मिळवीन पैसे. मला नाहीं राहायचें तुझ्या घरांत !" असें सांगून घरांत होते नव्हते ते पैसे उचलून घेऊन स्वारी पळून गेली होती आणि विठूच्या गोठ्यांत जाऊन लपली होती.

गोपाळनें मुलाला जरा न्याहाळून पाहिलें. मुलगा बरा दिसला. मुलगा कर्तबगार निघेल, असें वाटलें त्याला. त्याला काम दिलें तर करील. पोटाला मिळूं लागलें कीं सुधारेल. गोपाळ विठूला बाजूला बोलावून घेऊन गेला व म्हणाला—"तूं आपल्या मुलीचें लग्न करून दे याच्याशीं माझ्या मतें !"

"हा आपलें पोट भरील तर ना बायकोचें भरणार !" विठूनें शंका केली.

"काढूं मार्ग शोधून ! हें पहा, मी अहेर म्हणून एक गाडी देतों. तुझ्याकडे पाडा आहेच. गाडी भाड्याचे पैसे येतील ते पुरतील दोघांच्या पोटापाण्याला. आणि लग्नाला दहावीस लागतील ते मी देईन. तूं हुंडा म्हणून बैल दे म्हणजे झालें !" गोपाळनें आग्रह केला.

विठूला तें पटलें. शितूच्या बापाला पण मुलाला वाटेवर आणायला तो उपाय ठीक वाटला. शितू व सखू दोघांचें लग्न झालें. गोपाळनें गाडी दिली. शितू गाडी हांकायला शिकला. त्याला दोघांच्या पोटापाण्या पुरेसें भाडें मिळूं लागलें.

सखूला पण आनंद झाला कीं ज्या पाड्याला तिनें चारा पाणी घालून वाढविलें होतें तो तिच्या इच्छेप्रमाणें तिच्याच घरीं तिच्याबरोबर आला.





# निश्चयदत्त

उज्जैन नगरींत निश्चयदत्त नांवाचा वैश्य जातीचा एक तरुण युवक रहात असे. त्याला जुगारीचा फार नाद होता. जुगार खेळून तो, जो पैसा मिळे तो, दानधर्म करून टाकण्यांत खर्च करी.

तो रोज शिप्रा नदींत स्नान करून महाकाल याच्या देवळांत दर्शनास जाई व पूजा वगैरे करून जवळच्या श्मशानांत जाई. सर्व अंगाला चंदन लावी आणि पाठीला चंदन लावण्यासाठीं तेथील दगडाच्या खांबाला चंदन लावून त्या दगडावर आपली पाठ घासून घेई.

एकदां दगडावर खोदकाम करणारा एक शिल्पकार त्या स्मशानांत गेला व तुळतुळीत दगड पाहून त्यानें त्या दगडावर देवीची मूर्त कोरून काढली.

त्यानंतर कांहीं वेळानें एक विद्याधरी तिकडे आली. तिनें महाकालाची आराधना केली. खांबावर गौरीची मूर्त कोरलेली पाहून तिला वाटलें खांबांत गौरी रहात असावी. ती देखील त्या खांबांत शिरून विश्रांती घेत बसली.

थोड्या वेळानें निश्चयदत्त नित्यनियमा-प्रमाणें त्या खांबाजवळ आला व देवीची मूर्त पाहून त्याला आश्चर्य वाटलें. त्यानें खांबाच्या मागच्या बाजूला चंदन लावलें व आपली पाठ त्यावर घासली.

खांबांतल्या विद्याधरीनें त्याला पाहिलें व त्याच्या सौंदर्यावर भाळली. याच्या पाठीला चंदन लावणारी कोणी नसेल, असें तिला वाटलें. ती खांबाबाहेर हात काढून निश्चय-दत्ताच्या पाठीला चंदन लावूं लागली.

श्री प्रभाकर गवंडे



तिच्या हाताचा स्पर्श झाल्यावर व लगेच तिच्या बांगड्यांचा आवाज ऐकूं आल्यावर निश्चयदत्त चकित झाला व हात वळवून मागें त्यानें चटदिशीं तिचा हात धरला.

"सोड हात! कां धरलास हात माझा? माझी काय चूक?" विद्याधरीनें खांबांतूनच विचारलें.

"तूं कोण हें तूं समोर येऊन सांगेपर्यंत मी नाहीं सोडणार हात!" निश्चयदत्त म्हणाला. विद्याधरी खांबांतून बाहेर आली व निश्चयदत्तसमोर बसून तिनें आपलें जीवनवृत्त सांगितलें.

हिमालय पर्वताच्या एका शिखरावर पुष्करावती नगरींत विद्याधर नांवाचा एक विद्याधर राज्य करीत असे. त्याची ती मुलगी होती. अनुरागपरा असें तिचें नांव होतें. ती महाकालाच्या पुजेसाठीं आली होती आणि त्या खांबांत विश्रांती घेत बसली असतां निश्चयदत्ताला पाहून त्याच्या रूपावर भाळली. म्हणून साहस करून तिनें त्याच्या पाठीला चंदन चोळलें. असें थोडक्यांत आपलें वृत्त सांगून तिनें त्याचा निरोप मागितला.

"दुष्ट कुठली! माझें मन चोरून तूं पळून जाणार होय? मी नाहीं जाऊं देणार!" निश्चयदत्त म्हणाला.

"तूं आमच्या गांवीं आलास तर मी तुझ्याबरोबर लग्न करून तुझी पत्नी म्हणून रहायला तयार आहें. तूं तिकडे यायला तयार असशील तर वाटदेखील तुला कळेल." असें सांगून ती त्याच्याकडे प्रेमानें पहात आकाशांत उडूं लागली.

पुष्करावती नगरीस जावें लागलें तरी चालेल पण अनुरागपराचा विसर होणें अशक्य! यत्न करून पहावा. यश मिळालें तर ठीकच. पण यत्न केल्याशिवाय स्वस्थ बसून राहाणें त्याला आवडेना. तो उत्तरेकडे निघाला.

वाटेंत त्याला तीन वैश्य तरुण भेटले. ते देखील उत्तरेकडेच जात होते. म्हणून तिघे बरोबरच निघाले.

कांहीं अंतर चालून गेल्यावर ते ताजिक जातीच्या देशांत येऊन पोंचले. ताजिक जातीच्या लोकांनीं या चौघांना धरलें आणि एका श्रीमंत ताजिक व्यापाऱ्याच्या हातीं त्यांना विकून टाकलें. त्या व्यापाऱ्यानें त्यांना आपल्या राजाकडे नजराणा म्हणून पाठवून दिलें. ते ताजिक देशाच्या राजधानीजवळ पोंचले असतील त्याच वेळीं, दैवयोग असा कीं राजा मरण पावला. म्हणून ताजिक व्यापाऱ्याच्या नोकरांनीं राजाच्या मुलाजवळ विनंती केली कीं त्यांच्या धन्यानें राजाकडे नजराणा म्हणून त्या चौघांना पाठविलें होतें. तर युवराजानें तो नजराणा स्वीकारावा. असें सांगून त्यांनीं निश्चयदत्त व तिघां वैश्य तरुणांना युवराजाकडे सोडलें व ते निघून गेले.

"असें होय! तर मग माझ्या वडिलांची समाधी बांधतांना त्यांच्या प्रेताबरोबर या चौघांना पण पुरावें. तोंपर्यंत यांना तुरुंगांत



ठेवावें." अशी युवराजानें आपल्या नोकरांना आज्ञा केली.

राजाच्या शिपायांनीं चौघांना एका झोंपडींत नेऊन ठेवलें. आपल्याबरोबरचे तिघे तरुण घाबरून गेलेले पाहून निश्चयदत्त त्यांना म्हणाला—"घाबरून जाऊन थरथर कांपत राहाल्यानें तुमच्यावरचें संकट टळेल असें वाटलें का तुम्हांला. मरायचेंच आहे तर हंसत खेळत मरण्याची तयारी कां ठेवीत नाहीं? नाहींतर सर्वांचें रक्षण करणाऱ्या दुर्गामातेचें तरी स्मरण करा." असें सांगून त्यानें महादेवाचें स्मरण केलें



व मनांतल्या मनांत त्याला नमस्कार करून निश्चिंतपणें झोंपला.

त्याला दृष्टांत झाला. देवीनें स्वप्नांत येऊन त्याला सांगितलें, तूं बंधनमुक्त झाला आहेस. तूं तुला वाटेल तिकडे निघून जा. चौघांची झोंप मोडली व पाहतात तर चौघांचीं बंधनें तुटलेलीं. त्यांना फार आनंद झाला.

रात्र अजून बरीच उरली होती. चौघे उठले आणि झोंपडींतून बाहेर निघाले आणि उजाडण्यापूर्वीं बरेंच दूर जाऊन पोंचले.

निश्चयदत्त उत्तरेकडेच जात राहाला. पण इतर तिघे म्हणाले—“ उत्तरेकडे म्लेंच्छांचें राज्य आहे. नुकतेच एका संकटांतून मुक्त झालों आहों. पुन्हां दुसरें संकट नको यायला. म्हणून आम्ही दक्षिणे-कडेच जातों.”

“ठीक ! तुमची मर्जी !” असें सांगून निश्चयदत्त पुढें निघाला. त्याला अनुराग-परांला भेटायचें होतें. म्हणून तो उत्तरेकडेच चालत राहाला.

वितस्ता नदीच्या काठीं त्याला तिघे शाक्त लोक भेटले. सर्व नदी पार करून पलीकडे गेले. सूर्यास्ताच्या आधीं जेवण वगैरे आटोपून ते पुढें निघाले आणि एका रानांत येऊन पोंचले.

त्या वेळीं त्यांना कांहीं लाकूडफोडे रानांतून लाकडें फोडून परत येत असलेले दिसले. त्यांनीं त्यांना विचारलें—“ कोठें निघालांत इकडे ! काळोख पडला आहे. जवळपास कोठें गांव नाहीं. तसें या रानांत एक जुनें शंकराचें देऊळ आहे. पण रात्रीं त्यांत राहणें हिताचें नाहीं. या रानांत श्रृंगोत्पादिनी नांवाची एक यक्षिणी राहाते. तिच्या नजरेला जो कोणी दिसतो त्याच्या डोक्याला शिंगें येतात. ती त्यांना जनावरें करून टाकते व त्यांना खाते.

परंतु त्या शाक्त लोकांनीं त्या लाकूड फोड्यांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केलें. ते निश्चयदत्ताला म्हणाले—“ आम्ही नेहमीं श्मशानांतच राहतों. आम्ही पाहिल्या आहेत पुष्कळ यक्षिणी ! आम्ही हिला पाहून भिऊन जाऊं असें का वाटतें तुम्हांला ?” असें सांगून ते शंकराच्या देवळाकडे निघाले. निश्चयदत्ताला पण त्यांच्याबरोबर जावें लागलें. तो पण त्यांच्याबरोबर देवळांत गेला.

शंकराच्या देवळांत शाक्तांनीं राखेचें एक मंडळ केलें व आंत जाऊन अग्नि पेटवून ते कोणता तरी मंत्र जपूं लागले.

मध्यरात्रीच्या सुमारास श्रृंगोत्पादिनी तेथें आली. ती मंडळाच्या बाहेर उभी राहाली. ती नृत्य करूं लागली व एका शाक्त माणसाकडे पाहून आपला मंत्र म्हटला. त्या बरोबर त्याच्या डोक्यावर एक शिंग उगवलें.

तो शाक्त उठून उभा राहाला व नाचत नाचत जाऊन त्यानें अग्नींत उडी टाकली. यक्षिणीनें त्याला आगींतून काढून खाऊन टाकलें.



अशा तऱ्हेनें यक्षिणीनें एका मागून एक तिघां शाक्तांना त्यांच्या डोक्यावर शिंगें उगवून खाऊन टाकलें. ते गात नाचत आगींत जाऊन पडत. चांगले भाजून निघाल्यावर तिनें त्यांना खालें. तिनें तिघांना खालें असल्यानें तिला मद चढला असावा. त्याच धुंदींत तिनें कंकाल किन्नरनी काढून ठेवली व बेशुद्ध स्थितींत जमिनीवर आडवी पडून राहाली.

निश्चयदत्त तें पाहून क्षणार्धांत उडी मारून तिच्याजवळ गेला. कंकाल किन्नरनी उचलून घेतली. तिनें म्हटलेला शिंग उगवणारा मंत्र त्यानें चारदां ऐकला होता. म्हणून तो त्याला तोंडपाठ झाला होता. यक्षिणीकडे पाहून त्यानें तो मंत्र म्हटला. यक्षिणीच्या डोक्यावर शिंगें उगवलीं. ती शुद्धीवर येऊन निश्चयदत्ताच्या पायां पडली व म्हणाली—

“मी बाई माणूस. माझ्यावर दया कर. मंत्र म्हणूं नकोस. तूं म्हणशील तें करायला मी तयार आहें. तुला हवें असेल तर तुला अनुरागपराकडे पोंचतीपण करीन.

यक्षिणीच्या विनवण्या ऐकून त्यानें मंत्र मागें घेतला. वचन दिल्याप्रमाणें ती त्याला आपल्या पाठीवर बसवून घेऊन आकाशांत उडूं लागली व उजाडण्यापूर्वी पुष्करावतीला घेऊन पोंचली.

अनुरागपराला दिव्य दृष्टीनें तिचा प्रियकर येत असल्याचें कळलें होतें. ती त्याच्या स्वागतासाठीं आपल्या वडिलांच्या धरून निघाली. तिला भेटून निश्चयदत्ताला फार आनंद झाला. नंतर निश्चयदत्त व अनुरागपरा यांचा विवाह पुष्करावती नगरींत थाटामाटानें विद्याधर देशाच्या रीतीप्रमाणें पार पडला.





# माकडचेष्टा

एका गांवीं एक म्हातारा रहात असे. एकदां तो शिधोरी बांधून घेऊन डोंगरावर गवत कांपण्यासाठीं निघून गेला. त्यानें शिधोरी एका झाडाच्या फांदीला बांधून ठेवली होती.

तो गवत कांपून थोडा वेळ दम घ्यायला झाडाखालीं येऊन बसला. तेवढ्यांत कोठून तरी माकडांची एक टोळी आली आणि फांदीला बांधून ठेवलेली शिधोरीची पुरचुंडी काढून घेऊन त्यांनीं फस्त करून टाकली.

हें सर्व डोळ्यांनीं पहात असून म्हातारा कांहीं बोलला नाहीं. निःशब्दपणें पहात बसून राहाला. माकडांनीं त्याला पाहिलें, पण असेल दगडाची मूर्त असें समजून निश्चिंतपणें त्याची शिधोरी खाऊन टाकली. पण आश्चर्य म्हणजे, तीं कोठून तरी पैसे घेऊन आलीं व म्हाताऱ्यासमोर ते टाकून निघून गेलीं. तोंपर्यंत म्हातारा जागचा हलल्याशिवाय बसून राहाला.

जवळच्या एका पारावरच्या मूर्तीसमोर येणारे जाणारे लोक पैसे टाकीत. तें माकडांनीं पाहिलें होतें. ते पैसे गोळा करून त्यांनीं ठेवले होते आणि ते पैसे त्यांनीं म्हाताऱ्याला दिले.

माकडें निघून गेल्यावर म्हातारा हंसला. आणि ते पैसे घेऊन घरीं गेला. त्याला ती सर्व ईश्वरी कृपाच वाटली.

वाटेंत त्यानें स्वतःसाठीं व बायकोसाठीं नवीन कपडे विकत घेतले. घरीं गेल्यावर बायकोला सर्व पैसे नेऊन दिले. भाग्य उदयास आलें असें त्यांना वाटलें. त्या दिवशीं म्हातारीनें पंच पक्वान्नांचें जेवण तयार केलें.

श्री गो. स. सुतार

दोघे जेवायला बसले. त्याच वेळीं म्हातारी शेजारीण आली. तिनें त्यांना विचारलें—"अहो, आज तुमच्याकडे दिवाळी उजाडली कीं काय? काय छान छान कपडे आहेत आणि, पंच पक्वान्नांचें जेवण! आहे तरी काय?"

म्हातारीनें शेजारणीला जेवायला वाढलें आणि माकडांच्या कृपेनें भाग्य कसें उदयास आलें तें सांगितलें.

शेजारीण घरीं गेली. तिनें आपल्या नवऱ्याला माकडांची गोष्ट सांगितली आणि म्हणाली—"तुम्ही कां नाहीं जाऊन माकडांनीं दिलेले पैसे आणीत?" शेजारी, बायकोच्या सांगण्याप्रमाणें भाग्याची परीक्षा पाहायला तयार झाला.

दुसऱ्या दिवशीं म्हाताऱ्या शेजारणीनें नवऱ्याला शिभोरी बांधून दिली. तो ती घेऊन रानांत गेला आणि झाडाच्या फांदीला बांधून झाडाखालीं मूर्तीसारखा निःस्तब्ध बसून राहाला.

थोड्या वेळानें माकडें आलीं. त्यांनीं शिभोरी खाऊन टाकली. म्हाताऱ्याकडे टक लावून कांहीं वेळ पहात राहालीं. नंतर त्यांना काय वाटलें कोणास ठाऊक, तीं म्हाताऱ्याला उचलून घेऊन जाण्याचा यत्न करूं लागलीं. म्हाताऱ्याला गुदगुल्या होऊं लागल्या व तो हंसूं लागला. तेव्हां तो मूर्त नसून मनुष्य असल्याचें माकडांना कळलें. त्यांनीं त्याला बोचकारलें व ओरबाडलें. म्हाताऱ्याचें सर्व अंग रक्तबंबाळ झालें.

म्हातारा कण्हत कसाबसा घरीं आला. तेव्हां त्याची बायको आपल्या जुन्या कपड्यांची होळी करून नव्या कपड्यांची वाट पहात बसली होती.





# शंखध्वनी

अरवली पर्वतांत शंखचूड नांवाचें एक छोटेखानी राज्य होतें. तेथें रजपूत वंशाचे राजे राज्य करीत असत. तेथल्या किल्ल्याच्या बुरुजांत एक शंकराचें देऊळ होतें. शिवलिंगासमोर एक शंख होता. तो शंख प्रत्यक्ष राजानें वाजवला तरच वाजे आणि राजाच्या वारसदारांपैकीं आणखी कोणी तो वाजवला तरी वाजत नसे असें लोक म्हणत.

उत्तर हिंदुस्थानांत हिंदुमुसलमानांचें युद्ध चालू असतां शंखचूड देशाच्या राजा रणसिंह यानें रजपुतांना मुसलमानांविरुद्ध मदत करण्याचें ठरविलें. त्यानें आपला भाऊ कृपाणसिंह याला देखील बरोबर न्यायचें ठरविलें. त्यांचें सैन्य मोहिमेच्या तयारीनें सज्ज करण्यांत आलें. दोघां भावांचे घोडे पण तयार होते.

रणसिंह आपल्या भावाला बरोबर घेऊन वर बुरजावर चढून गेला. शंकराच्या देवळांत देवाला नमस्कार करून शिवलिंगासमोर जो शंख ठेवलेला होता तो घेऊन त्यानें वाजविला. एक विचित्र आवाज प्रजेला राज्यभर ऐकूं आला. आनंदानें व वीररसानें सर्वांचीं हृदयें उचंबळून आलीं.

रणसिंहानें शंख यथा स्थानी ठेवून दिला. नंतर तो आपला भाऊ कृपाणसिंह याला म्हणाला—"कृपाण! यदाकदाचित मी या युद्धांत ठार झालों तर तूं येथें देवळांत येऊन हा शंख वाजव आणि राज्याचा अधिपती म्हणून राज्य कर!"

कृपाणसिहानें एकदां चारी बाजूला दृष्टि फिरविली. त्याला बुरुजावरून दूरदूरचे डोंगर व दऱ्या दिसत होत्या. त्याचें राज्य म्हणजे

श्री ल. व. क्षीरसागर



खरोखरच नैसर्गिक सौंदर्यानें भारावलेला एक अतिसुंदर देश होता. आपल्या देशाहून सुंदर देश या जगांत कोठें असणार असें त्याला वाटलें.

दोघे भाऊ बुरुजावरून खालीं उतरले व घोड्यावर बसून आपलें सैन्य घेऊन उदयपुराच्या दिशेनें कूच करीत निघाले.

त्या वेळीं कृपाणसिंहाच्या मनांत मुसलमानांशीं होणाऱ्या युद्धांत जय मिळणार कीं पराभव याचा विचार मुळींच नव्हता. आपण स्वतःच या देशाचे अधिपती झालों तर किती बरें होईल ! परंतु मोठा भाऊ जिवंत असेपर्यंत तें अशक्य, ही गोष्ट त्याच्या मनाला बोचत होती.

रणसिंह एक साहसी व पराक्रमी योद्धा होता. तो रणांगणावरून पाठ फिरवून परत येणें शक्य नाहीं. मुसलमानांचें सैन्य मोठें असेल तर नक्कीच युद्धांत रजपुतांचा पराभव होणार व भाऊ त्यांत ठार होणार. परंतु भाऊ रणांगणावर मेला नाहीं तर ! तें नको व्हायला पाहिजे. कृपाणसिंह स्वतः मुसलमानांशीं युद्धाला मुळींच तयार नव्हता. भावानें बोलविलें म्हणून तयार झाला. युद्धांत भाऊ मरण पावला कीं आपणाला गादी मिळेल ही आशा मनांत बाळगून तो युद्धभूमीवर आला होता. भाऊ रणांगणांत मेला नाहीं तर स्वतःच त्याचा वध करावा असेंदेखील त्यानें मनाशीं ठरविलें. परंतु तो तसा मेला तर लोक त्याच्यावर संशय करतील. म्हणून त्यानें मारेकरी नेमून भावाचा खून करण्याचें ठरविलें. पैशाच्या लोभानें कोणी तरी हें कृत्य करायला तयार होईल यांत त्याला मुळींच शंका नव्हती.

त्याला तसे तीन सैनिक त्याच्याच सैन्यांत आढळले. त्यानें त्यांना पैसे चारून आपल्या मोठ्या भावाचा खून करायला आणि त्याचें प्रेत कोठें तरी पुरून टाकायला सांगितलें.

पुढें कांहीं दिवसांनीं रजपुतांचें सैन्य यमुनेकांठीं छावणी टाकून रहात असतां कृपाणसिंहानें नेमलेल्या मारेकऱ्यांनीं काम पुरें झाल्याचें येऊन त्याला सांगितलें. म्हणाले—"महाराज आपल्या डेऱ्यांत झोंपले असतां त्यांना ठार करून त्यांचें प्रेत यमुनेंत टाकलें आहे." कृपाणसिंहानें त्यांना इनाम देऊन निरोप दिला.

दुसऱ्या दिवशीं रणसिंह एकाएकीं नाहींसा झाल्याचें वर्तमान छावणीभर पसरलें. 'तो डेऱ्यांत नाहीं व ज्या बिछान्यावर झोंपला होता त्यावर रक्ताचे डाग आहेत.' हें वर्तमान कळल्यावर कृपाणसिंहानें आपला भाऊ वारल्याबद्दल फार वाईट वाटत असल्याचें सोंग केलें. तो सेनापतींकडे गेला व म्हणाला—"आतां मला आपल्या सैन्यासह परत स्वदेशीं जावेंसें वाटतें. नाहीतर राज्यांत बंडाळी होईल." आपल्या सहकारी रजपूत सेनापतीचा निरोप व परवानगी घेऊन तो चंद्रचूड देशांत परत आला.

रणसिंहाच्या मृत्यूची गोष्ट ऐकून प्रजा फार दुःखी झाली. "भावाच्या आज्ञेप्रमाणें





मला राज्यकारभार हातीं घ्यावा लागत आहे." असें सांगून त्यानें भावाची सर्व उत्तरक्रिया केली आणि राज्यारोहणाची तयारी करूं लागला.

तो परत आला त्या दिवसापासून पुजे-साठीं म्हणून तो दररोज बुरुजावर चढून जाई आणि शंख वाजविण्याचा यत्न करी. परंतु शंखांतून फक्त वाराच बाहेर येई. आवाज मुळींच येत नसे. म्हणून त्या शंखाविषयीं त्यानें कोणत्याहि प्रकारें कोणाजवळ उल्लेख केला नाहीं. उलट कोणी तो विषय काढला तर तो, विषय बदलून दुसऱ्याच विषयावर बोलूं लागे. राज्याभिषेकापूर्वीं राज्याच्या रीतीप्रमाणें वारसानें तो शंख वाजविलाच पाहिजे असें राज्याच्या मुख्य पुरोहितानें सांगितलें. परंतु कृपाणसिहानें "हे जुने अंधविश्वास घेऊन काय बसला आहांत, गुरुजी!" असें सांगून उडवाउडवी केली.

राज्याभिषेकाचा दिवस उजाडला. राज्या-रोहण समारंभ थाटानें पार पडला. नव्या राजाची स्वारी हत्तीवर निघाली होती. मेजवान्या देण्यांत आल्या. निरनिराळ्या चढाओढी व सामने झाले. रात्रीच्या मेजवानीला सर्व मानकरी व राज्याचे मुख्य सरदार हजर होते. कृपाणसिंहाच्या आनंदाला पारावार नव्हता.

इतक्यांत शंखध्वनी झाला. मेजवानींत बसलेल्या प्रत्येकाच्या तोंडावर आश्चर्य झळकूं लागलें. कृपाणसिंहाचें रक्त गोठल्यासारखें झालें. त्याला काय करावें हें सुचेना.

"महाराजांनींच...." असें कोणीतरी म्हणाला. कोणाला त्यांत संशय वाटत नव्हता. सर्व राज्यारोहण समारंभ विसरले आणि मेजवानीच्या मांडवांतून बाहेर पडले. त्यांची दृष्ट बुरुजाकडे होती. त्यांना बुरुजावर रणसिंह शंख वाजवीत असलेला दिसला.

रणसिंह बुरुजावरून खालीं उतरून आला. आपल्या अनुयायांना प्रेमालिंगन करून म्हणाला—"श्री एकलिंगजींच्या कृपेनें मी जिवंत आहें. मला ठार करण्याचा ज्यांनीं प्रयत्न केला त्यांनीं मला नदींत फेंकलें हें माझ्या हिताचेंच ठरलें. अंगाला थंड पाणी लागल्यामुळें मी लवकरच शुद्धीवर आलों. कांहीं रानटी लोकांनीं मला बाहेर काढलें व माझी सेवा शुश्रूषा केली. मी आपल्या विश्वासघातक खुनी सैनिकांना धरलें आहे. मी मेलों असें समजून ते फुशारक्या मारीत हिंडत होते. त्या तिघांचा वध करून मी त्यांना त्याचें प्रायःश्चित्त दिलें आहे."

"महाराज! हा एवढा अन्याय व अत्याचार कोणी केला असावा असें आपल्याला वाटतें? कोणी पैसे चारल्या-शिवाय त्या गरीब बिचाऱ्यांना हें धाडस करण्याचें सुचलें नसतें."

रणसिंहानें एकदां सर्वांवर नजर फिरवून पाहिलें. कृपाणसिंह दिसला नाहीं तेव्हां म्हणाला—"कोणी का असेना, हें पापकर्म भुतासारखें सतत त्याचा पाठलाग करीत राहील. त्याला आयुष्यभर स्वस्थचित्तता लाभणार नाहीं. म्हणून त्याला निराळा दंड देण्याची गरजच नाहीं."

सर्व मेजवानीच्या मांडवांत गेले. तेथें कृपाणसिंह नव्हता. भाऊ जिवंत असल्याचें कळतांच तो पळून गेला होता.

दुसऱ्या दिवशीं रणसिंहाच्या सत्कारार्थ पुन्हां सभा भरली. तोंपर्यंत कृपाण-सिंहानेंच भ्रातृद्रोह केला असल्याचें सर्वांना कळलें.





# उंदराची मदत

शंकराचार्य अद्वैत सिद्धांताचा प्रसार करीत फिरत असतां चिदानंद नांवाच्या एका ब्रह्मचारी संन्याश्यानें आपल्या शिष्यांसह येऊन शंकराचार्यांजवळ अद्वैताचा अभ्यास करण्याचें ठरविलें. परंतु चिदानंद स्वामींना किंवा त्यांच्या शिष्यांना संस्कृत भाषेचा गंध पण नव्हता. म्हणून एका गांवीं जाऊन त्यांनीं एका विद्वान पंडिताकडे संस्कृत भाषेचा अभ्यास करण्यास मदत करावी अशी विनंती केली. ती ऐकल्यावर संस्कृत शिकवायला तो पंडित तयार असावा असें दिसलें. परंतु त्याच्या बोलण्या वागण्यावरून त्याच्या मनांत कोणती तरी शंका असावी असें दिसलें.

तें ओळखून चिदानंद स्वामी म्हणाले— "गुरुवर्य! मला व माझ्या शिष्यवर्गाला संस्कृत शिकविण्यास कांहीं हरकत असेल तर आपण काय तें खुशाल सांगावें."

"हरकत आणखी कसली नाहीं. आमच्या या प्रांतांत दुष्काळ पडला आहे. तुम्हांला संस्कृत भाषेचा अभ्यास निदान एक वर्षभर तरी करावा लागेल. इतके दिवस आमच्या गांवचे लोक तुम्हांला पोटा पाण्याला पुरेल एवढी भिक्षा घालूं शकतील कीं नाहीं, एवढी एकच एक शंका माझ्या मनांत आहे."

"त्यांत काय! परमेश्वराची इच्छा असेल तसेंच होईल!" चिदानंद स्वामी म्हणाले.

गांवाच्या एका टोंकाला एक लहानसा मठ होता. चिदानंदस्वामी आपल्या शिष्यवर्गासह त्या मठांत राहूं लागले. तो संस्कृत पंडित दर रोज येऊन त्यांना संस्कृत शिकवी. शिष्यवर्ग गांवांतून भिक्षा मागून आणी व सर्व ती वांटून घेत. चिदानंदस्वामी पंडिताजवळ जें शिके तें आपल्या शिष्यवर्गाला शिकवी. अशा तऱ्हेनें विद्याभ्यास जोरानें चालू होता.

अशातऱ्हेनें एक आठवडा गेला. एकदां चिदानंदस्वामी आपल्या शिष्यांना संस्कृत शिकवीत असतां एक लहानसा उंदीर तेथें आला आणि स्वामींच्या समोर भाताचा (साळीचा) एक दाणा ठेवून निघून गेला. कांहीं वेळानें तो पुन्हां आला आणि एक दाणा ठेवून निघून गेला. दोन तीन घटकांत तो कित्येकदां आला आणि स्वामींसमोर एकेक दाणा ठेवीत गेला.

"हें विचित्र दिसतें आहे. याच्या पाठीमागें खात्रीनें त्या परमेश्वराची प्रेरणा असणार" असें सांगून चिदानंद स्वामीनें दिवा घेतला आणि तो उंदीर कोठें जातो हें पाहण्यासाठीं मठाबाहेर गेले. तो उंदीर दाणा घेऊन आला तेव्हां मठाच्या आंत येणाऱ्या एका भोकांतून बाहेर निघून दूर जमिनीवर कोठेंतरी पळत निघाला. नंतर एका बिळांत शिरला व अदृश्य झाला.



सौ. विमला ठकार

नंतर बराच वेळ वाट पाहली तरी तो दिसला नाहीं. तें बीळ एका खडकाळ जागीं होतें.

दुसऱ्या दिवशीं उजाडतांच चिदानंद स्वामी पंडिताकडे आले तेव्हां त्यांनीं रात्रीं जी गंमत पाहिली होती ती वर्णन करून सांगितली.

“निर्जन प्रदेशांतून उंदीर धान्य घेऊन येत आहे तर खरोखरच शोध लावलाच पाहिजे कीं हें धान्य कोठून येतें. गांवच्या पाटलाच्या मदतीनें त्या बिळाजवळची जमीन खणली पाहिजे.”

पंडित पाटलाकडे गेला. स्वामी चिदानंद-यांच्याकडून त्याला जें कांहीं कळलें होतें तें त्यानें पाटलाला सांगितलें आणि म्हणाला—“आठ दहा जणांना लावा, ती जागा खणायला.” त्या प्रमाणें पाटील कांहीं कुदळी व फावडी आणि मजुरांना-बरोबर घेऊन मठाजवळ गेला आणि चिदानंद स्वामीनें मठामागची बीळ असलेली जागा दाखविली.

एक तासभर खणल्यानंतर त्यांना जमिनी-खालीं दडलेलें एक जुनाट कोठार दिसलें. त्यांत धान्याचे ढीग होते व त्यांवर बसून उंदरांची मेजवानी चालली होती.

गांवच्या पाटलानें सर्व धान्य उचलून गांवांत नेलें. गांवकऱ्यांना त्यांतलें आवश्यक तेवढें धान्य वांटलें व जें उरलें तें कोठारांत भरून ठेवून दिलें. अशा तऱ्हेनें उंदरांच्या मदतीनें गांवावरचें दुष्काळाचें संकट टळलें.

दुसऱ्यावर्षी चांगला पाऊस पडला, म्हणून सर्वत्र सुबत्ता नांदूं लागली. उंदरानें केलेली ही मदत गांवावरचें एक मोठें संकट टळण्यास उपयोगी ठरली.





# कृष्णावतार

कालिंदी नदीच्या काठीं एक गांव होतें. त्या गांवीं गाई, वासरें व बैल पुष्कळ. गांवच्या बायका दूध दुभत्याचें काम करण्यांत प्रसिद्ध होत्या. गांवांत सदा आनंदीआनंद असे. वसुदेवाच्या सूचनेवरून नंद त्या गांवीं सकुटुंब निघाला. गांवच्या प्रमुखांनीं त्याचें स्वागत केलें. नंदानें त्यांची कुशलवार्ता विचारली. सर्वांचा परिचय झाला व नंद त्यांच्या गांवीं जाऊन राहूं लागला. वृद्ध गोपींनीं नंदाच्या घरीं येऊन यशोदेचें व तिच्या मुलाचें अभिनंदन केलें. मुलाचें बारसें थाटानें झालें. त्याच्या सावळ्या रंगावरून त्याचें नांव कृष्ण ठेवण्यांत आलें. रोहिणी पण आली. नंदानें तिचा सर्व प्रकारें सत्कार केला. कृष्ण गोपींचा लाडका बाळ झाला. त्याला आपलें व परक्याचें घर असा फरक मुळींच कधीं कळला नाहीं.

कंसाला वसुदेवाचा मुलगा जिवंत असल्याचें योगमायेच्या तोंडीं कळलेंच होतें. म्हणून त्यानें कित्येक राक्षसांना शिशुहत्येच्या कामावर नेमलें होतें. त्यांत पूतना नांवाची एक भयंकर राक्षसीण होती. तिची आकृति भयंकर होती. ती रात्रीं गांवांत शिरली. तिची नजर मुलांवरच होती. बालकृष्णाला पाहून ती थांबली.



मुलगा सुंदर व तेजस्वी दिसला. इतर मुलांहून अगदीं निराळा. तिला वाटलें कीं हाच असावा कंसवध करण्यासाठीं जन्मलेला मुलगा.

तो विचार मनांत येतांच तिचा पारा चढला. दांत ओठ चावून ती त्याच्याकडे पाहूं लागली. तिच्या डोळ्यांतून जणुंकांहीं ठिणग्या झडूं लागल्या. कपाळाला आठ्या पडल्या. नागसांपाच्या फूत्कारासारखा श्वासोच्छ्वास जोरजोरानें सुरू झाला. तिनें आईच्या कुशींत झोपलेल्या मुलाला उचलून मांडीवर घेतलें आणि आपले विषारी स्तन त्याच्या तोंडांत कोंबले. कृष्ण जोरानें रडला. पण तें रडण्याचें सोंगच होतें. कारण त्यानें पूतनेचे दोन्ही स्तन घट्ट धरून तिचें दूध नव्हे तर तिचें रक्त शोषण करून तिला नको जीव करून सोडलें होतें, इतकें कीं शेवटीं ती मोठ्यानें ओरडली व धाडदिशी जमिनीवर मरून पडली.

तिचा तो भयंकर आवाज ऐकून गांव-भरच्या गवळणी जाग्या झाल्या आणि नंदाच्या घरीं धांवून आल्या. कृष्ण रडला त्याच वेळीं यशोदा जागी झाली होती. कुशींत मुलगा नाहीं हें पाहून तिनें नंदाला जागें केलें. नंद आला व शेजारचे गवळी पण धांवले. तेव्हां त्यांना पूतनेचें तें भयंकर रूप दिसलें. ती उताणी जमिनीवर मरून पडली होती आणि तिची छाती धरून माकडाच्या पिलासारखा कृष्ण बसला होता. यशोदा व नंद दोघांनीं आपल्या लाडक्याचा तो पराक्रम पाहिला व म्हणाले—"शाबास बाळा!" आणि मुलाला उचलून घेतलें.

"ही राक्षसीण इकडे कोठून कशी काय आली? हिनें मुलाला उचललें तें



तुला नाहीं का कळलें?" नंदानें यशोदेला विचारलें.

"मुलाला दूध पाजून मी झोपविलें. दिवा होता. बराच वेळ मी जागी होतें. केव्हां डोळा लागला कोणास ठाऊक! तसा जास्त वेळ सुद्धां झाला नाहीं. ही राक्षसीण कोठून आली, कशी आली तें त्या देवालाच माहीत! मुलाला उचलून घेण्यांत तिचा काय हेतू होता नकळे. परंतु त्या राक्षसिणीच्या हातीं त्याच्या केसालादेखील धक्का लागला नाहीं. देवाची दया!" यशोदा म्हणाली.

कृष्ण केवढ्या मोठ्या संकटांतून वांचला? प्रत्येक गवळ्याच्या मनांत तोच विचार होता. त्यांना फार आनंद झाला. त्यांनीं पूतनेचा देह एका बाजूला ओढून नेला. नंदानें आपल्या लाडक्याला उचलून घेतला. यशोदेनें आपल्या बाळाची दृष्ट काढली.

एकदां वसुदेवानें गर्ग नांवाच्या आपल्या भटजींना कंसाच्या नकळत गोकुळीं पाठविलें. त्यानें रोहिणीच्या मुलाचें नांव बलराम व यशोदेच्या मुलाचें नांव कृष्ण ठेवलें.

नंदाच्या आनंदाला पारावार नव्हता. त्यानें ब्राह्मणांना बोलावून वस्त्रदान व



गोदान केलें. गोपूजा केली. गोपगोपींनीं नंद यशोदेचें अभिनंदन केलें.

तिकडे मथुरेला, इकडे पूतनेची जी दुर्गती झाली त्याची बातमी कंसाला कळली. त्याच्या राक्षस दूतांनीं सर्व वर्तमान त्याला कळविलें. कंसाला नंदाच्या मुलाचें भय जास्तच वाटूं लागलें. त्यानें नंदाच्या मुलाचा शेवट जो करील त्याला मोठें बक्षिस मिळेल असें जाहीर पण केलें. तें ऐकून शकटासुर नांवाचा एक राक्षस अदृश्यपणें गोकुळीं गेला व नंदाच्या गाडींत शिरून संधी पहात बसला.

       

यशोदेनें कृष्णाला गाडीच्या सावलींत एक घोंगडी टाकून निजविलें व स्वतः नदीवर स्नानाला गेली. ती गेल्यावर कांहीं वेळानें कृष्ण जागा झाला व जवळ आई नाहीं हें कळल्यावर तोंडांत बोटें घालून मोठ्यानें रडूं लागला आणि लाथा झाडूं लागला. गाडीच्या चाकाला एक लाथ लागली तेव्हां ती एका बाजूला जाऊन पडली आणि मोडून गेली. शकटासुर ठार झाला.

इतक्यांत यशोदा नदीवरून परत आली व गाडी मोडून पडलेली पाहून धांवत गाडीकडे गेली. गाडी उलटून पडलेली होती. ती "अगोबाई!" म्हणून मोठ्यानें ओरडली आणि मुलाला उचलून पोटाशीं धरलें. "मुलगा झोंपला आहे असें समजून मी वाऱ्यावर झोंपवून गेलें होतें. आतां मुलाचे वडील येऊन रागावतील. पण ही गाडी अशी उलटली कशी? कोणी विचारलें तर मी काय उत्तर देऊं? सर्व मलाच नाहीं नाहीं तें बोलतील!" असे अनेक विचार तिच्या मनांत येत होते. मुलाला मांडीवर घेऊन तिनें त्याला दूध पाजलें.

इतक्यांत नंद आपल्या मित्र गवळ्यां-बरोबर बोलत घरीं आला. त्याचे केस विखुरलेले होते. सर्व अंग धुळीनें माखलेलें होतें. हातांत एक दांडकें होतें. येतांच उलटलेली गाडी व मोडलेलें चाक पाहून त्याचें सर्व अंग शहारलें. कारण त्याच्या मुलाला नेहमीं गाडीखालींच झोंपवीत. गाडी उलटलेली व चाक मोडलेलें. मुलाला तर कांहीं इजा झाली नाहीं? त्याच्या छातींत धस्स झालें.





त्याच वेळीं त्यानें यशोदा कृष्णाला दूध पाजीत आहे हें पाहिलें. तेव्हां कोठें त्याला जिवांत जीव आल्यासारखें वाटलें. कृष्ण त्याच्याकडे पाहून हंसत होता. त्यानें मुलाला उचलून घेतलें आणि यशोदेला विचारलें—"गाडी अशी उलटली कशी?" पण ती तरी काय उत्तर देणार? तिला देखील तेंच आश्चर्य वाटत होतें. मस्त बैलानें येऊन शिंगानें गाडी उलटली असेल कदाचित असा ही एक विचार त्याच्या मनांत आला. "कांहीं असो, देवानें माझ्या मुलाला वांचविलें!" असा विचार करून त्यानें देवाला नमस्कार केला. यशोदा पुढें होऊन म्हणाली—"मुळांत चूक माझी! मुलाला असें उघड्यावर झोंपवून मी नदीवर गेलें होतें. नदीवरून येऊन पाहतें गाडी उलटलेली दिसली. माझें नशीब बलवत्तर! त्याच्या कृपेनेंच माझा मुलगा वांचला!"

इतक्यांत कांहीं मुलें तिकडे खेळत आलीं. म्हणालीं—"अहो! आम्ही डोळ्यांनीं पाहिलें, तुमचा मुलगा लाथा झाडझाडून रडत होता. एक लाथ लागल्याबरोबर गाडी उलटली!"

तें ऐकून नंद व यशोदेला जास्तच आश्चर्य वाटलें. त्यांनीं आपल्या पराक्रमी मुलाची पुन्हां पुन्हां दृष्ट काढली आणि देवाचे आभार मानले.







हां हां म्हणतां ती बातमी गांवभर पसरली. सर्व गांव नंदाच्या घरीं जमा झालें. सर्व चकित झाले. त्यांनीं गाडी सरळ उभी केली. चाक दुरुस्त करून बसविलें आणि घरीं गेले. अशा तऱ्हेनें शकटासुराचा वध झाला.

हळूहळू कृष्ण रांगूं लागला. खाटेला धरून उभा राहूं लागला व चालूं पण लागला. कोणी गुदगुल्या केल्या कीं मोठ्यानें हंसूं लागला. कधीं नंदाचें तर कधीं यशोदेचें बोट धरून चालूं लागला. इतका खेळकर होता कीं नंदाकडे येणारे गोपगोपी त्याला जवळ बोलावीत. तो उभा राहून चालायचा प्रयत्न करी व पडला कीं लोक जवळ जाऊन त्याला उचलून घेत. पुढें कांहीं दिवसांनीं तो रस्त्यावर धांवत जाऊं लागला. मातींत बसून खेळूं लागला.

यशोदा मुलाला लोणी खायला देई. तो लोणी खाई आणि तोंड, हात, पाय, सर्व अंग लोण्यानें माखून घेई.

कृष्ण हळूहळू शेजारच्या गवळणींकडे जाऊं लागला. गवळणी त्याला जवळ बोलावून लोणी खायला देत. पुढें पुढें तो त्यांची रवी धरून उभा राही. त्यांचा पदर ओढे व हट्ट करी कीं पहिल्यानें लोणी खायला द्या. त्यांनीं लोणी खायला दिलें कीं तो आणखी मागे. गोपी लोणी खायला देत. पण म्हणत–"एक पाय नाचिव रे गोविंदा, घागरीच्या छंदा!" आणि कृष्ण खरोखरच नाचूं लागे. त्या आनंदांत गोपी देहभान विसरून जात. लोणी काढायचें बंद करून कृष्णाकडे पहात उभ्या रहात. कृष्ण स्वतःच्या हातानें लोणी उचलून खाई व तें पाहून त्यांना जो आनंद होई तो काय वर्णावा?

पण कृष्ण गोपबालकांना घेऊन गोपींच्या घरांत शिरूं लागला. लोणी

चोरून खाऊं लागला. तो भांडीं उलटून टाकी, साय, दही व लोणी जें मिळे तें स्वतः खाई व आपल्या सवंगड्यांना खायला देई. गोपी कृष्णाला धरायला धांवत. "पकडा, पकडा!" म्हणून त्याचा पाठलाग करीत व त्याला धरून यशोदेकडे घेऊन जात व तो किती दंगा करतो याच्या तक्रारी सांगत.

कृष्ण व त्याचे बालसवंगडी गांवभर फिरत आणि शिंक्यावर ठेवलेलें लोणी, साय, दूध, दही ताक जें मिळे तें खात व भांडीं फोडून पळून जात. मुलांचा धुडगुस इतका सुरू झाला कीं कृष्णाच्या खट्याळ-पणाच्या तक्रारी नंद यशोदेच्या कानावर येऊं लागल्या.

कृष्णाचा व त्याच्या सवंगडी मित्रांचा दंगा एवढ्यावरच थांबला असता तरी भागलें असतें. मुलें गोठ्यांत शिरत व वासरांना सोडून देत. वासरें गाईचें दूध पिऊन टाकीत व बाहेर येऊन नाचत बागडत. मुलें ती गंमत पाहून हंसत.

कृष्ण आपल्या मित्रांना शिकवून देई व सर्व मिळून लोणी कसें चोरायचें याच्या क्लृप्त्या योजीत. ताकाच्या भांड्यांत दूध ओतून ठेवीत. तूप चुलींत नेऊन ओतीत. लोण्याच्या भांड्यांत दही किंवा दुधाच्या भांड्यांत लोणी नेऊन टाकीत. मुलें ओणवी उभी रहात व कृष्ण त्यांच्या पाठीवर चढून शिंक्यावरचें दही व लोणी खाई व सर्वांना खायला देई.

अशातऱ्हेनें कृष्णानें व त्याच्या मित्र-मंडळीनें सर्व गोकुळांत असा धुमाकूळ माजविला कीं त्यांना कसें ताळ्यावर आणावें हें कोणाला सुचेना.





# अरण्यपुराण

[६]

मोंवलीनें मनुष्यांची भाषा शिकून घेण्याचें ठरविलें. जंगलांत रहात असतां त्याला प्रत्येक जातीच्या जनावराची भाषा येत होती. मेस्सुवाच्या तोंडांतून जो शब्द किंवा वाक्य निघे त्याची आवृत्ति मोंवली करी. काळोख पडण्यापूर्वी झोपडींतल्या सर्व वस्तूंचीं नांवें मोंवलीला तोंडपाठ झालीं.

रात्रीं झोंपतांना एक मोठा प्रश्न उत्पन्न झाला. पिंजऱ्यासारख्या त्या झोंपडींत त्याला झोंप येईना. दरवाजा बंद करतांच मोंवली खिडकींतून बाहेर निघून गेला.

"त्याला जिकडे जायचें असेल जाऊन झोंपूं दे. कारण कधीं तो अंथरुणावर झोंपला नाहीं. तो आपला मुलगा म्हणून आला आहे तर तो आपल्याला सोडून कधीं जाणार नाहीं." मेस्सुवाचा नवरा तिला म्हणाला.

मोंवली शेतांत जाऊन हिरव्या गार गवतावर जाऊन झोंपला.

त्याला घडलेल्या गोष्टी आठवूं लागल्या. काळ्या वाघानें त्याला 'लालफूल' आणायला सांगितलें होतें तेव्हां तो थोडासा विस्तव एका घरांतून उचलून घेऊन रानांत गेला होता. एकू रात्रीं एक शिकार करतांना हारला होता आणि कळपानें त्याला जो दंड दिला होता तो भोगीत होता. कळपां-तल्या लांडग्यांनीं मोंवलीचा दिवसभर कसा शोध केला हे काळ्या वाघानें मोंवलीला येऊन सांगितलें होतें. मोंवलीनें काटक्या गोळा करून रात्रभर जाळ राहील याची

शेवटीचें मलपृष्ठ



काळजी बाळगली होती. त्या दिवशीं रात्रींच कळपाची सभा भरली होती.

वाघ्यानें भाषण केलें तेव्हां मौवलीनें वाघ्याला कळपाचा नायक कोण असावा या विषयीं बोलण्याचा अधिकार नाहीं असा आक्षेप केला होता. परंतु कळपानें त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केलें होतें. वाघ्या म्हणाला होता कीं त्या मनुष्याच्या पिलावर त्याचा अधिकार होता. कळपाला चिथवून मौवलीला ठार करण्याचा बेत झाला होता. मौवलीनें उठून कळपाच्या मधोमध जळकें लाकूड फेंकलें होतें. विस्तव पाहून कळपाचे लोक घाबरले. वाघ्याचें अंग पोळलें. लांडगिणीचा निरोप घेऊन तो पसार झाला वगैरे वगैरे.

त्याचा डोळा लागला असेल नसेल त्याच्या हनुवटीला कोणाचें तरी नाक लागलें. तो त्याचा मोठा भाऊ म्हणजे लांडगिणीचा मोठा मुलगा होता.

“हें रे काय? वीस मैल तुझा शोध काढीत आलों आहें. हेंच का याबद्दल बक्षिस? तुझ्या अंगाला धुराचा वास येत आहे. जनावराच्या अंगाच्या वासासारखा वास येत आहे आणि एवढ्यांत तूं मनुष्य झालास का? ऊठ! मी एक बातमी घेऊन आलों आहें.” मोठा भाऊ म्हणाला.

मौवलीनें त्याला जवळ पोटाशीं ओढून विचारलें—“रानांत सर्व सकुशल आहेत ना?”

“लालफुलामुळें ज्यांचें अंग पोळलें गेलें आहे त्यांच्या शिवाय बाकी सर्व खुशाल! वाघ्याचें अंग पोळलें गेलें होतें ना? अंगावरचे केस पुन्हां उगेपर्यंत स्वारी दूर कोठें तरी निघून गेली आहे. पण परत आल्यावर तुला ठार करण्याची प्रतिज्ञा करून गेला आहे.” मोठा भाऊ म्हणाला.

“मीदेखील तशीच एक प्रतिज्ञा केली आहे. मधून मधून येऊन रानांतल्या बातम्या देत रहा. मला आतां झोंप येत आहे.” मौवली म्हणाला.

“मनुष्यांच्या भुलावण्यांत येऊन तूं लांडगा आहेस हें विसरूं नकोस.”

“तें कसें विसरेन? तुला आणि आपल्या गुहेतल्या लांडग्यांना कधीं विसरेन का? त्याच बरोबर मला कळपांतून हाकलून दिलें होतें हेंदेखील विसरणार नाहीं.”

“परंतु या नव्या कळपांतून तुला कोणी काढून टाकणार नाहीं, ही गोष्टदेखील लक्षांत असूं दे. किती झाला तरी मनुष्य तो मनुष्यच! ते बोलूं लागले कीं वाटतें, डबक्यांतले बेडूक ओरडत आहेत. मी येईन तेव्हां कुंपणापलीकडे तुझी वाट पाहीन.” असें सांगून तो परत रानांत निघून गेला.

मौवली तीन महिने गांवाबाहेर कोठें गेला नाहीं. तो मनुष्यांच्या चालीरीती, भाषा व वागणें शिकत राहिला. पहिल्यानें एक कापड पांघरून त्याला ठेवीत. तें त्याला मुळींच आवडत नसे. नंतर त्याला रुपये पैसे व त्यांचा उपयोग शिकावा लागला. पण त्याला तें कळेना. नंतर त्याला शेत नांगरण्याचें शिक्षण घ्यावें लागलें. पण त्यापासून फायदा काय हें कळेना.



गांवांतली मुलें त्याला फार त्रास देत. रानांत राहिल्यानें राग आवरण्याची शक्ति त्याच्या अंगांत भरपूर आली होती. रानांत स्वतःचा जीव वांचविण्यासाठीं कधीं कधीं राग आवरावा लागे. परंतु मुलें त्याच्या बोवडेपणाची किंवा त्याला बरोबर खेळतां येत नाहीं याची थट्टा करूं लागले कीं त्याला चीड येई व त्यांना चिरून फाडून टाकावेंसें त्याला वाटे. परंतु लहानमुलांच्या वाटेला जाणें बरोबर नाहीं असा विचार करून तो स्वतःला आवरी. स्वतःच्या अंगांत किती बळ आहे हें मौवलीला

       

माहीत नव्हतें. आपल्याहून शक्तिशाली प्राणी कितीतरी आहेत हें त्याला चांगलें माहीत होतें. पण गांवकऱ्यांना वाटे कीं त्याच्या अंगांत रेड्याची शक्ति असली पाहिजे.

मनुष्य जातींत जो जातिभेद आहे त्याची मौवलीला कल्पनादेखील नव्हती. कुंभाराचें गाढव एकदां खड्ड्यांत पडलें तेव्हां त्यानें त्याचें शेपूट धरून त्याला उभें केलें आणि त्याच्या पाठीवर मडकीं रचून ठेवण्यास कुंभाराला मदत केली. ती त्याची चूक ठरली. कारण कुंभार खालच्या जातीचा होता. गाढवाला त्यानें हात लावला ही तर त्याहून मोठी चूक. पुरोहित त्याला खूप रागावले.

"उद्यां तुम्हांला सुद्धां मडक्यावरोबर गाढवावर बसवून दाखवीन." मौवली पुरोहिताला म्हणाला.

पुरोहितानें मेस्सुवाच्या नवऱ्याला तें जाऊन सांगितलें. म्हणाला—"या मुलाला कांहीं तरी काम दे. नाहींतर हा बिघडणार!"

गांवाच्या पाटलानें मौवलीला बोलावून, रानांत म्हशी चरायला घेऊन जायला सांगितलें. याहून जास्त आनंदाची गोष्ट काय असणार त्याला? गांवच्या सर्व म्हशी तोच चरायला घेऊन जाई. तो गांवाकरितां काम करणारा गांवभरचा नोकर झाला. म्हणून रोज सायंकाळीं गांवकऱ्यांची सभा होई. त्या सभेला तो हजर राहूं लागला. झाडावर माकडें बोलत. झाडाच्या पाराखालीं नागसांप रहात असे. त्याला दैवत म्हणून लोक दूध पाजीत. वृद्ध वडील माणसें तेथें जमा होत व हुक्का पीत बराच वेळ बोलत बसत. देव, मनुष्य, भूतपिशाच वगैरे त्यांच्या चर्चेचे विषय असत. (चालू)



# ६०. अति प्राचीन गुहेंतील चित्रकारी

फ्रांस देशाच्या मध्यवर्ती प्रदेशांतल्या गुहांत २० हजार वर्षांपूर्वी प्रस्तर युगीन मनुष्यजातीनें अद्भुत चित्ररचना करून ठेवली आहे. त्यांनीं बोटें रंगांत बुडवून व हाडांच्या फुंकणीनें रंग फुंकून हीं चित्रें काढलीं. यांत शिकारी, धरून आणलेल्या जनावरांना पळवून नेत असलेले दिसतील.



       



# भारताचा इतिहास



बाळाजी बाजीराव याच्या कारकीर्दींत देखील मराठ्यांचें राज्य विस्ताराचें काम चालू राहिलें. १७५७ च्या मार्च महिन्यांत श्रीरंगपट्टण येथें मराठ्यांच्या फौजा दाखल झाल्या व कृष्णा नदीच्या दक्षिणेकडच्या राज्यांना मराठ्यांना कर द्यावा लागला.

अर्काटच्या नबाबानें दोन लाख रुपयांचा न दिलेला चौथ दिला व त्यानें उरलेला अडीच लाख रुपयांचा चौथ पण देण्याचें वचन दिलें.

मराठ्यांनीं विजापूर व म्हैसूर राज्यांवर देखील स्वाऱ्या केल्या. महाराष्ट्राच्या स्वारीला म्हैसूरचा शूर सेनापति हैदर यानें, फ्रेंच सरदार बुसीनें व हैदराबादच्या निजामानें तोंड दिलें. परंतु पेशव्यांचे बंधु सदाशिवराव यांनीं १७६० सालीं उदगीर-जवळ झालेल्या युद्धांत निजामाचा पूर्ण पराभव केला. बुसीच्या तालमींत शिक्षण घेऊन निजामाच्या फौजेंत काम करणारा व तोफेच्या कामांत हुशार असा इब्राहिमखान हा मराठ्यांच्या फौजेंत नोकरीला लागला. त्याला पाश्चात्य पद्धतीच्या युद्धतंत्राची चांगली माहिती होती.

या युद्धांत पराभव झाल्यामुळें संधी करते वेळीं निजामाला नाइलाजानें पुरें विजापूरचें राज्य, औरंगाबादचा बराचसा भाग, बीदरचा कांहीं भाग व दौलताबादचा किल्ला मराठ्यांना द्यावा लागला. अशा तऱ्हेनें मोंगल साम्राज्याचा एक फार मोठा भाग मराठ्यांना मिळाला.

उत्तरेकडेपण मराठ्यांना याहून मोठी विजयप्राप्ती झाली. १७५६ च्या अखेरीला मल्हारराव होळकर व त्यानंतर रघुनाथराव यांना कांहीं आठवड्यांच्या अंतरानें उत्तरेकडे पाठविण्यांत आलें.

रघुनाथरावाला कांहीं कारणास्तव चार महिने राजपुतान्यांत रहावें लागलें. म्हणून त्यानें सखारामबापू यांच्या नायकत्वाखालीं २० हजारांची फौज दोआब प्रांताच्या मोहिमेवर पाठविली.

सखाराम बापूनें जाट लोकांना चातुर्यानें आपल्याकडे वळवून घेतलें आणि १७५७ मध्यें खुद्द दिल्लीवर चालून गेला आणि दिल्लींत अब्दालीनें नेमलेल्या नजीबुद्दौला याला कांहीं अटींवर संधी करून घ्यायला लावलें.

१७५८ च्या मार्च महिन्यांत सरहिंद व एप्रिलमध्यें लाहोर मराठ्यांच्या हातीं आलें. मराठ्यांनीं पंजाब प्रांतांत अदीन बेग नांवाच्या एका व्यक्तीला आपला राजकीय प्रतिनिधि म्हणून नेमलें.

हा प्रांत जिंकण्यासाठीं पुरेशी तयारी न केल्यामुळें रघुनाथरावाला हा तथाकथित 'मोठा विजय' मिळविण्यासाठीं राजकीय व आर्थिक दोन्ही दृष्ट्या बरीच किंमत द्यावी लागली. अब्दालीशीं आणखी एक युद्ध करणें पण अपरिहार्य झालें.



१३ अक्टोबर १७५८ या रोजीं अदीन बेग याच्या मृत्यूनंतर पंजाबांत अराजकता पसरली. बंडखोरांना ताब्यावर आणून राज्यांत पुन्हां सुव्यवस्था स्थापन करण्यासाठीं पेशव्यांनीं १७५९ सालीं दत्ताजी शिंदे यांना बरोबर एक मोठें सैन्य देऊन पाठविलें.

परंतु इतक्यांत दुर्राणीच्या सैन्यानें पंजाबावर स्वारी केली. १७५९ च्या नोव्हेंबर महिन्यांत सर्व पंजाब प्रांत जिंकून अहमदशाह अब्दालीनें दिल्लीवर स्वारी केली.

त्यावेळीं मराठ्यांच्या मदतीला कोणीच आलें नाहीं. म्हणून त्यांचा पराभव झाला.

रोहिले व अवधचे नवाब अब्दालीला सामील झाले व रजपूतांनीं तटस्थ धोरण ठेवलें. शिखांनीं देखील मदत केली नाहीं. याला कारण, बाळाजी बाजीराव यानें दोन बाबतींत आपल्या वडिलांचें बदललेलें धोरण. त्यानें पाश्चात्य युद्धतंत्र अमलांत आणून आपल्या सैन्यांत धंदेवाईक सैनिकांना भर्ती करून घेतलें. यामुळें सैन्यांतलें ऐक्य नाहींसें झालें व शिस्तपण कमी झाली. त्यानें 'हिंदू पदपादशाही' स्थापन करण्याचें धोरण सोडलें. तें धोरण कायम राखलें असतें तर हिंदू राज्यांत ऐक्य होण्याची शक्यता होती. म्हणून त्याच्या सैनिकांनीं हिंदू मुसलमान हा फरक न करतां वाटेल त्या राज्यावर हल्ले करून प्रजेंत लुटमार सुरू केली. यामुळें मराठ्यांनी प्रजेला स्वतःविरुद्ध करून घेतलें.

म्हणून दुर्राणीशीं जेव्हां मराठ्यांच्या सैन्याला युद्ध करावें लागलें तेव्हां त्यांच्या मदतीला कोणी आलें नाहीं व उलट अनेक लोक दुर्राणीच्या बाजूला गेले.

१७५९ च्या शेवटीं दत्ताजी शिंदेचा अब्दालीच्या हातीं स्थानेश्वर येथें पराभव झाला. म्हणून तो दिल्लीकडे परतला. वाटेंत दिल्लीच्या उत्तरेला दहा मैलांवर बरारीघाट येथें ९ जानेवारी १७६० या रोजीं अफगाणांनीं त्याचा खून केला. दुर्राणीच्या घोडेस्वारांचा हल्ला मल्हारराव वगैरे कोणीच थोपवूं शकला नाहीं. म्हणून निजामाची पाठ मऊ करणारे सदाशिवराव भाऊ यांना एका मोठ्या सैन्यासह पाठविण्यांत आलें. पेशव्यांनीं आपले सतरा वर्षें वयाचे चिरंजीव विश्वासराव यांना नांवापुरता सेनापति नेमून त्यांच्याबरोबर उत्तरेकडे पाठविलें.



# नेहरू चरित्र

[ ३० ]

ते मोठे चळवळीचे दिवस होते. पहावें तेथें मिरवणुकी, लाठीचार्ज, गोळीबार व हरताळ चालू होते. विदेशी वस्त्रबहिष्काराला पण जोर होता. पिकेटिंग चालू होतेंच. जवाहरलालजींना जेव्हां हें कळलें कीं त्यांच्या वृद्ध माता व धाकटी बहीण पिकेटिंग करीत आहेत तेव्हां फार वाईट वाटलें.

सर्वांत जास्त कामाची जबाबदारी घेतली ती त्यांच्या पत्नी कमला नेहरू यांनीं. त्यांनीं आपल्या खालावलेल्या प्रकृतीची मुळींच फिकीर केली नाहीं.

२३ एप्रिल या रोजीं एक फार महत्वाची घटना पेशावर येथें घडली. त्याचा परिणाम जवाहरलालजींच्या मनावर फार झाला. पश्चिमोत्तर सरहद्दीच्या प्रांतांत व इतर ठिकाणीं तशाच घटना होऊं लागल्या होत्या. अहिंसेच्या तत्वाचें पालन करून पठाणांनीं जें कौतुकास्पद साहस दाखवून बंदुकांचा सामना केला त्याचा प्रभाव सर्व देशावर पडला.



आणखी एक महत्वाची घटना त्याच प्रांतांत घडली. गढवाली शिपायांनीं तेथील जनतेवर गोळीबार करण्यास नकार दिला. कदाचित सैनिकांच्या मनांत निःशस्त्र जनतेच्या चळवळीशीं सहानुभूति असावी. आपल्या अधिकाऱ्याचा हुकूम मोडणें सैनिकांचा फार मोठा अपराध समजला जातो. याबद्दल दंडदेखील तितकाच मोठा असतो. म्हणून गुरखा सैनिकांनीं दाखविलेलें साहस वाखाणण्या सारखेंच होतें.

त्या काळांतली आणखी एक महत्वाची गोष्ट म्हणजे स्त्रियांनीं चळवळींत भाग

जाण्यासाठी ठरलेल्या तारखेपूर्वी एकच दिवस त्यांना अटक झाली व ते नैनीच्या तुरुंगांत जवाहरलाल वगैरेंच्यासमोर दत्त म्हणून उभे राहाले.

जवाहरलालजी या खेपेस सात वर्षांनंतर पुन्हां तुरुंगांत आले होते. आपल्या त्या तुरुंगांतल्या जीवनाशीं ते अगदीं समरस होऊन गेले होते व बाहेरच्या जगाला विसरून गेले होते. या खेपेस त्यांना एकट्याला एका कोठडींत ठेवण्यांत आलें होतें. हा त्यांना एक नवा अनुभव होता. त्यांना जेथें ठेवण्यांत आलें होतें. तें सुमारें १०० फूट व्यासाचें एक आवार होतें. त्याला पंधरा फूट उंचीची भिंत होती. त्यांत चार घाणेरड्या कोठड्या होत्या. त्यांपैकीं दोन नेहरूंना देण्यांत आल्या होत्या. बाकी दोन रिकाम्या होत्या.

जवाहरलालजींना हा एकटेपणा फार जाणवला, असह्यच वाटला. कारण त्यांना सर्व सामान्य प्रजेंत वावरण्याची संवय होती. दोन तीन दिवस ते खूप झोपले. उष्मा वाढूं लागला होता, म्हणून त्यांना बाहेर उघड्यावर झोंपण्याची परवानगी देण्यांत आली होती. ते खाटेची शिडी करून भिंतीवरून पळून जातील या भीतीनें, जवाहरलालजी लिहितात कीं, त्यांच्या खाटेला सांखळी बांधून ठेवली होती.

जेथें जवाहरलालजींना ठेवण्यांत आलें होतें, ती जागा क्रूर कैद्यांसाठीं राखून ठेवलेली खास जागा होती. तुरुंगांत त्याला 'कुत्र्यांचें घर' असें टोपण नांव होतें. नंतर तेथें राजकीय कैद्यांना ठेवूं लागले. त्यांचा इतर कैद्यांशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध राहात नसे.





# पाताळ कोट

[ ८ ]

[ उग्रसेनच्या राजवाडा व खजिना बंडखोरांनीं लुटला. नंतर ते राजाच्या शोधार्थ जंगलांत गेले. धूमकनें व सोमकनें त्यांना समजावून शांत केलें व परत राजधानीकडे पाठवून दिलें. धूमकच्या कमरेला जो मंत्रदंड लोंबत होता तो एकाएकीं दोरी तोडून आकाशांत उडणार होता. त्याला धरण्यासाठीं सोमकनें उडी मारली. पुढें—]

घोड्यावरून उडी मारून सोमकनें तो मंत्रदंड पकडला. परंतु तेवढ्या वेळांत घोडा थोडा बाजूला सरकला. म्हणून सोमक खालीं जमिनीवर आदळला. परंतु सोमकनें हातांतला मंत्रदंड मात्र सोडला नाहीं.

धूमक घोड्यावरून उडी मारून खालीं आला व म्हणाला—"सोमू, चपळपणा असावा तर असा. दोरी तुटली तेव्हां काय करावें हें मला सुचेना. खरोखरच काल-शंबरचा मंत्रदंड खरोखरींच मंत्रवलेला आहे."

सोमक मंत्रदंड धरून उठून उभा राहाला. तो त्याच्या मुठींतून निसटून जाण्यासाठीं नागिणीसारखा वर खालीं होत होता. अंगांत प्राणसंचार झाल्यासारखा तो कांहीं तरी पुटपुटूं लागला. पण तो काय म्हणत होता तें दोघांपैकीं एकालाहि कळलें नाहीं.



धूमक कांहीं वेळ लक्ष देऊन तें ऐकत होता. तरी त्याला कांहीं कळलें नाहीं. पण विचार करून सोमकला म्हणाला—“सोमू! मला असें वाटत आहे कीं कालदंबर या मंत्रदंडाला पुन्हां आपल्याकडे बोलावण्यासाठीं कांहीं तरी मंत्र म्हणत असावा. म्हणूनच हा तिकडे जाण्याच्या प्रयत्नांत दिसतो आहे.”

“आपण याच्या पाठोपाठ गेलों तर त्या दुष्ट मांत्रिकाला पकडणें आपल्याला शक्य होईल.” सोमक धूमकच्या हातांत मंत्रदंड देत म्हणाला.

“तें कसें शक्य होईल? आपल्याला त्याच्याबरोबर आकाशांत उडतां येईल का? आतां तो पूर्वेकडे उडूं लागला होता, होय कीं नाहीं!” धूमकनें विचारलें.

सोमकनें डोकें हलवून होकार दिला.

“या मंत्रदंडाचा महिमा आपण कोणाला कळूं देतां कामा नये. राजकन्या कांतिसेनेला शोधून काढण्याची जबाबदारी आपण घेतली आहे नाहीं का? या मंत्रदंडाचा या कामीं छान उपयोग होईल.” धूमक म्हणाला. नंतर दोघे घोड्यावर बसून गंगाधर मंत्री होता तेथें गेले.

“बंडखोरांना रक्तपात झाल्याशिवाय राजधानीकडे परतवण्यांत यश मिळविल्याबद्दल आम्ही तुमचें अभिनंदन करतों. परंतु तुम्ही त्यांना जें वचन देऊन परतवलें आहे, तें ऐकून आम्हांला आश्चर्य वाटलें. तुम्ही राजकुमारीला राक्षसाच्या हातांतून कसें काय सोडवून आणणार?” गंगाधरनें विचारलें.

“त्यासाठीं आम्ही प्रयत्न करणार आहों. या प्रयत्नांत मरण आलें तरी तें आम्हांला कबूल आहे. कारण आम्ही आपल्या साथीदारांना तसेंच वचन दिलें आहे.” धूमक म्हणाला.



“दोघांपैकीं तूंच सरदार दिसतो आहेस. जर तूं माझ्या मुलीला सोडवून घेऊन आलास तर मी तुला आपलें राज्य देईन, धूमक!” राजा उग्रसेन म्हणाला.

“अहो! एकतर तुमच्याजवळ राज्य नाहीं. दुसरें असलें तरी तुमचें हें दान स्वीकारायला मी तयार नाहीं.” धूमकनें रागानें उत्तर दिलें.

कदंब राजाचा खजिनदार डोळे वटारून धूमक उभा होता तिकडे वळणार तेवढ्यांत गंगाधर त्याला म्हणाला—“यालाच म्हणतात सुंभ जळालें, पण पीळ नाहीं गेला.” नंतर आपल्या सैनिकांकडे वळून म्हणाला—“उग्रसेन महाराजांना व त्यांच्या अनुयायांना आपल्या राजधानींत नेऊन सुटका देण्याची व्यवस्था करा.”

राजा उग्रसेन, त्याचा मंत्री व खजिनदार कुंतलच्या सैनिकांबरोबर ओढ्यापलीकडे गेल्याबरोबर गंगाधर धूमकला म्हणाला—“मी तुम्हां दोघांना कुंतल देशाच्या सैनिकांचा गणवेष देतों. एवढेंच नव्हे तर तुम्हांला, तुम्ही कुंतल देशाच्या राजाच्या कामासाठीं जात आहां असें एक अधिकारपत्र पण लिहून देतों. त्या अधिकारपत्राच्या



मदतीनें तुम्हांला वाटेल त्या राजाजवळ मदत मागतां येईल.”

धूमकनें त्याबद्दल आभार मानले. सेनापतीनें आणून दिलेले गणवेष दोघांनीं घातले. मंत्र्याचा निरोप घेतेवेळीं धूमकनें त्याला विचारलें—

“प्रभो! आपले चिरंजीव शशिकांत यांच्याविषयीं काय करावें असें आपणांस वाटतें? ते अजून जिवंत आहेत असेंच धरून चालायचें ना आपण?”

“यांत मला मुळींच शंका नाहीं. कालदंबरच शशिकांतला बरोबर घेऊन गेला



आहे. तुम्ही राक्षसाचा शोध काढलांत तर कांतिसेना कोठें आहे हें तुम्हांला कळेल. मांत्रिक कोठें आहे याचा शोध मी लावणार आहें. त्या साठीं मी शशिकांतचा मित्र मद्रक याला, बरोबर कांहीं सैनिक देऊन पाठवीन." मंत्री म्हणाला.

धूमक त्यावर कांहीं बोलला नाहीं. गंगाधरला नमस्कार करून सोमकबरोबर तो पूर्व दिशेनें निघाला. कारण त्याला वाटत होतें कीं मांत्रिक कालशंबर कोठें आहे हें कळलें तर त्याच्याकडून राक्षस कोठें आहे, हें देखील कळेल. त्यांचें परस्परांशीं जें बोलणें झालें होतें त्यावरून त्याला तसें वाटत होतें. त्यांचें आपसांत वैर होतें, म्हणून कालशंबर त्यांना मदत करील यांत धूमकला शंका नव्हती.

धूमक व सोमक डोंगराळ प्रदेशांतल्या वाटेनें कांहीं अंतर चालून गेल्यावर त्यांना एक दाट जंगल लागलें. तेथें त्यांना एक ओढा दिसला. दोघांना खूप भूक लागली होती. ओढ्याच्या कांठीं बसून त्यांनीं बरोबर जें थोडें खायला होतें तें खाऊन घेतलें आणि पाणी पिऊन ओढ्याच्या काठच्या झाडाखालीं कांहीं वेळ विश्रांती घेण्याचें योजलें.

दोघांनीं आपले घोडे एका झाडाच्या बुंधाला बांधून ठेवले. नंतर दोघे ओढ्याच्या कांठीं वाळूवर चालू लागले. जात असतां दोघांना माणसांच्या पावलांचीं चिन्हें दिसलीं. त्यांपैकीं एका विशिष्ट प्रकारच्या पावलांच्या खुणांवर धूमकची दृष्टि गढून होती. कारण त्या खुणा पावलांच्या नसून खडावांच्या होत्या.

धूमक चकित होऊन त्यांच्याकडे पहात होता. सामान्यपणें योगी किंवा साधून खडाव घालतात. या दाट रानांत कोण



साधू आला असेल बरें! खात्रीनें कालशंबरच्या पावलांच्या ह्या खुणा असणार. बाजूला ज्या पावलांच्या खुणा आहेत त्या शशिकांतच्या असूं शकतील.

"सोमू, या खुणा कालशंबरच्या पावलांच्या आहेत, यांत मला तरी शंका नाहीं." धूमक म्हणाला.

त्यावेळीं सोमक अन्यमनस्कपणें विचार करीत असलेला दिसला.

सोमक सशंकित मुद्रेनें म्हणाला—"धूमू! मला वाटतें आपण चुकतों आहों. या वाटेनें यायला नको होतें. राजकन्येला राक्षस उचलून घेऊन गेला होता. त्याचा शोध काढायचें सोडून आपण या कालशंबरच्या शोधार्थ व्यर्थ आलों आहों. चल परत त्यांतच शहाणपण आहे."

धूमकनें त्याला कोणत्या उद्देश्यानें याच वाटेनें जाणें इष्ट आहे हें आपल्या मताप्रमाणें सांगितलें. म्हणाला—"राक्षस कोठें आहे व कोणत्या वाटेनें गेला आहे, हें तरी माहीत आहे का आपल्याला? मंत्रदंडाच्या सहाय्यानें कालशंबरचा पत्ता लागेल व त्याच्या मदतीनें त्याच्या शत्रूचा, म्हणजे राक्षसाचा शोध काढणें आपल्याला शक्य होईल."



"होय, तें बरोबर आहे!" सोमक म्हणाला. परंतु ती वाट त्याला दूरची व जास्त कठीण वाटली. धूमक ओढ्याचें पाणी प्याला व पाण्यांत उतरून पलीकडे गेला. गुढगाभरच पाणी होतें. ओढ्यापलीकडे देखील धूमकला पावलांच्या खुणा दिसल्या. त्यानें सोमकला ओढा पार करून यायला सांगितलें.

सोमक जवळ आल्यावर त्याला धूमकनें पावलांच्या खुणा दाखविल्या. म्हणाला—"मांत्रिक या बाजूनें जाऊन जास्त वेळ झालेला नाहीं. जर खाणं खायला न थांबतां



आपण असेच पुढें निघालों तर त्याची गांठ पडणें तितकेंसें कठीण नाहीं."

"तरमग चल, तसेंच करूं. घोडे घेऊन येतों. असें सांगून सोमकनें पाठ फिरविली असेल नसेल, त्याला झाडींतून कोणी तरी टाळी वाजविल्याचें ऐकूं आलें. धूमक व सोमक तलवारी उपसून त्या बाजूला गेले व झाडींत शिरून त्यांनीं पाहिलें, पण कोणी दिसलें नाहीं. चकित होऊन ते परत फिरले. तेव्हां दुसऱ्याच एका बाजूनें टाळी वाजविल्याचा व शिट्या फुंकल्याचा आवाज ऐकूं आला. या खेपेस दोघे जास्त सावध होऊन त्या बाजूला हळूहळू गेले, तेव्हां त्यांना त्यांच्या उजव्या बाजूच्या झाडाआडून टाळी वाजल्याचें ऐकूं आलें.

"सोमू, आपल्याला चारी बाजूंनीं घेरून कोणी तरी पकडण्याच्या किंवा ठार करण्याच्या बेतांत आहेसें वाटतें. म्हणून आपण परत ओढ्याकडे जाणेंच हिताचें होईल." धूमक म्हणाला. दोघे तावडतोब वळले व ओढ्याकडे पळूं लागले तेव्हां चारी बाजूनीं शिट्या व टाळ्या वाजूं लागल्या आणि झाडावरून उड्या मारून पांच सहा रानटी लोकांनीं त्यांना घेरलें.

सोमक व धूमक दोघांना परस्परांकडे एकदां पाहून पुढें काय करावयाचें हें ठरवायला सुद्धां वेळ नव्हता. दोघे 'जय काली माते' चा जयघोष करीत त्या रानटी लोकांवर तुटून पडले. विजेसारखी तलवार फिरवून त्यांनीं त्यांना जखमी केलें. ते रानटी लोक त्यांना धरण्याचें सोडून झाडीकडे पळत जात असतां जमिनीवर पडले.

दोन तीन मिनटें गेली असतील. त्यांच्या अंगांत किती शक्ति असली व तलवार फिरविण्यांत ते किती पटाईत असले म्हणून

लांडग्यांच्या कळपासारखे रानटी लोक चारी बाजूनें त्यांच्यावर तुटून पडल्यावर त्यांच्या-समोर टिकाव धरणें त्यांना अशक्य झालें. रानटी लोकांनीं फेंकलेले भाले त्यांना लागले व अंगांतून रक्त वाहूं लागलें. त्यांच्याशीं युद्ध करणें त्यांना अशक्य झालें. रानटी लोकांनीं दोघांना कैद केलें.

रानटी लोकांच्या आनंदाला पारावार नव्हता. त्यांच्यापैकीं कांहीं जण ठार झाले होते. कांहीं जखमी झाले होते व तडफडत जमिनीवर पडले होते. परंतु बाकी रानटी सोमक व धूमक या दोघांना कैद केल्याच्या आनंदांत उड्या मारीत होते व नाचत होते. दुरून कोणी तरी टाळी वाजविल्याचें ऐकूं आलें. तिकडे पहात नाचणाऱ्यांपैकीं कांहीं ओरडूं लागले—"विरूपो! विरूपो!" कांहीं वेळानें तेथें एक अडदांड उंच रानटी मनुष्य हातांत एक मोठा भाला घेऊन आला व भयंकर आवाजांत ओरडून म्हणाला—"आहा, शांभवी!" त्याचे डोळे लाल होते. हातांत भाला होता. दांत ओठ चावून धूमक व सोमक यांना ठार करण्यासाठीं त्यानें उडी मारली.

धूमक व सोमक दोघे मरण जवळ आलें असा विचार करून डोळे मिटून उभे होते. परंतु भाला लागणार व आपण मरणार असा विचार करून वाट पहात असलेल्या दोघांना आश्चर्य वाटलें. कारण त्या रानटी सरदारानें हातांतला भाला खालीं फेंकून दिला व म्हणाला—"माफ करा आम्हांला! आमच्या हातून मोठी चूक झाली!" नंतर त्यानें धूमक व सोमक यांचे पाय धरून क्षमा मागितली.



# विलक्षण योगायोग

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला व प्रेत काढून खांद्या-वर टाकून स्मशानाच्या दिशेनें नेहमींप्रमाणें मौनपणें चालूं लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तूं इतके कष्ट कां सहन करीत आहेस, हें नाहीं मला ठाऊक. पण नशिबाचें पाठबळ मिळेल तर अशक्य अशी इच्छादेखील सहज पुरी होण्याची शक्यता असते. या गोष्टीला दृष्टांत म्हणून मी तुला कंदर्प नांवाच्या ब्राह्मण तरुणाची गोष्ट सांगतों." असें सांगून त्यानें गोष्टीला सुरवात केली.

वेणा नदीच्या काठीं रत्नपुर नांवाचें एक मोठें बाजाराचें गांव होतें. तेथें एका श्रीमंत ब्राह्मणाला कंदर्प नांवाचा मुलगा होता. एकदां सायंकाळीं कंदर्प नदीवर

वेताळाच्या गोष्टी







स्नानाला गेला असतां पाय घसरून पाण्यांत पडला व प्रवाहाबरोबर रात्रभर वहात राहाला. सकाळीं नदींत लोंबत असलेल्या एका फांदीला त्याचें अंग लागलें. फांदी धरून तो कसाबसा काठावर आला. त्याला तेथें एक देवीचें देऊळ दिसलें. तो आंत गेला. त्यानें देवीला नमस्कार केला व म्हणाला—" अंबे ! या दीन गरिबाचें रक्षण कर." तो दमला असल्या-मुळें देवीची दया भाकीत असतांच त्याला झोंप लागली.

दिवस गेला, रात्र आली. त्याची झोंप मोडली तेव्हां त्याला देवी देवळांतल्या इतर देवींशीं बोलत असलेली दिसली. " आज चक्रपुरींत जत्रा आहे. तेथें आपल्याला जायचें आहे. पण इकडे तर हा मुलगा आपल्या आश्रयास आला आहे. याला एकट्याला या रानांत सोडून कसें जायचें? रानटी श्वापदांची भीति आहे ना ! याला कोणत्या तरी घरांत सुरक्षितपणें ठेवून देऊं व परत घरीं जाते वेळीं घेऊन जाऊं." त्या देवींनीं आपसांत चर्चा करून ठरविलें.

त्याला त्यांनीं खूप सजवलें आणि आकाश मार्गें रत्नपुर नांवाच्या गांवीं नेऊन जयदत्त नांवाच्या ब्राह्मणाकडे त्याला सोडलें आणि त्या निघून गेल्या.

योगायोग असा कीं त्याच दिवशीं जयदत्त याची मुलगी सुमन हिचें लग्न होणार होतें. लग्नाची सर्व तयारी झाली होती. सुमन गौरीहाराला बसली होती. नवरा मुलगा येणाची सर्व वाट पहात बसले होते. मुहूर्त जवळ येत चालला तसतशी सर्वांना मुहूर्त टळतो काय याची काळजी वाटूं लागली. पण वाजंत्र्यांचा आवाज नाहीं कीं मिरवणूक नाहीं. इतक्यांत कोणाची तरी नजर कंदर्पवर पडली व म्हणाला—" हे पहा नवरदेव !" सर्वांनीं



मिळून त्याला आदरपूर्वक बोहोल्यावर उभें केलें. विधिवत सर्व लग्नसमारंभ पार पडला. कंदर्पचें रूप पाहून लग्नाला आलेल्या सर्व बायकांनीं नवऱ्यामुलीच्या नशिबाची वाखाणणी केली.

विवाहविधि संपला होता. पण रात्र संपली नव्हती. कंदर्प माडीवर जाऊन झोपला. उजाडण्यापूर्वीं देवींनीं चक्रपुरची जत्रा पुरी करून परत येते वेळीं कंदर्पला उचलून घेतलें आणि निघून गेल्या.

पण आकाशमार्गें जात असतां त्यांना कोणी तरी अडविलें व कंदर्पला घेऊन जाण्यासाठीं त्यांची आपसांत झोंबाझोंब सुरू झाली व त्या गडबडींत कंदर्प त्यांच्या हातांतून सरकून खालीं पडला.



आतां त्याला कष्ट सहन करावे लागणार असा विचार करून पाय नेतील तिकडे तो जाऊं लागला. त्याचें लग्न कोणत्या गांवीं झालें तें देखील त्याला आठवेना. त्याचें लग्न ज्या मुलीशीं झालें होतें तिचें नांव सुमन होतें, एवढेंच काय तें त्याला आठवत होतें. वाटेंत एका ब्राह्मण तरुणाशीं त्याची ओळख झाली. कंदर्पनें त्याला जें जें घडलें तें सर्व वर्णन करून सांगितलें आणि त्याच्याबरोबर चालूं लागला. चालत चालत दोघे एका नदीचा समुद्राशीं जेथें संगम होत होता तेथें येऊन पोंचले. तेथें भीमपुर नांवाचें एक गांव होतें.

ते नदी काठीं पोंचले तेव्हां तेथें घाटावर लोकांची गर्दी होती. कंदर्प आपल्या मित्रा-बरोबर कसली गर्दी आहे हें पाहण्यासाठीं जवळ गेला. भरतीच्या वेळीं एक मोठा मासा किनाऱ्याला येऊन लागला होता. लोक त्याचे मांस कापून काढीत होते. परंतु कापीत असतां माशाच्या पोटांतून एक तरुण स्त्री निघाली. ती कंदर्पचीच



बायको सुमन होती. तिला ओळखून कंदर्प आपल्या मित्राला म्हणाला—"हीच तर ती! हिच्याशींच माझें लग्न झालें होतें. पाहूं या काय गंमत होते ती."

चार सहा जण सुमनच्या चारी बाजूला वेरा करून उभे राहाले आणि विचारूं लागले—"कोण तूं? आणि या माशाच्या पोटांत कशी काय शिरलीस?"

ती म्हणाली—"माझें नांव सुमन! मी रत्नपुराची राहणारी. माझ्या वडिलांचें नांव जयदत्त! कालच माझें लग्न एका सुंदर तरुणाशीं झालें. पण उजाडल्यावर पाहातें तर माझा पति अदृश्य झालेला. माझ्या वडिलांनीं त्यांचा पुष्कळ शोध केला, पण सर्व फुकट! मला माझ्या जीविताचा वीट आला व मी जीव देण्यासाठीं नदींत उडी मारली. मी वहात चाललें असतां देवमाशानें मला गिळलें व तुम्ही त्याचें पोट चिरून मला बाहेर काढलें."

ती असें सांगत असतां एकदम यज्ञस्वामी नांवाचा ब्राम्हण गर्दींतून पुढें आला व म्हणाला—"अग मुली सुमन! देव पावला, म्हणून तूं भेटलीस!" असें म्हणत त्यानें तिला पोटाशीं धरलें.

सुमननें त्याच्याकडे पाहिलें व "मामा मामा!" म्हणत जोर जोरानें रडूं लागली.

"उगी बाळ! रडूं नकोस! चल, घरीं जाऊं!" यज्ञस्वामी म्हणाला.

"नको मामा! जिवंत राहून तरी काय करायचें आहे मला? जगायचेंच असतें तर नदींत जीव कशाला दिला असता? पेटवा चिता आणि मी उडी मारून जीव देतें." सुमन म्हणाली.

यज्ञस्वामीनें व इतरांनीं तिला आत्महत्त्या करूं नको म्हणून किती समजावून सांगितलें पण सुमन हट्टाला पेटली होती. इतक्यांत कंदर्प समोर आला. सुमननें त्याला ओळखलें व त्याचे पाय धरून ती रडूं लागली.

"कोण हा?" यज्ञस्वामीनें व इतरांनीं तिला विचारलें.

"हेच तर ते!" आनंदानें लाजत स्मित करून ती मान खालीं करून उभी राहाली.

यज्ञस्वामीला आनंद झाला. तो सुमन व कंदर्पला आपल्या घरीं घेऊन गेला. दोघं कांहीं दिवस यज्ञस्वामीच्या घरीं राहालीं. नंतर यज्ञस्वामीनें दोघांना निरोप दिला. कंदर्प आपल्या बायकोला घेऊन सासुरवाडी गेला व तेथें कांहीं दिवस राहून आपल्या गांवीं परतला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा! मला एका गोष्टीची शंका आहे. सुमनला पाहतांच कंदर्प कां नाहीं समोर गेला? ती चिता पेटवण्याचा हट्ट करून बसली तेव्हांच तो कां पुढें झाला? या प्रश्नाचें उत्तर माहीत असूस तूं दिलें नाहींस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

विक्रमार्क म्हणाला—"सुमनशीं त्याचें लग्न झालें, तो एक योगायोग होता. परंतु तिनें मनापासून त्याला वरलें होतें हें कळल्यावर त्याला फारच आनंद झाला. स्वाभिमानी लोक फक्त नशिबावर अवलंबून रहात नाहींत, त्यांना आत्माभिमान पण असतो. त्याचें समाधान झाल्याशिवाय त्यांना आनंद वाटत नाहीं. स्वाभिमानी व्यक्तीला साजेल असेंच कंदर्पचें वर्तन होतें.

अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेताबरोबर नाहींसा झाला व झाडाला जाऊन लोंबकळूं लागला. (कल्पित)





# अहंभाव

एका गांवी रामराव देशमुख नांवाचे एक जमीनदार रहात असत. त्यांची बायको आजारी होती. आजार वाढत चालला होता. पण रोगाचें निदान कोणा वैद्याला किंवा हकिमाला करतां आलें नाहीं.

देशमुखांच्या गांवानजीकच्या गांवीं एक ज्योतिषी रहात असे. तो प्रश्नांची उत्तरें बरोबर देई. कोणाच्या मनांत विशिष्ट गोष्टीसाठीं इच्छा उत्पन्न झाल्यास तो त्या ज्योतिष्याकडे जाई व आपली इच्छा व्यक्त करी. ज्योतिषी ती इच्छा पुरी होण्यास ज्योतिष पाहून उपाय सांगे. परंतु ज्योतिषी जें सांगे तें लक्षपूर्वक ऐकून अगदीं तसेंच करावें लागे. कोणी लक्षपूर्वक न ऐकतां उडवा उडवीनें ऐकून कांहीं केलें तर मात्र ज्योतिष्याला मनस्वी राग येई. ऐकणारा कितो का मोठा असेना, प्रथम त्याला ज्योतिषी जें कांहीं बोले, निमूटपणें ऐकून घ्यावें लागे. तरच ज्योतिषी प्रश्नाचें उत्तर बरोबर सांगे. म्हणून कोणी त्या ज्योतिष्याकडे जायला फारसा धजत नसे. परंतु एक गोष्ट मात्र सर्वांच्या प्रत्ययास आली होती, तो ज्योतिषी जें कांहीं सांगे तें खरें ठरे.

देशमुखांनीं ज्योतिष्याला जाऊन बायकोच्या आजाराचें कारण विचारावें असें अनेक वेळां योजलें. परंतु ज्योतिष्याचें तऱ्हेवाईक वागणें ऐकूनच त्याच्याकडे जायला त्यांना धीर होत नव्हता. परंतु बायकोच्या आजारामुळें देशमुख इतके त्रासले कीं शेवटीं त्याच्याकडे जाण्याव्यतिरिक्त दुसरा उपाय त्यांना सुचेना. एक दिवशीं ते ज्योतिष्याच्या घरीं गेले.

ज्योतिष्याला पांढरी व लांब दाढी होती. लांब लांब मिशा होत्या. एकंदर चेहरा रुबाबदार होता. देशमुख येऊन बसल्याबरोबर ज्योतिषी म्हणाला—"रामराव देशमुख नव्हे का तुम्ही! बायको आजारी आहे व आजार काय व त्याला इलाज काय, हें विचारायला आलां आहां, नव्हें का तुम्ही? तुमची मान खालीं होईल असें वाटलें तुम्हांला! हा शुद्ध दुरभिमान होता तुमचा. अगदीं सहज होणारी गोष्ट तुम्हांला सुचली नाहीं. कारण डोक्यांत शिरलेला दुरभिमान आड आला. तो करा बाजूला, तुमच्या बायकोचा सर्व आजार बरा होईल. औषध पाणी करून पाण्यासारखा व्यर्थ खर्च करूं नका. कळलें का?"

रामराव तर थक्कच झाले. सर्व कळल्यासारखें डोकें हलविलें. परंतु त्यांना कांहींच कळलें नव्हतें. खरें बोलावें तर आणखी काय काय ऐकावें लागतें कोणास ठाऊक असा विचार करून ते कांहीं बोलल्याशिवाय उठून घरीं निघून गेले.

ज्योतिषी जें म्हणाला त्या गोष्टीचा विचार करीत असतां त्यांना एक गोष्ट आठवली. रामराव गांवचे एक वजनदार जमीनदार होते म्हणून त्यांनीं गांवचा ओढा अडवून



ओढ्याचें सर्व पाणी पाटानें आपल्या शेतांत सोडलें होतें. शेजारच्या सोमूच्या शेतांत एक थेंबदेखील पाणी जाऊं दिलें नाहीं. म्हणून त्यांची बायको आजारी पडली असावी व ज्योतिष्याच्या बोलण्याचा अर्थ कदाचित तोच असावा.

म्हणून रामारावांनीं सोमूला बोलाविलें व म्हणाले—"हें पहा सोमू! तुला मागच्या खेपेला ओढ्याचें पाणी शेताला मिळालें नाहीं व तलावाचें पाणी पुरलें नाहीं. यापुढें तुला पाटाचें पाणी मिळेल. ती जबाबदारी मी घेतो." असें सोमूला सांगून त्याला

—श्री मा. स. सहोदे

निरोप दिला व ओढ्याला बांधलेला बांध आपल्या नोकरांकरवीं तोडून पाणी सोडलें.

रामरावांना आतां वाटूं लागलें कीं, बायकोची तब्येत आतां सुधारेल. परंतु तब्येत सुधारली नाहीं. ज्योतिषी जें म्हणाला होता त्यावर रामरावांनीं पुन्हां विचार केला, पण कांहीं कळेना. यांत जरूर कांहीं तरी गूढ अर्थ असला पाहिजे व तो ज्योतिष्यालाच विचारून घेतला पाहिजे. असा विचार करून रामराव अगदीं नाइलाजानें पुन्हां ज्योतिष्याकडे गेले. ज्योतिष्यानें त्यांना पाहतांच विचारलें–" पुन्हां आला आहां! अहो मी तुम्हांला तेव्हांच नाहीं का सांगितलें कीं तुमच्यांत अहंभाव आहे. मी सल्ला दिला होता तो कळला नाहीं तर तुम्हांला? जें सहज कळायला हवें होतें त्याच्या आड तुमचा तो अहंभावच आला. तुम्हीं अहंभावीपणानेच बायकोला माहेरी जाऊं दिलें नाहींत. माहेरचा ओढा कोणत्या बाईला नसतो? ल्हान सहान गोष्टीवरून तुम्हीं तिच्या माहेरला नांवें ठेवलींत व तिच्या मनाला दुखविलेंत. तेव्हांपासून तिची तब्येत बिघडली. आपल्या सासुरवाडच्या लोकांच्या उणीवा दाखवून त्यांचा अपमान केला असल्यास त्याबद्दल त्यांची माफी मागा. त्यांना आग्रहानें बोलावून आणा. मग पहा, बायकोची तब्येत सुधारते कीं नाहीं."

रामराव लगेच सासुरवाडी गेले. बायकोच्या आईवडिलांना भेटून प्रेमानें व आग्रहानें आपल्या घरीं बोलावून आणलें. त्यांना भेटल्यानंतर बायकोची तब्येत सुधारूं लागली. कांहीं दिवसांनीं तब्येत उत्तम सुधारली.





# यक्षानें खोड मोडली

यशस्थल नांवाच्या एका देशांत सोमगिरी नांवाचा एक शेतकरी रहात असे. त्याच्याकडे चार नांगरांची शेती होती व गोठ्यांत नेहमीं दोन तीन दुभत्या गाई असत. तो स्वभावानें लोभी व कृपण होता. म्हणून सर्व कामें तो स्वतःच करी. एकदां तो सकाळीं उठून गुरांना चारा वगैरे घालून शेतावर निघाला तेव्हां रस्त्याच्या बाजूला थोड्या अंतरावर त्याला कोणी घोरत असल्याचा आवाज ऐकूं आला. सोमगिरी आवाजाच्या अनुरोधानें जवळ गेला तर त्याला भेडकांच्या छत्री खालीं एक खुजा झोंपलेला दिसला.

त्या खुजाचा रूपरंग, त्याचे ल्हान बारीक हात पाय, मोठें पोट वगैरे पाहून सोमगिरीला वाटलें कीं तो कोणीतरी यक्ष असावा. त्या प्रदेशांत यक्ष मधून मधून दिसत. यक्ष मनुष्यांशीं मैत्री करून त्यांना थोडीफार मदत पण करीत. परंतु तो काळ आतां बदलला होता. तरी सोमगिरीला वाटलें कीं त्या यक्षाला धरून नेलें तर त्याच्या सहाय्यानें कोठें तरी चांगला मोठा ठेवा सांपडेल. म्हणून त्यानें त्या यक्षाला नकळत जवळ जाऊन धरलें.

"मला कां पकडतां? सोडा!" असें म्हणत यक्ष उठून उभा राहाला व स्वतःला सोडवूं लागला.

"किती दिवसांनीं सांपडलास! मला कोणता तरी ठेवा दाखव. तो दाखवीपर्यंत मी नाहीं सोडणार तुला." सोमगिरी म्हणाला.

"मला नाहीं माहीत कोणताहि ठेवा. मग मी कोठून दाखवूं?" यक्ष किरट्या आवाजांत म्हणाला.



"हें पहा बऱ्या बोलानें दाखविला नाहीस तर माझ्याशीं संबंध आहे, विसरूं नकोस, म्हटलें." असें सांगून सोमगिरी यक्षाला धरून आपल्या घरीं गेला आणि त्याला एका कपाटांत बंद करून कपाटाला कुलुप लावलें.

एक महिना लोटल्यावर सोमगिरी जंगलांत गेला असतां त्याला तेथें एक झाडाचें मोठें खोड तासून कापून ठेवलेलें दिसलें. हें येथें कोणी बरें आणून ठेवलें असेल, कळेना. त्यानें तें उचलून घेतलें आणि आपल्या गांवीं आला.

तें ओणकें घेऊन घरांत पाऊल टाकल्या-बरोबर कपाटांतून यक्षाचें हंसणें त्याला ऐकूं आलें. सोमगिरी म्हणाला—"तुला कपाटांत बंद करून ठेवल्याला एक महिना होत आला, पण अजून तुझें डोकें ठिकाणावर आलेलें दिसत नाहीं. येथेंच खितपत पडून राहण्यांत तुला मजा वाटते आहे म्हणावयाची. नाहींतर असा हंसला नसतास. बरं! पाहातों मी पण, किती दिवस तूं या कपाटांत बसून ही गंमत पाहतोस ती!"

आणखी कांहीं दिवसांनीं सोमगिरीच्या घरीं त्याचा दूरचा कोणी नातेवाईक आला. तो त्या बाजूनें कोठें तरी जात असतां सोमगिरीला भेटून जावें म्हणून आला होता. तो निघाला तेव्हां सोमगिरीनें जेवून जायला सांगि[illegible]. त्या नातेवाइकाला सोमगिरीच्या स्वभावाची चांगली ओळख होती. म्हणून म्हणाला—"कशाला हो! अहो, मला फार दूर जायचें आहे." असें म्हणाला व निघाला देखील. चारच पावलें गेला असेल व एक मस्तवाल पाडा समोर पळत आला आणि त्याला पाडलें व पायांखालीं तुडविलें. बिचाऱ्या नातेवाइकाचा पाय मोडला.

सोमगिरीला त्याला उचलून आपल्या घरीं आणावें लागलें व एक महिनाभर त्याची सेवाशुश्रूषा करावी लागली. सोमगिरी आपल्या नातेवाइकाला घरांत उचलून घेऊन येत होता तें पाहून कपाटांत बसलेला यक्ष जोरजोरानें हंसला. सोमगिरीनें तें त्याला ऐकून न आल्यासारखें दाखविलें.

आणखी एक महिना गेला. सोमगिरी आठवड्याच्या बाजाराला गेला. त्यानें आपले पैसे एका जागीं पुरून ठेवले होते. त्या काळीं बँका नव्हत्या. पैसे असेच जमिनींत पुरून ठेवण्याची पद्धत होती. सोमगिरीनें जरूर तेवढे पैसे काढून घेऊन बाकी तसेच त्या जागीं पुरून ठेवले व जमीन सारखी करून ठेवून निघून गेला. तें कोणीतरी पाहिलें आणि सोमगिरी निघून गेल्यावर सर्व पैसे काढून घेऊन खड्डा तसाच बुजवून ठेवून दिला.

संध्याकाळीं सोमगिरी बाजारांतून परत आला तेव्हां कपाटांतला यक्ष खदखदां हंसूं लागला.

सोमगिरीला राग आला. कपाटाची किल्ली घेऊन आला व कुलुप काढून कपाट उघडलें. यक्षाला बाहेर काढून म्हणाला—



"दोन महिने झाले, तूं येथें कैदेंत आहेस. तुला लाज नाहीं लज्जा नाहीं मला मदत करण्याचें दूरच, तूं माझी थट्टा मस्करी चालू ठेवली आहेस. दोनदां मी गय केली. या खेपेस तूं हंसण्याचें कारण सांगितलें नाहींस तर तुझा गळा दाबून तुझा जीव घेईन. बोल लवकर, काय रे झालें हंसायला तुला?"

"एके दिवशीं तूं ओणकें आणलेंस व तें सुताराला विकलेंस. तुला अक्कल नव्हती म्हणून तूं तें फक्त दोन रुपयाला विकलेंस. त्यांत हिरे माणिक्यें दडवून ठेवलीं होतीं तीं नाहीं कळलीं तुला! तो सुतार लक्षाधीश झाला आहे. तुझ्या मूर्खपणाबद्दल मला हंसूं आलें." यक्ष म्हणाला.

तें ऐकून सोमगिरीला आपल्या मूर्खपणाबद्दल स्वतःचाच राग आला. यक्ष पुढें म्हणाला—"मी दुसऱ्यानें हंसलो तें देखील तुझा मूर्खपणा पाहूनच! तूं त्या नातेवाइकाला नीट जेवायला घालून पाठविलें असतेंस तर तो पडला नसता व तुला महिनाभर त्याची सेवा करावी लागली नसती. आणि शेवटीं आतां मी हंसलो त्याचें कारण तसेंच झालें. तूं इतरांना मूर्ख समजून जें धन लपवून पुरून ठेवलें होतेंस तें तूं तिकडे बाजाराची वाट धरल्यावर चोरांनीं पळवून नेलें. तुझ्यासारखा मूर्ख तूंच!" यक्ष म्हणाला.

"म्हणजे सर्व पैसे चोरानें उचलून नेले म्हणतोस?" असें म्हणत सोमगिरी धांवत त्या खड्ड्याजवळ गेला. एक फुटकी कवडी पण त्याच्या हातीं लागली नाहीं. सोमगिरी परत येऊन पाहतो तर यक्ष तेथें नव्हता.





# काळी म्हाळसा

एका गांवीं एक शेतकरी रहात असे. त्याची बायको फार पूर्वीं वारली. गांवांत मंजुळा नांवाची मुलगी रहात असे. तिला त्यानें आपल्या घरीं कामाला ठेवलें होतें. तो शेतकरी मंजुळेला म्हाळसा म्हणून हाक मारी. मंजुळेला थोडें फार कळूं लागलें तेव्हां ती शेतकऱ्याला म्हणाली—"धनी! घरांतलें सगळें काम मी करतें. मग माझ्याशीं लगीन लावून रहा कीं थाटानें!"

"तुझ्याशीं म्हाळसे! मी लग्न करूं म्हणतेस? लग्न करायचेंच झालें तर चांगली मुलगी पाहून करीन!" शेतकरी म्हणाला.

मंजुळा भांडणच करायला आली होती कीं काय कोण जाणें, म्हणाली—"मी हाए तोंपर्यंत पाहतें कोण घरांत पाऊल टाकतें तें!" ती त्या दिवशीं आपल्या घरीं गेलीच नाहीं. शेतकरी तिला घराबाहेर कसें काढावें याचा विचार करूं लागला.

मंजुळा शेतांत काम करून आली होती. दमून भागून आडवी झाली ती गाढ झोंप लागली, इतकी कीं कोणी उचलून नेलें असतें तरी तिला कळलें नसतें. शेतकऱ्यानें तिच्या सर्व अंगाला काजळ चोपडलें.

संध्याकाळीं जेव्हां तिची झोंप मोडली तेव्हां आपले हातपाय काळे झालेले पाहून तिला स्वतःचेंच हंसूं आलें. मीच हाए कीं भूत? मला म्हाळसा नव्हते का म्हणत धनी. थट्टेखातर ती मालकाकडे जाऊन विचारूं लागली—"मंजुळा हाए का घरीं?"

"होय, आहे हो म्हाळसे!" असें शेतकरी म्हणाला. त्याला वाटलें कीं मंजुळा स्वतःलाच विसरून गेली आहे.



"म्हणजे मी नाहीं वाटतें मंजुळा ?" असा विचार करीत मंजुळा गांवाबाहेर गेली. तिला वाटेंत दोन चोर दिसले. ते तिचें तें भयंकर रूप पाहून पळूं लागले.

"खुळे आहांत झालें. असे पळतां कां ? चोरीला निघाला आहां ना ? मी मदत करीन तुम्हांला." मंजुळा म्हणाली.

चोरांनीं विचार केला कीं हें भूत स्वतः होऊन मदतीला येत आहे तर काय बिघडलें ! त्यांनीं मंजुळाच्या मदतीनें मेंढी चोरून न्यायचें ठरविलें. कारण मेंढी कोठें मिळणार हें त्यांना माहीत नव्हतें.

"तें काम माझ्याकडे लागलें. मी काळोखांत देखील मेंढरांच्या कळपांत शिरून मेंढी आणून देईन." मंजुळा म्हणाली. चोर तिच्याबरोबर निघाले. मेंढरांच्या खिल्लारा-नजीक पोचतांच मंजुळा आंत शिरली आणि चोर मेंढीची वाट पाहात बाहेर दडीआड उभे राहाले. इतक्यांत त्यांना मंजुळाचा आवाज ऐकूं आला—"मेंढीच ना पाहिजे कीं मेंढा ? कारण येथें दोन्ही आहेत."

"ओरडूं नकोस माझे आई, चांगली लठ्ठ दिसेल ती आण उचलून !" चोर म्हणाले.

"लठ्ठ ना ? कळलें, पण मेंढी कीं मेंढा ?....." मंजुळानें आणखी मोठ्यानें ओरडून विचारलें.

"लठ्ठ असूं दे, मेंढी असली काय किंवा मेंढा असला काय ? एकच !"

"मी सांगितलें ना येथें मेंढरांचा कळप आहे ! मेंढा हवा कीं मेंढी सांगा ना !"

"पुरे पुरे गप्प बस ! मिळेल तें घेऊन ये !" चोर ओरडून म्हणाले. मंजुळाचा आवाज ऐकून धनगर धांवत जवळ आला. चोर पळून गेले. "थांबा, थांबा जरा !" मंजुळा त्यांच्या पाठोपाठ धांवली.



मंजुळाचें तें रूप काळोखांत पाहून धनगराची जीभच खिळली.

त्या दिवशीं चोरांना उपाशी रहावें लागलें. मंजुळा पण उपाशीं राहाली.

दुसऱ्या दिवशीं काळोख पडल्यावर ते कोंबडी चोरून आणायला निघाले. पण कोंबड्यांचें खुराडें कोठें आहे हें त्यांना माहीत नव्हतें.

"मला माहीत आहे, गांवांत कोठें कोठें खुराडीं आहेत तीं. तें काम माझ्याकडे लागलें." असें सांगून मंजुळा त्यांना बरोबर घेऊन निघाली. गांवांत ती चोरांना बाहेर थांबायला सांगून एका आवारांत शिरली. खुराड्याजवळ जाऊन ओरडली—"पुष्कळ आहेत कोंबडीं ! कोंबडा हवा कीं कोंबडी ?"

"ओरडूं नको माझे आई ! मोठें व जड असलें कीं झालें. जें मिळेल तें आण उचलून !" चोर म्हणाले.

"मोठें कोंबडें ना ? आहे ! पण काय हवें कोंबडा कीं कोंबडी ?"

"ओरडूं नकोस बाळे ! चांगलेंसें जें मिळेल तें आण !" चोर म्हणाले.

"पण सांगा न, कोंबडा हवा कीं कोंबडी ! इथें पुष्कळ आहेत !" मंजुळा



ओरडून म्हणाली. कोंबड्या ओरडूं लागल्या. खुराड्याचा मालक जागा झाला. चोर पळून गेले.

"अरे थांबा तरी, असे पळतां काय ? कोंबडा मागितला असतात तर कोंबडा दिला असता, नाहीं तर कोंबडी !" मंजुळा असें म्हणून त्यांच्या पाठीमागून धांवत पळून गेली. मंजुळाचें रूप पाहून खुराड्याच्या मालकाची वाचा बंद झाली.

दोन दिवस फुकट गेले. चोरांना खायला मिळालें नाहीं व मंजुळालापण कांहीं मिळालें नाहीं. गांवकऱ्यांना वाटूं

लागलें कीं गांवांत भुतांचा सुळसुळाट वाढत चालला आहे.

तिसऱ्या दिवशीं चोर मेंढरांच्या कळपा-कडे निघाले. त्यांनीं मंजुळाला बरोबर घेतलें नाहीं. कारण या भुताला बरोबर घेतलें तर उपाशींच मरावें लागणार! मंजुळेचा जीव पण भुकेनें कासावीस होऊं लागला होता. म्हणून एका शेतांत शिरून रताळीं, भुइमुगाच्या शेंगा, जें मिळालें तें उपटून खाऊं लागली. शेताचा मालक पाहाऱ्याला एका मांच्यावर पडून होता. त्यानें मंजुळाला पाहिलें व तिला भूत समजून तो सरळ ओढ्यापलीकडे एका मांत्रिकाकडे गेला. ओढ्याला पूर आला होता. मांत्रिक यायला तयार नव्हता.

"मी तुम्हांला आपल्या खांद्यावर घेऊन ओढ्यापलीकडे नेतो. हें भूत जिवंत राहालें तर मला उपाशीं मरावें लागेल." असें सांगून शेतकऱ्यानें मांत्रिकाला पाठीवर बसवून घेतलें आणि ओढा पार करूं लागला.

शेतांतून मंजुळानें त्यांना येत असलेले पाहिलें. दुरून तिला ते चोरच असतील असें वाटलें. तिनें मोठ्यानें ओरडून विचारलें— "आहे ना चांगला अडदांड जाडजूड!"

तें ऐकून शेतकऱ्याच्या अंगांतलें सर्व रक्तच जणुं कांहीं गोठलें. "बापरे! तें आतां तूंच पहा!" असें म्हणत त्यानें मांत्रिकाला पाण्यांत टाकलें आणि पळ काढला.

रोज रात्रीं जें घडलें तें अर्थातच मंजुळाच्या मालकाला कळत गेलें. हा उद्योग मंजुळाचाच असणार ह्यांत त्याला शंका उरली नाहीं. म्हणून त्यानें तिला हुडकून घरीं आणलें आणि तिच्या इच्छेप्रमाणें तिच्याशीं लग्न करून घेतलें.





# परोपकारी गोपाळ

गोपाळ एक दिवशी आपल्या घराची रंगरंगोटी करविण्याच्या कामांत गुंतला असतां त्याला जुनें सामान साफसूफ करतांना घडी करून ठेवलेला एक कागद सांपडला. उघडून पाहिला तर त्यांत लिहिलें होतें कीं, "मला संगमनेरच्या रघुनाथरावांना माझें. औषधपाणी करून मला पुनर्जन्म दिल्याबद्दल पंचवीस आणि मला एका प्राण-संकटांतून वांचविल्याबद्दल शंभर. एकूण रुपये एकशें पंचवीस देणें आहे."

अक्षर गोपाळचे वडील वासुदेवराव यांचें होतें. गोपाळला मजकूर वाचून एवढेंच कळलें कीं त्याच्या वडिलांवर सव्वाशें रुपयांचें देणें होतें. पण कशाबद्दल हें कळेना. म्हणून त्यानें तो मजकूर आपल्या आईला वाचून दाखविला व तिला विचारलें.

आईनें थोडा वेळ विचार केला व म्हणाली "होय बाबा! थोडें पुसट कांहीं तरी आठवतें आहे. म्हणजे तें देणें त्यांनीं दिलें नव्हतें. वाटतें ? ते कधीं माझ्याजवळ याविषयीं बोलले नाहींत. तीस वर्षांपूर्वीची गोष्ट असेल. तुझें वय त्यावेळीं सुमारें तीन वर्षांचें होतें." नंतर तिनें. तिला जें आठवलें तें. थोडक्यांत सांगितलें.

गोपाळचे वडील वासुदेवराव यांच्याकडे तशी जास्त जमीन नव्हती. घरची गरीबीच होती. म्हणून कोणी जेवायला बोलाविलें तर दूर परगांवीं जावें लागलें तरी जात.

एकदां वासुदेवराव राजधानीच्या गांवीं एका मोठ्या अधिकाऱ्याच्या घरीं जेवायला गेले होते. त्याच्याकडे कोणाचें तरी लग्न होतें. तेथें जेवून खाऊन व दक्षिणा घेऊन



[श्री. मा. गो. मोरे



ते घरीं परत येत होते. वाटेंत रघुनाथराव भेटले. ते संगमनेरचे राहणारे होते. ते देखील लग्नाला आले होते. दोघांची वाट एकच होती. म्हणून दोघे बोलत बोलत बरोबर येत होते. संगमनेरजवळ पोंचेपर्यंत खूप काळोख पडला. त्याच वेळीं एका चोरानें झाडापाठीमागून येऊन दोघांच्या पायांवर जोरानें दांडकें मारलें. परंतु वासुदेवरावांनाच फार लागलें व ते खालीं पडले. नंतर चोरांनीं त्या दोघांना निर-निराळ्या झाडांना बांधलें व त्यांच्याजवळ जें कांहीं होतें तें काढून घेतलें. नंतर तो म्हणाला—"तुमच्या दोघांपैकीं जो कोणी जाऊन शंभर रुपये आणून देईल त्याला तर सोडून देईनच दुसऱ्याला पण सोडून देईन. पैसे आणायला गेलेला सकाळपर्यंत पैसे घेऊन आला नाहीं किंवा बरोबर आणखी कोणाला घेऊन आला तर येथें राहील त्याचा वध केला जाईल."

दोघे एकत्र पकडले गेले होते म्हणून चोरानें ही युक्ति केली होती. दोघांपैकीं कोणी एकटाच भेटला असता तर त्याच्या-जवळ जें कांहीं मिळालें असतें तें घेऊन चोर निघून गेला असता. पण आतां दोघांपैकीं एकानें शंभर रुपये आणून देऊन दुसऱ्याला वांचवायचें होतें. वासुदेवरावांचें गांव दूर होतें. रघुनाथरावांचें गांव जवळ होतें. म्हणून ते चोराला म्हणाले—"मला सोड, मी जाऊन उजाडण्यापूर्वीं शंभर रुपये आणून देतों."

वासुदेवरावांना तें शक्यच नव्हतें. कारण एक तर गांव दूर होतें, दुसरें घरांत फुटकी कवडीसुद्धां नव्हती. मग शंभर रुपये कोठून आणून देणार!

"माझें गांव जवळ आहे, मी जाऊन शंभर रुपये आणून देतों." रघुनाथरावांनीं चोराला सांगितलें.

चोरानें रघुनाथरावांना सोडलें. अशा तऱ्हेनें जीव वांचल्यावर रघुनाथराव पुन्हां परत येऊन शंभर रुपये आणून देईल व आपला जीव वांचवील असें स्वप्नांत देखील वासुदेवरावांना वाटलें नव्हतें. सकाळीं चोर आपला जीव घेणार ही खात्री वासुदेवरावांना वाटत होती. म्हणून देवाची दया भाकीत राहाण्यापलीकडे त्यांना दुसरा उपाय उरला नव्हता.

परंतु रघुनाथराव उजाडण्यापूर्वीं परत आले व चोराला शंभर रुपये दिले. चोर पळून गेल्यावर रघुनाथरावांनीं वासुदेवरावांना सोडलें. अशा तऱ्हेनें जीव वांचविणाऱ्या रघुनाथरावांनीं केलेल्या उपकाराची फेड कशी करावयाची हे वासुदेवरावांना सुचेना. नंतर रघुनाथराव वासुदेवरावांना आपल्या घरीं उचलून घेऊन गेले. त्यांना लागलें होतें. पदरचे पैसे खर्च करून औषधपाणी केलें. त्याहून जास्त आश्चर्याची गोष्ट म्हणजे रघुनाथराव स्वतः तसे श्रीमंतपण नव्हते. रात्रीच्या रात्रीं त्यांनीं शंभर रुपये कसे काय उभे केले असतील हें वासुदेवरावांना कळेना. ते शंभर रुपये व औषधपाण्या-साठीं खर्च केलेले पंधरा रुपये, हे सर्व कसे



फेडायचें हा एक मोठा प्रश्न होता. तरी घरीं निघते वेळीं निरोप घेतांना, मी शक्य तितक्या लवकर हें कर्ज फेडीन असेंदेखील त्यांनीं सांगितलें होतें.

वासुदेवरावांनीं घरीं आल्यावर घडलेलें वृत्त बायकोला सांगितलें होतें. बायकोनें विचारलें तेव्हांच त्यांना आठवलें कीं रघुनाथ-रावांच्या घरीं त्यांचा तांब्या राहून गेला होता.

त्यानंतर दोन वर्षांनीं वासुदेवराव वारले. त्यांनीं कर्ज फेडलें कीं नाहीं गोपाळच्या आईला माहीत नव्हतें. कारण वासुदेव-



रावांना या ना त्या कामानिमित्तें नेहमीं घराबाहेर व तें देखील परगांवीं रहावें लागत असे. घर सोडून एकदां गेले कीं दोन दोन तीन तीन दिवस परत येत नसत. अगदीं शेवटीं ते आजारी पडले तेव्हां त्यांना अर्धांग झाला व वाचा बंद झाल्यामुळें त्यांना बायकोजवळ कांहीं सांगतां आलें नाहीं.

तें सर्व ऐकून गोपाळला फार वाईट वाटलें. वडिलांचें कर्ज इतके दिवस फेडलें गेलें नव्हतें. पैतृक ऋण फेडणें मुलाचें कर्तव्य असतें. तें फेडल्याशिवाय पित्याच्या आत्म्याला शांतिलाभ होणार नाहीं.

गोपाळनें हिशोब करून पाहिला, व्याजासकट कर्जाची रकम पांचशेंवर होत होती. म्हणून त्यानें लगेच थोडी जमीन विकली व पैसे घेऊन संगमनेरच्या वाटेनें निघाला. त्यानें तेथें पोंचल्यावर रघुनाथरावांविषयीं चवकशी केली तेव्हां एक जण म्हणाला—"हो हो, अहो ते रघुनाथराव म्हणतां? अहो ते गांवचे कुळकर्णी होते. आतां बहुतेक ते येथें नाहींत सें वाटते."

गोपाळ कुळकर्ण्यांकडे गेला. त्यावेळीं कोणी एकनाथराव गांवचे कुळकर्णी होते. त्यांनीं गोपाळच्या परोपकाराच्या गोष्टी ऐकल्या होत्या. म्हणून गोपाळनें आपली ओळख सांगतांच त्यांनीं गोपाळला आदरपूर्वक बसायला सांगितलें व सर्वप्रकारें त्याचा आतिथ्यसत्कार केला.

गोपाळ त्याच्या वडिलांनीं रघुनाथरावांकडून घेतलेल्या कर्जाची गोष्ट सांगून म्हणाला—"तुमच्या वडिलांनीं माझ्या वडिलांना एकशें पंचवीस रुपये कर्जाऊ दिले होते. तें आजपर्यंत मला माहीत नव्हतें. गेल्या तीस वर्षांत त्यावर जें व्याज चढलें आहे तें जमेस धरून मी कर्जाची पुरी रकम फेडण्यासाठीं आलों आहें. घ्यावी."

एकनाथराव पैसे घेण्यास मागेंपुढें करूं लागले. म्हणाले—"अहो, तुमच्या वडिलांना माझ्या वडिलांनीं जें दिलें होतें तें कर्ज नसून त्यांच्या रक्षणासाठीं खर्च केलेले पैसे होते ते. पण तुम्ही तें कर्ज समजून फेडण्यासाठीं आलांत हें पाहून तुमच्या पितृभक्तीचें कौतुक करावें तितकें थोडें आहे."

"तुमच्या वडिलांनीं काय विचार करून माझ्या वडिलांना मदत केली होती. हें कळायला आज जागा नाहीं. पण माझ्या वडिलांनीं ती रकम कर्जाची मानून टिपून ठेवली होती. ती गोष्ट कळल्यावरच मी आज आलों आहें." गोपाळ म्हणाला.

शेवटीं गोपाळच्या आग्रहावरून एकनाथरावांनीं पैसे घेतले व म्हणाले—"तुम्ही हे पैसे घ्यायला इतका आग्रह करीत आहां तर मी घेतों. हे पैसे मी कोणत्या तरी धार्मिक कार्याला लावीन." असें सांगून त्यांनीं पावती लिहून दिली. नंतर गोपळ निरोप घेतेवेळीं म्हणाला—"हो, एक गोष्ट आठवली, माझे वडील तुमच्या घरून निघतांना आपला तांब्या घेऊन जायला विसरले होते. आहे का तो?"

एकनाथराव चकित होऊन म्हणाले—"पाहून येतों. जुन्या भांड्यांत असेल.




थांबा." थोड्या वेळानें एक लहानसा गडू एकनाथराव घेऊन आले आणि म्हणाले—"हा आहे तुमच्या वडिलांचा तांब्या!"

गोपाळ तो तांब्या घेऊन आपल्या गांवीं निघाला. थोडें अंतर चालून गेल्यावर त्याला एका झाडाखालीं एक म्हातारा साधू बसलेला दिसला. त्या साधूला गोपाळनें जाते वेळीं पण पाहिलें होतें. त्या साधूसमोर फाटके कपडे घालून आतां दोन मुलें व एक जण असे तिथे उभे होते. तो मनुष्य रडत सांगत होता. "एकदां येऊन आईला भेटा." त्याच्या-



बरोबर आलेली मुलें रडत म्हणत होती—"या ना आजोबा!" त्या साधूचें लक्ष तिकडे मुळीच नव्हतेंसें दिसलें.

गोपाळ तेथें थांबला. त्यांच्याजवळ चवकशी करतां त्याला सर्व कांहीं कळलें. तो म्हातारा साधू रघुनाथराव होता. त्यानें गोपाळच्या वडिलांचा जीव वांचविला होता. तीस तीस वर्षांपूर्वी संगमनेरचा कुळकर्णी व ग्रामप्रमुख होता. घरची गरीबी होती. जमीन महसूल वसूल करून त्यानें घरांत शंभर रुपये ठेवले होते. तेच पैसे देऊन त्यानें वासुदेवरावांना सोडविलें होतें. परंतु ते रुपये पुन्हां सरकारांत जमा करणें त्याला शक्य झालें नाहीं व वासुदेवरावदेखील कर्जाचे पैसे फेडूं शकले नाहीत.

सरकारचे पैसे जमा करण्याची वेळ जवळ येत गेली तेव्हां रघुनाथरावांनी गांवांतल्या लोकांकडून कर्ज मागून ते रुपये फेडण्याचा प्रयत्न केला. एकनाथाच्या वडिलांचें रघुनाथरावांशीं पटत नव्हतें. त्यांनीं सरकार दरबारांत जाऊन रघुनाथरावांविरुद्ध अधिकाऱ्यांचे कान भरले. अधिकाऱ्यांनी येऊन चवकशी केली तेव्हां जमीन महसुलाचे पैसे रघुनाथरावांनीं खर्च करून टाकल्याचें कळलें. रघुनाथरावांनी चोराच्या हातून वासुदेवरावांना सोडविण्यासाठीं पैसे दिल्याचें सांगितलें नाहीं. अर्थात त्याला कामावरून कमी करण्यांत आलें. त्याच्याजवळ जी थोडी जमीन होती ती सरकारनें जप्त केली. त्याला गांवाबाहेर हाकलून लावण्यांत आलें व त्याच्याजागीं एकनाथाच्या वडिलांना कुळकर्णी म्हणून नेमण्यांत आलें.

त्या दिवसापासून रघुनाथरावांना आपल्या जीविताचा घरादाराचा वीट आला. त्यांनीं संन्यास घेतला व रानांत जाऊन ते एक झोंपडी बांधून राहूं लागले. त्यांचा मुलगा मधून मधून येऊन त्यांना जेवण देऊन जाई. आतां त्यांची बायको आजारी पडली होती. मरण्यापूर्वी पतीची भेट होईल म्हणून ती वाट पहात होती. म्हणून मुलगा त्याला घरीं चला म्हणून आग्रह करीत होता.

हें सर्व ऐकून गोपाळ थक्क झाला. त्यानें रघुनाथरावांना विचारलें—"माझे वडील तुमच्याकडे एक तांब्या ठेवून गेले होते नाहीं का?"

"होय गेले होते. तो तांब्या आहे घरांत. ज्या सद्गृहस्थाला मदत करायला गेल्यामुळें आमची अशी दुर्दशा झाली त्याला आम्ही कसे काय विसरूं? माझ्या आईनें तो तांब्या घेऊन त्याच्याकडे भीक मागायला जाऊन ये म्हणून मला कितीदां सांगितलें. पण मी उत्तर दिलें कीं जोंपर्यंत जिवांत जीव आहे त्याच्या दारीं भीक मागायला जाणार नाहीं." तो मनुष्य म्हणाला.

गोपाळनें त्याला आपली ओळख पुरी दिली व त्या साधूला म्हणाला—"रघुनाथराव! आतां या पुढें तुम्हीं संन्यासी म्हणून रहावें कीं पुन्हां घरीं जाऊन मुलांबाळांबरोबर रहावें हें तुम्हीच ठरवायचें आहे.



पण माझ्या प्रयत्नानें तुमचा मुलगा पुन्हां गांवचा कुळकर्णी म्हणून बहाल होईपर्यंत माझ्या बाबांच्या आत्म्याला शांतिलाभ होणार नाहीं."

गोपाळ रघुनाथरावाच्या मुलाला व नातवंडांना बरोबर घेऊन त्यांच्या झोंपडीपर्यंत गेला. रघुनाथरावांच्या बायकोला सर्व वृत्त कळल्यावर पुनर्जन्म झाल्यासारखें वाटलें. आपल्या वडिलांचा तांब्या घेऊन व बरोबर रघुनाथरावांच्या मुलाला घेऊन गोपाळ एकनाथाच्या घरीं गेला. त्यावेळीं एकनाथ चारसहा प्रमुख गांवकऱ्यांबरोबर बोलत

बसला होता. गोपाळनें त्याला विचारलें– "काय हो एकनाथराव, तुम्हीच रघुनाथरावांचे चिरंजीव म्हणून मी चुकीनें तुमच्याशीं सर्व बोलला असलांतरी तुम्ही माझ्या चुकीची दुरुस्ती करायला नको होती का? रघुनाथराव तुमचे वडील नाहींत व माझ्या वडिलांनीं तुमच्या वडिलांकडून कर्ज घेतलें नव्हतें. तुम्ही दिलेला तांब्यापण माझ्या वडिलांचा नाहीं. हा आहे माझ्या वडिलांचा तांब्या. यावर माझ्या वडिलांचें नांव देखील आहे. हा मनुष्य रघुनाथरावांचा मुलगा आहे. मी तुम्हांला दिलेले सर्व पैसे याला मिळाले पाहिजेत. म्हणून मुकाट्यानें सर्व पैसे परत करा. ही घ्या तुम्ही दिलेली पावती."

एकनाथ घाबरला. "काय भानगड आहे?" सर्व विचारूं लागले. कांहीं बोलल्याशिवाय त्यानें निमूटपणें सर्व रुपये परत केले. गोपाळनें ते रुपये नेऊन रघुनाथरावांच्या बायकोला दिले. "हे तुमचे रुपये आहेत. नीट औषधपाणी करून घ्या. खर्चाला आणखी पैशाची गरज पडली तर कळवा. मी पुन्हां येऊन भेटेन." असें सांगून गोपाळ निघून गेला.

गोपाळनें येऊन रघुनाथरावांवर झालेला अन्याय वर्णन करून सांगितला तेव्हां त्यांनीं जुने कागदपत्र काढून चवकशी केली व पुन्हां तीस वर्षांनंतर गांव कुळकर्ण्याचें काम रघुनाथरावाच्या कुटुंबियांकडे आनुवंशिक करून दिलें. रघुनाथरावांचा मुलगा गांव कुळकर्णी झाल्याचें ऐकून एकनाथानें त्याच्याशीं वितुष्ट ठेवण्याऐवजीं आनंदानें सर्व कागदपत्र त्याला दिले. अशानऱ्हेनें त्याला तुरुंगाची पायरी चढावी लागली नाहीं.





# कुत्र्यांना कळतें

एका धनगराला आठवड्याच्या बाजाराला जावें लागलें. मेंढरांवर लक्ष ठेवण्यासाठीं त्यानें कोणाजवळ सांगून ठेवलें नाहीं. कारण सांगून ठेवायला त्याचा मित्र किंवा कोणी नातेदार पण नव्हता. देवावर भरंवसा ठेवून त्यानें मेंढरें चरायला सोडलीं व बाजार पेठेला निघून गेला.

धनगर कांहीं अंतर चालून गेला असेल, त्याला बाजारपेठेंतून येणारा त्याच्या ओळखीचा एक मनुष्य भेटला. त्यानें त्याला विचारलें "काय बुवा, कोठें निघालास?"

"बाजारपेठेला जातो आहें. तसेंच एक जरूरी काम आहे." धनगर म्हणाला.

"मेंढरें कोठें आहेत? नजर ठेवायला आहे का कोणी?" त्यानें विचारलें.

"कोण असणार? देवाच्या भरंवशावर ठेवून आलो आहें." असें सांगून धनगर पुढें निघाला.

"मी पाहातो, आतां देव त्यांच्यावर कशी नजर ठेवतो तें." असा विचार करीत तो त्या धनगराचीं मेंढरें चरत होतीं तिकडे गेला. व पंचवीस मेंढरें निवडून त्यांना आपल्या गांवीं हांकून घेऊन निघून गेला.

धनगर बाजारपेठेंत आपलें काम आटोपून परत आला तेव्हां पंचवीस मेंढरें कमी झाल्याचें त्याला आढळलें. तेव्हां त्याला कळलें कीं देवाच्या भरंवशावर मेंढरें सोडून देणें बरोबर नाहीं.

मेंढरांची राखण करण्यासाठीं त्यानें दोन कुत्रीं विकत घेतलीं. ज्याच्याकडून त्यानें तीं कुत्रीं विकत घेतलीं होतीं त्यानें त्यांना

रोज प्रत्येकी एक पावशेर मांस खायला घालायला सांगितलें होतें. राखण करायला कुत्री ठेवली तरी मेंढरें कमी होत गेली. त्या प्रदेशांत लांडगे पुष्कळ होते. ते रोज एकेक दोन दोन मेंढरें खात. दुसऱ्या दिवशीं मेंढरें मोजल्यावरच ही गोष्ट कळे. कुत्रीं लांडगे येत असलेली पहात. पण तीं भुंकत नसत कीं त्यांच्या अंगावर धांवून जात नसत. मेंढरें उचलून नेऊं लागले कीं पहात उभीं रहात. लांडगे मेंढरांना ठार करून त्यांचें मांस पोट भरून खात व बाकी तेथेंच टाकून निघून जात. ते निघून गेल्यावर उरलेलें मांस कुत्रीं खात. दररोज हेंच होत असे. मेंढरें रोज कमी होत होतीं. काय करावें हें धनगराला सुचेना. तो अगदीं निराश झाला. त्या विचारांत त्याला एक दिवशीं रडूं कोसळलें.

तितक्यांत त्याला एक दाढीवाला म्हातारा तिकडे येत असलेला दिसला. त्यानें धनगराला रडत असलेला पाहून विचारलें—“कां रडतोस रे ! असें झालें तरी काय, सांगशील कीं नाहीं !”

“रडूं नाहींतर काय करूं ! देवाच्या भरंवशावर मेंढरें सोडून एकदां मी बाजार-पेठेला गेलो होतो तेव्हां पंचवीस मेंढरें नाहींशीं झालीं. मग विचार केला कीं राखण करण्यासाठीं कुत्रीं पाळावीं. पण कुत्रीं ठेवून न ठेवून सारखींच. दररोज लांडगे येत आहेत व मेंढरें चोरून नेत आहेत. हीं कुत्रीं भुंकतदेखील नाहींत.” धनगर म्हणाला.

“कुत्र्यांना खायला काय घालतोस ?” म्हाताऱ्यानें विचारलें.

“एकेक पावशेर मांस. म्हणजे प्रत्येकाला एकेक उंदीर खायला घालीत आहें.” धनगर म्हणाला.

“म्हणूनच तर तुला असें रडत बसावें लागत आहे. तूं जेव्हां जेव्हां बकरा किंवा मेंढरूं कापतोस तेव्हां तेव्हां थोडें मांस कुत्र्यांना पण खायला देत जा. तूं आपलें काम बरोबर करूं लागलास कीं कुत्रींपण आपलें काम बरोबर करूं लागतील.” म्हातारा म्हणाला.

तेव्हांपासून धनगर आपल्या कुत्र्यांना पोटभर खायला घालूं लागला. पहिल्या दिवशीं एक मेंढरूंदेखील कमी झालें नाहीं. दुसऱ्या दिवशीं एक दोन लांडगे कळोख पडूं लागल्याबरोबर आले.

“पळा रे पळा ! आमचा धनी आम्हांला पोटभर खायला घालीत आहे, आम्हांला तुमचें उष्टें मांस नको खायला.” एक कुत्रें भुंकूं लागलें.

“जाऊं नकोस. तूं आपलें पोट भरून खा व आम्हांला पण थोडें देऊन जा.” दुसरें कुत्रें भुंकलें.

दुसऱ्या कुत्र्याचें भुंकणेंच लांडग्यांना खरें वाटलें व ते मेंढरांच्या कळपांत शिरले. लगेच राखण करणाऱ्या कुत्र्यांनीं त्यांच्यावर झडप मारून त्यांना ठार केलें.
















# पाताळांतील नाग

सोन नदीच्या कांठीं गौड नगरीं महीपाल नांवाचा राजा राज्य करीत असे. तो युवराज असतांनाच आपल्या बायकोबरोबर नदी कांठीं गेला. तेथें कांहीं कोळी मासे धरत होते. त्यांनीं तीन मासे आणून युवराजाला भेट म्हणून दिले. आणि म्हणाले— "आम्ही ते राजवाड्यांत आणून पोंचते करूं. पण युवराज म्हणाला कीं, कशाला ? मी घेऊन जाईन बरोबर."

नंतर तो आपल्या बायकोबरोबर गिरि-प्रदक्षिणा करून राजधानीकडे परत जाण्या-पूर्वीं डोंगराच्या पायथ्याशीं एका दगडावर थोडा वेळ बसला आणि कोळ्यांनीं दिलेल्या माशांकडे लक्ष्यपूर्वक पाहूं लागला. ते मासे त्या नदींत मिळणाऱ्या सामान्य माशांपेक्षा थोडे मोठे व चांगलेपण होते. महीपालाच्या बायकोनें जास्त लक्षपूर्वक पाहून विचारलें—"हा किडा कसला ?"

टोपलींत तीन माशांव्यतिरिक्त एक किडा पण होता. तो काळा व दिसायला विलक्षण होता.

"हा, विषारी किडा दिसतो आहे. द्या फेंकून !" बायको म्हणाली.

महीपालनें बायकोच्या सांगण्याप्रमाणें शेपटी पकडून जवळच्या एका पडक्या विहिरींत तो किडा फेंकून दिला व दोघं राजवाड्यांत परत गेलीं.

त्यानंतर कांहीं दिवसांनीं अंग व मगध या दोन राज्यांचें आपसांत एक मोठें युद्ध झालें. महीपाल आपल्या वडिलांबरोबर मगध राज्याच्या वतीनें युद्धाला गेला. त्या युद्धांत मगध राज्याला जय मिळाला. पण युद्धांत महीपालच्या वडिलांस वीरगति मिळाली. तो घरीं आला तेव्हां चहूंकडे शुकशुकाट दिसला. कित्येक गांवें जळून बेचिराख झालीं होतीं.



महीपालनें घरीं पोंचतांच विचारलें "या प्रदेशावर असें एकदम कोणतें मोठें संकट आलें आहे !"

"होय, फारच मोठें संकट आलें आहे व तें देखील तुमच्यामुळेंच. आपण त्या दिवशीं जो किडा एका पडक्या विहिरींत टाकला होता तो पाताळांतला एक नाग होता. एक लहान किड्याचें रूप घेऊन कोळ्याच्या टोपलींत कसा काय आला नकळे. तो विहिरींत मोठा झाला व आतां वीस हात लांब एक नाग सांप झाला आहे. त्याला भूक लागली कीं त्याच्या तोंडांतून ज्वाळा येऊं लागतात. तो आपलें भक्ष्य शोधायला निघाला कीं, तो जिकडे जातो तिकडचीं झाडें झुडपें व घरें दारें जळून जातात. एवढेंच नव्हे तर दगड देखील वितळून जातात. तो मनुष्य किंवा प्राणी कांहीं खात नाहीं. तो दूध पितो हें कळल्यापासून लोक डोंगराखालीं मोठमोठीं भांडीं व कढाया भरून दूध ठेवून देतात. तो रोज सकाळीं येतो व दूध पिऊन नदींत निघून जातो. नदीच्या एका डोहांत दगडाला विळखा घालून झोंपतो. पाताळांत परत जायची वाट त्याला माहीत नसावी." या शब्दांत महीपालाच्या बायकोनें त्या भयंकर सांपाचें वर्णन केलें.

"पाताळांतले सांप एक हजार वर्षं जगतात, म्हणे ? या नागाला ठार केलें नाहीं तर प्रजेला फार त्रास होईल. या नागाला इतकें दूध रोज पाजत गेलों तर प्रजेला प्यायला दूध कोठून मिळणार ?" महीपाल म्हणाला.



"प्रजा खरोखरच फार घाबरून गेली आहे. या सांपाला कसें वाटेला लावायचें हें कोणाला कळत नाहीं. कांहीं दिवसांनीं इतकें दूध तरी कोठून मिळणार? ज्या दिवशीं त्याला दूध मिळत नाहीं त्या दिवशीं तो वाटेल तिकडे जातो व वाटेंत पडेल तें जळून भस्म होऊन जातें." महीपालची बायको म्हणाली.

"मी त्याला, काय वाटेल तें करून ठार करीन." असें सांगून तो नदीकाठीं गेला. पाण्यांत दगडाला बिळखा घालून सांप पडून होता. त्याचा काळा रंग चमकत होता. महीपालला डोंगराच्या पायथ्याशीं दुधाची मोठी टाकी पण दिसली. त्याच टाकींत लोकांनीं ओतलेलें दूध तो सांप पीत असे.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं महीपाल तलवार घेऊन सांप दूध पीत असे त्या जागीं गेला. सांप दुधांत तोंड बुडवून दूध पीत होता व त्याचें सर्व अंग बाहेर होतें. ती संधी साधून महीपालनें आपल्या तलवारीनें त्याचे दोन तुकडे केले. तलवारीचा धक्का लागल्यानें सांपाचें तोंडपण बाहेर येऊन पडलें. महीपालला वाटत होतें कीं सांप मरेल. पण सांप जमिनीवर तडफडूं लागला व आश्चर्य म्हणजे त्याचें तोंड व शरीर पुन्हां जुळलें व त्याच्या तोंडांतून ज्वाला येऊं लागला. तें पाहून सांप वळून त्याच्याकडे पाहण्यापूर्वीच महीपाल दूर निघून गेला. त्यानें मागें वळून पाहिलें तेव्हां सांप नदीकडे परत जात असलेला त्याला दिसला.

महीपालनें घरीं गेल्यावर जें घडलें तें आपल्या बायकोला जाऊन सांगितलें.

"त्या सांपाला तलवारीनें ठार करणें अशक्य आहे. त्याचे शेंभर तुकडे केले तरी ते पुन्हां जुळतील. याला आतां कसें ठार



करावें?" महिपालनें बायकोला विचारलें व विचारांत पडला.

गौड नगरीं एक वृद्ध नागरीक रहात असे. त्याला जगाचा अनुभव व ज्ञान फार होतें. कोणताहि कठीण प्रश्न असला तरी तो कसा सुटेल हें तो सांगत असे. महीपालनें बायकोच्या सांगण्यावरून त्याला बोलवून घेतलें व आदरपूर्वक बसायला सांगून पाताळांतल्या नागाच्या संकटांतून कशी सुटका मिळेल हें विचारलें.

म्हातारा कांहीं वेळ डोळे बंद करून विचार करीत राहिला व नंतर म्हणाला–"राजा! त्या नागाला ठारच करावयाचें असेल तर पाण्यांत शिरूनच त्याच्याशीं युद्ध केल्यास तें शक्य होईल."

राजाला तो सला थोडा विचित्र वाटला. ज्या नागाला जमिनीवर ठार करणें अशक्य आहे त्याला पाण्यांत ठार करणें कसें शक्य होईल? या शिवाय त्या दिवशीं नदीला पूर पण आला होता. वेगानें वाहणाऱ्या नदींत पाय थरत नव्हता मग सांपाशीं युद्ध कसें शक्य होणार?

त्या सर्वाचें उत्तर त्या वृद्ध नागरिकानें दिलें नाहीं. "मला जें बरोबर वाटलें तें



मी म्हणालो. पुढें आपल्याला वाटेल तें करावें." असें सांगून तो निघून गेला.

अशक्यच का होईना, महीपालानें, त्या म्हाताऱ्यानें सांगितल्याप्रमाणें करण्याचें ठरविलें. नाग दूध प्यायला गेला असतां तो नदी काठीं गेला आणि ज्या दगडाला नाग विळखा घालून पडून रहात असे त्या दगडाजवळ पोहोत गेला. त्या दगडाचें एक टोंक पातळीवर येत असे. त्यावर चढून महीपाल तलवार उपसून सांप येण्याची वाट पहात उभा राहाला.

कांहीं वेळानें सांप दूध पिऊन परत आला. त्याला दगडावर कोणी उभा











आहे हें दिसलें. तो पाण्यांत उतरून पोहोत दगडाजवळ आला. व घाई घाईनें दगडाला विळखा घालूं लागला. महीपाल चकित होऊन त्याच्याकडे पहात होता. पाण्यांत दगडाला सांप विळखा घालून बसला असल्या कारणानें त्याचें तोंड कोठें आहे व शेंपूट कोठें आहे हें महीपालला कळेना. इतक्यांत त्याच्या पायाला विळखा घालून सांप ओढीत असल्याचें महीपालला कळलें. तें त्याचें शेपूट होतें. महीपालनें तें तलवारीनें छाटून टाकलें व तें पाण्यांत पडून वाहून गेलें.

म्हाताऱ्यानें तसा सल्ला कां दिला होता हें आतां महीपालला कळलें. आतां त्याच्या मनांतली सांपाची भीति पार लयास गेली. जेथवर त्याचा हात पोंचला, त्यानें तलवारीनें सांपाच्या अंगाचे तुकडे करून टाकले. एकेक तुकडा वाहून जातांना दिसला कीं त्याचा उत्साह द्विगुणित होई. कारण ते तुकडे पुन्हां जुळत नव्हते. शेवटीं सांपाचें तोंडदेखील प्रवाहांत वाहून जात असलेलें त्याला दिसलें.

त्यानें घरीं आल्यावर पुन्हां त्या वृद्ध नागरिकाला आदरपूर्वक बोलाविलें व त्याचा सार्वजनिक सत्कार केला. कारण त्याच्या सल्ल्यानेंच नगराचें रक्षण झालें होतें.

परंतु एक गोष्ट राजाला कळली नाहीं. त्या म्हाताऱ्यानें पाताळ नागाला पण मदतच केली होती. पाताळनाग मरत नाहींत. राजानें कापून टाकलेले तुकडे समुद्रांत एकत्र जमले व पुन्हां जुळले. तेथल्या नागांनीं त्याला ओळखलें व त्याला आपल्याच पैकीं एक मानून पाताळ लोकांत राहण्याची परवानगी दिली.






कृष्णाचा खोडसाळपणा वाढत गेला. आतां याला कसा आळा बसेल हें गोपींना कळेना. गप्प तरी किती दिवस बसणार. शेवटीं त्यांनीं यशोदेकडे जाऊन कृष्णाच्या विरुद्ध तक्रारी सांगण्याचें ठरविलें. एक गोपी येऊन म्हणाली—"लाडकें मूल फक्त तुझ्याच पोटीं जन्मलें आहे. डोक्यावर बसवून ठेवलें आहेस त्याला, लाड कर करून. लहान मूल म्हणून आम्ही कानाडोळा करीत आलो. म्हणजे त्याला डोक्यावर चढूं देऊं असें वाटलें होय तुला ! तूंच शिकवून देते आहेस आपल्या लाडक्याला. त्यानें माझ्याकडे जो धुमाकूळ घातला तो जरा कान उघडून ऐक." असें सांगून ती कांहीं बोलणार इतक्यांत दुसरी गोपी येऊन म्हणाली—

"बाइ बाइ, बाइ बाई ! काय म्हणावें या मुलाला ? घरांत शिरून दहा मडकीं तूप, दही व दूध केलें कीं फस्त यानें. दहा दुधाचीं मडकीं अशी पालथी केली तर आम्हां गरिबांचा निभाव कसा लागणार ?"

तिसरी गोपी आली व म्हणाली—"हा मुलगा आहे कीं राक्षस ! मडकीं भरून लोणी शिंक्यावर ठेवलें होतें. तीं सर्व मडकीं रिकामी केलीं कीं या गुलामानें. नंतर मडकीं फोडलीं आणि शिंकीं तोडून पळून गेला ! आम्हांला नाहीं बाई हें खपणार !"



आणखी एक गोपी येऊन जोरजोरानें हात हालवून यशोदेला म्हणाली—" दुभत्याच्या खोलींत तूप भरून ठेवलें होतें मडक्यांत. मागच्या बाजूनें घराला कुलूप होतें. आपलें रत्न आलें आणि कुलूप फोडून आंत शिरलें. मी तर घाबरून पळूनच गेलें. त्यानें तूप खाल्लें कीं नाहीं हें नाहीं मला कळलें. थोड्या वेळानें जाऊन पाहातें तर एक थेंब भर तूप असेल तर शपथ! हा त्रास सहन करण्यापेक्षां गाई गुरांना घेऊन हें गांव सोडून कोठें तरी निघून जाण्यांत शहाणपण आहे. निदान या तुझ्या लाडक्याच्या त्रासांतून तर जीव सुटेल!"

आणखी एक गवळीण पाठीमागून इतर गवळणींना रेटीत व बाजूला ढकलत पुढें आली व म्हणाली—" हें तूं काय ऐकत बसली आहेस! माझ्या घरांत जो उपद्व्याप आपल्या चिरंजिवांनीं मांडला आहे तो घे ऐकून थोडा. तुझें लेकरूं आमच्या घरांत शिरलें. दहा मडकीं तूप, दहा मडकीं दही व दहा मडकीं दूध, जमिनीवर ओतून घरभर राडा करून ठेवला. रिकामीं मडकीं फोडून टाकलीं. नंतर गोठ्यांत शिरून गाई व वासरें सोडून दिलीं. घरांत मुलें रडत आहेत त्यांना पाजायला एक थेंबभर देखील दूध नाहीं."

आणखी एक गोपी येऊन म्हणाली—"मी मुलांकरितां व त्यांच्या वडिलांसाठीं तूपसाखरेचीं पक्वान्नें डबे भरून ठेवलीं होतीं. तुझ्या लाडक्यानें सर्व पक्वान्नें खाऊन डबे व भांडीं रिकामीं केलीं. त्याचें पोट म्हणजे भस्मासुराचें पोट आहे. मी कांहीं सांगितलें तरी त्यावर माझीं मुलें किंवा त्यांचे वडील विश्वास करतील कीं नाहीं शंकाच."

अशा तऱ्हेनें सगळ्या गोपींनीं यशोदेला कृष्णाच्या विरुद्ध अनेक तक्रारी सांगितल्या.



एकीच्या घरचा भिजवून ठेवलेली कणीक व साखरच कृष्णानें खाऊन टाकली होती. एवढेंच नव्हे तर कच्चे तांदूळसुद्धां कृष्णानें खाऊन टाकले होते. हीं कामें आतां लहान मुलांचीं का म्हणावयाचीं? कोणाच्या गाई, तर कोणाचीं वासरें रानांत सोडून द्यायचीं, घरांत त्यांचा मालक नाहीं कीं घरीं दुसरें कोणी नाहीं. हा सर्व उद्योग करणारें कुकुलं बाळ का?

शेवटीं सर्वांनीं एकत्र मिळून सांगितलें—"आम्ही जातों हें गांवच सोडून. तूं व तुझा मुलगा रहा तुम्हीच सुखानें."

सर्वांचें म्हणणें ऐकून यशोदा म्हणाली—"माझ्या मुलानें तुमचें एवढें का नुकसान केलें आहे? मी देईन बरं का सर्व भरून. पण एवढ्याशा मुलानें इतकी नासधूस केली असेल व इतका त्रास दिला असेल या गोष्टीवर विश्वासच बसत नाहीं माझा. बाकी तुम्ही खोटें कशाला सांगाल? पाहातें मी त्याला. पण तुम्ही नका बाई गांव सोडून जाण्याचें बोलूं? तुम्ही सर्व निघून गेलांत तर आम्ही एकटे कसे राहूं या गांवांत?" असें सांगून व सर्वांची समजूत घालून यशोदेनें सर्वांना निरोप दिला.



नंतर तिनें कृष्णाला बोलावून विचारलें—"बाळ, कशाला जातोस त्यांच्या घरीं? तुला माझ्या घरीं दही, लोणी नाहीं का खायला मिळत? तूं हवें तितकें लोणी खा. आईच्या हातचा लोण्याचा गोळा नाहीं का आवडत तुला? घरचें घोटभर दूध कासंडीभर दुधासारखें असतें. कां उगीच दुसऱ्यांच्या घरीं जाऊन अशी नासधूस करतोस?"

"आज उजाडल्यापासून तुझ्या विरुद्ध तक्रारी ऐकूनच कान किटले. फार खट्याळपणा चालवला आहेस. मला नाहीं आवडत हा खट्याळपणा. थांब, आज मी तुझी खोडच



मोडतें." असें सांगून तिनें कृष्णाचा हात धरला व अंगणांत उखळ होतें त्या उखळाला त्याला बांधून ठेवला. नंतर एक काठी घेऊन आली व म्हणाली—"पाहातें येथून कोठें जातोस तें. हललास तर पहा." असें सांगून ती घरांत जाऊन कामाला लागली.

कांहीं वेळानें कृष्ण गोठ्यालगत दोन झाडें होतीं, त्या झाडांच्या मधोमध उखळ ओढीत घेऊन गेला. नंतर जोरानें असा हिसका दिला कीं दोन्ही झाडेंच उपटून खालीं पडलीं.

तो आवाज ऐकून शेजार पाजारच्या गोपी धांवत आल्या. त्यांनीं कृष्णाचा तो प्रताप पाहाला व आंत जाऊन यशोदेला सांगितलें. म्हणाल्या—"उगाच का कोणी म्हटलें कीं तुझा मुलगा मनुष्य नाहीं राक्षस आहे म्हणून? त्याला का तूं उखळीला बांधून ठेवला होतास? त्यानें झाडें उपटून पहा अंगावर पाडून घेतली आहेत. मोठें शहाणपण केल्यासारखें तुला वाटत असेल. पण जरा बाहेर येऊन तर पहा, कांहीं बरेंवाईट झालें तर तें आम्हांला नाहीं खपणार."

तें ऐकून यशोदेच्या मनांत धस्स झालें. ती पळत बाहेर आली. तिला त्या वेळीं स्वतःचें भानदेखील राहालें नाहीं. चुलीवर दूध होतें तें तसेंच टाकून धांवली.

त्या अवधींत नंद व त्याचे मित्र गवळीपण तेथें आले. दोन ढगांमध्यें चंद्र असावा तसा कृष्ण त्या दोन्ही झाडांच्यामधें हंसत बसला होता.

नंदानें कृष्णाच्या कमरेला बांधलेली दोरी सोडली व त्याला उचलून घेऊन म्हणाला—"कोणी रे बांधली दोरी कमरेला? आणि उखळीला बांधून कां कोणी ठेवलें? इतकी दूर कशी रे उखळी ओढून नेलीस?





आणि हीं दोन्ही झाडें कशी रे उपटून निघालीं? हें सर्व मी काय पाहातों आहें?"

यशोदेनें येऊन सर्व सांगितलें. म्हणाली—"कान धरला बाई या मुलापुढें. अहो, मीच बांधून ठेवलें होतें याला." तें ऐकून नंदानें मनांतल्या मनांत आपल्या मुलाचें किती कौतुक केलें? 'एवढें का बळ आहे माझ्या मुलाच्या अंगांत?'

म्हाताऱ्या कोताऱ्यांना तें सर्व झालें कसें हेंच कळेना. "वादळ आलें नाहीं कीं वीज देखील पडली नाहीं. कोणी हत्ती या बाजूला आला नाहीं. मग हीं झाडें पडलीं कशीं? या एवढ्याशा मुलानें का पाडलीं म्हणावयाचीं हीं? या मुलानें असलें काम पहिल्यानेंच कां केलें आहे? त्या पूतनेला यानेंच नाहीं का ठार केलें आणि ती गाडी यानेंच नाहीं का मोडली? आतां या गांवीं नको रे बाबा रहायला! पण जन्म येथें झाला. लहानाच्या मोठ्या येथेंच झालों आणि आतां गांव सोडून जावेंच म्हटलें तर कोठें व कसें जायचें?" असा विचार करीत त्या आपापल्या घरीं निघून गेल्या.

दिवसांमागून दिवस गेले व महिन्यांमागून महिने आणि पांच वर्षें लोटलीं. बलराम आठ वर्षांचा झाला व कृष्ण सात वर्षांचा. बरोबरच्या सवंगड्यांबरोबर सर्व खेळत. दिवस केव्हां उजाडला व केव्हां संपला कळतदेखील नसे. निरनिराळे खेळ खेळण्यांत सर्व गुंग होऊन जात. कधीं मोठ्यानें गलका करून मेंढरांना पळवून लावीत, तर कधीं गाणीं म्हणत हिंडत फिरत. कधीं झाडावर चढत. कधीं मधमाशांचीं पोळीं दिसलीं कीं चढून मध खात. या गवळ्यांच्या मुलांची एकंदरीत मजा होती.

एकदां बलराम कृष्णाला म्हणाला—"कृष्णा! अरे, आपण येथें जन्मलों आणि



येथेंच इतके वाढलों. गवळ्यांनी व गाई-गुरांनीं एकाच जागीं किती दिवस रहायचें? हें कांहीं बरोबर नाहीं. गवताचीं कुरणें पण संपत आलीं. चारा नाहीं. झाडें पडून गेलीं आहेत. लाकूडफाट्यासाठीं दूर जावें लागतें. म्हणून चला आपण हें गांव सोडून वृंन्दावनला जाऊन राहूं या. तें एक सुंदर वन आहे असें ऐकतों. तेथें गोवर्धन पर्वत आहे. त्याच्यावर भांडीर नांवाचा एक वटवृक्ष आहे. वृंदावन नगराच्या मधोमध कालिंदी नदी वाहाते. तेथें जाऊन राहूंया आपण. म्हाताऱ्या लोकांना सोडायला नको आहे हें गांव. त्यांना भीति वाटावी म्हणून मी एक युक्ति करतों. हें पहा."

तो इकडे असें म्हणाला आणि एक चमत्कार घडला. त्याच्या अंगांतून लांडग्यांचे कळप उड्या मारून बाहेर आले व ते त्या प्रदेशांत हिंडूं फिरूं लागले. गवळी घाबरले. गाई पळूं लागल्या, एकाएकीं सहस्रावधी लांडगे कोठून आले कोणाला कळेना. त्यांची शिकार करणें गवळ्यांना शक्यच नव्हतें. लांडग्यांनीं एका मोठ्या बैलाला ठार केलें. तो बैल सामान्य नव्हता. त्याला पाहून वाघ व सिंहदेखील जवळ यायला भीत. एका क्षणार्धांत लांडगे आले आणि वासरें ओढून घेऊन जाऊं लागले. एवढेंच नव्हें तर रात्रीच्या वेळीं वाघासिंहांची डरकाळी पण ऐकूं येऊं लागली. रानटी डुकरें येऊन गांवभर जमीन उकरून जाऊं लागलीं.

प्रमुख गवळ्यांची एक सभा भरली. आतांपर्यंत लांडग्यांनीं जो धुमाकूळ माजविला होता त्याची जाणीव सर्वांना झाली होती. या पूर्वीं मधून मधून अशीं संकटें येत, परंतु त्यांनीं कधीं त्यांची फिकीर केली नव्हती. पण आतांचें हें भयंकर संकट कसें टळणार हें त्यांना कळेना.











"वृंदावन एक चांगलें गांव आहे. पण तेथेंदेखील जाणें सोपें नाहीं. तेथें सुद्धां राक्षस येतात म्हणे. कांहीं का असेना, येथें राहाणें या पुढें तरी शक्य नाहीं. येथून दुसरें कोठें तरी गेलें हें पाहिजेच." कित्येक गोप प्रमुख म्हणाले.

त्यांचें परस्परांचें बोलणें चालू असतां नारद तिकडे आला व तो नंदाला बोलावून एका बाजूला घेऊन गेला व म्हणाला—"तुम्ही वृंदावनला जाऊन राहण्याच्या विचारांत आहां असें दिसतें. पण तिकडे देखील राक्षस येतील व मुलांबाळांना त्रास देतील, ही भीति वाटते आहे तुम्हांला? होय ना? मग ऐक! तुझा मुलगा मनुष्य नसून स्वतः आदिनारायण आहे. त्यानें राक्षसांचा संहार करण्यासाठीं अवतार धारण केला आहे. बलरामाच्या अंगांत देखील नारायणाचा अंश आहे. राक्षस कृष्णाला ठार करण्यासाठीं निरनिराळीं रूपें घेऊन आले. शकटासूर गाडीच्या रूपें आला. झाडांत लपून ते बसले होते. पण त्यांच्या पैकीं एकालाहि कृष्णाच्या केसाला धक्का पोंचवतां आला नाहीं. हें सर्व तुम्हीं स्वतःच्या डोळ्यांनीं पाहिलेंच आहे. म्हणून तुम्ही उगाच विचार करीत बसूं नका. अगदीं निर्भयपणें जाऊन वृंदावनला राहूं लागा. तुमचें कल्याणच होईल."

नारद कृष्णाला जाऊन भेटला. त्याच्या-जवळ पण तो तेंच म्हणाला. नंतर नंद आपल्या गवळी मित्रांना म्हणाला—"आपण सर्व वृंदावनला जाऊन राहूं या. आतां यांत उशीर करूं नये. सर्व वृंदावनला जाण्याची तयारी करा."

(पुढें चालू)





# अरण्यपुराण

[७]

गांवकऱ्यांच्या बैठकींत बलदेव रानटी जनावरांच्या गमतीदार गोष्टी तिखटमीठ लावून सांगे. मुलें दूर बसून त्या गोष्टी ऐकत व चकित होऊन त्याच्याकडे पहात.

बलदेव बंदूक हातांत घेऊन त्या कपोल-कल्पित गोष्टी सांगूं लागला कीं मौवली पोट धरून हंसे. त्याचें हंसणें कोणाला दिसूं नये म्हणून तो तोंडावर हात ठेवी.

बलदेव एकदां सांगूं लागला कीं मेस्सु-वाच्या मुलाला एक भूतवाघ उचलून घेऊन गेला होता. कांहीं दिवसांपूर्वी एक सावकार मेला होता व तो भूत होऊन त्या वाघाच्या अंगांत शिरला होता.

"आणखी हें तरी खोटें कां म्हणावें! कारण त्या पूरणदास सावकाराच्या वह्या जाळल्या गेल्या तेव्हां मारामारीच झाली आणि गोंधळ उडून गेला होता. त्या गोंधळांत त्या सावकाराचा एक पाय तुटला होता. मी ज्या भूतवाघाची गोष्ट सांगितली तो देखील लंगडाच आहे. कारण त्याच्या पावलांच्या खुणा एक सारख्या नाहीत." बलदेव म्हणाला.

"या सर्व गोष्टी खोट्या आहेत. तो वाघ जन्मापासूनच लंगडा होता. ज्यांच्या अंगांत कोल्ह्याइतकें देखील साहस व धैर्य नाहीं असे भित्रे लोक का भूत होऊन वाघाच्या अंगांत शिरून बसणार?" मौवलीनें उलटा प्रश्न केला.

बलदेव थक्क होऊन मौवलीकडे पाहूं लागला. तोंडांतून एक शब्ददेखील उमटत



नव्हता. ग्रामप्रमुखानें विचारलें—"कोण तो ! तें जंगली पोर वाटतें ? इतकें सर्व तुला माहीत आहे तर त्याचें कातडें दाखव आणून. सरकारनें जाहीर केलें आहे कीं जो कोणी त्या वाघाला धरून आणील त्याला शंभर रुपयांचें बक्षिस मिळेल. तूं मधें बोलून लहान तोंडी मोठा घास घेऊं नयेस यांतच तुझें हित आहे."

मोवली उठून उभा राहाला व म्हणाला—"मी इतका वेळ निमूटपणें बसून बलदेवनें सांगितलेल्या जंगलांतल्या खऱ्या खोट्या गोष्टी ऐकत होतो. त्यानें भूत स्वतःच्या डोळ्यांनी पाहिलें नाहीं तर मग त्याच्या या गप्पांवर कोणाचा विश्वास बसणार ?" असें म्हणत तो तेथून उठून निघून गेला.

बलदेवला आपला अशा तऱ्हेनें झालेला पाणउतारा असह्य वाटला.

"या पोराला गुरें चरायला घेऊन जायला सांगितलें पाहिजे या पुढें." ग्राम-प्रमुख म्हणाला.

गांवांतली मुलें सकाळीं गुरें चरायला घेऊन जात आणि संध्याकाळीं परत येत. मुलें गुरांबरोबर असत तोंपर्यंत त्यांच्या जिवाला कोणत्याहि प्रकारें धोका नव्हता. कारण वाघ, गुरें एकत्र चरत तिकडे येण्याचें धाडस करीत नसे. मुलें फुलें तोडायला किंवा फळें खायला दूर कोठेंतरी निघून गेलीं म्हणजे मात्र थोडी भीति वाटत असे.

उजाडतांच मोवली 'रामू' नांवाच्या रेड्याच्या पाठीवर बसून निघाला. म्हशी एकामागून एक त्याच्या पाठीमागून येऊं लागल्या. मोवली बरोबरच्या मुलांवर अधिकार गाजवी व त्यांना नेहमीं गुरां-बरोबरच रहायला सांगे.

गुरें चरत तेथें उंचसखल व थोडी खडकाळ जमीन होती. गुरें खालीं खोलगट जागेंत दिसत नसत. कारण चरायला हिरवळ असेल तिकडे जात.

मोवली आपल्या गुरांना अगदीं जंगलाजवळ घेऊन गेला, वेणगंगेच्या काठी. तो रामूवरून उतरला आणि झाडींत शिरला. तेथें त्याचा मोठा 'भाऊ' वाट पहात होता.

"किती दिवस झाले, मी तुझी वाट पहात होतों. गुरें चरायला घेऊन जायचें हें काम काय करूं लागला आहेस ?" त्यानें मोवलीला विचारलें.

"मला हेंच काम करायला सांगितलें आहे. मला कांहीं दिवस गुरांना चरायला घेऊन जावें लागणार आहे. वाघोबा काय करत आहेत ?" मोवलीनें विचारलें.

"तो पुन्हां आला होता या बाजूला. पुष्कळ शोधलें त्यानें तूं कोठें दिसशील म्हणून. त्याला एकदेखील शिकार दिसली नाहीं तेव्हां गेला परत. तुझ्यावर त्याचा डोळा आहे", 'भाऊ' म्हणाला.

"बरें, वाघोबा परत येईपर्यंत तूं किंवा आणखी कोणी तरी, मी इकडे गुरें चरायला घेऊन येईन तेव्हां या टेंकडीवर बसलेले असा. तो इकडे परत आला तर मैदानांतल्या



तांबड्या उंचवट्यावर बसून रहा. मला त्याची हालचाल कळायला हवी आहे." मोवली म्हणाला.

आपल्या 'भावाला' पाठवून दिल्यावर तो झाडाखालीं जाऊन झोंपला. गाई व म्हशी जवळच चरत होत्या.

गुरांना चरायला घेऊन जाण्यापेक्षां जास्त सुखाचें काम काय असणार ? गुराख्यांना दिवसभर दुसरें कांहीं काम नसतें. गुरें चरत असतात व दिवस केव्हां गेला हें कळत नसे. तीं ओरडत पण नसत. म्हशी, त्यांना चरायचें असेल तोंपर्यंत चरत व नंतर

डबक्यांत किंवा चिखलांत जाऊन लोळत. गुराख्यांना मधून मधून आकाशांत गिधा-डांच्या कर्कश ओरडण्याचा आवाज ऐकूं येई. त्यांचा तो शिळीसारखा आवाज ऐकून इतर गिधाडें घिरट्या घालूं लागत. तीं कोणत्यातरी मेलेल्या जनावरावर धाड घालीत व लचके मारून मांस खात.

मुलें कांहीं वेळ झोंपत व पुन्हां उठून खेळत. नाहीं तर फुलें वेंचून आणीत व हार व गजरे करीत बसत, नाहीं तर मातींत बसून घरकुलें करीत. कधीं कोणी राजा होई, तर कधीं राणी, नाहीं तर देव किंवा देवी. अशातऱ्हेनें दिवस निघून जाई. काळोख पडूं लागल्याबरोबर ते गुरांना आरोळी मारून बोलवीत. तीं आपापल्या जागेवरून उठून येत आणि आपल्या गुराख्याबरोबर गांवाकडे जात.

मौवली दररोज गुरांना घेऊन आला कीं सर्वांत प्रथम टेकडीकडे पाही. त्याच्या भावां-पैकीं कोणी तरी तिकडे बसलेला दिसे. त्याचा अर्थ वाघोबा तिकडे जवळपास आलेला नाहीं. तो रोज झाडाखालीं झोंपे आणि आपल्या जंगलांतल्या जुन्या गोष्टींचीं स्वप्नें पाही. वाघोबा आलाच असता तर त्याच्या पावलांची चाहूल मौवलीला खात्रीनें लागली असती.

शेवटीं एक दिवशीं मौवलीला टेकडीवर त्याचा कोणी भाऊ दिसला नाहीं. मौवलीला मनांतल्या मनात हंसूं आलें व तो आपल्या गुरांना त्या तांबड्या उंचवट्याकडे घेऊन गेला. तेथें त्याचा 'मोठा भाऊ' वाट पहात बसला होता. मौवलीच्या अंगावर शहारे उभे राहिले.

जोरानें श्वास घेत तो पुटपुटला—"वाघोबा आला आहे तर!"





# ६१. समर्रा मिनार

शिया मुसलमानांचें समर्रा हें एक तीर्थक्षेत्र आहे. हें टायग्रस नदीकाठीं आहे. अब्बास वंशाच्या खलीफांनीं नवव्या शतकांत येथें आपली राजधानी वसविली. नवव्या खलीफांनीं बांधलेल्या या मिनाराची उंची १७० फूट आहे. याचें सर्व बांधकाम विटांचें आहे.





# भारताचा इतिहास



सुरवातीला सदाशिवराव भाऊ यांनीं चातुर्यानें काम केलें. त्यांनी आपलें सैन्य व संपत्ति वाढविण्यासाठीं रजपुतांशीं सख्य वाढविण्याचा यत्न केला. २ ऑगस्ट १७६६ या रोजीं दिल्ली शहर त्यांच्या हातीं आलें. त्या नंतर भाऊंच्या नशिबानें पाठ फिरविली. सूरजमल याच्याशीं थोडा बेबनाव होताच ते भाऊला सोडून निघून गेले. मल्हारराव होळकरांशीं पण त्यांचें विशेष पटलें नाहीं. दिल्लीवर केलेल्या स्वारी-मुळें पण त्यांच्या अडचणी वाढल्या. ऑगस्टच्या मध्याच्या सुमारास ते दिल्लीहून निघाले व २९ ऑक्टोबर १७६० या रोजीं पानीपत येथें पोंचले.

त्या अवधींत अहमदशाह अब्दालीनें अलीगढ काबीज केलें आणि अवधचा नबाब शुजाउद्दौला याच्याशीं सख्य करून घेतलें आणि त्यानंतर १ नोव्हेंबर १७६० या रोजीं तो पानीपतला पोंचला.

सुप्रसिद्ध पानीपतच्या मैदानावर अफगाण व मराठे यांच्या सैन्यांचें युद्ध झालें. अब्दालीच्या सैन्यांत ३० हजार घोडेस्वार व ३० हजार पायदळ सैन्य होतें. मराठ्यांचें सैन्य ४५ हजारांचें होतें. अब्दालीच्या बाजूला फक्त सैन्यच मोठें नव्हतें. त्याचें घोडदळ मोठें होतें, एवढेंच नव्हे तर त्याच्याकडे तोफादेखील होत्या. त्याची व्यूहरचना पण चांगली होती.

अडीच महिने दोन्ही सैन्यांच्या परस्परांशीं लहान मोठ्या चकमकी होत राहाल्या. त्यांतच, मराठ्यांचें बरेंच नुकसान झालें होतें. रसद पुरवठा होण्यास अडचणी आल्यानें त्यांना फार कष्ट सहन करावे लागले. शेवटीं १४ जानेवारी १७६१ या रोजीं मराठे अफगाण सैन्याशीं युद्धाला निघाले.

अब्दालीनें आपल्या सैन्याच्या मध्यभागीं आपला वजीर शावलीखान याच्या नायक-त्वाखालीं १८,००० चें सैन्य उभें केलें. त्याच्या उजव्या व डाव्या बाजूला पांच पांच हजारांच्या दोन तुकड्या उभ्या केल्या. त्यांत जास्त घोडेस्वार होते. त्यांचे प्रमुख होते नजीबुद्दौला व शुजाउद्दौला.



भाऊनें मराठा सैन्याचे पण तीन भाग केले. मधला भाग त्यानें स्वतःकडे ठेवला. डाव्या बाजूला इब्राहिम गारदी याचें सैन्य होतें व उजव्या बाजूला मल्हारराव होळकर व जनकोजी शिंदे यांचीं सैन्यें होतीं.

मराठ्यांनीं तोफांच्या गोळीबारानें युद्धाला सुरवात केली. ते फार शौर्यानें लढले. सुरवातीला त्यांना थोडें यशपण आलें. इब्राहिम गारदीच्या हल्ल्यासमोर नऊ हजार रोहिले हताहत झाले. याच प्रमाणें दुर्राणीच्या मधल्या फळींतील सैन्यावर भाऊनें शावलीखानाला हल्ला करावयास पाठविलें. यश जवळजवळ त्याच्या पदरांतच पडलें होतें.

परंतु त्याच वेळीं अब्दालीनें १२ हजार राखीव सैन्याची कुमक दुर्राणीच्या मदतीला पाठविली. तोंपर्यंत मराठ्यांचा जोर कमी होत गेला होता. दोन वाजतां विश्वासरावाला बंदुकीची गोळी लागली व तो तत्काळ मरण पावला. त्यानंतर भाऊ जिवावर उदार होऊन शौर्यानें लढला. परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. पावणे तीन वाजेपर्यंत मराठ्यांचा धीर खचत गेला.

दुर्राणीच्या तीन चार घोडेस्वारांनीं सदाशिवराव भाऊच्या दागिन्यांच्या मोहानें त्याचें डोकेंच कापून नेलें. अशा तऱ्हेनें











त्यानें आपल्या देशाच्या रक्षणासाठीं प्राणार्पण केलें. तरी पानीपतच्या युद्धांत मराठ्यांना जें अपयश आलें त्याला कारणपण तोच होता. त्यानें दुसऱ्या कोणाचा सल्ला घेतला नाहीं. या युद्धांत मराठ्यांचा नुसता पराभवच झाला नाहीं तर त्यांचे सर्व मोठमोठे सरदार धारातीर्थी पडले. सहस्त्रावधी शूर सैनिक बायका मुलांसह प्राणास मुकले.

महाराष्ट्राला हें युद्ध म्हणजे कलंकच होता. एक पिढीच्या पिढी ठार झाली. प्रत्येक कुटुंबांतला एक वीर तरी बळी पडला. ५० लाख घोडे, दोन लाख गुरें, सहस्त्रावधि उंट, पांचशें हत्ती व अलोट वैभव ते घालवून बसले. या सर्वांचा पेशव्यांना धक्काच बसला व २३ जानेवारी १७६१ या रोजीं त्यांना देवाज्ञा झाली.

पेशव्यांच्या वर्चस्वाला पण या पराभवामुळें धक्का पोंचला. तरी मराठ्यांनी पुन्हां आपली संघटणा केली. माधवराव पेशव्यांना या कामीं फक्त यशच मिळालें नाहीं तर मोठी कीर्तिपण मिळाली. त्यांनीं आपल्या पूर्वींच्या पेशव्यांची ध्येयधोरणें अमलांत आणण्याचा पुरेपूर यत्न केला. १७७२ सालीं त्यांचा मृत्यू झाला. मराठ्यांच्या राज्याला पानी-पतच्या युद्धा इतकाच मोठा धक्का माधवराव पेशव्यांच्या मृत्युमुळें बसला.

तें कांहीं असो पण पानीपतचें युद्ध ही भारताच्या इतिहासांतली अविस्मरणीय अशी घटना आहे. मराठे व मुसलमान यांनीं या युद्धांत परस्परांना इतकें निर्वीर्य करून सोडलें कीं इंग्रजांना त्याचा फायदा मिळाला.



# नेहरू चरित्र

[ ३१ ]



तुरुंगाच्या अधिकाऱ्यांनीं कांहीं दिवस तुरुंगाच्या आंगणाबाहेर जाऊं दिलें नाहीं. नंतर उजाडण्यापूर्वी अर्धा तास बाहेर पाहरेकऱ्यांबरोबर हिंडण्यास व पळण्यास त्यांना परवानगी देण्यांत आली. इतक्या लवकर हिंडण्याफिरण्याची परवानगी देण्याचें कारण त्यावेळीं जवाहरलालजींना कोणी पाहणें शक्य नव्हतें व त्यांना पण कोणी दिसणें शक्य नव्हतें.

रात्रीं ज्या दिव्याचा उपयोग जवाहर-लालजी करीत त्याचा उजेड वाचण्यासाठीं पुरेसा नव्हता. म्हणून ते लवकर झोंपत व पहाटे तीनचार वाजतां उठत. आकाशांतलीं नक्षत्रें पाहण्याचा त्यांना नादच लागला. भिंतीच्यावर ध्रुव तारा पाहून त्यांना विशेष आनंद होई.

एक महिनाभर जेलवार्डर व पाहारेकऱ्यां-शिवाय जवाहरलालजींना कोणी मित्र किंवा साथी नव्हता. म्हणून त्यांनीं त्या काळच्या तुरुंगांची तुलना भारताच्या पारतंत्र्याशीं केली आहे. तुरुंगाची व्यवस्था बहुतेकशी कैद्यांच्या हातांतच असे. कैद्यांनाच वार्डर नेमण्यांत येई. तेच ओव्हरसियर, सैंपाकी वगैरेंची कामें करीत.

जवाहरलालजींच्या लक्षांत आणखी एक गोष्ट आली. तुरुंगांतले पुष्कळसे कैदी गुन्हेगार नव्हतेच. त्या काळांत एकाद्या गांवांत दंगा झाला तर जो कोणी हातीं लागे त्यालाच तुरुंगांत घालण्यांत येई. ब्रिटीश अधिकाऱ्यांना ती संवयच पडून गेली होती. घरच्या कुटुंबियांपासून दूर कोणाला एकटें ठेवणें फारच मोठा दंड आहे. थोड्याच










पावसाळा सुरू झाला होता. छप्पर गळत होतें. खोल्यांतून ओल आली होती. रात्रीं मोतीलालजींचा बिछाना कोठें ठेवावयाचा हा प्रश्न होता. मधून मधून त्यांना ताप पण येई. शेवटीं तुरुंगाच्या अधिकाऱ्यांनीं त्या कोठड्यांना जोडून एक वऱ्हांडा बांधायचें ठरविलें. तो बांधून पुरा होण्यापूर्वीच मोतीलालजींची सुटका झाली व त्या वऱ्हांड्याची 'मजा' इतरांना उपभोगायला मिळाली.

जुलईच्या शेवटीं सप्रू व जयकर दोघे सरकार व कांग्रेस यांच्यामध्यें तडजोड घडवून आणण्याची खटपट करीत आहेत अशा अफवा कानावर येऊं लागल्या. व्हॉयसरॉय लॉर्ड अर्विन आणि सप्रू व जयकर यांच्या मध्यें जो पत्रव्यवहार झाला होता तो वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झाला. सप्रू व जयकर गांधीजींना भेटले. त्यांनीं तडजोडीची उठाठेव कशाला सुरू केली हे जवाहरलालजींना कळेना.

२७ जुलईला सप्रू व जयकर नैनीच्या तुरुंगांत जवाहरलालजींना भेटायला आले. त्यांच्या नांवीं गांधीजींचें एक पत्र बरोबर घेऊन आले होते. त्याच वेळीं तडजोडीच्या बोलण्यांचें गुपित जवाहरलालजींना कळलें. लंडनचे एक पत्रकार स्लोकोम्ब यांनीं एक वक्तव्य तयार करून मोतीलालजींच्या परवानगीनें प्रसिद्ध केलें. हें २५ तारखेला प्रसिद्ध झालें. त्याच सुमारास मोतीलालजींना अटक झाली होती. त्या वक्तव्यांतला सारांश असा होता कीं सरकारनें कांहीं अटी कबूल केल्या तर सत्याग्रह मागें घेण्यांत येईल. त्या साठीं गांधीजी व त्या वेळचे कांग्रेस अध्यक्ष जवाहरलालजी यांची अनुमति आवश्यक होती.





# पाताळ कोट

[ ९ ]

[ धूमक व सोमक कुंतल देशाच्या सैनिकांचा गणवेष घालून कांतिसेनेच्या शोधार्थ निघाले. कांहीं अंतर चालून गेल्यावर त्यांना एक लहान नदी लागली. ते पाणी पिऊं लागले तेव्हां एकाएकीं कांहीं रानटी लोकांनीं येऊन त्यांना घेरलें. त्यांचा सरदार विरूप त्यांच्यावर भाला फेंकणार इतक्यांत कां कोण जाणें, तो थांबला व त्यांचे पाय धरून माफी मागूं लागला.]

धूमक व सोमक क्षणभर थक होऊन त्याच्या कडे पहात राहाले. कारण- विरूपचें सर्व वागणें त्यांना विलक्षण वाटलें.

विरूप त्यांना नमस्कार करून म्हणाला— "तुम्ही दोघे कालशंबर मांत्रिकाचे मित्र आहां, म्हणून तुम्ही आम्हांला धन्यासारखे आहां. आज्ञानामुळें आमच्या हातून चूक झाली. त्याबद्दल माफ करा."

"आम्ही कालशंबर याचे मित्र नाहीं, शत्रू आहों." असें म्हणत दांत ओठ चावून तो जमिनीवर पडलेली आपली तलवार उचलणार, एवढ्यांत धूमक त्याला अडवून म्हणाला—"विरूपा! आम्ही कालशंबरचे मित्र आहों हें तुला कसें काय वाटलें?"

विरूप धूमकच्या कमरेला बांधलेल्या कालशंबरच्या मंत्रदंडाकडे बोट दाखवून



म्हणाला—" मांत्रिक कालशंबर आजच सकाळीं आमच्या गांवीं कांहीं वेळ विश्राम करून पुढें गेले. ते आम्हांला सांगून गेले कीं कोणी त्यांचा मंत्रदंड घेऊन आला तर त्याचें सर्व प्रकारें आदरातिथ्य करावें व ज्याच्याजवळ तो नसेल त्याला जंगलांत पाऊल टाकतांच ठार करावें."

तें ऐकून धूमकला फार आनंद झाला, पण एक शंका वाटली. कदाचित काल-शंबरचा यांतहि कांहीं गूढ हेतू असावा.

" आम्ही कालशंबरच्या निवासस्थाना-कडेच जात आहों. कुंभीर नांवाचा राक्षस त्याचा फार मोठा शत्रु आहे. तो कोठें राहतो हें आहे का माहीत तुला? एवढेंच नव्हें तर मांत्रिक कालशंबर आज रात्रीं कोठें मुक्कामाला राहणार आहे हें आहे का माहीत तुला?" धूमकनें विचारलें.

" मांत्रिक या रानांत कोणत्या रस्त्यानें गेला, आम्हांला तरी कोठें माहीत आहे? पण तो दंडकारण्यांत महाकली राक्षसाच्या पाताळ कोटांतल्या प्रदेशांत कोठें राहतो हें तर तुम्हांला माहीतच असेल. तुमच्या बरोबर कांहीं अंतर येऊन मी दाखवीन पाहिजे तर!" विरूप म्हणाला.

" हा महाकली राक्षस कोण आहे बुवा?" धूमक विचारांत पडला. सोमक विरूपला कांहीं विचारणार एवढ्यांत धूमकनें मध्येंच त्याला अडविलें व म्हणाला—" विरूपा! पण पहिल्यानें थोडें कांहीं तरी खाऊन घेऊंया बुवा!"

जेवणाचें नांव काढतांच विरूपानें आपल्या अनुयायांना विचारलें—" येथें ठोंब्या-सारखे पहात उभे काय राहलांत? खाण्या-पिण्याची व्यवस्था करा."

" जेवण तयार आहे! सर्वांनीं जेवावयास यावें!" एक तरुण युवक म्हणाला. तो



विरूपचा एक खास विश्वासपात्र अनुयायी होता.

विरूपनें धूमक व सोमक यांना राजेशाही थाटाची मेजवानी दिली. निरनिराळ्या प्रकारचें मांस, फळें, मध वगैरे पदार्थ वाढण्यांत आले. दोघांना फार भूक लागली होती. दोघांनीं पोटभर जेवून घेतलें. पाहुण्यांच्या करमणुकीसाठीं रानटी जातीच्या तरुण स्त्रीपुरुषांचें सुंदर नृत्य झालें. गाणें झालें. लाठी, तलवार, फरी गदगा, भाला फेंक आदिचे खेळ झाले.

धूमक व सोमक दोघांना जें काम कठीण वाटत होतें तें एकाएकीं सोपें झाल्यासारखें भासलें. कालशंबर याचा शोध काढणें त्याला भेटून त्याच्या सूचनेप्रमाणें कुंभीर राक्षसा-च्या कैदेतून कांतिसेनेला सोडविणें, सर्व त्यांना सोपें वाटूं लागलें. धूमकच्या मना-तली शंका मात्र अद्याप दूर झाली नव्हती. कालशंबर आपला मंत्रदंड परत मिळावा म्हणून कांहीं युक्ति तर करीत नसेल. मंत्रदंड मिळाल्यावर तो आपणांला ठार केल्याशिवाय राहणार नाहीं.

काय वाटेल तें झालें तरी, किती संकटांना तोंड द्यावें लागलें तरी राजकन्या



कांतिसेनेला राक्षसाच्या हातांतून सोड-विलेंच पाहिजे. धूमकनें मनांतल्या मनांत पक्कें ठरविलें होतें. मेजवानी संपल्यावर थोडा वेळ विश्राम करून ते पुढल्या मुक्का-मावर निघाले. या खेपेस त्यांच्याबरोबर विरूप पण होता. त्याच्याजवळ धनुष्य बाण व भाला आणि एक लांबलचक दोरी पण त्याच्या खांद्यावर होती.

दोघे रानांतल्या वाटेनें एक तास भर चालल्यावर डोंगरी प्रदेशांत आले. खोऱ्यांत एक नदी वहात होती. ती नदी पार करून पलीकडे जावयाचें होतें. विरूप पुढें



होता. तो नदी काठीं येऊन पोंचला. चकित होऊन त्यानें पाठीमागून येणाऱ्या धूमक व सोमक दोघांना हांक मारली. दोघे घोड्यावरून उतरून विरूपजवळ आले. त्यांनीं तेथून एक चकित करून सोडणारें दृश्य पाहिलें.

नदीच्या काठीं तुटलेले धनुष्य बाण, भाले वगैरे शस्त्रें व रक्ताचे डाग होते. त्यावरून तेथें नुकतेंच एक छोटेखानी युद्ध झाल्याचें स्पष्ट कळत होतें. काठावरच्या चिखलांत पायांच्या खुणा दिसत होत्या. त्या दाखवून विरूप म्हणाला—"या प्रदेशांत-आमच्या जातीचे लोक रहात नाहींत. भिल्ल जातीचे लोक राहतात. त्यांच्याशीं आमचें वैर नाहीं, मित्रतापण नाहीं. एवढा रक्तपात कोणासाठीं झाला हें नाहीं कळत मला! मी नदी काठानें जाऊन पाहून येतों. तुम्ही दोघे येथेंच थांबा." असें सांगून तो काठाकाठानें कांहीं अंतर चालून गेला.

विरूपला पावलांच्या खुणा दिसल्या. त्या पाहून त्याला कालशंबरची आठवण झाली. त्याच्या जिवाला तर कांहीं धोका नाहीं झाला? त्याच्या खडावांच्या खुणा कोठें आहेत का हें पाहण्यासाठीं तो थोडा वांकला. त्याबरोबर एक भाला त्याच्या डोक्याजवळून जाऊन एका हातावर जमिनींत रुतला.

विरूप लगेच सरळ उभा राहाला. त्यानें मागें वळून पाहालें तर आणखी एक भाला विजेसारखा त्याच्याकडे येत होता. तो लगेच एका बाजूला जमिनीवर झोपला. भाला जमिनींत जाऊन पडला. विरूप पुन्हां उठूं लागला—"राक्षस सेवक! बरा भेटलास तुझ्या आतड्यांची माळ गळ्यांत घालून घेईन." असें म्हणत एक आडदांड भिल्ल त्याच्याकडे येत असलेला दिसला.













विरूपला हा हल्ला अगदीं अनपेक्षित असाच होता. म्हणून भिलानें त्याची कंबर धरून त्याला धक्का दिला तेव्हां तो जमिनी-वर पडला. लगेच तो भिल त्याच्या छातीवर चढून बसला व त्याचा गळा दाबूं लागला. पण तोंपर्यंत विरूप सावरला होता. त्यानें आपल्या पायांनीं भिलाचा गळा पकडला आणि त्याला मागें ढकललें. भिल नदींत जाऊन पडला. तो नदींतून उठून उभा राहण्यापूर्वीच विरूपनें उठून त्याला धरलें आणि त्याचें डोकें धरून पाण्यांत बुडविलें. त्याच्या नाकातोंडांत पाणी गेलें. तो वर तोंड आलें कीं ओरडे—"विरूपा! सोड मला, अरे! मी पुलिंद!"

तो आवाज ऐकून धूमक व सोमक धांवत आले. ते पोंचले तेव्हां विरूप त्या भिलाला पाय धरून पाण्याबाहेर ओढीत होता. तें पाहून धूमकनें विचारलें—"विरूप! कोण रे हा? भिल जातीचा आहे वाटतें? काय झालें?"

"यानें लपून मला ठार करण्याचा डाव रचला होता. मी त्याची खोड मोडली. यानें स्वतःचें जें नांव सांगितलें आहे त्यावरून हा सामान्य भिल नसून त्यांचा सरदार आहे." विरूप म्हणाला.

धूमक व सोमक त्या भिलाजवळ आले व त्याला विचारूं लागले—"काय रे? कोण तूं? या विरूपला ठार करण्यांत तुझा काय हेतू होता?"

भिल पाणी ओकत होता. थोडा दम घेऊन म्हणाला—"राजसैनिक हो! तुम्हीच आतां न्याय करा! माझें नांव पुलिंद! मी भिल जातीचा नायक आहे. एका तासा-पूर्वीं माझ्या दहाव्या तरुण बायकोला हा विरूप व त्याचे कांहीं मित्र धरून घेऊन गेले. यांना ज्यांनीं अडविलें त्यांना ठार करून यांनीं त्यांचीं प्रेतें नदींत फेंकून दिलीं. हा व याचे अनुयायी माझ्या बायकोला कोणत्यातरी राक्षसासाठीं धरून घेऊन गेले आहेत. जे लोक स्वतःचा जीव वांचवून परत आले त्यांच्या तोंडीं मला हें सर्व कळलें."

पुलिंदच्या तोंडीं तें वृत्त ऐकून सर्वांना आश्चर्य वाटलें. धूमक पुढें कांहीं विचारणार एवढ्यांत विरूपनें जवळ जाऊन पुलिंदला विचारलें—"तुझ्या बायकोला उचलून नेणा-रांत मी होतों, हें तुझ्या लोकांनीं तुला सांगितलें? त्यांनीं मला पाहिलें का? ते मला ओळखतात का? गप्प बैस! उगीच असें खोटें बोलूं नकोस! मी आपल्या भाल्यानें तुझ्या आंतड्या बाहेर काढीन. लक्षांत ठेव!" त्यानें असें म्हणत आपला भाला उगारला.

धूमकनें विरूपाचा हात धरला व त्याला अडविलें. पुलिंदकडे वळून म्हणाले—"पुलिंद! तूं चूक करतो आहेस, असें मला वाटतें. गेले पांच दहा तास विरूप आमच्याबरोबर आहे. तूं कोणत्यातरी राक्षसाविषयीं म्हणत होतास. त्याच्या अनुयायांनींच विरूपची बदनामी करण्या-



साठीं त्याचें नांव घेतलें असेल! तुमच्या दोघांच्या जातींचें परस्परांशीं भांडण व्हावें, या दुष्ट हेतूनें त्यांनीं तसें सांगितलें असेल. त्यांत त्यांचा कांहीं स्वार्थ होता. तूं कोणत्यातरी राक्षसाचा उल्लेख केला होतास. तें ऐकलें आम्हीं. त्या राक्षसाचा वध करण्यासाठींच आम्ही निघालों आहों. तुझ्या बायकोला पण सोडवून आणूं. तूं मुळींच फिकीर करूं नकोस!"

धूमकनें एवढें सांगितल्यावर त्याची चूक पुलिंदच्या लक्षांत आली. त्यानें विरूपजवळ माफी मागितली. धूमक व सोमक यांच्या











सूचनेवरून दोघे परस्परांना प्रेमानें भेटले. त्यानंतर धूमक व सोमक यांना नदी पार करून जावयाचें आहे हें कळल्यावर पुलिंद म्हणाला—"तुम्ही येथेंच थांबा! मी आपल्या गांवीं जाऊन दोन नावा घेऊन येतों. त्यांत बसून तुम्हांला आपल्या घोड्यांसह सहज पार जातां येईल." असें सांगून तो आपल्या गांवाकडे धांवत गेला.

थोड्या वेळानें दोघे दोघे मिळ दोन नावांत बसून आले. धूमक व सोमक एका नावेंत बसले. विरूप घोड्यांबरोबर दुसऱ्या नावेंत बसला. दोन्ही नावा वल्हवीत भिल्ल नदी पार जाऊं लागले. नदीच्या मधोमध पोंचतांच धूमकच्या कमरेला बांधलेला मंत्र-दंड लगेच सांपासारखा एकदम फडा वर करून उभा राहिला व पूर्वीकडे तोंड करून 'फुस्सफुस्स' असा फूत्कार सोडूं लागला. तें पाहून विरूप चकित होऊन कांहीं बोलणार इतक्यांत डोंगराच्या टोंकावर बसलेली एक घार बाणासारखी उडत आली व मंत्रदंडाला सांप समजून आपल्या पंजांत धरून उडाली. मंत्रदंड एका बळकट दोरीला घट्ट बांधलेला होता व दोरी धूमकच्या कमरेला बांधलेली होती. म्हणून तोदेखील बरोबर उडूं लागला. सोमक जोरानें ओरडला व बाण सोडून घारीला मारण्याच्या विचारांत होता. परंतु बाण धूमकला लागेल या भीतीनें त्यानें बाण सोडला नाहीं. तिकडे विरूप "शांबवी!" म्हणून इतक्या जोरानें ओरडला कीं डोंग-रावर आदळून त्याचा प्रतिध्वनी ऐकूं आला. त्यानें आपल्या खांद्यावरच्या दोरीचा फांस घारीवर फेंकला.

[पुढील गोष्ट पुढील अंकीं]



# कलियुग भीम

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. पुन्हां झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतलें व स्मशानाच्या वाटेनें नेहमींप्रमाणें मौनपणें चालूं लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तुझ्या-सारखे, कठीण कामाची जबाबदारी शिरावर घेऊन त्यांत यशस्वी होणारे क्वचितच आढळतील. परंतु शशिकेतूप्रमाणें आलेलें यश स्वेच्छेनें गमावून बसणारा कोणी भेटणार नाहीं. तुला कंटाळा येऊं नये म्हणून करमणुकीसाठीं त्याची गोष्ट सांगतों. ऐक!" असें सांगून तो गोष्ट सांगूं लागला.

नवकेतन नांवाच्या नगरांत पुष्पकेतु नांवाचा राजा राज्य करीत असे. तो एक प्रजावत्सल राजा होता. त्याची प्रजा राजाच्या रक्षणासाठीं आपला जीवदेखील

**वेताळाच्या गोष्टी**










द्यायला नेहमीं तयार असे. परंतु पुष्पकेतू पुत्रअपत्य नसल्यामुळें नेहमीं उदास राही.

एकदां त्यानें पुरोहिताचा सल्ला घेतला.

पुरोहित त्रिकालज्ञानी होता. म्हणाला– "महाराज! राज्याला वारस नसल्याचें दुःख जेवढें आपल्याला वाटतें, तेवढेंच आपल्या प्रजेला पण वाटतें. आपण संतर्पण करावें व प्रजेला जेवण द्यावें. प्रजा आपल्याला आशीर्वाद देईल व तो फुकट जाणार नाहीं."

पुरोहिताच्या सल्ल्याप्रमाणें राजानें संतर्पणाची तयारी केली. सर्व प्रजेला भक्ति-भावें नमस्कार करून आशीर्वाद मागितला आणि खरोखरच एका वर्षाच्या आंत राजाला एक मुलगा झाला. राजानें त्याचें नांव शशिकेतु असें ठेवलें.

शशिकेतूच्या अंगांत वडिलांचे सर्व सद्गुण दिसत होते. त्याच्या अंगीं शौर्य, साहस व पराक्रमपण वाढूं लागला. वयांत आल्यावर त्याला मुली सांगून येऊं लागल्या. एकाहून एक सुंदर राजकन्या असून त्याला एक देखील पसंत पडली नाहीं. पण त्यानें खरी गोष्ट सांगितली नाहीं व म्हणाला–"बाबा! माझ्या लग्नाची इतकी घाई काय आहे?" एकदां त्यानें पुरोहिताला विचारलें– "माझ्याशीं लग्नाला योग्य कन्या कोठें आहे का?"

पुरोहित म्हणाला–"आहे! रुद्रजटचा राजा जितसेन याच्या मुलीशिवाय तुझ्याशीं लग्नाला योग्य मुलगी कोणी नाहीं."

तें ऐकून शशिकेतू आपली तलवार घेऊन व घोड्यावर बसून रुद्रजटच्या वाटेनें निघाला. तो राजधानींत एका म्हातारीच्या घरीं उतरला. तो तिला म्हणाला–"मी तुमच्या देशाच्या राजकन्येशीं विवाह करण्यासाठीं आलों आहें. काय केलें म्हणजे मला यश मिळेल."





म्हातारी सुस्कारा सोडून म्हणाली– "वेड्या मुला! तुझ्यासारख्या शंभरावर राजकुमारांशीं तिनें आजवर लग्न केलें असेल. त्यांचीं मुंडकीं कापून त्यांचें तोरण बांधून ठेवलें आहे तिनें. माझा सल्ला विचारशील तर आल्या वाटेनें घरीं परत जाण्यांत शहाणपण आहे."

"तें अशक्य! मी नाहीं परत जाणार! काय वाटेल तें झालें तरी मी तिच्याशींच लग्न करणार!" शशिकेतू म्हणाला.

"आतां काय सांगूं तुला? आमच्या राजाची मुलगी चार वर्षें वयाची असतांना एक मांत्रिक तिला उचलून घेऊन गेला होता. नंतर राजानें जाहीर केलें कीं मुलगी राजवाड्यांत सुरक्षित आहे. दोन वर्षांपूर्वीच ती मुलगी मोठी झाली. तिच्या लग्नासाठीं तयारी सुरू झाली. तिच्या रूपाचें वर्णन ऐकून कित्येक राजकुमार आपल्या नशीबाची परीक्षा पाहण्यासाठीं आले. पण राजकुमारीनें एक अट ठेवली. येथून दहा कोसावर एक कलियुगीभीम राहतो. जो कोणी त्याला ठार करून त्याचें मुंडकें आणून दाखवील त्याच्याशीं ती लग्न करील व ज्याला त्या प्रयत्नांत यश येणार नाहीं त्याचें मुंडकें कापून दारासमोर टांगण्यांत येईल. म्हणून तूं हिच्याशीं लग्न करण्याचा विचार मनांतून काढून टाक."

"इतका दूर मी आलों आणि आतां हार मानून परत जाऊं म्हणतां? तर मग राजा कां नाहीं तिचा हा तऱ्हेवाईकपणा बंद करीत?" शशिकतूनें विचारलें.

"आतां तुला मी काय सांगूं? अरे तो आपल्या मुलीलापण भितो!" म्हातारी म्हणाली.

दुसऱ्या दिवशीं शशिकेतू राजवाड्यांत गेला. राजाकडे तो आल्याची वर्दी पोंचती



झाली. राजकन्या लग्नाला तयार आहे का त्यानें निरोप पाठवून विचारलें. राजाचे शिपाई त्याला राजाच्या खास महालांत घेऊन गेले. सिंहासनावर राजा एका बाजूला बसला होता व दुसऱ्या बाजूला राजकन्या बसली होती. शशिकेतूनें त्याला दाखविलेल्या जागीं बसल्यावर येण्याचें कारण सांगितलें.

राजकुमारी म्हणाली—"भीमवनांतील कलियुगी भीमाचें मुंडकें आणून दाखवील त्याच्याशींच मी लग्न करीन आणि जो कोणी हें कबूल करून त्याप्रमाणें करूं शकणार नाहीं त्याचें मुंडकें कापून किल्ल्याच्या फाटकावर टांगून ठेवीन."

शशिकेतू जोरानें हंसला व म्हणाला—"जर त्या कलियुगी भीमाचें मुंडकें कापून आणून देऊं शकलों नाहीं तर मी परत कशाला येईन? आपल्या गांवीं निघून जाईन. फाटकाची शोभा वाढविण्यासाठीं मी मुंडकें द्यायला इकडे कां येईन?"

राजकुमारीनें त्याच्याकडे डोळे वटारून एकदां पाहिलें व म्हणाली—"तूं आपल्या पायानें येथवर चालत येशील!"

शशिकेतु घोड्यावर बसून भीमवनाकडे निघाला.

भीमवन एक सुंदर वन होतें. खोल रानांत गेल्यावर त्याला एक घर दिसलें. त्या घराजवळ जाऊन त्यानें दार ठोठावलें. एका तरुण मुलीनें येऊन दार उघडलें. शशिकेतूला पाहून ती थोडी चपापल्यासारखी दिसली. नंतर तिनें विचारलें—"कोण तुम्ही? काय काम आहे?"

शशिकेतू थक्क होऊन तिच्या रूपाकडे पहात उभा राहाला. "मी एका कामासाठीं आलों आहें. कलियुगी भीम कोठें राहातो. माहीत आहे का तुला?" त्यानें विचारलें.



"हेंच त्याचें घर आहे. पण त्याच्याशीं तुमचें काय काम?" तिनें विचारलें.

"त्याच्याशीं युद्ध करून त्याला ठार करून त्याचें मुंडकें राजकुमारीला देणार आहें व तिच्याशीं लग्न करणार आहें." तो म्हणाला.

"त्याला जिंकणें अशक्य!" ती मुलगी म्हणाली.

"जिंकूं शकलों नाहीं तर त्याच्या हातीं मरावें लागेल, एवढेंच ना! मी त्याला तयार होऊनच आलों आहें." शशिकेतु म्हणाला.

"मी त्याची मुलगी आहें. तो जवळच कोठें तरी झाडाखालीं झोंपला असेल." ती म्हणाली.

"बरें येतों." असें सांगून तो निघाला तेव्हां त्या मुलीनें त्याला बोलावलें व म्हणाली—"त्याचें मुंडकें हातीं आलेंच तर तें खालीं जमिनीवर ठेवूं नका. हातांत घेऊन सरळ माझ्या जवळ या!" तिनें दाखवलेल्या वाटेनें शशिकेतु गेला. त्यानें डोंगरासारख्या त्या महाकाय कलियुगी भीमाला झाडाखालीं झोंपलेला दुरून पाहालें. त्यानें जवळ जाऊन त्याला जोरानें लाथ मारली. तो उठून उभा राहला व विचारलें—"मला कां उठविलेंस?"



"तूं कलियुगी भीम असशील तर तलवार घेऊन ये युद्धाला माझ्याशीं." शशिकेतु म्हणाला.

कलियुगी भीम कांहीं शस्त्र घेतल्या-शिवाय त्याच्याशीं युद्ध करूं लागला. शशिकेतूनें पण तलवार उपसली नाहीं व त्याच्याशीं कुस्ती खेळूं लागला. कलियुगी भीम खालीं पडला. शशिकेतु त्याच्या छातीवर पाय ठेवून म्हणाला—"मी तुझें डोकें कापणार आहें."

"घे कापून! मी कोठें अडवीत आहे तुला!" कलियुगी भीम म्हणाला.



शिताफीनें तलवार काढून शशिकेतूनें त्याचें मुंडकें कापून घेतलें व तें एका हातांत धरून निघाला. दोन तीन पावलेंच तो गेला असेल, "काव काव!" करीत दोन तीन कावळे त्याच्या डोक्यावर उडत आले. शशिकेतूनें कलियुगी भीमाचें मुंडकें हातांतलें सोडलें व आपल्या तोंडावर दोन्ही हात ठेवले. त्यानें हात उचलून पाहिलें तेव्हां त्याला तेथें ते कावळे दिसले नाहींत कीं तें कलियुगी भीमाचें मुंडकें दिसलें नाहीं.

तो क्षणभर किंकर्तव्यविमूढ स्थितींत उभा राहाला व पुन्हां कलियुगी भीमाच्या घरीं गेला आणि जें घडलें तें त्यानें त्याच्या मुलीला सांगितलें.

ती स्मित करून म्हणाली—"तुम्ही एवढे पराक्रमी आहां आणि त्या कावळ्यांना भ्यालांत? माझ्या सल्ल्याप्रमाणें वागलां असतात तर तुम्हांला यश आलें असतें. या खेपेस कलियुगी भीमाचें मुंडकें जमिनीवर ठेवल्याशिवाय माझ्याकडे घेऊन या!"

शशिकेतु पुन्हां झाडाजवळ जाऊन पाहातो तों, कलियुगी भीम जणुं कांहीं कांहींच झालें नाहीं असा झाडाखालीं पहिल्यासारखाच घोरत पडला होता. शशिकेतूनें त्याला जागें केलें, त्याला चीत मारून त्याचें डोकें कापून घेतलें आणि सरळ त्याच्या घरीं गेला.

त्याच्या हातांत कलियुगी भीमाचें मुंडकें पाहून ती मुलगी म्हणाली—"जा आतां राजकन्येकडे आणि दाखवा हें मुंडकें. सर्वांसमक्ष हें कलियुगी भीमाचेंच मुंडकें आहे हें कबूल करायला लावा! ती तें मागेल. पण तुम्ही तें तिला देऊं नका. लगेच तें जाळून टाका. त्यानंतर राजकन्येशीं विवाह करण्यास कोणतेंहि विघ्न येणार नाहीं. एवढेंच नव्हें तर





कित्येक राजकुमारांचा अकालमृत्यु त्यामुळें वांचेल."

"बरें, मी येतों. सर्व काम आटोपून मी येथेंच परत येईन. तूं येथेंच राहाशील ना तोंपर्यंत?" त्यानें तिला विचारलें.

होकारार्थी डोकें हलवून ती घरांत निघून गेली.

शशिकेतु कलियुगी भीमाचें मुंडकें घेऊन राजधानींत पोंचला तों पर्यंत रात्र पडली होती. थंडीचे दिवस होते. पाहारेकरी शेकोट्या पेटवून शेकत बसले होते.

शशिकेतूनें राजवाड्याच्या सिंहद्वारावर पोंचतांच राजकुमारीकडे आल्याची बातमी करविली. ती आली "हें पहा, कलियुगी भीमाचें मुंडकें. नीट पाहून घे त्याचेंच आहे ना?" त्यानें विचारलें.

राजकुमारी मुंडकें पाहून म्हणाली—"होय त्याचेंच आहे! तूं माझी अट कबूल केलीस. आतां तें मला देऊन टाक!" राजकुमारी म्हणाली.

"हें मुंडकें तुला देण्याची अट नव्हती." असें सांगून शशिकेतु बाहेर निघून गेला.

"तें मला दे. मी किल्ल्याच्या फाटका समोर तें टांगून ठेवणार आहें. तूं तें घेऊन काय करणार आहेस?" असें म्हणत राजकुमारी त्याच्या पाठोपाठ जाऊं लागली.

शशिकेतु सरळ, पाहारेकरी शेकोटीजवळ बसले होते तेथें आला. तो कलियुगी भीमाच्या डोक्याचे तलवारीनें तुकडे करून विस्तवांत टाकूं लागला. राजकुमारी मोठ्यानें ओरडली. ती त्याच्या हातांतलें तें मुंडकें घेण्यासाठीं ओढाताण करूं लागली. त्यानें मुंडकें डाव्या हातांत घट्ट धरलें आणि उजव्या हातांतल्या तलवारीनें राजकुमारीला ठार केलें. नंतर त्यानें कलियुगी भीमाच्या



शिताफीनें तलवार काढून शशिकेतूनें त्याचें मुंडकें कापून घेतलें व तें एका हातांत धरून निघाला. दोन तीन पावलेंच तो गेला असेल, "काव काव!" करीत दोन तीन कावळे त्याच्या डोक्यावर उडत आले. शशिकेतूनें कलियुगी भीमाचें मुंडकें हातांतलें सोडलें व आपल्या तोंडावर दोन्ही हात ठेवले. त्यानें हात उचलून पाहिलें तेव्हां त्याला तेथें ते कावळे दिसले नाहींत कीं तें कलियुगी भीमाचें मुंडकें दिसलें नाहीं.

तो क्षणभर किंकर्तव्यविमूढ स्थितींत उभा राहाला व पुन्हां कलियुगी भीमाच्या घरीं गेला आणि जें घडलें तें त्यानें त्याच्या मुलीला सांगितलें.

ती स्मित करून म्हणाली—"तुम्ही एवढे पराक्रमी आहां आणि त्या कावळ्यांना भ्यालांत! माझ्या सल्लयाप्रमाणें वागलां असतात तर तुम्हांला यश आलें असतें. या खेपेस कलियुगी भीमाचें मुंडकें जमिनीवर ठेवल्याशिवाय माझ्याकडे घेऊन या!"

शशिकेतु पुन्हां झाडाजवळ जाऊन पाहातो तों, कलियुगी भीम जणुं कांहीं कांहींच झालें नाहीं असा झाडाखालीं पहिल्यासारखाच घोरत पडला होता. शशिकेतूनें त्याला जागें केलें, त्याला चीत मारून त्याचें डोकें कापून घेतलें आणि सरळ त्याच्या घरीं गेला.

त्याच्या हातांत कलियुगी भीमाचें मुंडकें पाहून ती मुलगी म्हणाली—"जा आतां राजकन्येकडे आणि दाखवा हें मुंडकें. सर्वांसमक्ष हें कलियुगी भीमाचेंच मुंडकें आहे हें कबूल करायला लावा! ती तें मागेल. पण तुम्ही तें तिला देऊं नका. लगेच तें जाळून टाका. त्यानंतर राजकन्येशीं विवाह करण्यास कोणतेंहि विघ्न येणार नाहीं. एवढेंच नव्हें तर कित्येक राजकुमारांचा अकालमृत्यु त्यामुळें वांचेल."

"बरें, मी येतों. सर्व काम आटोपून मी येथेंच परत येईन. तूं येथेंच राहाशील ना तोंपर्यंत?" त्यानें तिला विचारलें.

होकारार्थी डोकें हलवून ती घरांत निघून गेली.

शशिकेतु कलियुगी भीमाचें मुंडकें घेऊन राजधानींत पोंचला तों पर्यंत रात्र पडली होती. थंडीचे दिवस होते. पाहारेकरी शेकोट्या पेटवून शेकत बसले होते.

शशिकेतूनें राजवाड्याच्या सिंहद्वारावर पोंचतांच राजकुमारीकडे आल्याची वर्दी करविली. ती आली "हें पहा, कलियुगी भीमाचें मुंडकें. नीट पाहून घे त्याचेंच आहे ना?" त्यानें विचारलें.

राजकुमारी मुंडकें पाहून म्हणाली—"होय त्याचेंच आहे! तूं माझी अट कबूल केलीस. आतां तें मला देऊन टाक!" राजकुमारी म्हणाली.

"हें मुंडकें तुला देण्याची अट नव्हती." असें सांगून शशिकेतु बाहेर निघून गेला.

"तें मला दे. मी किल्ल्याच्या फाटका समोर तें टांगून ठेवणार आहे. तूं तें



घेऊन काय करणार आहेस?" असें म्हणत राजकुमारी त्याच्या पाठोपाठ जाऊं लागली.

शशिकेतु सरळ, पाहरेकरी शेकोटीजवळ बसले होते तेथें आला. तो कलियुगी भीमाच्या डोक्याचे तलवारीनें तुकडे करून विस्तवांत टाकूं लागला. राजकुमारी मोठ्यानें ओरडली. ती त्याच्या हातांतलें तें मुंडकें घेण्यासाठीं ओढाताण करूं लागली. त्यानें मुंडकें डाव्या हातांत घट्ट धरलें आणि उजव्या हातांतल्या तलवारीनें राजकुमारीला ठार केलें. नंतर त्यानें कलियुगी भीमाच्या










घरीं जाण्यासाठीं निघाला. त्याच वेळीं आकाश ढगाळलें व सोसाट्याचा वारा सुरू झाला आणि त्याच्या पाठोपाठ पाऊस पडूं लागला. घनदाट काळोख पण पडला.

मोठ्या गाडीरस्त्यानें घरीं पोंचायला वेळ लागेल म्हणून तो पाऊल वाटेनें निघाला आणि काळोखांत वाट चुकला. पुष्कळ अंतर चालत गेला तरी त्याला गांव सांपडलें नाहीं. सर्व अंग ओलेंचिंब झालें होतें. निर्जन प्रदेश, वाट विचारावी तर कोणाला?

तशा परिस्थितींतहि त्याला दूर एका जागीं दिव्याचा उजेड दिसला. दिव्याच्या रोखानें चालत चालत तो एका राजवाड्यांत येऊन पोंचला. त्या निर्जन प्रदेशांत इतका मोठा राजवाडा असेल या गोष्टीची स्वप्नांत देखील त्याला कल्पना नव्हती. आंत प्रवेश करण्याचा विचार त्याच्या मनांत आला. पण पाहारेकरी अडवतील ही भीति वाटली. फाटकाजवळ कोणी पाहारेकरी नव्हता. शेतकरी आंत राजवाड्याजवळ गेला. तेथें-देखील त्याला कोणी दिसलें नाहीं. "कोण आहे हो आंत?" त्यानें मोठ्यानें ओरडून विचारलें! पण उत्तर नाहीं. राजवाड्यांतलीं सर्व दारें खिडक्या उघड्या होत्या. कोणत्याहि खोलींत त्याला कोणी दिसलें नाहीं. सर्व राजवाडा इतका स्वच्छ होता कीं आतांच कोणी केर काढून ठेवल्यासारखें आणि तेथें राहात असल्यासारखें वाटे.

वाड्यांत एका खोलींतून जांत असतां त्याला एका बाजूनें पक्वान्नांचा सुवास आला. तिकडे जाऊन पाहिलें तर एका मोठ्या दालनांत ताजीं पक्वान्नें भरून ठेवलेलीं होतीं. शेतकऱ्याला भूक लागली होती. म्हणून त्यानें मागचा पुढचा विचार केल्याशिवाय त्याला खाववलें तेवढें खाऊन घेतलें.



सैपाकघरांतल्या चुलींत अद्याप चांगला विस्तव होता. त्यानें आपले भिजलेले कपडे काढून शेकोटी थोडा वेळ ते वाळवले आणि झोंपायच्या खोलींत पलंगावर स्वच्छ बिछाने घातलें होते त्यांवर जाऊन झोंपला. उजाडतांच उठला. इकडे तिकडे पाहिलें कोणी भेटेल म्हणून. पण त्याला चिट-पाखरूंदेखील दिसलें नाहीं. कोणी दिसलें नाहीं तेव्हां तो तेथून निघाला. वाड्यांतून तो बाहेर पाऊल टाकणार एवढ्यांत एका बाजूला बागेंत मोगरीचा वेल दिसला. सुंदर कळया लागल्या होत्या.



शेतकऱ्याला फार आनंद झाला. त्यानें मोठीशी कळी तोडून घेतली. कांहीं तरी सरकत येत असल्याचा भास झाला त्याला. एक मोठी पाल सरकत पुढें आली. तिचे डोळे लाललाल होते. ती मनुष्यांच्या भाषेंत बोलूं लागली. म्हणाली—"दुष्ट कुठला माझ्या घरांत शिरलास. माझ्या घरचें अन्न खाल्लेंस, माझ्या पलंगावर झोंपलास आणि जातेवेळीं माझी परवानगी घेतल्याशिवाय मोगरीच्या कळ्या तोडूं लागला आहेस!"

शेतकरी घाबरून थर थर कांपूं लागला. दोन पावलें मागें सरकून म्हणाला—"चूक झाली माझी! मी ज्या कळ्या तोडल्या आहेत त्यांची जी किंमत मागशील ती द्यायला मी तयार आहें."

"फुकटच्या गप्पा नको मारूस! तुला मुली आहेत ना?" पाल म्हणाली.

"तीन मुली आहेत. मी तिसऱ्या मुली करितां हीं फुलें तोडीत आहें." शेतकरी म्हणाला.

"बरें तर मी तुला एका आठवड्याचा अवधी देतें. पुढल्या आठवड्यांत याच वेळीं तूं आपल्या एका मुलीला तरी आणून पोंचती कर किंवा स्वतःचा जीव देऊन दे. समजलें?" एवढें सांगून पाल पुढें म्हणाली.



"जीं फुलें तूं तोडलीं आहेस तीं तूंच ठेवून घे. तुझी मुलगी येऊन या मोगरीच्या कळ्या तोडील तेव्हां मी निघून जाईन. ती समजूतदार शाहणी असेल तर मी सांगेन तशी वागेल. नंतर जें होईल तें कळेलच."

एवढें सांगून पाल कोठें तरी निघून गेली. शेतकरी आपल्या चुकीबद्दल तिची माफीदेखील मागूं शकला नाहीं. या पालीच्या इच्छेप्रमाणें कोणत्या मुलीचा बळी द्यायचा? कोणती मुलगी याला तयार होईल? आणि जर एकीनें कबूल केलेंच तर तिची काय गत होईल, देवच जाणें!

असा विचार करीत शेतकरी आपल्या घरी निघून गेला.

तिन्ही बहिणींना जें कांही मागितलें होतें तें प्रत्येकीला मिळालें. परंतु मल्लिकेसाठीं त्याच्यावर जो प्रसंग ओढवला होता त्याचा उल्लेख करून तो म्हणाला—"त्या भयंकर पालीच्या घरांत जायला तुमच्यापैकीं कोण तयार आहे?"

"बाप रे बाप! या पालीला पाहतांच माझे डोळे पांढरे होतील." मोठी म्हणाली.

"हें सर्व त्या मल्लिकेच्या हट्टामुळेंच भोगावें लागत आहे. हिनें या वेळीं मोगरीच्या फुलांचा हट्ट कां धरावा, मी म्हणतें!" दुसरी म्हणाली.

"होय ही चूक माझीच! मीच जाईन त्या पालीकडे!" मल्लिका कांपऱ्या आवाजांत म्हणाली.

ठीक एका आठवड्यांनंतर मल्लिकेला-बरोबर घेऊन शेतकरी त्या वाड्याकडे निघाला. पहिल्यासारख्याच दारें खिडक्या उघड्या होत्या. मल्लिका सरळ मोगरीच्या वेलाजवळ गेली व तिनें एक कळी तोडली.

लगेच ती पाल प्रगट झाली. तिला-पाहून, त्यांत तिचे लाललाल डोळे,



खपल्या पडलेली त्वचा व घाणेरडें लाल तोंड पाहून तिला तिचा किळस आला व तिच्या अंगावर शहारे उभे राहाले.

"तुझें नांव काय?" त्या पालीनें गोड आवाजांत विचारलें व पुढें म्हणाली—"मल्लिके! तुला येथें कसलाच त्रास होणार नाहीं. तूं जर शाहण्यासारखी वागलीस तर तुला येथें सुखच मिळेल. तुला कोणतीहि उणीव भासणार नाहीं. तुला वाटेल त्या खोलींत राहा. तुला माझ्याशीं जेव्हां जेव्हां बोलावेंसें वाटेल तेव्हां या मोगरीची एक कळी तोड, मी प्रगट होईन." म्हणत पाल झुडपांत निघून गेली.

शेतकरी आपल्या मुलीबरोबर त्या वाड्यांत तीन दिवस राहाला. त्यांना वाड्यांत त्या तीन दिवसांत कोणी दिसलें नाहीं. परंतु तिन्ही वेळ सैंपाक होई व कोणत्याहि गोष्टीची उणीव भासली नाहीं.

"आतां तुम्ही घरीं निघून जा. आई व बहिणी तुमची वाट पहात असतील." मल्लिका आपल्या वडिलांना म्हणाली. शेतकऱ्यानें पण विचार केला कीं तेथें फार दिवस राहाणें बरोबर नाहीं. तो घरीं निघून गेला आणि आपल्या शेतीच्या कामाला लागला.



मल्लिका आपल्या वडिलांना फाटकापर्यंत पोंचवायला गेली होती. परत येते वेळीं तिनें एक कळी तोडली. लगेच ती भयंकर पाल प्रगट झाली.

त्या पालीला पाहून मल्लिकेला तिची दया आली. तिला वाटलें कीं तिला कसला तरी कष्ट असावा. तो कष्ट आपल्याला दूर करतां आला तर आपण करावा असें तिला वाटलें.

ती त्या पालीला म्हणाली—"तुम्ही मला व माझ्या बाबांना इतकें प्रेमानें वागवलें त्या बद्दल मी आपली फार फार आभारी



आहे. मी त्यांना घरीं पाठवून दिलें आहे. मी आतां तुम्ही सांगाल तें खुशीनें करण्याचा यथाशक्ति यत्न करीन."

"मलिके! तूं हें सर्व मनापासून का बोलत आहेस? तूं किती नाजुक व सुंदर आहेस, माझा विद्रूपपणा पाहून तुला माझी घृणा नाहीं का वाटली? आश्चर्यच आहे. तूं किती उदार व दयाळू आहेस?" पाल म्हणाली. तिचे डबडबलेले डोळे पाहून मलिकेच्या हृदयाला पाझर फुटला.

"तुम्हांला पाहून मला मुळींच घृणा वाटली नाहीं. मी तुमच्याबरोबर अगदी आपुलकीनें वागेन. काय वाटेल तें झालें तरी मी तुम्हांला सोडून जाणार नाहीं." मलिका म्हणाली.

"हें पहा मलिके! माझ्या आशेचा तंतू काय तो तूंच आहेस. पुढल्या आमावास्येच्या नंतरच्या प्रतिपदेला मी तुला आपल्या घरीं जायची परवानगी देतें. तूं तेथें तीन दिवस रहा व चवथ्या दिवशीं परत ये. मी हे तिन्ही दिवस तुझी वाट पहात राहीन. तूं आली नाहीस तर आगींत उडी घेऊन जीव देईन. मी तुझ्यावर विश्वास टेवून तुला स्वतः होऊन पाठवीत आहें. मला फसवूं नकोस!"

अमावास्या आली. प्रतिपदेला मलिका आपल्या घरीं गेली. तिला भेटून तिच्या वडिलांना व बहिणींना फार फार आनंद झाला. पुन्हां मलिकेची भेट होईल हें स्वप्नांत देखील त्यांना वाटलें नव्हतें. त्यांनीं त्या पालीविषयीं मलिकेला निरनिराळे प्रश्न विचारले. मलिका म्हणाली "ती पाल मुळींच दुष्ट किंवा क्रूर नाहीं. तिला पाहून दगडाच्या हृदयाला देखील पाझर फुटेल. या सर्वामागें काय गुपित आहे हें मात्र माहीत नाहीं."

मलिकेच्या तोंडीं पालीचें वर्णन ऐकून त्यांच्या मनांत पालीविषयीं जी भीति होती ती पार नाहींशी झाली. ते तीन दिवस तीन मिनटासारखे निघून गेले. त्या दिवशीं मलिका जाण्यासाठीं निघाली तेव्हां सर्वांनीं तिला तिसरी रात्र घरींच राहण्याचा आग्रह केला.

चवथ्या दिवशीं सकाळीं पण मलिकेला जातां आलें नाहीं. जेवल्याशिवाय त्यांनीं जाऊं दिलें नाहीं. मलिका जेवून खाऊन वाड्यांत पोंचली तोंपर्यंत संध्याकाळ झाली होती.

ती पोंचली तेव्हां तिला हें पाहून आश्चर्य वाटलें कीं मोगरीचा वेल वाळूं लागला होता. ती लवकर वेलाजवळ गेली. एकच एक कळी उरली होती. तिनें ती कळी तोडली. पण पाल बाहेर आली नाहीं.

काय झालें कोणाला ठाऊक म्हणून चकित होऊन ती इकडे तिकडे पाहूं लागली तेव्हां दूर तिला कोणी तरी कण्हत असल्याचा आवाज ऐकूं आला. त्या बाजूला ती धांवत गेली. अगदीं मरणावस्थेंत पडलेल्या पालीला पाहून ती म्हणाली— "मला उशीर झाला यायला माफ करा."



"मी तुझ्या साठींच मरत आहें. तुला भेटण्यासाठींच इतका वेळ जिवंत राहले. पाहातेसच आहेस." पाल म्हणाली.

"मी आलें ना आतां. आतां मरण्याची काय गरज?" असें म्हणत मलिकेनें पालीला उचलून घेण्यासाठीं हात पुढें केला.

तिचा हात लागतांच पाल अदृश्य झाली व तिच्या जागीं एक तरुण युवक दिसला. तो कोणी तरी राजकुमार होता, हें त्याच्या रंगारूपावरून स्पष्ट दिसत होतें.

तो बदल पाहून मलिका थक्कच झाली. अवाक होऊन त्याच्याकडे पहात उभी राहाली.

"मल्लिके! मी शापग्रस्त झालो, त्याला एक कारण झालें. मी नेहमी सुखोपभोगांत, गुरफटलेला किंवा युद्धाच्या कामांत गुंतलेला असें. दया व औदार्य कसें असतें हें मला माहीत नव्हतें. कधीं मी दानधर्म केला नाहीं. फाटके कपडे घातलेल्या गरीब दरिद्र लोकांना पाहून दया वाटण्याऐवजीं मला त्यांची घृणा वाटे. एके दिवशीं मी एका भिकाऱ्यावर ओरडलों व लगेच एक घाणेरडी पाल झालों. अशा तऱ्हेनें मी शापग्रस्त होतों. म्हणून माझें घर म्हणजे येणाऱ्या जाणाऱ्यांना धर्मशाळेसारखा झालें होतें. पण मी एका झाडाच्या बुंधांत राहूं लागलों. माझ्या प्रेमाचें प्रतीक म्हणून मोगरीचा एक वेल वाड्यासमोर उगवला. त्या वेलाला लागलेली पहिली कळी त्या तरुणीच्या हातांत जाईल तिनें मला घृणा केल्याशिवाय हात लावला तर मला शापमुक्ति मिळेल. तसें झालें नाहींतर मी त्याच रूपांत मरणार असें मला वाटलें. त्याच प्रमाणें त्या स्त्रीनें मला प्रेमानें वागवलें नाहीं तर तिला देखील खात्रीनें मरण येईल असें देखील मला वाटलें." राजकुमार मल्लिकेला म्हणाला!

दोघे त्या मोगरीच्या वेलाजवळ गेलीं तेव्हां तो वेल पुन्हां हिरवागार झालेला दिसला. त्याला पुष्कळ कळ्या लागल्या होत्या. लगेच राजवाड्यांत दास दासी दिसूं लागल्या व सर्व महाल गजबजून गेला. मल्लिकेशीं राजकुमाराचें थाटामाटानें लग्न झालें. तिचे आई वडील व बहिणी सर्व लग्नाला हजर होते व सर्व त्या वाड्यांतच राहूं लागले.





# खरा वारस

काश्मीर देशाचा राजा प्रवर्धन याला मुलगा नव्हता. पद्मिनी नांवाची एक मुलगी मात्र होती. म्हणून बापाची माया मुलीवर फार होती. परंतु मुलीला जसें वळण लागायला पाहिजे होतें, लागलें नाहीं.

एकदां प्रवर्धन राजाला यवनांशीं युद्ध करायला जावें लागलें. त्यानें पद्मिनीच्या मैत्रिणींना तिची काळजी घ्यायला ताकीद करून ठेवली.

वडील निघून गेल्यावर राजकन्येला सर्व जग मोकळें वाटलें. ती दररोज राजोद्यानालगतच्या नदींत जलक्रीडेला जाऊं लागली.

कांहीं दिवसांनीं राजकन्येला राजवाड्यापासून थोड्या अंतरावर असलेल्या पुष्करिणींत जलक्रीडेला जावेंसें वाटलें. ती पुष्करणी गंधर्वांची होती व तेथें विहार करायला ते येत. तेथें कोणी स्नानाला जात नाहीं हें पद्मिनीला माहीत होतें, तरी तिथेंच जलक्रीडा करावी असा तिच्या मनानें हट्ट धरला. ती आपल्या मैत्रिणींना बरोबर घेऊन पुष्करिणीच्या काठीं फिरायला म्हणून गेली. नंतर मैत्रिणींच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून ती पुष्करिणींत उतरली व पोहोत पोहोत मधोमध पोंचली.

"चला आपण देखील आंत जाऊं व राजकन्येला बाहेर ओढून घेऊन येऊं." असें ठरवून तिच्या मैत्रिणीपण पाण्यांत उतरल्या. फक्त चार हातच त्या पुढें गेल्या असतील, राजकन्या एकदां मोठ्यानें ओरडली व पाण्यांत बुडली. मैत्रिणी भिऊन काठावर आल्या व बराच वेळ वाट पहात राहल्या. दुसऱ्या दिवशीं ओल्या

श्री दा. मो. शेटे











कपड्यानिशी ती घरीं परत आली. तिच्या मैत्रिणींनी तिला पुष्कळ विचारलें परंतु तिनें कशी ती बुडाली व कशी इतक्या वेळानें जिवंत परत आली हें त्यांना सांगितलें नाहीं.

त्यानंतर सहा महिन्यांनीं प्रवर्धन महाराज परत आले. त्यावेळीं पद्मनीला सहावा महिना लागला होता. वडिलांना आश्चर्य वाटलें व ते कुळाला कलंक लावल्याबद्दल मुलीला फार रागावले.

पद्मनीनें मान खालीं करून निमूटपणें सर्व ऐकलें व घडलेली गोष्ट वडिलांना सांगितली. मैत्रिणींच्या सांगण्याविरुद्ध ती पुष्करिणींत विहार करायला गेली असतां तिला पुष्करिणीतल्या तळाशीं गंधर्व आपल्या वाड्यांत ओढून घेऊन गेलें व तिच्यावर तो प्रसंग आला. दुसऱ्या दिवशीं सुटका मिळाल्यावर ती घरीं आली.

मुलीचें पाऊल स्वच्छेनें वांकडें पडलें नाहीं, हें जेव्हां राजाला कळलें तेव्हां त्यानें तिला माफ केलें. यथा वेळीं पद्मनीला एक मुलगा झाला. प्रवर्धन त्या मुलाला बापा-सारखा पण होता. त्याचें नांव प्रगल्भ असें ठेवण्यांत आलें.

प्रगल्भाच्या शिक्षणाची राजानें उत्तम व्यवस्था केली. तो सोळा वर्षांचा झाला तेव्हां त्याचें शिक्षण पुरें झालें. एकदां प्रवर्धन आपल्या नातवाबरोबर उपवनांत फिरायला गेला असतां दमून गेल्यामुळें संगमरमरी शिळेवर विश्रांतीसाठीं थोडा बसला.

तेव्हां प्रगल्भ त्याला म्हणाला—"आजोबा! मी पुष्कळ दिवसांपासून पहात आहें, वार्धक्यामुळें तुम्हांला राज्य एक ओझें वाटूं लागलें आहे. माझा राज्याभिषेक करून देऊन तुम्ही विश्रांती घ्यावी.



प्रवर्धनला तो नातवाचा पोरकटपणा वाटला. म्हणाला—"इतकी घाई कसली रे झाली आहे तुला? माझ्यानंतर तुलाच गादी मिळणार आहे."

पुन्हां एकदां असेंच झालें. राजोद्यानांत बराच वेळ फिरत राहाल्यावर महाराज दमले व ते एका चबूतऱ्यावर बसले. प्रगल्भ थोडा उर्मट शब्दांनच म्हणाला—"तुम्हाला चालवतदेखील नाहीं व माझा राज्याभिषेक करून देऊन स्वस्थ बसण्याची इच्छादेखील तुमच्या मनांत येत नाहीं."



"तुझ्या डोक्यांत हें सर्व कोण घालीत आहे, कळत नाहीं मला! पण ते तुझे हितैषी नाहींत, एवढें खास. माझ्यानंतर तूंच या गादीला वारस आहेस बाळा!" प्रवर्धन म्हणाला.

"तुम्ही स्वखुशीनें मला आतांच गादीवर बसविलें नाहींत तर मलाच ही गादी बळकवावी लागेल." असें तावातावानें सांगून प्रगल्भ तेथून निघून गेला आणि घरीं जाऊन आपल्या आईला म्हणाला—"आई! मी निघालों!" आईनें कोठें व कां म्हणून त्याला विचारलें तेव्हां तो म्हणाला—"आजोबा माझा राज्याभिषेक करून द्यायला तयार नाहींत, म्हणून मी या घरांत राहायला तयार नाहीं." आईलादेखील मुलाचा तो पोरकटपणाच वाटला.

परंतु प्रगल्भ खरोखरच निघून गेला. तो दोनतीन दिवसांनीं सुपर्ण नांवाच्या राजाकडे गेला व त्याच्या पदरीं नोकरी करण्यासाठीं आला असल्याचें सांगितलें.

"कोण तूं आणि तुला कोणतें काम येतें, सांगशील कीं नाहीं? आणि पगार काय घेणार?" सुपर्णनें प्रगल्भला विचारलें.

"मी कोणी असलों म्हणून काय झालें? सांगाल तें काम करायला मी तयार आहें.



पराक्रमाविषयीं मी कधीं विचारणार नाहीं. एक वर्षभर काम करणार आहें. माझें काम आपणांस आवडलें तर आपल्याला वाटेल तें द्यावें किंवा मी मागेन तें द्यावें."

सुपर्ण त्याला कबूल झाला.

नातू दिसला नाहीं तेव्हां प्रवर्धनला, पुत्र अपत्य नसल्याबद्दल फार दुःख वाटूं लागलें. त्यानें राजधानी नजीकच्या एका शेतकऱ्याच्या चंपकवती नांवाच्या मुलीशीं लग्न करून घेतलें.

एक वर्ष लोटलें. प्रगल्भनें हळूहळू सुपर्णाची मर्जी संपादन केली. तो सुपर्णाकडे आला व म्हणाला—"मी आपल्या पदरीं एक वर्षभर काम केलें आहें. माझें काम पसंत पडलें असेल तर माझी एक इच्छा पुरी करावी."

सुपर्णानें इच्छा प्रगट करायला सांगितलें.

"आपण प्रवर्धन महाराजांच्या राज्यावर स्वारी करावी." प्रगल्भ म्हणाला.

सुपर्णानें चकित होऊन विचारलें—"पण कां? ते तर आपले महाराज, चक्रवर्ती आहेत. मी त्यांचा एक मांडलिक आहें."

"मी तरी कोणी परका आहें असें वाटलें का तुम्हांला? मी त्यांचा वारस आहें. ते या युद्धांत हारले तर मीच चक्रवर्ती होईन. त्यांना जय मिळाला तर त्यांत माझेंच नुकसान होईल. दिलेलें वचन मोडूं नये." प्रगल्भ म्हणाला.

सुपर्ण वचन दिल्याप्रमाणें प्रगल्भची इच्छा पुरी करण्यासाठीं प्रवर्धनच्या राजधानीवर चालून गेला.

प्रवर्धनजवळ सैन्य एकत्र करण्यास सवड नव्हती. तरी युद्ध करून वीरगति मिळविणेंच त्याला श्रेयस्कर वाटलें.

चंपकवती त्यावेळीं गरोदर होती. तिला राजानें माहेरीं पाठविलें. तिला म्हणाला



"कदाचित या युद्धांत मला जय मिळणार नाहीं व वीरगति मिळेल. तुला मुलगा होईल तोच माझा वारस होईल. त्याचें चिन्ह म्हणून मी तुला हा रत्नहार देतो. तो त्याच्या गळ्यांत घाल." असें सांगून राजानें आपल्या गळ्यांतला हार काढून दिला.

चंपकवती माहेरीं निघून गेली.

त्या युद्धांत प्रवर्धनला वीरगति मिळाली. प्रगल्भ गादीवर बसला. राजवाड्यांत जे कोणी राजभक्त नोकर काम करीत होते, त्यांना प्रगल्भनें कामावरून काढून टाकलें आणि स्वतःच्या विश्वासांतल्या लोकांना नेमलें. त्याच्या अत्याचारांमुळें प्रजेंत असंतोष वाढत गेला.

यथा वेळीं चंपकवतीला मुलगा झाला. तोच गादीला खरा वारस होता म्हणून चंपकवतीच्या वडिलांनीं प्रगल्भच्या राजधानीपासून त्याला दूर ठेवण्याचें ठरविलें आणि एका गांवीं एका विश्वासपात्र माणसाच्या घरीं त्याला नेऊन ठेवलें.

प्रगल्भला त्याच्या आजोबांनीं दुसरें लग्न केलें असल्याचें मुळींच माहीत नव्हतें. राजाची बायको राज्यांतच जिवंत आहे हें देखील त्याला माहीत नव्हतें. त्यानें



आपल्या आजोबांचा वध करून बळजबरीनें जी गादी बळकावली होती त्या गादीला एक दुसरा वारस आहे ही गोष्ट कधींच त्याच्या ध्यानीं मनीं आली नाहीं.

सोळा वर्षे लोटलीं. चंपकवतीचा मुलगा लहानाचा मोठा झाला. त्याचें नांव प्रद्योत असें ठेवण्यांत आलें. तो शेतकऱ्याच्या, म्हणजे आपल्या आजोळीं परत आला.

प्रद्योतला हें कळून चुकलें होतें कीं प्रगल्भ एक प्रजापीडक राजा आहे. प्रजेच्या मनांत त्याच्याविरुद्ध असंतोष आहे. त्याला गादीवरून काढून टाकण्याची प्रजेची इच्छा



आहे. प्रद्योतनें विचार केला कीं थोड्या प्रयत्नानें तें साध्य होईल.

प्रगल्भ दररोज कोणाला तरी दूत म्हणून एकेका घरीं पाठवूं लागला. कोणी आला कीं त्याला रात्रभर ठेवून घेऊन एक गोष्ट सांगायला सांगे. ती गोष्ट त्याला आवडली नाहीं तर त्याचा शिरच्छेद करून टाकी. अशा तऱ्हेनें कित्येक नागरिकांचा शिरच्छेद झाला.

प्रद्योत आल्यानंतर त्याच्या आजोळच्या घरीं एक दिवशीं राजदूत आला. म्हणाला—"तुमच्या घरून कोणीतरी येऊन आज राजाला गोष्ट सांगावी अशी राजाज्ञा आहे."

शेतकरी घाबरला. आतां आपण शेवटचा निरोप घेऊनच जावें. कारण आपल्याला राजाला आवडेल अशी गोष्ट सांगणेंच अशक्य, असें त्याला वाटलें.

"कांहीं भिण्याचें कारण नाहीं, आजोबा! मी आहे ना त्या दुष्टाला गोष्ट सांगायला." प्रद्योत म्हणाला.

"तूं त्या दुष्ट राजाकडे जाणार? नको नको!" चंपकवती म्हणाली.

"मी आहें आज उद्यांचा पाहुणा. मीच जातों, बाळ!" शेतकरी म्हणाला.

"तुम्हांला काय वाटलें कीं तो दुष्ट इतका सहज मला ठार करूं शकेल? मुळींच भिऊं नका." असें सांगून प्रद्योत राजवाड्या-कडे निघाला. तो पोंचला तेव्हां राजवाड्यांत सर्व जेवायला बसले होते. प्रद्योत पंगतींत एका जागीं जाऊन बसला. वाढप्यांनीं चकित होऊन त्या अपरिचित व्यक्तीला पाहून विचारलें—"कोण रे तूं?"

"मी राजाचा अतिथि आहें." प्रद्योत म्हणाला.

पंगतींत बसलेले लोक चकित होऊन त्याच्याकडे पाहूं लागले. राजाला गोष्ट सांगण्यासाठीं त्या पूर्वी राजाचा कोणी नातेवाईक कधींच आला नाहीं. तळहातावर आपला जीव घेऊनच जणुकांहीं त्यांना यावें लागे, कारण उजाडण्यापूर्वी त्यांना या जगाचा निरोप घ्यावा लागे.

वाढप्यांनीं त्याला कांहीं बोलल्याशिवाय वाढलें. प्रद्योतनें पोटभर जेवून घेतलें. व म्हणाला—"आतां मला राजाकडे घेऊन चला."

नोकर त्याला राजाच्या शयनगृहांत घेऊन गेले. प्रगल्भ पलंगावर भिंतीकडे तोंड करून पडून होता.

"आज रात्रीं आपल्याला गोष्ट सांगायला आलों आहें." प्रद्योत म्हणाला.

"तरमग सुरू कर!" प्रगल्भ त्याच्या-कडे पाहाल्याशिवाय म्हणाला.

प्रद्योतनें, त्यानें परदेशांत ऐकलेल्या अनेक गोष्टी रात्रभर सांगितल्या. उजाडल्या-वर प्रगल्भ अंथरुणावर पडल्या पडल्या तोंड फिरवून म्हणाला—"तुला छान गोष्टी सांगतां येतात!"

"तूं ऐकल्या असशील तर ना? कारण तूं तर रात्रभर घोरत पडला होतास." प्रद्योत म्हणाला. प्रगल्भ प्रद्योतचा तो उर्मटपणा ऐकून रागावला आणि म्हणाला—



"आपली बडबड बंद कर. मी मुळींच झोंपलों नव्हतों. माझा डोळादेखील लागला नव्हता."

"तसें असेल तर तूं नागपुत्र असला पाहिजेस!" प्रद्योत म्हणाला. तें ऐकून प्रगल्भचा हात तलवारीला गेला.

"एवढी घाई नको. दाखवूस. तलवार माझ्या हातांत पण आहे. राग मानण्याचें मुळींच कारण नाहीं. तूं आपल्या आईला जाऊन विचारून ये कीं तुझा जन्म केव्हां व कसा झाला होता तो?" प्रद्योत शांतपणें म्हणाला.

प्रगल्भ उठून निघून गेला आणि परत येऊन प्रद्योतला म्हणाला—"तू म्हणालास तें बरोबर आहे. माझे वडील कोणी मानव नाहीत."

"ठीक! तरमग मी तुला झोप यावला एक उपाय सांगतो. येथून कांही अंतरावर गंधर्वांची एक पुष्करिणी आहे त्यांत कांही वेळ पोहोत रहा त्यानंतर तुला गार झोंप येऊं लागेल." प्रद्योत म्हणाला.

त्याच दिवशी प्रद्योत आपल्या मित्र मंडळीबरोबर स्नानाला गेला. सर्वांनी त्याला पाण्यांत बुडत असलेला पाहिलें. त्यानंतर तो बराच वेळ वर आला नाही. काळोख पडावयाची वेळ झाली. सर्व तो वर येईल म्हणून वाट पहात राहिले. पण तो आला नाही तेव्हां सर्व निराश होऊन घरीं परत निघाले.

राजा अदृश्य झाल्याचें प्रजेला कळलें. राज्यांत शोककळा पसरण्याऐवजी सर्वत्र मुक्तिपर्वासारखा आनंदीआनंद पसरला. बारपांच दिवसांनीं प्रगल्भानी उत्तरक्रिया पण करण्यांत आली.

गादीला वारस कोण या गोष्टीच्या चर्चेसाठीं तेराव्या दिवशीं सभा करण्यांत आली. त्या सभेला प्रद्योत हजर होता. तो म्हणाला—"मी प्रवर्धन महाराजांचा एकुलता एक मुलगा आहे. हा पहा माझा रत्नहार!"

सर्वांनी तो हार ओळखला. प्रद्योतचा राज्यारोहण समारंभ थाटामाटानें पार पडला. शेतकरी. नातवाचा राज्याभिषेक पाहायला हजर होता.

प्रद्योतच्या राज्यांत सर्वत्र सुबत्ता नांदू लागली व प्रजा सुखी झाली.





# भुतांचें राज्य

प्राचीन काळीं महा कोशल देशांत असा कांही काळ होता कीं प्रत्येक घरीं एक तरी भूत किंवा पिशाच असे. लोक अशिक्षित होते व अंधविश्वास त्यांच्या मनांत इतका दृढबद्ध होऊन गेला होता कीं ते त्या भुतांना गृहदेवता मानीत व त्यांना प्रसन्न करण्यासाठीं बळी देत.

अपर्ण नांवाच्या एका क्षत्रियाच्या घरीं एक भूत होतें. तें घोड्यांचें दाणापाणी करी. त्या भुताला एक घोडा फार आवडे. म्हणून तें त्या घोड्याचें दाणापाणी जास्त मन लावून व काळजीपूर्वक करी.

अपर्ण एकदां एका नोकराला बोलावून म्हणाला—"तूं एकाच घोड्याची चांगली सेवा करतोस व इतरांकडे दुर्लक्ष करतोस, हें बरोबर नाही.".

"मी नाही धनी! तें गृहदेवतेचें काम आहे." नोकर म्हणाला.

अपर्णाचें तेवढ्यानें समाधान झालें नाही! तो स्वत: तबेल्यांत घोडे पहायला गेला. त्या घोड्यासमोर त्याला चारा थोडा जास्त घातलेला दिसला. इतक्यांत त्याच्या मानेला त्या भुतानें एक अर्धचंद्र दिला. तो खालीं पडला व त्याला लागलें.

तेव्हांपासून सर्व घोड्यांचें दाना पाणी तें भूतच करूं लागलें. अपर्ण रोज जाऊन त्या भुताला पाली खायला घालूं लागला. दसरा आला. अपर्णानें आनंदानें दसरा साजरा केला. त्यानें आपल्या नोकराचाकरांना जेवण दिलें व नवे कपडे दिले. भुतालापण जेवण व रेशमी वस्त्र दिलें.







अपर्णा आपल्या नोकराचाकरांबरोबर शिकारीला गेला होता. तो पावसामुळें एका जागीं अडकला. घोडे घरीं परत आले तेव्हां सर्व ओले चिंब भिजून गेले होते. अपर्णानें घरासमोर घोडे सोडले व स्वतः कपडे बदलले. भूत येऊन घोड्यांना पुसून काढील व त्यांना तबेल्यांत घेऊन जाऊन त्यांच्यासमोर चारा टाकील असें त्याला वाटत होतें. परंतु घोडे बाहेरच उभे होते. थंडीनें ते काकडत होते व त्यांचें हिणहिणणें ऐकूं येत होतें. त्यानें खिडकीतून बाहेर पाहिलें, भूत रेशमी कपडे घालून पावसाची गंमत पहात होतें.

"घोडे बाहेर पावसांत कुडकुडत आहेत. ठोंब्यासारखा उभा राहून काय पहात आहेस!" तो मोठ्यानें ओरडून म्हणाला.

"पाऊस थांबू दे! मी घेईन त्यांचा समाचार! माझे रेशमी कपडे पावसांत भिजणार नाहींत का!" भूत म्हणालें. असा होता तो गृहदेवता.

एका घरीं दोघे भाऊ होते. त्यांनीं आपली वडिलोपार्जित जमीन अर्धी अर्धी वांटून घेतली व शेती करूं लागले. परंतु एका भावाच्या शेतांत चांगलें पीक येई व दुसऱ्याच्या शेतांत बेताचें येई. दोघांचीं शेतें सारखीं वांटून घेतलेलीं होतीं. दोघांचीं शेतें सारखींच सुपीक होतीं.

कापणीची वेळ जवळ आली. मोठा भाऊ आपल्या शेतावर निघाला तेव्हां एक खुजा त्याला दिसला. तो आपल्या डोक्यावर भाताची एकच एक लोंब घेऊन जात होता पण डोक्यावर मोठें ओझें असल्यासारखा त्याला दम लागला होता.

"अरे खुजा! इतक्याशा एका काडीचें तुला एवढें ओझें वाटत आहे का रे?" मोठ्या भावानें थट्टेखातर विचारलें.

"कारण मी तुझ्यासाठीं घेऊन जात आहे ना! तूं स्वतःच उचलून घेऊन गेलास तर कळेल तुला तें किती ओझें आहे तें." असें म्हणत तो लगेच मागें फिरला व धाकट्या भावाच्या शेताकडे जाऊं लागला.

त्यानंतर मोठ्या भावाच्या शेतांत कमी पीक निघूं लागलें आणि धाकट्या भावाच्या शेतांत दुप्पट पीक निघूं लागलें. तो खुजा एक भूतच होता. तो मोठ्या भावाच्या शेतांत काम करी व पीक वाढविण्याच्या कामीं मदत करी. ही गोष्ट मोठ्या भावाला माहीत नव्हती. त्यानें त्याची थट्टा उडवून आपलेंच नुकसान करून घेतलें.

याहून जास्त विचित्र आणखी एक गोष्ट एका जागीं घडली. बाजू बाजूच्या दोन शेतांत दोन भुतें काम करीत असत. एका शेतांत उत्तम पीक येई व दुसऱ्या शेतांत फक्त गवत माजलेलें असे. त्याचें गुपित एकदां कळलें. एक भूत दुसऱ्या शेतांतलें धान्य चोरून आणी व दुसरें पहिल्याच्या शेतांतलें गवत चोरून आणी. अशा तऱ्हेनें चोरी करीत असतां दोघांनी परस्परांना पकडलें.

"अरे, तूं आमच्या शेतांतलें धान्य चोरून नेतोस काय!" एका भुतानें विचारलें.

"आमच्या शेतांतलें गवत तूंच नाहीं का इतके दिवस चोरत होतास!" दुसऱ्यानें त्याला विचारलें.

या गोष्टीवर दोघांची परस्परांशी मारामारी झाली, व दोन्ही शेतांची नासाडी झाली.

अशा तऱ्हेनें भुतांमुळें कित्येकांना लाभ होई तर कित्येकांचें नुकसान होई. पण गौतमबुद्धांनीं कोशल देशांत पाऊल टाकतांच भुतांचा सुळसुळाट पार नाहींसा झाला.





# परोपकारी गोपाळ

एकदां गोपाळ परगांवीं जाण्यासाठीं निघाला. दुसऱ्यादिवशीं त्या गांवच्या कुळकर्ण्यांशीं कांहीं काम होतें. कुळकर्ण्यांचें नांव बासू कुळकर्णी असें होतें. गोपाळ उन्हें थोडीं कमी झाल्यावर निघाला. त्या गांवानजीक पोंचण्याच्या सुमारास एक काळी गाय उड्या मारीत गोपाळकडे धांवत आली. दोरी धरून एक मनुष्यपण बरोबर येत होता. तो गाईला थांबविण्याचा यत्न करीत होता, पण तें त्याला शक्य होत नव्हतें. काटे बोचल्यानें व ठेंच लागून त्याचें अंग जागोजागीं खरचटून रक्तबंबाळ झालें होतें. गोपाळकडे पाहून तो म्हणाला—"अहो, जरा गाईला थांबवतां का?"

गोपाळ गाईसमोर गेला व तिला पुचकारूं लागला. गाय जोरानें धांवत पळत येत होती तरी गोपाळचा आवाज ऐकून थांबली. गोपाळनें दोरी एका झाडाला बांधून ठेवली व त्या मनुष्याला विचारलें,—"काय झालें काय असें गाईला पळायला?"

"डोकें फिरलें आहे आणखी काय? म्हणून अशी पळत आहे. खंडीभर पैसे देऊन परवांच मी ती विकत घेऊन आलों. सुरवातीपासूनच तिचे असे थेर चालले आहेत." तो मनुष्य म्हणाला.

तो बडबडत म्हणाला—"माझी काठी कोठेंतरी पडली आहे. आज हिला असा जिवंत सोडणार नाहीं मी." असें सांगून एक झाडाची काठी तोडून घेऊन तो गाईला मारायला धांवला. पण गाय त्याला मारण्यासाठीं अशी उभी राहाली कीं त्याचें पाऊलच पुढें पडेना.

गोपाळनें त्याच्याकडे पाहिलें आणि त्या माणसाचा राग थोडा कमी झाला.

"फेक ती काठी! यामुळेंच ती गाय बिथरली आहे. गाईला चुचकारून पुचकारून थंड करायचें असतें. मारहाण करून ती जास्तच बिथरेल. ही मारकी गाय दिसत नाहीं. नाहींतर मला कां नाहीं मारीत!" गोपाळनें विचारलें.

"तें सर्व मला माहीत आहे. पण आतां काय करूं म्हणतां मी? मला ओढून कितीदां जमिनीवर पाडलें. त्या डोंगराच्या वळणावर आमचें गांव आहे. मला चालवत नाहीं. या गाईला घेऊन जाणें मला शक्य नाहीं." असें म्हणत तो इकडे तिकडे पाहूं लागला.

"मदतच पाहिजे ना, मी आहे कीं. मी करतों मदत!" असें सांगून गोपाळनें गाईची दोरी हातांत घेतली आणि त्या मनुष्याच्या बरोबर निघाला. वाटेंत त्या मनुष्यानें विचारलें—"आपलें नांव काय? आपलें गांव कोठें आहे?"

गोपाळ आपल्या गांवाचें नांव सांगून म्हणाला—"उद्यां बासू कुळकर्ण्यांच्या घरीं थोडें काम आहे. तिकडे निघालों आहे." गोपाळ त्या माणसाच्या घरीं गेला. त्याच्या



घरीं गाईला बांधून ठेवून तिच्यासमोर चारा टाकून काळोख पडण्याच्या सुमारास तो बासू कुळकर्ण्यांच्या घरीं पोंचला.

बासू कुळकर्णी कुशलवार्ता विचारून म्हणाला—"हें पहा गोपाळ! मी दोन वर्षांपूर्वीं तुझ्या कडून जी गाय विकत घेतली होती. तिला एकाएकीं कांहींतरी आजार झाला आहे, हें हा मनुष्य आतांच सांगून गेला. सकाळपर्यंत चांगली होती. एवढ्या अवधींत काय झालें, कोणाला ठाऊक. एक पाऊल देखील टाकवत नाहीं तिला. चार जणांना तिला उचलून आणायला पाठविलें आहे."



तें ऐकून गोपाळला फार वाईट वाटलें. इतक्यांत वासू कुळकर्ण्याच्या लोकांनी गाईला आणून अंगणांत ठेवलें. पशुवैद्याकडे निरोप पाठविण्यांत आला. गाईला तपासून म्हणाला—" ही गाय तीन दिवसांपूर्वीच व्यायली असावीसें वाटतें. हिला आजार दुसरा कांहीं नाहीं. चांगलें खायला प्यायला मिळालें तर छान चालूं लागेल."

वासू कुळकर्णी चकित होऊन म्हणाला— "दोन तीन दिवसांपूर्वी कशी काय व्यायली? आमच्या गाईला दोन तीन महिन्याचें वासरूं आहे." नंतर तो जवळ जाऊन गाईला पाहून म्हणाला,—"ही गाय आमची दिसत नाहीं." ती गोष्ट खरी वाटण्यासारखीच होती. कारण वासरूं गाईजवळ जात नव्हतें.

गोपाळला लगेच शंका आली. जी गाय त्यानें अडविली होती व त्या माणसाच्या घरीं घेऊन गेला होता ती गाय कदाचित वासू कुळकर्ण्याचीच असेल. तो मनुष्य म्हणाला पण होता कीं परवांच त्यानें ती विकत घेतली होती.

पण गोपाळला इतरांविषयीं अशा तऱ्हेनें शंका करण्याची संवय नव्हती. पुन्हां त्या मनुष्याच्या घरीं जाऊन जों पर्यंत त्याच्या स्वतःच्या मनांतला संशय दूर होत नाहीं तोंपर्यंत वासू कुळकर्ण्याला कांहीं सांगावयाचें नाहीं, असें त्यानें ठरविलें होतें.

वासू नोकराला बोलावून म्हणाला— "काय रे, ही गाय तर आपली दिसत नाहीं? आपली गाय कोठें गेली? गाय बदलली कशी?"

नोकराला कांहीं करावें लागलें नाहीं, थोड्या वेळानें वासूची गाय स्वतःच पळत आली व आपल्या वासराजवळ उभी राहून त्याला दूध पाजूं लागली. सर्वांना आनंद झाला. गोपाळला पण आनंद झाला.





ती गोष्ट सर्वांना कळण्यासारखी होती. कोणी तरी आपली आजारी गाय वासूच्या गाईच्या बरोबर सोडली आणि त्याची नवीन व्यायलेली गाय धरून ओढून घेऊन गेला होता. "या आजारी गाईचा इलाज कसला करायचा? मरेल, मरूं दे!" वासू कुळकर्णी म्हणाला.

"चोराला शिक्षा द्या. बिचाऱ्या गाईची काय चूक? तिची चिकित्सा करा. चोर सांपडला तर आपल्याला आणखी एक गाय मिळेल." गोपाळ म्हणाला. तें ऐकून वासूचा राग शांत झाला.

गोपाळ त्या डोंगराजवळच्या वळणावरच्या गांवीं गेला. तेथें त्यानें गाईची चोरी करणाऱ्या चोराला पाहिलें. तो मनुष्य जखमांना मलम लावून खाटेवर कण्हत पडून होता. कारण त्या गाईनें त्याला आजच सकाळीं पळून जातेवेळीं खूप मारलें. म्हणून त्याला आणखी जास्त लागलें होतें.

"ती गाय नव्हती, तिच्या रूपानें यमराज आला होता." चोर कण्हत म्हणत होता.

"मग तूं स्वतःच यमराजाला कां बोलावून आणलेंस? वासू कुळकर्ण्याकडूनच तूं ती गाय विकत घेतली होतीस ना?" गोपाळनें त्याला विचारलें.

"तरमग, ही वासू कुळकर्ण्याची का गाय आहे?" तो म्हणाला. अशा तऱ्हेनें त्याची चोरी चवाठ्यावर आली. कुळकर्णी सामान्य मनुष्य नव्हता. कडक स्वभावाचा मनुष्य होता. त्याला कळलें कीं त्याची गाय कोणी चोरून नेली आहे, तर तो त्याला जिवंत सोडणार नाहीं ही गोष्ट चोराला माहीत होती.

त्यानें गोपाळचे पाय धरले व म्हणाला— "भाऊ! ही चोरी मी केली होती,












ही गोष्ट कुळकर्ण्यांच्या कानावर जातां कामा नये. केलेल्या पापाचीं फळें मला चांगली चाखायला मिळालीं आहेत." त्यानें गोपाळ समोर आपली चोरी कबूल केली.

चोरी केलेल्या काळ्या गाईनें चाऱ्याला किंवा पाण्याला तोंड लावलें नाहीं तेव्हां ती मरते की काय, असा संशय त्याला आला. दुधाशिवाय गाईचें वासरूं मरून गेलें. डोंगरांत गाई चरायला येत असत. चोर उजाडण्यापूर्वी आपल्या गाईला कुरणांत घेऊन गेला आणि झाडी आड तिला लपवून ठेवलें. ऊन पडल्यावर गाईंना घेऊन गुराखी आले. गाईंना चरायला सोडून गुराखी झाडाखालीं झोपले असतां चोरानें आपल्या गाई सारखीच एक दुसरी गाय चोरून नेली. ती येत नव्हती म्हणून तिला चुचकारून तिच्या गळ्यांत दोरी बांधली आणि घेऊन जाऊं लागला.

गाईला कळलें कीं तिला ओळखीच्या वाटेनें नेत नसून दुसऱ्याच वाटेनें नेत आहेत. तेव्हां ती पळूं लागली व तो ठेचा खात तिला आवरीत असतां गोपाळ त्याच्या मदतीला धांवला होता. त्यानें त्याला त्याच्या घरीं पोचतें केलें होतें.

गोपाळनें आणखी एका तऱ्हेनें चोराला मदत करण्याचें ठरविलें. तो वासू कुळकर्ण्यांला जाऊन म्हणाला "चोराला चांगली शिक्षा झाली आहे. त्याला आणखी शिक्षा देण्याची गरज उरली नाहीं." वासू कुळकर्ण्यांनें पण गोपाळच्या मनाविरुद्ध कांहीं न करण्याचें ठरविलें. लवकरच औषध पाणी नीट मिळाल्यानें चोराची गाय बरी झाली व चोर तिला घेऊन घेऊन गेला.





# कृष्णावतार

साऱ्या गोकुळांत गडबड होती प्रवासाच्या तयारीची. गाड्यांतून सामान भरण्यांत येत होतें. तुपालोण्याचीं मडकीं, धान्याचीं पोतीं, भांडींकुंडीं, पळ्यांचमचे, चाकू सुऱ्या व लहान मोठें सामान नीट रचून ठेवण्यांत आलें.

तरुण मंडळी आपल्या गुरांना पुढें हांकत निघालीं. त्यांच्या पाठोपाठ गाड्या व सर्वांत शेवटीं बायकापुरुष गप्पा मारीत आनंदानें चालत होते. म्हाताऱ्या माणसांना तरुण मंडळी मदत करीत होतीं.

अशातऱ्हेनें सारें गोकुळ वृंदावनला येऊन पोंचलें. वडीलधाऱ्या गवळ्यांनीं घरें बांधायला जागा ठरविली. गाड्या अर्ध-चंद्राकार उभ्या करण्यांत आल्या. कित्येकांनीं झोपड्या बांधून उभ्या केल्या. कित्येकांनीं झाडाखालीं किंवा लतामंडपांतच ठाणें दिलें.

कांहीं लोक गुरांच्या रक्षणाची व्यवस्था करण्यांत गुंतले. त्यांनीं कांट्याचें कुंपण तयार करून त्या आवारांत गुरांना नेऊन सोडलें. एका दिवसांत सर्व वृंदावन गवळ्यांचें होऊन गेलें. कांहीं दिवसांनीं गवळिणी नटून थटून हिंडूं फिरूं लागल्या. गवळ्यांची वस्ती तेथें होतांच त्या सर्व प्रदेशाला एक निराळीच कळा आली.

यथा वेळीं गवळ्यांनीं पुष्कळ धनवैभव संपादन केलें. पशुधन वाढत गेलें. कृष्णाला



तेव्हां तेरावें वर्ष लागलें होतें आणि उन्हाळा सुरू झाला. गुरांना गाईंना निरनिराळे आजार होऊं लागले. त्यांना उभें राहाणें अशक्य होऊं लागलें. तोंडांतून फेस येऊं लागला. त्यांचे खूर फुटूं लागले.

गुरांची रोगराई दूर व्हावी म्हणून गवळ्यांनीं मांत्रिकांकरवीं मंत्रतंत्र करून पाहिले व पशुवैद्यांकडून औषध पाणी केलें. पण कांहीं उपयोग झाला नाहीं.

ती सांथ यमुनेच्या कांठच्या रानटी जनावरांत सुद्धां पसरत असलेली दिसली. कित्येक गवळी व गुराखी आजारी पडूं लागले. ती भयंकर सांथ पाहून सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें. सर्व वृंदावनभर एक तऱ्हेची घाण येऊं लागली.

नंद आजारी पडला. यशोदा व रोहिणी पण आजारी पडल्या. कृष्णानें बलरामाला सल्ला विचारला आणि दोघे आपल्या गुरांना घेऊन एक कोसभर ओघाच्या उलट्या दिशेनें गेले. इतर गवळी व गुराखी पण बरोबर गेले. त्यांना कसला रोग झाला नाहीं.

नंद जायला तयार झाला नाहीं. "ही जागा आपली आहे. काय वाटेल तें झालें तरी सहन केलेंच पाहिजे. इतक्या लोकांना कोठें घेऊन जाऊं?" तो म्हणाला.

नंद, यशोदा व रोहिणी सर्वांनींच आजारी असूनहि नकार दिला व हट्टानें वृंदावनलाच रहायचें ठरविलें. तेव्हां काय करावें हें कृष्णाला पण सुचेना.

गवळ्यांमध्यें विदेह देशाचा राहणारा एक वृद्ध गवळी होता. तो सर्व प्रमुख गवळ्यांना बोलावून म्हणाला—"हें पहा, आपलें जीवित हें सर्व या गुरांच्या जिवावर आहे. त्यांच्या कृपेनेंच आपलें पोट भरतें. पशुरक्षण करणारा तो शिवशंकर आहे.



आपण त्याची आराधना केल्याशिवाय या संकटांतून आपला उद्धार नाहीं. कोणा उत्तम ब्राह्मण पुरोहिताला बोलावून शंकराची आराधना करावी."

त्याचा सल्ला ऐकून गोपालकांनीं ब्राह्मणांना आदरपूर्वक बोलाविलें व शंकराची पूजा करविण्याची व्यवस्था केली. एक आठवडाभर विधिवत पूजा झाली, अभिषेक झाला आणि सर्वांत शेवटीं नैवेद्य झाला. ब्राह्मणांचा शांतिपाठ व मंत्रजाप आठवडाभर चालू होता. सातव्या दिवशीं एका ब्राह्मणाच्या अंगांत देव आला. तो ब्राह्मण एकदम हंसूं लागला आणि उड्या मारून नाचूं, म्हणजे, तांडव नृत्यच करूं लागला.

"मला शंकरानें कैलास पर्वतावरून पाठविलें आहे. 'अरे शंखकर्णा! यमुनेच्या काठीं जाऊन पहा, गाईगुरांना कसला रोग झाला आहे तो.' मीच शंखकर्ण तो. स्वतः प्रभू शंकराच्या आज्ञेनें आलों आहें. शंकरानें तुम्हां सर्वांची आराधना स्वीकार केली आहे. तुम्ही सर्व कां आजारी पडलां आहां? आहे का माहीत तुम्हांला? द्वापर युगांत राक्षस जेव्हां भूलोकाला त्रास देण्याचें ठरवून निरनिराळ्या प्रकारचीं रूपें



घेऊन आले तेव्हां कालिकली राक्षस विरोचन याच्या मुलानें एका विषारी बिल्ववृक्षाच्या रूपें यमुनेच्या दक्षिण तीरावर जन्म घेतला. त्या राक्षसाच्या चारी बाजूला त्या राक्षसाचे अनुयायी विषारी वृक्ष व कांटेरी झुडपांच्या रूपें जन्माला आले. त्या विषारी बिल्ववृक्षाच्या वाऱ्यानें तुम्ही सर्व व तुमचीं गाईगुरें आजारी पडलां आहां. त्यामुळेंच यमुनेचें पाणी पण बिघडलें आहे. तो विषारी वृक्ष उपटून टाकण्याची शक्ति नंदाचा मुलगा बलराम याच्या अंगीं आहे. त्यानें हें काम



करण्याचें कबूल करून केलें, तर तुमचें सर्वांचें कल्याण होईल. ही गोष्ट तुम्हांला सांगण्यासाठींच महादेवानें मला पाठविलें आहे. मी तुम्हांला सांगितलें आहे तसें करा. बरें, आतां मी येतों. मला निरोप द्या."

हें बोलतां बोलतां ब्राह्मणाला मूर्छा आली व थोड्या वेळानें जागा होऊन तो पूर्ववत सर्वांशीं बोलूं लागला. सर्व ब्रह्म-वृंदाला आनंद झाला.

गोपालकांनीं बलरामाला बोलावून तें सर्व सांगितलें. तें ऐकून तो म्हणाला— "परमेश्वराची आज्ञा आहे व माता व पिता यांच्या रक्षणासाठीं ती आज्ञा आहे. याहून जास्त भाग्य तें मला काय मिळणार? मी तो विषारी वृक्ष उपटून टाकतों."

कृष्णानें ब्राह्मणांना नमस्कार केला. शंकराला साष्टांग दंडवत केला. शंकराच्या देवळाला प्रदक्षिणा घालून पुन्हा नमस्कार केला व बलरामाजवळ जाऊन उभा राहाला. बलरामानें पण अगदीं तशीच प्रदक्षिणा करून शंकराला नमस्कार केला. नंतर दोघे कुऱ्हाड, कुदळ व इतर आयुधें घेऊन तो विषारी वृक्ष होता तिकडे गेले.

शंकराची आराधना केल्यानेंच कित्येक गोपालकांना बरें वाटलें होतें. ते देखील दोघांच्या बरोबर विषारी वृक्षलता उपटून टाकण्यास निघाले.

तो विषारी वृक्ष कोठें आहे हें कळायला त्यांना मुळींच वेळ लागला नाहीं. रानांत जसजसे ते पुढें जाऊं लागले तसतसा कांहीं झाडाझुडपांतून एक विशिष्ट दुर्गंध आलेला त्यांना आढळूं लागला. तो हळूहळू असह्य होत गेला. थोड्यावेळानें तो भयंकर बिल्ववृक्ष पण त्यांना दिसला. फार मोठा होता तो. भुतासारखा वाटे पाहाल्यावर. त्याच्या चारी बाजूला विषारी काटेरी झाडें व झुडपें होतीं. बलराम व कृष्ण तीं झाडें झुडपें सपसप कांपीत पुढें त्या झाडाजवळ जाऊन पोंचले.

त्या वृक्षाचें खोडच तीस हात रुंद होतें. त्याला लागलेलीं बेलफळें हत्तीच्या डोक्याएवढीं होतीं. त्याच्या फांद्या व डहाळ्या दूरवर पसरल्या होत्या. फळांतून घाण वास येत होता. म्हणून कृष्णानें व बलरामानें प्रथम सर्व फळेंच तोडून टाकण्याचें ठरविलें.

दोघांनीं फळें फुलें व कळ्याच प्रथम तोडून किंवा खुडून टाकल्या. हाताला आलीं नाहींत तीं फळें व फुलें काठ्यांनीं झोडपून पाडलीं.

त्यांच्या मदतीला सर्व गोपबालक पण आले होते. त्यांनीं सर्वांनीं मिळून त्या झाडावर एकदेखील फळ, फूल किंवा कळी राहूं दिली नाहीं.

एक विचित्र गोष्ट त्यावेळीं घडली. गाईगुरांच्या रक्षणासाठींच बलराम व कृष्ण त्या कामांत गुंतले होते. पण जवळ हिंडत फिरत असलेल्या कांहीं गाईगुरांनीं त्यांच्यावर हल्ला केला. तीं गुरें सामान्य नव्हतीं हें सांगण्याची गरजच नाहीं. तीं, वृक्ष



व लता रूपें जन्माला आलेल्या राक्षसांचीं मुलें होतीं व त्यांच्याबरोबर गाईंच्या रूपांत राक्षसिणी होत्या. विषारी वृक्ष व लतांचीं पानें फळें खाऊनच तीं वासरें व गाई जगत होत्या.

कृष्णानें त्या गाईगुरांचा संहार करायला सुरवात केली. राक्षस स्वतःचें रूप घेऊन रक्त ओकीत मरून पडूं लागले.

गोमातेचें रूप घेऊन आलेल्या राक्षसिणी आपल्या मुलांचा संहार होतांना पाहून क्रुद्ध होऊन कृष्णाच्या अंगावर धांवल्या. परंतु कृष्णानें त्यांना सहज बाजूला ढकललें आणि तो विशाल विषवृक्ष उपटून



टाकण्याच्या कामीं बलरामाला हात भार लावला.

दोघांनीं मिळून तो वृक्ष उपटून टाकल्या-वर सर्व गोपबालकांनीं त्या वृक्षाचे तुकडे-तुकडे करून टाकले. नंतर त्यांनीं फांद्या, काटक्या व पाचोळा गोळा करून त्या सर्वांची एक मोठी होळी केली. पाहतां पाहतां त्या आगीचे लोट आकाशाला जाऊन भिडले, सर्व झाडें झुडपें, राक्षस राक्षसिणी सर्वांचा त्या आगींत संहार झाला.

गोपालक घामाघूम झाले होते. दमून गेले होते. सर्व फिरत यमुनेच्या काठावर येऊन पोंचले. त्यांनीं यमुनेंत उड्या मारल्या. खूप पोहले, खेळले व गाणीं म्हटलीं. तेव्हां त्यांचा सर्व शीण दूर झाला. काळोख पडेपर्यंत सर्व पाण्यांत डुंबत होते. नंतर घरून आणलेली शिदोरी सोडून खायला बसले. काळोख पडल्यावर आनंदानें सर्व आपापल्या घरीं गेले.

कांहीं दिवसांनीं वृंदावनवासी स्त्री पुरु-षांच्या तब्येती सुधारत गेल्या. गाईगुरांची रोग राई संपुष्टांत आली आणि उन्हाळा पण संपत आला.

पावसाळी ढग आकाशांत थैमान घालूं लागले. मेघगर्जना ऐकून सर्वांना आनंद होई. लवकरच पाऊस पडूं लागला. मधून मधून गारा पण पडत. पुष्कळ पाऊस पडला. जिकडे पहावें तिकडे हिरवळ दिसूं लागली. सरोवरें तुडुंब भरलीं.

अशा आनंदाच्या वेळीं विदेह देशावर संकट आलें. लोक घाबरून गेले. त्या प्रांतांत राहणारा कुंभीक नांवाचा एक रहिवासी होता. त्याच्याकडे पुष्कळ गाई होत्या. तो एक फार मोठा दानी व धर्मात्मा पुरुष होता. मागितल्या शिवाय

दान करणारा म्हणून तो त्या प्रांतांत प्रसिद्ध होता. तो यशोदेचा भाऊ होता. त्याच्या मुलाचें नांव श्रीधाम होतें व मुलीचें नीला असें होतें.

जेव्हां विष्णूनें तारकासुराशीं युद्ध केलें त्यावेळीं त्यानें कालनेमी नांवाच्या राक्षसाच्या सातहि मुलांचा वध केला होता. ते सात जण त्याचा सूड घेण्यासाठीं कुंभीकाच्याकडे वृषभ रूपानें जन्माला आले. त्यांनींच सर्व धुमाकूळ मांडला होता. ते गाईंच्या गर्दीत शिरून गाईंना व बैलांना ठार करूं लागले. कोणी गोपालक त्यांच्या रक्षणार्थ धांवे त्याला ते पायाखालीं तुडवीत किंवा शिंगानें ठार करीत. मोठमोठ्या भिंतीदेखील ते शिंगांनीं पाडीत. कुंपणाच्यांत शिरून गाईगुरांना ठार करीत. हें नित्य होऊं लागले. चहूकडे त्राहित्राहि उडून गेली.

कुंभीकनें त्या सातहि सांडांना पकडण्याचा पुष्कळ यत्न करून पाहिला. मोठमोठ्या वीरांना त्यानें त्या कामावर नेमलें. पण ते देखील ठार झाले. ते सांड गांवांत शिरत गोठ्यांत शिरत व मनुष्य पशु जो समोर येई त्याला ठार करत. प्रजा मिथिलेला राजाकडे आपलें गाऱ्हाणें घेऊन गेली. लोक म्हणाले—"विदेहराज! कुंभीककडे जन्मलेल्या पोळांनीं हा सर्व धुमाकूळ मांडला आहे. आमचीं गाई-गुरें ठार झालीं व शेतें ओसाड पडलीं आहेत. आपण वेळींच येऊन त्यांना आळा घातला नाहीं तर आम्हांला आपलें राज्य सोडून जावें लागेल."





# अरण्यपुराण

[८]

'**भा**वाच्या' अंगावर शहारे आले.

"तुला विसर पडेल या हेतूनें लबाड बाघोबा महिनाभर कोठेंतरी निघून गेला होता. कालच तो डोंगर ओलांडून कोल्ह्याबरोबर तुझा शोध काढीत आला आहे." 'भाऊ' घाबरल्यासारखा म्हणाला. त्याच्या तोंडांतून फेंस येत होता.

मौवली तोंड थोडें वेंगाडून म्हणाला—"त्या वाघ्याला मी नाहीं भीत. पण त्याच्याबरोबर तो लुब्रा कोल्हा आहे ना!"

'भाऊ' ओंठ जिभेनें चाटीत म्हणाला—"मी काल भेटलों होतों त्याला. त्यानें मला सर्व कांहीं सांगून टाकलें आहे. सर्व ऐकल्यानंतर मी त्याचें कंबरडेंच मोडून टाकलें आहे. आज संध्याकाळीं तूं घरीं परत जायला निघशील त्यावेळीं तुझ्यावर उडी मारण्याच्या विचारांत आहे बाघोबा. तो वैणगंगेच्या खोऱ्यांत आहे."

"आज त्याच्या पोटांत कांहीं गेलें आहे का? कीं उपाशीच शिकारीला निघाला आहे?" मौवलीनें विचारलें.

तोच मुख्य मुद्दा होता. त्यावरच मौवलीच्या जीवन मरणाचा प्रश्न अवलंबून होता.

"आज सकाळींच त्यानें एक डुकर ठार करून त्याच्या मांसाचरबीवर हात मारला आहे. तुला माहीतच आहे, सूड घ्यायला सुद्धां थोडा वेळ उपाशी राहाणें त्याला अशक्य आहे." 'भाऊ' म्हणाला.

"मूर्ख! खाऊन पिऊन घेतल्यावर त्याला वाटत असेल कीं मी तो येईपर्यंत वाट पहात

शेवटचें मलपृष्ठ



बसेन म्हणून! तो कोठें तरी घोरत पडला असावा! आपण दहापांच असतां तर त्याचा चांगला समाचार घेतला असता. जों पर्यंत त्याचा वास येत नाहीं तोंपर्यंत हे रेडे तिकडे जाणार नाहींत. मला त्यांची भाषा कळत नाहीं. या बाजूला त्यांना घेऊन जाऊं या का, म्हणजे त्यांना त्याचा वास येईल." मौवलीनें विचारलें.

"वास येऊं नये म्हणून तो गंगेंत बराच वेळ डुंबला आहे." 'भाऊ' म्हणाला.

"तरमग त्या कोल्ह्याच्या सूचनेवरूनच त्यानें तें केलें असेल. वाघ्याला एवढी अक्कल कोठून असणार?" असें सांगून मौवली तोंडांत बोट घालून कांहीं वेळ विचार केल्यावर म्हणाला—"त्या खोऱ्यांत मैदानांतल्या वाटेनें अर्धा मैल जावें लागेल. गुरांना इकडून खोऱ्यांत हांकून नेतां येईल. पण वाघ्या दुसऱ्या टोकानें निसटून जाईल. त्या टोकावर त्याला अडवलें पाहिजे. गुरांना दोन भागांत विभागलें तर?"

"हें काम मला तरी शक्य नाहीं. या साठीं आणखी एक जण ज्यास्त योग्य आहे. त्याला मी बरोबर घेऊन आलो आहें." असें म्हणत त्यानें एका खड्ड्यांत उडी मारली. त्यांतून एक मोठें डोकें वर आलें. त्याच वेळीं लांडग्यांच्या आवाजानें सारें खोरें दुमदुमलें.

"एकू एकू!" मौवली आनंदानें उड्या मारूं लागला. "तूं मला विसरणार नाहींस, मला माहीत होतें. आतां आपल्याला पुष्कळ काम करायचें आहे. या गुरांचे दोन भाग कर. एका बाजूला गाई, म्हशी व वासरें व दुसऱ्या बाजूला बैल व रेडे.

एकूला विचार करायला थोडादेखील वेळ लागला नाहीं. तो गुरांच्या गर्दींत असा शिताफीनें शिरला कीं मौवलीनें सांगितल्याप्रमाणें त्यानें गुरांचे दोन भाग पाडले. एका बाजूला गाई, म्हशी डोळे वटारून आपल्या वासरांना पाठीशीं घालून पुढच्या खुरांनीं माती ओढीत होत्या. लांडग्यांनीं जर का एक पाऊल पुढें टाकलें तर त्यांना शिंगांनीं फाडून जमिनीवर लोळवण्यासाठीं जणुंकांहीं त्या तयार होत्या. दुसऱ्या बाजूला बैल व रेडे नाकांतून सांपासारखे फूत्कार सोडीत होते. खरें पाहिलें तर गाई म्हशी इतका त्यांचा उपयोग होण्याची शक्यता नव्हती.

लवकरच कळप विभागला गेला. सहा सहा गुराख्यांनादेखील शक्य नाहीं इतकें सहज दोन भाग पडले. "बरें, पुढें काय करायचें, हें लवकर सांग. नाहींतर गुरें पुन्हां एकत्र होतील." एकू म्हणाला.

"बैला रेड्यांना डाव्या बाजूला हांकून घेऊन जा, एकू!" असें सांगून मौवली 'रामू'वर बसला आणि चालूं लागला. "'भाऊ'! आम्ही गेल्यानंतर गाई म्हशींना खोऱ्यांत खालीं घेऊन जा."

"खोऱ्यांत कोठवर घेऊन जाऊं?" 'भावानें' विचारलें.

"अशा चढणीच्या जागीं घेऊन जा कीं वाघ्याला उडी मारतां येऊं नये.



आम्ही दुसऱ्या टोकाकडून येईपर्यंत तूं त्यांना तेथें उभा करून वाट पहा" मौवली म्हणाला.

एकूनें बैलां रेड्यांसमोर उभा राहून एक आरोळी दिली त्याबरोबर ते घोळका करून जोरानें त्याच्या अंगावर धांवले. एकू त्यांच्या पुढें धांवत खोऱ्याच्या तोंडाकडे जाऊं लागला. तिकडे 'भाऊ' गाई व म्हशींना घेऊन खोऱ्याच्या दुसऱ्या टोकाकडे गेला होताच.

बाघोबा खोऱ्यांत झोंपत होता. तसा तो जात्याच भित्रा. पोटभर खाऊन पिऊन

       

घेतलें कीं त्याला कोणाशीं झुंज घेणें अशक्य होई. एका टोंकाकडून दुसऱ्या टोंकापर्यंत खोऱ्यांत उतरण होती. दोन्ही बाजूला उंच डोंगर होते. खोऱ्याच्या तळाशीं गाई म्हशींना उभें केलें आणि दुसऱ्या बाजूनें बैला रेड्यांना पळवीत आणले तर मध्यें सांपडून वाघोबाची चटणी होऊन जाईल. तो तुडवला गेला नाहीं तर म्हशींच्या बाजूला धांवेल व त्या आपल्या शिगांनीं त्याच्या चिंधड्या उडवितील. अशी युक्ति मौवलीनें योजली होती.

मौवली आपल्या 'रामू'वर बसून बैलां-रेड्यांबरोबर दुसऱ्या वाटेनें डोंगरावर खोऱ्याच्या एका उंच जागेवर येऊन उभा राहाला. इतकें झालें तरी वाघोबाला गुरांचा वास आला नाहीं. दोन्ही बाजूचे डोंगर उंच होते. त्यांवर वेली लोंबत होत्या. त्यांच्यावर चढून जाणें वाघोबाला शक्यच नव्हतें. तो खोऱ्यांत अडकला होता.

"आपण आलों आहों हें वाघोबाला कळवूं या." असें म्हणत मौवली तोंडा-जवळ दोन्ही हात ठेवून जोरानें ओरडला. त्याचा आवाज खोऱ्यांत दुमदुमला. वाघोबा जांभई घेत म्हणाले--"कोण हांक मारतो आहे तो?"

"मी मौवली! शिखराच्या टोंकावर भेटण्याची वेळ झाली. चल." असें म्हणत मौवलीनें एक आरोळी ठोकली--"एकू बैलां रेड्यांना पळव. 'रामू' पळ."

बैल व रेडे खोऱ्यांत धांवले. एकूनें आरोळी दिली. बैल व रेडे त्या बाजूला धांवले. त्यांचे पाय लागून दगड गडगडत खालीं जाऊं लागले. 'रामू'ला वाघाचा वास आला व तो जोरानें ओरडला. [ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]



# ६२. पीनांग द्वीपांतील बौद्धधर्म

मलाया देशांतलें पीनांग द्वीप ब्रिटीश साम्राज्यांत आलेला पूर्वेकडील सर्वांत प्रथम देश होय. येथील "केक लोकीस" नांवाच्या मठाचें आंगण ३० एकरांचें आहे. त्याच्या गोपुरांतील सर्वांत उंच गोपुर सात मजली आहे.





# भारताचा इतिहास



१५ व्या शतकाच्या शेवटीं पाश्चिमात्य देशांच्या रहिवाश्यांनीं नवीन भूभागांचा शोध लावल्यामुळें निरनिराळ्या देशांचा परस्परांशीं व्यापार सुरू झाला व त्या देशांच्या इतिहासांत एक नवीन अध्याय प्रारंभ झाला. वास्को डि गामाचें भारतांत आगमन ही त्यांपैकींच एक मुख्य घटना होय. मे महिन्याच्या २७ तारखेला कालिकतच्या बंदरांत त्यानें प्रवेश केला.

परदेशांतून आपल्या देशांत यायला दोन मार्ग होते. एक पश्चिमोत्तर प्रांतांतून खैबरच्या खिंडींतून व दुसरा समुद्राकाठचा.

मोंगलांनीं पश्चिमोत्तर प्रांताच्या रक्षणाची फिकीर केली, पण समुद्राकाठच्या मार्गाच्या रक्षणाकडे दुर्लक्ष केलें. समुद्रावर आपला अंमल स्थापन करण्याचा यत्न त्यांनीं कधींच केला नाहीं. तें काम मराठ्यांनीं केलें.

वास्को डि गामा मुख्य करून एक दर्यावर्दी तांडेल होता. तो पोर्तुगालचा रहिवाशी होता आणि लिस्बनहून निघून आफ्रिकेला वळसा देऊन भारतांत आला होता. झामोरिन नांवाचा कालिकतचा अधिकारी त्याच्याशीं प्रेमानें वागला. तो भारतांत आला म्हणून पोर्तुगाल व भारत यांच्या मध्यें पारस्परिक व्यापाराचे संबंध स्थापित झाले.

या पूर्वींहि भारत व पाश्चिमात्य देश यांच्यामध्यें मालाची देवाण घेवाण चालू होतीच. परंतु सातव्या शतकापासून हा व्यापार दोन तीन शतकांपर्यंत फक्त अरबी लोकांच्या हातांत होता. पुढें पोर्तुगीज लोकांनीं सुद्धां हिंदुमहासागर व लाल समुद्र या व्यापारी मार्गाचा उपयोग करायला सुरवात केली.



९ मार्च १५०० या रोजीं फिड्रो अल्वरेज कात्रल नांवाचा एक पोर्तुगीज तांडेल १३ जहाजें बरोबर घेऊन लिस्बनहून भारताच्या प्रवासास निघाला. या परकीयांना व्यापाराची इतकी परवा नव्हती. ज्या भूभागांत व्यापार होतो तो भूभाग काबीज करण्याच्या दुष्ट हेतूनें त्यांनीं चांचेगिरी सुरू केली. आतां-पर्यंत त्याला फायद्याचें वाटलें म्हणून झामोरिनचें लक्ष पोर्तुगिजांच्या कारवायांकडे गेलें नाहीं. परंतु चांचेगिरी सुरू झाल्यावर त्यांच्याशीं त्याचें वितुष्ट आलें. झामोरिनशीं कोचीनच्या शासकाचें वैर आहे हें ओळ-खून पोर्तुगीजांनीं त्याच्याशीं सख्य केलें आणि दक्षिण भारतांतील राजकीय डावपें-चांत शिरकाव करून घेतला.

भारतांत पोर्तुगीज सत्ता स्थापन केली ती अल्फान्सो डी अल्बुकर्क यानें. तो इ.स. १५०३ मध्यें एका नौकादलाचा नायक म्हणून आला. त्यानें इतकी कामगिरी बजावली कीं त्याला इ. स. १५०९ मध्यें गव्हर्नर म्हणून नेमण्यांत आलें.

भारतांत तो पोर्तुगीजांचीं सर्व कामें पाहूं लागला. १५१० विजापूरच्या राज्यांतलें गोवें त्यानें काबीज केलें. हें सुंदर व उत्तम



बंदर आहे. अल्फान्सोच्या काळांत गोव्याच्या रक्षणाची उत्तम व्यवस्था करण्यांत आली. तेथील व्यापारपण वाढला.

भारतांत पोर्तुगिजांची वस्ती वाढावी या हेतूनें त्यानें भारतीय स्त्रियांशीं विवाह करून राहण्यास आपल्या देशवासियांस प्रोत्साहन दिलें. मुसलमानांशीं त्याचें वैर होतें. आपल्या जातीचें त्यानें हित केलें. इ. स. १५१५ मध्यें तो मेला तेव्हां पोर्तुगीज नौकादलाला आव्हान करणारें नौकादल एकहि नव्हतें. सर्व पश्चिम किनाऱ्यावर त्याचा वचक होता.

अल्बुकर्क याच्या नंतर जो कोणी पोर्तुगीज अधिकारी भारतांत आला त्यानें समुद्रकाठीं एकेक नगर स्थापन केलें. दीव, दमण, सल्सेट, बसई, मुंबई, मद्रासनजीक सॅन्थोम व बंगालमधील हुगली अशींच नगरें होत. पोर्तुगीजांनीं सीलोनमध्यें सुद्धां आपली कीर्ति गाजवली. परंतु पुढें त्यांच्या सत्तेखालीं हा भाग राहाला नाहीं. दीव, दमण व गोवें एवढीं नगरेंच काय तीं त्यांच्या सत्तेखालीं राहालीं आणि भारत स्वतंत्र झाल्यानंतर १९६१ सालीं हा पोर्तुगीज अमलाखालील प्रदेशदेखील खालसा झाला.

भारताशीं केलेल्या व्यापारांत पोर्तुगीजांना पुष्कळ फायदा झाला. तें पाहून इतर पाश्चिमात्य देशांत ईस्ट इंडिया कंपनीसारख्या कंपन्या स्थापन झाल्या. इंग्लंडांत इ. स. १६०० मध्यें स्थापन झालेल्या कंपनीला पूर्वेकडील समुद्रीमार्गानें होणाऱ्या व्यापाराचा हक्क इंग्लंडच्या राजानें दिला. इ. स. १६०२ मध्यें स्थापन झालेल्या कंपनीला डच राजानें व्यापाराबरोबर पूर्वेकडील प्रदेशांत किल्ले बांधण्याचा व सत्ता कायम करण्याचा अधिकार पण दिला. १६१६ मध्यें डेनमार्कपण या क्षेत्रांत उतरला. १६६४ मध्यें स्थापन झालेल्या फ्रेंच ईस्ट इंडिया कंपनीनें राजकीय कामांत पुष्कळ शिरकाव करून घेतला अशाच तऱ्हेच्या अनेक ईस्ट इंडिया कंपन्या स्थापन झाल्या.

यांची आपसांत चढाओढ सुरू झाली. १७ व्या शतकाच्या पूर्वार्धात पोर्तुगीच, डच व इंग्रज याच्या आपसांत चकमकी उडत राहाल्या. यांत पोर्तुगीजांच्या हातीं यश आलें नाहीं. त्यांचा वचक १८ व्या शतकापर्यंत पुष्कळ कमी झाला.



# नेहरू चरित्र

[३२]



मोतीलालजी व जवाहरलालजी यांच्याशीं जयकर व सप्रू यांच्या दोन दिवस वाटाघाटी होत राहाल्या. पण त्याचा विशेष फायदा झाला नाहीं. कारण सप्रू व जयकर यांचे विचार व नेहरू पितापुत्रांचे विचार यांत पुष्कळ अंतर होतें. सरकार व कॉंग्रेस यांचा आपसांत समेट होईल याची अपेक्षा जवाहरलालजी किंवा मोतीलालजी दोघांनाहि नव्हती. गांधीजींचें मत घेतल्या शिवाय व कार्यसमितीच्या इतर सभासदांचा होकार मिळाल्या शिवाय कोणतेंहि मत जाहीर करण्यास ते तयार नव्हते. ही गोष्ट त्यांनीं सप्रू व जयकर यांस आणि पत्र लिहून गांधीजींना कळविली.

८ ऑगस्ट या रोजीं सप्रू व्हॉयसराय साहेबांकडून आणखी एक पत्र घेऊन नैनीच्या तुरुंगांत आले. त्या पत्राचा थोडक्यांत सारांश असा होता कीं येरवड्याच्या तुरुंगांत जाऊन नेहरू पिता पुत्रांनीं पाहिजे तर गांधीजींना भेटायला हरकत नाहीं. परंतु तुरुंगाबाहेर सरदार पटेल व मौलाना अबुल कलाम आझाद यांना भेटायला परवानगी नव्हती.

"या अटी मान्य करून तुम्ही येरवड्याच्या तुरुंगांत गांधीजींना भेटायला हरकत आहे का?" सप्रूंनीं विचारलें.

"गांधीजींना भेटायला आमची तयारी आहे. परंतु इतर सहकाऱ्यांना भेटल्याशिवाय व त्यांचा होकार मिळाल्याशिवाय कांहीं निर्णय घेतां येणार नाहीं." दोघां पिता पुत्रांनीं उत्तर दिलें.

या सर्वांचा ताण पडल्यामुळें मोतीलालजींना १६ तारखेला ताप आला. ते आपल्या इतर साथीदारांबरोबर १७ तारखेला नैनीला परत जाऊं शकले नाहींत. आले होते तसेच सर्व स्पेशल गाडीनेंच नैनीला परत गेले. या खेपेस स्टेशनांवर जास्तच गर्दी होती.

मोतीलालजींची तब्येत जास्त बिघडत गेली. त्यांच्या औषधोपचारासाठीं त्यांच्या स्वत:च्या डॉक्टरांखेरीज सरकारी डॉक्टरपण आले होते. तुरुंगांत चिकित्सेची चांगली व्यवस्था होणें शक्य नव्हतें. त्यांच्या मित्र-मंडळींनीं त्यांना तुरुंगांतून सुटका द्यावी असें मत दिलें तेव्हां मोतीलालजींना मनस्वी राग आला. त्यांनीं लॉर्ड अर्विन यांना तारेनें, सुटकेची मुळींच गरज नाहीं, असें कळविलें. परंतु तब्येत बिघडत चालली होतीच. अशक्तता वाढली होती. ८ सेप्टेंबर रोजीं त्यांना सोडण्यांत आलें. त्यांना दहा आठवडे तुरुंगवास भोगावा लागला.

त्यांची सुटका झाल्यानंतर जवाहरलालजींना तुरुंग निर्जीवसा भासूं लागला. त्यांच्याबरोबर डॉ. महमूद पण मोतीलालजींच्या सेवेला हजर असत. या कामांत जवाहरलालजी इतके मग्न असत कीं त्यांचें वाचन, लेखन, नवार विणणें व सूत काढणें वगैरे बंद घडलें होतें. मोतीलालजींना सुटका मिळाल्यानंतर उरलेल्या लोकांची सर्व कामें पूर्वीप्रमाणें सुरू झालीं. परंतु त्या कामांत त्यांचें मन लागत नसे व त्यांना आनंद वाटत नसे. मोतीलालजी सुटल्यानंतर वर्तमानपत्रें यायची बंद झालीं. त्याच सुमारास रणजीत पंडित यांना अटक झाली व ते तुरुंगांत आले.





# पाताळ कोट

[१०]

[धूमक व सोमक यांची विरूपशीं मैत्री झाली. त्याच्याबरोबर जात असतां नदीकाठीं त्यांची एका भिल्लनायकाशीं ओळख झाली. त्याच्या मदतीनें होडक्यांत बसून नदी पार करीत असतां त्यांचा मंत्रदंड एका राक्षसी काळ्या घारीनें. सांप समजून झडप मारून धरला व उडूं लागली. विरूपानें आपल्या दोरीचा फांस तिच्यावर टाकला.—पुढें.]

विरूपानें टाकलेला दोरीचा फांस घारीच्या पंखांत अडकला व त्यानें लगेच तो जोरानें ओढला. तिकडे घार जोरानें उडण्याचा यत्न करीत होती. दोन्हीं कडील ओढ असल्यामुळें कांहीं वेळ घार आकाशांत जागच्या जागीं स्थिर झाली. विरूप दोन्ही हातांनीं दोरी ओढीत होता व वल्हवणाऱ्या दोघां भिल्लांना पण हांक मारून मदतीला बोलावीत होता. दोघांनीं वल्हीं टाकलीं आणि विरूपाजवळ आले. तेवढ्यांत घारीनें इतका जोर लावला कीं विरूप वर हवेंत एक दोन हातवर ओढला गेला.

"विरूपा दोरी सोडूं नकोस, मी येतों आहें." असें ओरडत सोमक आपली नाव घेऊन विरूपाच्या नावेजवळ आला. तोंपर्यंत घारीचें बळ पण क्षीण पडत गेलें



होतें. तिघांनीं मिळून दोरी ओढल्याबरोबर ती पंख फडफडवीत खालीं येऊं लागली. धूमकनें आपला सुरा तिच्या मानेचा नेम धरून फेंकला. पण नेम चुकला व तलवार तिच्या छातीला लागली. त्याबरोबर तिनें मंत्रदंड सोडला व तडफडत पाण्यांत पडली.

तें पाहून सोमकला अत्यानंद वाटला. "धूम! आतां भीति नाहीं. मी होडी आणतों." असें ओरडून सांगून तिकडे नाव घेऊन गेला. या अवधींत विरूपाच्या नावेंतले घोडे बिचकून नावेंत उड्या मारूं लागले व धावूं लागले. त्यामुळें नाव उलटली आणि घोडे पाण्यांत पडले. त्यांच्याबरोबर विरूप व दोघे भिल पण पाण्यांत पडले. त्या दोघांना चांगलें पोहायला येत असूनहि ओघ जोराचा पाहून ते घाबरले आणि 'बुडलों' असें मोठ्यानें ओरडूं लागले. चार हातावर पाण्याच्या ओघांत वहात जाणऱ्या नावेची कडा धरून विरूप म्हणाला— "भिलदेखील इतके घाबरट असतील असें नव्हतें मला वाटलें. ही घ्या नाव आणि चढा वर. मला पोहतां येतें. इतका कष्ट सहन करून हातीं आलेल्या घारीची सागुती खाल्याशिवाय माझ्या मनाचें समाधान होणार नाहीं." असें सांगून तो त्या बाजूला पोहीत गेला.

सोमक धूमक आपली नाव घेऊन जातांच दोघे भिल पण नावेंत चढून बसले आणि विरूप पाण्यांत घारीशीं झुंजायला गेला होता तिकडे नाव घेऊन गेले. तोपर्यंत विरूप घारीजवळ पोंचून तिची मान धरायला गेला. तेव्हां तिनें आपले पंजे झाडून त्याचें अंग ओरबाडून काढलें. त्यामुळें घाबरून जाण्याऐवजीं विरूपाला भयंकर राग आला. तो संतापून तिच्यावर तुटून पडला. आकाशांत उडणाऱ्या पक्ष्यांशीं भूमीवर राहणाऱ्या



विरूपाशी पाण्यांत होत असलेली ती विलक्षण झोंबाझोंब पाहण्यासारखी होती. धूमक व सोमक स्वत: मोठे शूर व बहाद्दर होते, पण ते देखील ते दृश्य पाहून विरूपाचें कौतुक करीत होते.

परंतु त्यांच्या मनांत सारखी भीति वाटत होती, एखादी सुसर किंवा मगर येऊन दोघांना धरून खोल पाण्यांत आपल्या गुहेंत ओढून घेऊन गेली तर! "दोन्ही नावा विरूपाजवळ घेऊन चला!" धूमक ओरडला. एका मिनिटांत दोन्ही नावा त्याप्रमाणें विरूपाजवळ जाऊन पोंचल्या. तिकडे तो एका हातानें घारीची मानगुटी पकडून दुसऱ्या हातानें तिचे दोन्ही पाय घट्ट धरण्याचा यत्न करीत होता. नावा जवळ पोंचतांच धूमक ओरडून म्हणाला—"विरूपा! नावेंत ये पाहूं! फांसांत अडकलेली घार कोठें जाते रे?" असें सांगून त्याच्या दोन्ही खाकांत हात घालून त्यांनीं त्याला वर ओढलें. त्याच्या सर्व अंगाला पक्ष्याच्या नखांच्या जखमा झाल्या होत्या.

"अरे ही घार नाहीं, कोणतातरी राक्षस दिसतो आहे." धूमक आपला सुरा घारीच्या अंगावर फेंकीत म्हणाला.

"अहो भाऊ! याच्याहून मोठमोठे भयंकर पक्षी आहेत या रानांत. आमच्यापैकीं कांहीं जणांनीं यांचीं पिलें पकडून पाळली आहेत. यांना शिकवलें कीं शिकारीच्या वेळीं यांची पुष्कळ मदत पण होते." विरूप कींव वाटल्यासारखें घारीकडे पहात म्हणाला.

तें पाहून धूमक जोरानें हंसला व म्हणाला. "तिचें काळीज काढून तें भाजून खाण्याची तुझी ती प्रतिज्ञा काय झाली रे? आपलें अंग पहा जरा, किती जखमा झाल्या आहेत व किती रक्त वाहतें आहे तें!"



आपल्या जखमांकडे एकदां पाहून विरूप म्हणाला—"नदी पलीकडे एकदां पोंचूं तर या, एका मिनिटांत सर्व जखमा भरून येतील."

तेवढ्यांत भिल्लांनीं जोरानें वल्ही मारल्यावर थोड्याच वेळांत सर्व पलीकडच्या काठीं येऊन पोंचले. नदींत उडी मारून पडलेले घोडे पोहोत पलीकडे गेले व झाडाखालीं उभे राहून खेंकाळूं लागले. "वांचलों बुवा! पळून नाहीं गेले रानांत कोठें, नशीब आपलें." असें म्हणत सोमकनें जवळ जाऊन त्यांचे लगाम धरले व एका जागीं हिरवें गवत होतें तिकडे त्यांना घेऊन गेला. विरूपनें घारीला झाडाच्या बुंधाला बांधून ठेवून आपल्या जखमांना पाल्याचा रस काढून चोळण्यासाठीं जवळच्या झुडपाच्या बाजूला गेला. धूमक आपले ओले झालेले कपडे पिळून वाळत घालूं लागला.

पाव तास जेमतेम झाला असेल एकदम विरूप एका झुडपा आडून ओरडला—"भाऊ, भाऊ! हें पहा काय झालें तें!" असें म्हणत एक खडाव हातांत धरून धूमकजवळ धांवत आला.

"कालशंबर मांत्रिकाची आहे का ही?" धूमकनें विचारलें.



"होय दादा! मला चांगलें आठवतें. मी ओळखली. त्या मालकावर कांहीं तरी मोठें संकट खास ओढवलें होतें. कुंभीर नांवाचा राक्षस आहे, असें म्हणाला होता ना तुम्ही? त्यानें त्यांना ठार केलें असावें" भ्याल्यासारखा विरूप म्हणाला.

"कालशंबर मांत्रिक असा सहजीं मरणारा नाहीं. राक्षस असूनदेखील कुंभीर असा दुष्ट नाहीं. त्याचा स्वभाव असा नाहीं, मला माहीत आहे. पण मांत्रिकावर कांहीं तरी मोठें संकट ओढवलें होतें, यांत मला सुद्धां शंका नाहीं." धूमक म्हणाला.



विरूप काहीं तरी बोलणार होता तेवढ्यांत सोमक धूमकला म्हणाला—" धूम ! लवकर इकडे ये !" असें म्हणत तलवार उपसून जवळच्या झुडपांच्या बाजूला घाई घाईनें निघाला. एक घोडा मोठ्यानें खेंकाळत मागच्या दोन पायांवर उभा राहून सोमकच्या हातांतला लगाम सोडवून पळून जाण्याच्या बेतांत दिसला.

धूमक व विरूप सोमक होता तिकडे पळत गेले. सोमक झुडपांकडे बोट दाखवीत म्हणाला—" त्यांच्या पाठीमागून गुहेंतून किंवा बिळांतून कोणी बोलल्यासारखा आवाज ऐकूं येत आहे. सुरवातीला मी ओळखलें नाहीं. घोडा पळून जाण्याची घाई करूं लागला तेव्हां माझें लक्ष तिकडे गेलें."

धूमक " जय काली माते !" म्हणत तलवार उपसून त्या झुडपांत शिरला. त्याच्या पाठोपाठ ' जयशांभवी !" म्हणत विरूप पण शिरला.

" अहो पण, फक्त पहात उभा राहणाऱ्या वर तलवारीचा वार कां करतां ? मी राक्षस नाहीं. तसाच मनुष्यपण नव्हे. पंचवीस वर्षें झाली मला कालकली राक्षसानें हें विलक्षण रूप दिलें आहे." असें कोणी बोलत असल्याचें ऐकूं आलें.

तें बोलणाऱ्याचें तें भयंकर व विलक्षण रूप पाहून तिथे जागच्या जागीं थबकले. खोल गेलेले डोळे, टकल पडलेलें डोकें आणि सुई सारखे, उभे जाड जाड केस असलेला तो मनुष्य बोलणाऱ्या भयंकर प्रेतासारखा दिसत होता. त्याच्या शरिरावर जखमा स्पष्ट दिसत होत्या.

"त्या खडावा कोणाच्या, तो मंत्रदंड कोणाचा ? दोन्ही कालशंबर मांत्रिकाचेच का ?" त्या भयंकर कुरूप माणसानें मोठ्या कष्टानें विचारलें



" होय ! कालशंबरचेच ! पण तूं कसें काय ओळखलेंस ? कोण तूं ?" धूमकनें विचारलें.

" थोड्या वेळांत मरायला टेकलेला मी कोणी असलों म्हणून काय झालें ? एका काळीं मी या प्रदेशांतला निवासी होतों. कालकलि राक्षसाच्या नोकरांचे हातीं सांपडलों व गेलीं पंचवीस वर्षें त्यांनीं दिलेले कष्ट सहन करीत आहें. त्यांनीं मला ठार करण्याचें भय दाखवून, मी या प्रदेशांतला राहणारा आहें म्हणून इकडून मनुष्यांना धरून घेऊन जातांना वाट दाखविण्यासाठीं मला बरोबर घेऊन जाऊं लागले. आतां सुद्धां मला त्याच कामावर बरोबर आणले. मी पळून जाण्याचा प्रयत्न केला, आणि त्याचें हें फळ भोगतो आहें." असें सांगून तो डोळे मिटून कण्हूं लागला.

आतां बराच वेळ तो कांहीं बोलणें शक्य नाहीं असा विचार करून धूमक त्याच्या अगदीं जवळ जाऊन म्हणाला—" आम्ही त्या कालिकली राक्षसावर सूड उगवण्यासाठींच जात आहों. त्याला ठार करून तुझ्या आत्म्याला शांति मिळवून देण्याची जबाबदारी आम्ही घेतों. एक गोष्ट सांगशील का ?



त्या कालशंबर मांत्रिकाला त्या राक्षसाच्या नोकरांनीं ठार केलें का ?"

" तें नक्की नाहीं मला माहीत. तो आणि त्याच्याबरोबर आलेला तरुण, दोघे त्यांच्याशीं युद्ध करूं लागले तेव्हां त्या गडबडींत पाय काढण्याचा मी प्रयत्न केला. तेव्हां मला तलवार भोसकून त्यांनीं येथें टाकून दिलें." तो म्हणाला.

" ते दुष्ट कोणत्या बाजूला गेले सांगशील का ?" धूमकनें विचारलें.

" मला तें माहीत नाहीं. पण ते ज्या नावेंत बसून आले होते ती नाव डोंगराला

वळसा देऊन नदी जाते तेथें काठावर आहे. तुम्ही म्हटल्याप्रमाणें त्या कालकलीला ठार करून माझ्या आत्म्याला शांतिलाभ मिळेल एवढें मात्र अवश्य करा." असें सांगून तो थोडा उठण्याचा यत्न करूं लागला. एकदां त्याचें अंग हादरल्यासारखें झालें व तो एकदम खालीं पडला.

धूमकनें कापड त्याच्या अंगावर टाकलें व विरूपाला विचारलें–"विरूपा! तुला माहीत आहे का रे नदी कोठें वळते ती?"

"माहीत आहे दादा! तसें फार दूर पण नाहीं. चला जाऊं या." विरूप म्हणाला.

"घोड्यांवर नीट नजर ठेवायला भिल्लांना सांगून नदी वळसा घेते त्या बाजूला तिघे निघाले. चारपांच मिनटांनीं त्यांना डोंगराला वळसा देऊन जाणारी नदी व तेथें नदीच्याकाठीं एक मोठी नाव दिसली. ते झाडाच्या आडून लपतछपत पुढें गेले व काठाजवळ पोंचतांच काठावरच्या झाडावर चढून नावेच्या बाजूला टेहेळणी करून पाहूं लागले. नावेंत कोणी नव्हतें. पण नावेभोंवतीं कित्येक सुसरी तरंगत असलेल्या दिसल्या. धमक म्हणाला–"सोमू बाण एकीला मारून पाहूं या, डोक्याचा नेम धरून बरं का."

सोमक बाण सोडणार तेवढ्यांत विरूप म्हणाला–"दादा! अहो भाऊ!" असें म्हणत कांहीं सांगूं लागला. परंतु तोंपर्यंत सोमकनें बाण सोडला होता व तो एका सुसरीच्या डोक्याला जाऊन लागला होता. सुसर नदींत मोठ्यानें उडी मारून मनुष्यांच्या आवाजांत ओरडली.

[पुढील गोष्ट पुढील अंकीं]



# मालिणीची भक्ति

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतलें व श्मशानाच्या दिशेनें मौनपणें चालूं लागला. तेव्हां प्रेतांत असलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! या अपरात्रीच्या वेळीं तुला इतके कष्ट सहन करीत असलेला पाहून मला हंसपाद नांवाच्या राजाला मोगरीच्या फुलांसाठीं किती कष्ट सहन करावे लागले होते ते आठवतात. तुला मी त्याची गोष्ट सांगतों." असें सांगून वेताळ ती गोष्ट सांगूं लागला.

कुंजरावतीच्या हंसपाद राजाला भद्रपाल नांवाचा मुलगा होता. त्याचें कुमुदद्वीपाच्या राजकन्येशीं लग्न झालें. लग्न झाल्यावर तो तीन महिने सासुरवाडीच राहाल्यानंतर बायकोला घेऊन आपल्या घरीं एका जहाजांत



बसून निघाला. हंसपाद राजाला पूर्वीच तें कळलें होतें.

भद्रपालचें जहाज समुद्रांत मध्यभागीं चालत होतें. एकाएकीं एक मोठें तुफान आलें. वादळाच्या जोरानें कुंजरावती नगरींतील मोठमोठीं झाडें उपळून पडलीं. गांवांत समुद्राचें पाणी शिरलें. कोळ्यांच्या होड्या बुडाल्या. कित्येक जहाजें पण बुडून गेल्याची बातमी आली. वादळांत मुलगा व सुनबाई यांच्या जहाजाची काय दशा झाली असणार या गोष्टीची काळजी राजाला वाटत होती.

राजानें कुलदेवीची पूजा केली व मागणें मागितलें—"अंबे! माझ्या मुलाला व सुनबाईला सुरक्षित घरीं पोंचतें केलेंस तर मी तुझ्या चरणीं एक सहस्र सुवर्ण मुद्रांचीं मोगरीचीं फुलें वाहीन."

तिसऱ्या दिवशीं वादळ ओसरलें. चवथ्या दिवशीं राजपुत्र भद्रपाल सकुटुंब येत होता तें जहाज सुखरूप किनाऱ्याला लागलें. जहाजाचा कप्तान फार हुशार होता. वादळ येणार हें त्याला कळतांच त्यानें आपलें जहाज एका बेटाजवळ नेऊन नांगर टाकला होता. वादळ थांबल्यावर जहाज पुन्हां निघालें. भद्रपाल सपत्नीक किनाऱ्यावर उतरला.

"देवीनें माझें मागणें मान्य करून माझ्या मुलाला व सुनबाईला सुखरूप घरीं आणून पोंचतें केलें आहे. बोलल्याप्रमाणें आजच हजार सुवर्णमुद्रांचीं मोगरीचीं फुलें देवीच्या चरणीं वाहीन." असें सांगून राजानें आपल्या नोकरांना मोगरीचीं फुलें आणायला पाठविलें आणि स्वतः देवळांत वाट पहात बसला.

राजाचे नोकर संध्याकाळ होत आली तरी परत आले नाहींत आणि आले ते रिकाम्या हातांनीं. एक देखील फूल कोठें मिळालें नाहीं. वादळामुळें सर्व फुल झाडांची नासाडी झाली होती.

तें ऐकून काय करावें हें प्रधानाला सुचेना. तो राजाला म्हणाला—"महाराज! देवीची पूजा पुन्हां केव्हां तरी करूं. आज एक देखील फूल कोठें मिळालें नाहीं. वादळानें फुलझाडांची फार नासाडी झाली."

"पण मी नवस केला होता ना कीं मुलगा सपत्नीक परत येईल त्याच दिवशीं मोगऱ्याच्या फुलांनीं पूजा करीन म्हणून! फुलें मिळेपर्यंत मी येथेंच बसून राहणार." राजा म्हणाला.

फुलें विकणारे माळी देवळाच्या दारावर संध्याकाळच्या वेळीं फुलें घेऊन येऊन विकायला बसत. प्रधानानें विचार केला एकावाजवळ असतील चार फुलें. त्याप्रमाणें तो गेला. परंतु एकदेखील माळी आलेला नव्हता.

इतक्यांत एक माळीण फुलांची एक टोपली घेऊन येऊन बसली. प्रधानानें जवळ जाऊन विचारलें—"मोगरीचीं फुलें पाहिजेत. आहेत का? आहेत तीं एवढीच आहेत." असें सांगून तिनें ओंजळभर फुलें पुढें केलीं.




"बस, एवढीच! हीं कशी पुरणार? आम्हांला एक हजार सुवर्णमुद्रांचीं फुलें हवीं आहेत." तो म्हणाला.

"तुला हजाराचीं कीं लाखाचीं हवीं असतील. पण माझ्याकडे आहेत तीं एवढींच." ती म्हणाली.

प्रधानानें देवळांत जाऊन ती गोष्ट राजाला सांगितली.

राजाच्या मनांत एक गोष्ट आली. म्हणाला—"प्रधान! आपल्यावर देवीची कृपा झाली आहे. तींच फुलें हजार सुवर्णमुद्रा देऊन घ्या."




प्रधानानें एक हजार सुवर्णमुद्रा त्या माळिणीला देऊन तिच्या जवळचीं फुलें घेतलीं. पुजाऱ्यानें येतांच देवावर फुलें वाहण्यास मंत्र म्हणायला सुरवात केली. तेवढ्यांत ती माळीण देवळांत आली व आणखी ओंजळ भरून फुलें देत म्हणाली—"हीं देखील देवीच्या चरणीं माझ्या वतीनें वाहा!"

तें पाहून प्रधानाला फार राग आला. म्हणाला—"चोर, लबाड! माझ्याकडून एक हजार सुवर्ण मुद्रा घेऊन तूं फुक्त ओंजळभर फुलें दिलीस, मी एक चकार शब्द बोललों नाहीं. तुझ्याकडे आणखी फुलें होतीं व तूं आतां आणखी ओंजळ भरून घेऊन आली आहेस. म्हणजे तूं मला ठगवलेंस.

"हें पहा, विकायला फक्त एक ओंजळ भरून फुलें आहेत असेंच मी सांगितलें होतें. मी त्यासाठीं तुमच्याजवळ एक हजार सुवर्णमुद्रा मागितल्या होत्या का? तुम्हीच स्वतः दिल्यात. माझ्याजवळ एक ओंजळ आणखी फुलें होतीं. पण तीं विकायला नव्हतीं. मी स्वतः देवीच्या पुजेसाठीं तीं ठेवून दिली होतीं. माझ्याकडे दोन टोपल्या फुलें असतात तेव्हां मी फक्त एका टोपलींतलीं फुलेंच विकतें. दुसऱ्या टोपलींतल्या फुलांनीं मी देवीची पुजा करतें. माझ्याकडे दोन फुलें असतीं तर मी फक्त एकच फूल तुम्हांला विकलें असतें. मी कोणाला ठग-वलें नाहीं." ती म्हणाली.

ती गोष्ट खरी होती. तिच्या नवऱ्याचा मळा होता. त्यांत जेवढीं फुलें मिळत त्यांतलीं अर्धीं ती विकणं असे व अर्धीं देवीच्या पुजेला घेऊन जाई. ही गोष्ट कळल्यावर तिच्या नवऱ्यानें व सासूनें तिला घराबाहेर काढलें. कारण फुलें विकून ती पैसे मिळवीत नव्हती व अशातऱ्हेनें घर लुटलें जात होतें. तेव्हां ती आपल्या



म्हाताऱ्या आज्याकडे जाऊन राहूं लागली. त्याच्या दारीं तिनें मोगरीच्या फुलांचे वेल लावले. त्या वेलांना लागणारीं फुलें ती अर्धीं विकत असे व तेवढ्यावर तिचा व तिच्या आजाचा निर्वाह होई. बाकी अर्धीं फुलें नेऊन ती देवीची पुजा करी.

ती दररोज देवीच्या पुजेला येऊन देवीला फुलें वाहाते हें चांगलें माहीत असूनहि पुजारी तिच्यावर खिसकावून ओरडला—"माहीत आहे का, हे कोण तें? महाराजांकडून हजार मोहरा घेऊन देखील तूं स्वतःजवळ एवढी फुलें लपवून टेवली होतीस नाहीं का? तुझ्यासारख्या लबाड लोकांची पूजा देवी कबूल करील असें वाटलें होय तुला?" असें म्हणत त्यानें, माळिणीनें दिलेलीं फुलें राजाच्या फुलांत घातलीं. त्याबरोबर राजाचीं फुलें निखाऱ्यासारखीं लाल होऊन राख होऊन गेलीं. तें पाहून राजा वेड्यासारखा पुजाऱ्यावर ओरडून म्हणाला—"भटजी! देऊन टाका त्या माळिणीचीं फुलें तिला. देवीसमोर कोणी लहान किंवा मोठा नाहीं."

पुजाऱ्यानें कांपऱ्या हातांनीं ताजीं फुलें उचलून बाजूला काढलीं. तेव्हां पुन्हां



जळलेलीं फुलें टवटवीत झालेली दिसलीं. त्यानें राजाचीं व त्या माळिणीचीं फुलें निरनिराळीं वाहून पुजा केली.

त्यानंतर गरीब माळिणीचें आयुष्यच पालटलें. बायकोजवळ एक हजार मोहरा आहेत हें कळल्यावर माळिणीचा नवरा तिला बोलावून घेऊन गेला. त्या माळिणीवर देवीची विशेष कृपा आहे हें कळल्यापासून सर्व तिचा आदर करूं लागले.

येथवर गोष्ट सांगून वेताळानें विचारलें—"राजा! दोघांपैकीं कोणाची भक्ति तुझ्या-मतें जास्त वाखाणण्याजोगी म्हणतां येईल,

राजाची कीं माळिणीची ? या प्रश्नाचें उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

त्यावर विक्रमार्क म्हणाला–" माळिणीचीच भक्ति नाहीं का मोठी ? राजानें ओंजळभर फुलांसाठीं एक हजार मोहरा द्यायला मागेंपुढें केलें नाहीं हें खरें असलें तरी त्यानें थोडाशा स्वार्थबुद्धीनेंच तो नवस केला होता. त्याचा मुलगा व सून दोघांना सुखरूप परत पोंचविलें तर देवीला एक हजार मोहरांचीं मोगरीचीं फुलें वाहण्याचा नवस राजानें केला होता. असले नवस त्यानें आपल्या आयुष्यभरांत कित्येकदां केले असणार. या शिवाय एक हजार मोहरा काढून देणें राजाला मुळींच कठीण नाहीं. पण माळिणीची गोष्ट निराळी आहे. तिला एकेक पैसा मिळविणें किती कष्टाचें काम होतें ? तरी ती आपल्याजवळचीं अर्धी फुलें नित्यनियमितपणें देवाला वाहायला वगळून ठेवी. तिनें नवस फेडण्यासाठीं स्वार्थबुद्धीनें देवीला नव्हती फुलें वाहलीं. नवऱ्यानें टाकलें तर त्याहून मोठें दुर्भाग्य आणखी काय असणार एका स्त्रीचें ? परंतु त्या स्थितींतहि ती देवीला विसरली नाहीं. तिच्या मनांत देवीची भक्ति पहिल्यासारखीच जिवंत होती. म्हणून त्या माळिणीच्या भक्तीशीं राजाच्या भक्तीची तुलना करणें हास्यास्पद आहे."

अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेतावरोबर अदृश्य झाला व पुन्हां झाडाच्या फांदीला जाऊन लोंबकळूं लागला.

(कल्पित)





# गार्हस्थ्य धर्म

सुरैभ्य नांवाच्या एका मुनिकुमारानें विद्याभ्यास पुरा करून सुमना नांवाच्या एका मुलीशीं लग्न करून संसार थाटला. त्याच्याकडे शिकायला कांहीं शिष्य जमा झाले.

एकदां विद्वत्सभा भरली. मोठमोठे वेदशास्त्र पारंगत विद्वान सभेला हजर होते. वेदांत खरा पारंगत कोणी असेल तर ते एकटे माण्डव्य मुनि, असें थोर पंडितांनीं म्हटलेलें सुरैभ्यनें ऐकलें. लगेच तो मांडव्य मुनींकडे गेला व त्यांचें शिष्यत्व ग्रहण करून वेदाध्ययन करूं लागला.

चारपांच वर्षांत मांडव्य मुनींनीं आपल्या या शिष्याला त्यांच्याजवळ होती ती सर्व वेदविद्या शिकवून दिली. " वेदविद्या एवढीच का गुरुवर्य ? कीं आणखी कांहीं शिकायचें राहून गेलें आहे." सुरैभ्यनें विचारलें.

मांडव्य मुनि म्हणाले–" ब्रह्मदेवाची वाणी म्हणून प्रगट झालेल्या वेदांतून फक्त चारच वेद देवेंद्रानें मर्त्यलोकांत येऊं दिले. त्यांपैकीं फक्त एकाचेंच मी अध्ययन केलें, बाकी भारद्वाज यांच्याकडे आहेत."

तें कळल्यावर सुरैभ्य मांडव्य मुनींचा निरोप घेऊन भारद्वाजांच्या आश्रमांत गेला. त्यांना माहीत होती ती वेदविद्या त्यांच्याकडून शिकून घेतली. पण तेवढ्यावर त्याच्या मनाचें समाधान झालें नाहीं. म्हणून त्यानें त्यांना विचारलें–" आणखी वेदाध्ययन करावयाचें असल्यास काय करावें ?"

" आणखी वेदाध्ययन करावयाचें असेल तर इंद्राला संतुष्ट कर आणि त्याच्याजवळ पुढील वेदविद्या शीक." भारद्वाज म्हणाले.



सुरैभ्य इंद्राला संतुष्ट करण्यासाठीं तपश्चर्या करूं लागला. कांहीं दिवसांनीं इंद्र प्रसन्न झाला व वर मागायला सांगितलें.

"देवाधिदेवा! मी वेदांत पारंगत पद प्राप्त व्हावें म्हणून तपश्चर्या करीत आहें. आपल्याजवळ जेवढी वेदविद्या आहे ती देण्याचा अनुग्रह करावा." सुरैभ्य म्हणाला.

इंद्र त्याच्यासमोर वेदांचें मोठें दप्तर टाकून अंतर्धान पावला. सुरैभ्य तें घरीं आणून एकेक ताडपत्र वाचूं लागला. तो वाचीत असतां त्याची बायको आली.

"कशाला ग आली आहेस तूं? मी नव्हतें बोलाविलें तुला!" सुरैभ्य म्हणाला.

"तुम्ही गृहस्थाश्रमी आहां. गृहस्थधर्म निभावण्याची तुम्हाच्यावर जबाबदारी आहे, या गोष्टीची आठवण करून द्यायला आलें आहे." बायको म्हणाली.

"हें वेदाध्ययन पुरें झाल्याशिवाय संसारांत गुरफटून राहाण्याची इच्छा नाहीं." सुरैभ्य म्हणाला.

खरें पाहिलें तर ती होती म्हणूनच त्याचें वेदाध्ययन निर्विघ्न चालू राहालें. कारण त्याला कंदमूळ फळें घेऊन यायला जाण्याची गरज नव्हती कीं गाईगुरांकडे लक्ष देण्याची गरज नव्हती. सर्व कामें सुमनाच करी. एके दिवशीं वेदांच्या दप्तरांत एकहि पान उरलें नाहीं तेव्हां तो भारद्वाज मुनींचे आभार मानण्यासाठीं त्यांच्याकडे गेला व त्यांना नमस्कार करून म्हणाला—"आपल्या कृपेनें मी तपश्चर्याकरून इंद्राला प्रसन्न केलें व त्याच्या अनुग्रहानें सर्व वेद मला मिळाले. मी वेदांचें आद्योपान्त अध्ययन केलें आहे."

"तरमग तुझ्याहून थोर वेदवेत्ता आतां या जगांत दुसरा कोणी नाहीं. तूं जी वेदविद्या संपादन केली आहेस ती आपल्या शिष्यांना शिकव. हेंच तुझें कर्तव्य होय!" असा उपदेश करून भारद्वाज मुनींनीं त्याला आशीर्वाद दिला.

सुरैभ्य आपल्या आश्रमांत परत आला. आपले गुरू समग्र वेदाध्ययन करून वेदपारंगत झाले आहेत हें ऐकून त्याचे जुने शिष्य पुन्हां आश्रमांत आले. सुरैभ्य त्यांना वेदविद्या शिकवूं लागला तेव्हां त्याला इंद्राच्या अनुग्रहानें मिळालेले वेद आठवेनात. मांडव्य व भारद्वाज मुनीकडून त्यानें शिकून घेतला होता तेवढाच वेदाचा भाग त्याला आठवला. त्याची चूक त्याच्या लक्षांत आली. इंद्रानें दिलेले वेद त्यानें वाचून काढले होते. परंतु सस्वर त्यांचा पाठ केला नव्हता. आपली चूक लक्षांत आल्यावर त्याला फार वाईट वाटलें. त्यानें प्रत्यक्ष वेदांचेंच स्मरण करून प्रार्थना केली. तेव्हां वेदांचें तें दप्तर त्याच्यासमोर प्रगट झालें. या खेपेस त्यानें भक्तिपूर्वक वेदांचें शास्त्रोक्त पारायण सुरू केलें. वर्षामागून वर्षें लोटलीं. सुरैभ्याची दृष्टि क्षीण होत गेली. त्यानें वर डोकें करून पाहिलें, तेव्हां त्याला समोर एक म्हातारी उभी दिसली.

"कोण हो बाई तुम्ही?" त्यानें विचारलें.



"मी सुमना!" ती म्हणाली.

सुरैभ्यनें चकित होऊन स्वतःकडे पाहिलें. त्याला पण वार्धक्य आलें होतें. तोंडावर व अंगावर सुरकुत्या पडल्या होत्या. केस पिकले होते. पारायण करण्यास अंगांत शक्ति सुद्धां उरली नव्हती.

सुरैभ्यनें इंद्राचें स्मरण करून ध्यान धरलें. इंद्र दर्शन देण्यासाठीं प्रत्यक्ष झाला. तेव्हां सुरैभ्य म्हणाला—"देवा! तूं मी मागितल्याप्रमाणें वेद देण्याचा अनुग्रह केलास पण त्यांचा पाठ करण्यास पुरेशी शक्ति दिली नाहींस. माझें आयुष्य संपत











आलें आहे. तरी अद्याप वेदाध्ययन पुरें झालें नाहीं."

"मी तुझा वेदावरचा विश्वास व त्यांचा पाठ करण्यासाठीं तूं जी निष्ठा व भक्ति दर्शवलीस त्यावर संतुष्ट झालों आहें. मी तुला तीनशें वर्षांचें आयुष्य देतों." असें सांगून इंद्र अंतर्धान पावला. सुरैभ्यला पुन्हां यौवन मिळालें व तो वेदाध्ययन करूं लागला. या अवधींत सुमनाला वार्धक्य आलें व ती परलोकीं निघून गेली. सुरैभ्य तिचा दहनसंस्कार वगैरे उरकून पुन्हां वेदाध्ययन करूं लागला. पण त्याच्या अध्ययनांत विघ्नें येऊं लागलीं. तो अध्ययनाला बसला कीं समोर एक भूत येऊन विचारी—"मग आमचा विचार केला का?"

सुरैभ्यला हीं भुतें कोण व असा त्रास कां देत आहेत, हें कळेना. तेव्हां तो आपल्या शिष्यांसह भारद्वाज मुनींकडे तें विचारण्यासाठीं गेला. सर्व ऐकून भारद्वाज मुनी म्हणाले—"तुला जीं भुतें दिसत आहेत तीं सर्व तुझीं पापें आहेत. प्रत्येकाला पितृ-ऋण, मातृऋण व इतर ऋणांबरोबर पत्नी ऋण पण फेडावयाचें असतें. तें न फेडल्यास फार मोठें पाप लागतें. वेदाध्ययनांत मग्न होऊन तूं आपलें तें आद्य कर्तव्य विसरलास. तुझी बायको, तिच्या इच्छा पुऱ्या न झाल्यामुळें तुझ्या एका शिष्याच्या मुलीच्या रूपें जन्मली आहे. तूं तिच्याशीं लग्न करून तिला सुखी कर आणि त्या ऋणांतून मुक्त हो. वेद अनंत आहेत. इंद्रानें तुला अनंत आयुष्य जरी दिलें तरी तुझें अध्ययन संपणें शक्य नाहीं."

सुरैभ्यानें भारद्वाज मुनींनीं केलेल्या उपदेशाप्रमाणें विवाह केला आणि गार्हस्थ्य-धर्माचें पालन करून मोक्ष संपादन केला.





# जावें त्याच्या वंशा

एका गांवीं विठू नांवाचा एक गरीब मनुष्य रहात असे. त्याला दहा वर्षें वयाचा एक मुलगा होता. त्याचें नांव धोंडू होतें. विठू रोज बाजारांत जाई, मोल मजुरी करून चार पैसे मिळवी व संध्याकाळीं घरीं परत येई. तो रोज मुलाला बरोबर घेऊन बाजारांत जाई. धोंडू कांहीं वेळ बाजारांतल्या गंमती पाही. दुकानांत त्याला कांहीं नवीन गमतीदार दिसलें कीं तें घ्यायला बापाला आग्रह करी.

"बाळा! त्या वस्तू आपल्यासाठीं नाहींत रे. असल्या वस्तू विकत घेणारे राजे किंवा राजकुमारच असतात." बाप म्हणाला.

"मी जर राजाच्या घरीं जन्मलों असतों तर किती बरें झालें असतें, नाहीं का हो? माझा जन्म राजाच्या घरीं कां हो झाला नाहीं?" अबोध धोंडूनें विचारलें.

"त्यांना देवानें तसा वर दिला होता व तुला दिला नाहीं म्हणून!" बाप म्हणाला.

ती गोष्ट धोंडूच्या मनांत घर करून बसली. तसा वर मिळावा म्हणून त्यानें तपश्चर्या करण्याचें मनाशीं ठरविलें आणि गांवांत एक ग्रामदेवीचें देऊळ होतें त्या देवळांत रोज देवीसमोर बराच वेळ बसून राहून तो देवीकडे वर मागूं लागला कीं देवी मला राजकुमार कर!"

एकदां दुपारीं धोंडू तशीच प्रार्थना करीत बसला असतां देवी प्रगट झाली व म्हणाली—"तुला राजकुमार व्हायचें असेल तर या देवळामागच्या जंगलांत



जा. तुला एक राजकुमार भेटेल. तूं त्याला शिवून पळून जा. त्यानंतर तूं राजकुमार होशील."

धोंडू त्याप्रमाणें उड्या मारीत आनंदानें देवळामागच्या जंगलांत गेला. त्यावेळीं त्या देशाच्या राजानें कोठें तरी प्रवासाला जात असतां त्याच जंगलांत पडाव टाकला होता. राजाचा मुलगा धोंडूच्या वयाचाच होता. तो हरणाला धरण्यासाठीं त्याच्या पाठीमागून धांवत धोंडू होता तेथें आला. तो राजकुमार आहे हें कळतांच धोंडू त्याला शिवून दूर जंगलांत पळून गेला.

धोंडूनें त्याच्या अंगाला हात लावल्या-बरोबर धोंडू तो राजकुमार झाला व राजकुमार धोंडू झाला. आपल्याला एकाएकीं हें गरिबाचें रूप कसें मिळालें हें राज-कुमाराला कळेना. ज्या मुलानें हात लावतांच त्याला गरीब मुलाचें रूप मिळालें होतें त्या मुलाचा शोध काढीत राजकुमार देवळानजीक आला. तेव्हांच विठू पण तिकडेच आला. राजकुमारानें त्याला विचारलें—"काय रे काय करतो आहेस येथें ?"

विठूनें त्याच्या त्या उर्मट बोलण्याकडे दुर्लक्ष्य केलें. राजकुमारानें त्याला पाहून पुन्हां विचारलें—"काय रे मला माझ्या वडिलांकडे पोंचता करशील का ? तुला मी बक्षीस देईन."

विठू चकित होऊन त्याच्याकडे पाहूं लागला. व म्हणाला—"डोकें फिरलें कीं काय ? एवढी बडबड चालविली आहेस ती ?"

धोंडूच्या रूपांत असलेला राजकुमार म्हणाला—"तोंड संभाळून बोल. मी राज-कुमार आहें, लक्षांत ठेव."

विठूनें त्याला स्वतःचा मुलगा समजून त्याच्या तोंडावर हात ठेवला व म्हणाला—"बाळ ! असें वेड्यासारखें बोलूं नये. कोणी ऐकलें तर तुला कैद करतील कीं. तुला नेहमीं राजकुमार होण्याचीं स्वप्नें पडत असतात. तीं स्वप्नें पाहतां पाहतां वेड लागणार आहे तुला." असें म्हणत तो राजकुमाराला धोंडू समजून उचलून घरीं घेऊन गेला.

राजकुमार वाटभर पाय झाडीत ओरडत होता. सोड मला. कोण तूं ? कोठें घेऊन चालला आहेस मला. कोणता तरी मुलगा मला शिवला व मला हें रूप मिळालें. त्याला येऊं दे तर समोर, त्याचें रक्त पिईन."

विठू त्याला कसाबसा घरीं घेऊन आला. मांत्रिकांना बोलावून भूत बीत असेल तर उतरवायला सांगितलें. पण कांहीं उपयोग झाला नाहीं. राजकुमाराची प्रकृति जास्तच बिघडत गेलेली दिसली. शेवटीं त्याला एका खांबाला बांधून ठेवावें लागलें. त्याची खात्री झाली कीं मुलाला वेडच लागलें आहे. कारण तो झोपडीकडे पाहून तोंड वेंगाडूं लागला व खायला आणून दिलें कीं तें भिरकावून देऊं लागला.

तिकडे धोंडूला राजकुमाराचें रूप येतांच बावरल्यासारखें झालें व तो पळूं लागला. राजवाड्यांत राजकुमार हरवल्याचा ओरडा



झाला. त्याला हुडकून काढण्यासाठीं निघालेल्या शिपायांपैकीं एकां दोघांची नजर राजकुमाराच्या रूपांत असलेल्या धोंडूवर पडली. त्यांनीं त्याला विचारलें—"मालक ! तुम्ही येथें आहां का ? किती वेळ झाला, तुमचा शोध चालला आहे." ते त्याला राजवाड्यांत घेऊन गेले.

राजवाड्यांतल्या नवनवीन वस्तू पाहून धोंडूला आश्चर्य वाटलें. त्याला प्रत्येक वस्तु लक्ष देऊन पाहात असलेला पाहून शिपायांनीं विचारलें—"धनी ! असें नवीन काय दिसले यांत ?"



धोंडूनें त्यांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केलें व राजवाड्यांतल्या प्रत्येक दालनांत व खोलींत जाऊन सर्व कांहीं कौतुकानें हाताळून पाहूं लागला. एका जागीं नोकरांचाकरांसाठीं सैंपाक चालू होता. धोंडूनें त्यांतले एक दोन पदार्थ उचलून खाले व म्हणाला—“काय पण चवदार आहे!”

“मालक! हा तर नोकरांसाठीं सैंपाक चालू आहे. मालक लोकांसाठीं सैंपाक निराळ्या जागीं चालू आहे.” नोकर म्हणाले. पण धोंडूनें तिकडे दुर्लक्ष केलें.

तो दिसायला राजकुमार होता, पण त्याचें वागणें राजकुमारासारखें नव्हतें. कांहीं तरी विचित्र वाटलें सर्वांना. नोकरांनीं ती गोष्ट राजाला जाऊन कळविली. राजानें मुलाला जवळ बोलाविलें व त्याच्या चालण्या बोलण्यावरूनच राजाची खात्री पटली कीं त्याच्या मानेवर भूत तरी बसलें असावें किंवा कोणीतरी मंत्र टाकला असावा. म्हणून त्यानें मांत्रिकांना बोलावून उपचार करायला सांगितलें. पण सर्व उपाय निरुपयोगी ठरले. एवढेंच नव्हे तर तो राजवाड्यांतून पळून जाण्याचा यत्न करीत आहे हेंदेखील कळलें.

राजानें दवंडी पिटविली कीं राजकुमाराला भूतबाधा झाली आहे. त्याला जो कोणी बरा करील त्याला दहा हजार रुपयांचें बक्षिस देण्यांत येईल.

ही बातमी विठूलापण कळली. राजकुमार त्याच्याकडेच होता. त्यालापण कळली. त्याला शिवणारा मुलगा विठूचा मुलगाच असावा हें त्यानें तर्क करून ओळखलें होतें. पण तो कोठें आहे व काय करीत असावा हें त्याला माहीत नव्हतें. दवंडीची बातमी कळल्यावर तो मुलगा राजवाड्यांत राजकुमार म्हणून राहूं लागला असावा म्हणून जाऊन एकदां पाहूंया. समोरासमोर बोललों कीं साऱ्या गोष्टीचा उलगडा होईल, असा त्यानें विचार केला.

म्हणून राजकुमार विठूशीं त्याच्या मुलासारखाच बोलूं लागला, इतका कीं विठूला वाटूं लागलें कीं मुलाची भूतबाधा गेली. विठूनें त्याला खांबाला बांधून ठेवायचें सोडलें. राजकुमार विठूला म्हणाला—“काय हो बाबा! राजाच्या मुलाला वेड लागलें आहे कीं भूतबाधा झाली आहे असें लोक सांगत आहेत नाहीं का!”

“होय, ती ऐकलीस का दवंडी? त्याला जो बरा करील त्याला दहा हजार रुपयांचें बक्षिस मिळेल म्हणे.” विठू म्हणाला.

“मी त्याला बरा करून दाखवतो. चला मला घेऊन राजाकडे!” राजकुमार म्हणाला.

दोघे राजवाड्यांत गेले. राजकुमार नोकरांकडे टक लावून पहात होता. त्याला तसा पहात असलेला पाहून नोकरांना आश्चर्य वाटलें. आणखी याहि गोष्टीचें आश्चर्य वाटलें कीं तो मुलगा सरळ राजाकडे विठूला घेऊन गेला, जणुंकांहीं राजवाड्यांतली



प्रत्येक खोली, दालन व काना कोपरा त्याच्या माहितींतला होता.

तो सरळ राजाकडे गेला व म्हणाला– "तुमच्या मुलाला भेटून मी त्याच्याजवळ थोडा वेळ बोलतों. तो बरा होईल."

तें ऐकून राजाला थोडें आश्चर्य वाटलें. पण त्याचबरोबर त्याच्या बोलण्यांत कांहीं अर्थ असावा असें देखील वाटलें. म्हणून त्यानें त्याला राजकुमाराला भेटायला त्याच्या खोलींत पाठविलें.

दोघांचें परस्परांशीं बोलणें झालें. धोंडू म्हणाला–"मला नाहीं येथें राहायचें. मला येथें कांहींच आवडत नाहीं."

"तुझ्या घरीं मला तरी कोठें काय आवडलें? हें पहा दोघांना परस्परांचें रूप मिळालें व आपणां दोघांना नव्या रूपांत दुःखच सहन करावें लागत आहे. त्या पेक्षां आपण आपापलीं रूपें बदलून परत आपल्या मूळ घरीं राहूं लागलों तर सुखी होऊं, असें नाहीं का तुला वाटत!" राजकुमार म्हणाला.

धोंडूला तें पटलें त्यानें राजकुमाराचा हात आपल्या हातांत घेतल्याबरोबर त्यांना परस्परांचीं मूळ रूपें मिळालीं.

धोंडू 'बाबा' म्हणून मोठ्यानें ओरडून विठूला जाऊन भेटला व राजकुमार राजाला भेटला.

विठूला प्रथम वाटलें, कदाचित पुन्हां मुलाच्या अंगांत वारें शिरलें असावें. परंतु राजकुमारानें घडलेलें वृत्त थोडक्यांत सांगि-तल्यावर सर्वांच्या मनाचें समाधान झालें. राजानें विठू व त्याचा मुलगा धोंडू दोघांना दहा हजाराचें बक्षिसच नव्हें तर एक घर देखील बांधून दिलें.





# सूज्ञ पुरोहित

चंद्रपूर राज्याच्या गादीवर सोमशेखर नांवाचा राजा राज्य करीत होता. वयानें तो मोठा नव्हता, पण फार हुशार होता. त्याचा आपल्या पुरोहितावर फार विश्वास होता. त्याचा सल्ला घेतल्याशिवाय तो कधीं कांहीं करीत नसे. फक्त त्याचें लग्नच काय तें त्याचा सल्ला घेतल्याशिवाय झालें. त्यालाहि एक कारण झालें. लग्ना-पूर्वीं फार दिवसांपासून पुरोहित आजारी होता. त्यांचा आजार वाढतच गेला व आराम पडण्याचीं चिन्हें दिसत ना. तेव्हां राजा त्याला भेटण्यासाठीं गेला.

राजा भेटायला आल्याबद्दल पुरोहिताला फार आनंद झाला. त्यानें राजाचे आभार मानले व एक विनंति केली. म्हणाला– "महाराज! माझ्या मागें माझ्या मुलाला राजपुरोहित करावें. तो कोणत्याहि बाबतींत माझ्याहून कमी किंवा लहान नाहीं.

नंतर त्यानें आपल्या मुलाला जवळ बोलाविलें आणि त्याच्या कानांत कांहींतरी सांगून डोळे मिटले.

राजानें पुरोहिताचा मुलगा शेषाद्री याला राजपुरोहित म्हणून नेमलें. राजानें केव्हां, काय व कसें करावें हें तो सांगे. आपल्या तरुण पुरोहिताच्या सल्ल्याप्रमाणें राजा जें करी त्यांत तो यशस्वी पण होई. यामुळें शेषाद्रीवर राजाचा विश्वास बसला.

एकदां राजा शेषाद्रीला म्हणाला–"मी शिकारीला जावें म्हणत आहें. निघायला चांगला मुहूर्त सांगा."

"उद्यां सूर्योदयापूर्वीं चार घटका निघालांत तर तुमची शिकार चांगली यशस्वी होईल.



त्यावेळीं पूर्वेकडील वारा थोडा सोसाट्याचा असेल. पण तो फार वेळ टिकणार नाहीं." शेषाद्री राजाला म्हणाला.

"तर मग तुम्हीदेखील आमच्याबरोबर शिकारीस जायला तयार असा. संध्याकाळीं सर्व बरोबर परत येऊं." राजा म्हणाला.

शेषाद्रीनें सांगितलेल्या वेळींच सर्व शिकारीला निघाले. उजाडण्यापूर्वी गांवा-बाहेर येऊन पोंचले. ठीक त्याच वेळीं पूर्वेकडून सोसाट्याचा वारा सुटला.

"अरे चुकलों कीं, तुम्ही सांगितलें होतें नाहीं का कीं वारा सोसाट्याचा सुटणार आहे म्हणून? किती गार वारा आहे. तुम्ही जाऊन माझ्या झोंपण्याच्या खोलींतून लोकरीची शाल आणून देतां का?" राजानें शेषाद्रीला विचारलें.

शेषाद्री घोड्यावर बसून परत राजवाड्या-कडे निघाला. तो राजाच्या शयनागारांत पाऊल टाकणार, तेवढ्यांत त्याला त्याच्या वडिलांनीं कानांत सांगितलेला उपदेश आठवला—"नवराबायको ज्या खोलींत झोंप-तात त्या खोलींत कधीं जाऊं नये."

म्हणून तो बाहेर उभा राहून म्हणाला—"महाराजांनीं आपली शाल घेऊन यायला पाठविलें आहे."

"दार उघडें आहे, या आंत." आंतून राणी म्हणाली.

"तुम्ही आणून द्यावी बाहेर!" शेषाद्री म्हणाला.

"राणीनें एकच दार उघडून शाल दिली. त्याच वेळीं एक पुरुषी हात बाहेर आला व शेषाद्रीचा हात धरून त्याला आंत ओढण्याचा यत्न करूं लागला.

शेषाद्री आपला हात सोडवून व शाल घेऊन घोड्यावर बसून राजा वाट पहात उभा होता तेथें येऊन पोंचला.

त्या दिवशीं राजाला चांगलें यश मिळालें. संध्याकाळीं राजा राजवाड्यांत परत आला. शेषाद्री आपल्या घरीं निघून गेला.

राजा अंतःपुरांत पोंचला तेव्हां दास दासी नेहमींसारखे हंसतमुख नसून माना खालीं करून उभे होते. त्यांचीं तोंडें उदास दिसलीं. राणी केस पिंजारून रडत होती.

राजानें येऊन विचारलें कीं झालें काय, कळूं द्याल कीं नाहीं, तेव्हां ती म्हणाली कीं शेषाद्री शाल घ्यायला म्हणून जो आला होता त्यांत त्याचा हेतू निराळाच होता.

राजाच्या मनांत कधीं अशी शंका येणें शक्यच नव्हतें. परंतु राणी तरी असा खोटा आळ कां आणील? राजा विचारांत पडला. या विषयीं चवकशी करावी तर स्वतःचीच नाचक्की होणार. शेषाद्री निर्दोष असला तरी हा पेचप्रसंग सोडविण्यासाठीं त्याला बळी देणें भागच आहे.

राजा असें मनाशीं ठरवून कोटाच्या दक्षिण द्वारावरच्या अधिकाऱ्याला बोलावून म्हणाला—"हें पहा, तुला एक जण येऊन





प्रश्न करील कीं राजानें सांगितलेलें काम केलेंस कीं नाहीं? तेव्हां हा प्रश्न करील त्याचें डोकें तत्क्षण छाटून टाक."

शेषाद्रीनें नित्यनियमाप्रमाणें येऊन राजाला आशीर्वाद दिला व त्या दिवसाचें भविष्य सांगितलें.

राजा त्याला म्हणाला—"दक्षिणेकडील द्वारावरच्या अधिकाऱ्याला एक काम मी सांगितलें होतें तें त्यानें केलें कीं नाहीं, विचारून मला येऊन सांगा."

शेषाद्री होकारार्थी मान हलवून दक्षिण द्वाराकडे निघाला. वाटेंत त्याला त्याचा एक ब्राह्मण मित्र भेटला. म्हणाला—"शेषाद्री! अरे, आमच्या घरीं सत्यनारायणाची पूजा आहे, तेवढी सांगून जा!"

तेव्हां त्याला वडिलांनीं सांगितलेला आणखी एक उपदेश आठवला. तो त्या ब्राह्मणाच्या घरीं गेला आणि पूजा वगैरे आटोपून दक्षिणद्वाराकडे निघाला.

तिकडे राजाचा प्रधान विश्वजित राजाजवळ येऊन म्हणाला—"पुरोहिताला जाब विचारला पाहिजे."

राजा त्याला म्हणाला—"मला सगळें कळलें आहे, मी त्याच संबंधीं एक काम दक्षिण द्वारावरच्या अधिकाऱ्याला करायला सांगितलें होतें. तें त्यानें पुरें केलें कीं नाहीं त्याला विचारून या."

विश्वजित लगेच दक्षिण द्वाराकडे गेला. त्यानें जाऊन अधिकाऱ्याला विचारलें—"काय रे? राजानें तुला सांगितलें होतें तें काम झालें का?"

लगेच त्या अधिकाऱ्यानें विश्वजिताचा शिरच्छेद केला आणि डोकें एका चादरींत गुंडाळून राजाला आणून दाखविलें.

"तुझें काम संपलें आहे. आज तूं द्वार बंद करून घरीं निघून जा." राजा म्हणाला.



चादरींतलें डोकें शेषाद्रीचेंच असणार असें राजाला वाटलें होतें. परंतु थोड्या वेळानें येऊन तो म्हणाला—"महाराज! मी दक्षिण द्वारावर जाऊन आलों. पण द्वार तर बंद आहे व तेथें कोणीच दिसलें नाहीं."

त्याला पाहून राजाला आश्चर्याचा धक्काच बसला. त्यानें शेषाद्रीला विचारलें—"काय रे, मी तुला केव्हां जायला सांगितलें होतें आणि तूं आतां येतो आहेस का? करीत काय होतास इतका वेळ?"

"एका मित्राच्या घरीं सत्यनारायणाची पूजा होती, तिकडे जावें लागलें महाराज! म्हणून थोडा उशीर झाला. क्षमा करावी." शेषाद्री म्हणाला.

"माझ्या हुकुमापेक्षां मोठी तुला ती पूजा वाटली होय!" राजानें विचारलें.

"होय, माझ्या वडिलांनीं मृत्युसमयीं मला कांहीं उपदेश केले होते. त्यांप्रमाणेंच मी वागत आलों आहें." शेषाद्री म्हणाला.

"काय आहेत ते उपदेश?" राजानें विचारलें.

"नवराबायको ज्या खोलींत झोपतात त्या खोलींत कधींच प्रवेश करूं नये व अंत:पुरांतलें गुपित कोणाजवळ बोलूं नये.



राजकार्याहून देवकार्य मोठें आहे. या उपदेशाप्रमाणें पूजा झाल्यानंतर आपल्या कामासाठीं गेलों होतों." शेषाद्री म्हणाला.

"परंतु काल सकाळीं खोलींत गेल्याशिवाय शाल कशी आणलीस हें नाहीं सांगितलेंस!" राजानें विचारलें.

"कारण त्यांत अंत:पुरांतलें एक रहस्य होतें म्हणून मी सांगितलें नाहीं." शेषाद्री म्हणाला.

"मी स्वत:च विचारीत असतां सांगण्यास काय हरकत आहे? सांग!" राजा म्हणाला.

शेषाद्रीनें त्याला राणी दरवाज्यांत उभी राहून शाल देत असतां एक पुरुषी हात कसा बाहेर आला व त्यानें शेषाद्रीचा हात धरून ओढण्याचा यत्न केल्यावर शेषाद्रीनें स्वतःचा हात कसा सोडवून घेतला, हें सविस्तर वर्णन करून सांगितलें.

"तूं सूज्ञ आहेस म्हणून विचारतों, या सर्वांपाठीमागें काय गुपित आहे तें सांग पाहूं." राजा म्हणाला.

"महाराज! शाल घेऊन जात असतांच मी या सर्व गोष्टीचा विचार केला होता. कोणी तरी आपला मित्र आपला वध करण्याच्या विचारांत होता. आपला विवाह-पण त्यानें त्याच हेतूनें ठरवून दिला होता. विवाहानंतर दोघांनीं मिळून आपला वध करण्याचा घाट घातला होता. पण मी त्यांच्या वाटेंत कांटा उभा होतों. म्हणून त्यांनीं प्रथम माझा कांटा दूर करण्याचा विचार केला होता. पण त्यांचा तो हेतू साध्य झाला नाहीं. मला असेंपण वाटत आहे कीं आतां आपल्याला पण त्या शत्रूचें भय उरलें नाहीं."

तें सर्व ऐकल्यावर राजानें चादरींत बांधलेलें मुंडकें सोडून पाहिलें व म्हणाला—"हाच माझा तो शत्रु असला पाहिजे. तुझे वडील आजारी असतां यानेंच माझें लग्न जमविलें होतें." राजानें असें सांगून प्रधानाचें मुंडकें आपल्या राणीला नेऊन दाखविलें. तें पाहून ती मोठ्यानें ओरडली आणि बेशुद्ध होऊन पडली. तेव्हां तिचा स्वैरपणा राजाच्या लक्षांत आला. राजानें तिला तुरुंगांत टाकलें आणि शेषाद्रीच्या सूचनेप्रमाणें दुसऱ्या एका मुलीशीं लग्न करून घेतलें. त्याच्याच सल्ल्याप्रमाणें तो पुढें राज्य करूं लागला.





# शुभांगी

एका गांवीं काशीनाथ नांवाचा एक तरुण मुलगा रहात असे. तो तसा विशेष हुशार नव्हता. त्याला शिक्षणासाठीं गुरुकुलांत पाठविण्यांत आलें. विद्याभ्यास संपल्यावर काशीनाथ घरीं परत आला आणि पदोपदीं तत्वज्ञानाच्या गोष्टी सांगूं लागला. गांवकरी म्हणत—"अरे, ज्याला आपण अक्कलशून्य मूर्ख म्हणत होतों तो चांगला तत्वज्ञानी निघाला कीं!"

काशीनाथाला कित्येक मुली सांगून आल्या. त्यांत शुभांगी नांवाची एक हुशार व कामसू मुलगी होती. परंतु जन्मल्या-पासूनच तिच्या अंगांत अनेक व्यंगें होतीं. तिचे हात, पाय, मान, कंबर पाठ सर्वच बेडौल होते. म्हणूनच कीं काय, तिच्या आईवडिलांनीं तिचें नांव शुभांगी असेंच ठेवलें होतें. तिचें लग्न कसें होणार या काळजींत तिचे आईवडील असतां काशीनाथ म्हणाला—"मी करतों तिच्याशीं लग्न!" त्याच्या नातेवाइकांनीं त्याला किती समजावून सांगितलें कीं तिच्याशीं लग्न करण्याचा खुळेपणा करूं नकोस, परंतु त्यानें त्या सर्वांना उत्तर दिलें—"भार्या रूपवती शत्रुः, म्हणून मी लग्न करणार तर तिच्याशींच."

काशीनाथाच्या लग्नानंतर कांहीं दिवसांनीं त्याचे वडील वारले. घरची सर्व जबाबदारी त्याच्या शिरावर येऊन पडली. परंतु त्यानें उदर निर्वाहाची कधींच फिकीर केली नाहीं. तो एक तुणतुणें घेऊन भजनें म्हणत गांवभर हिंडे व जी भिक्षा मिळे घरीं आणून देई.



गांवकरी त्याच्या विषयीं काय बोलतात हें एकदां त्यानें ऐकलें. "काशीनाथचें बरें आहे बुवा. त्यानें समजून उमजून शुभांगीशीं लग्न केलें. मागच्या जन्मीं त्यानें कन्यादान केलें नसावें." ते म्हणाले.

काशीनाथाला त्यांच्या बोलण्यांत तथ्य असावेंसें वाटलें. कारण त्यानें कोठें तरी वाचलें होतें कीं जे कन्यादान करतात त्यांना पुढील जन्मीं सुंदर बायको मिळते व उदरनिर्वाह पण त्यांचा सुखानें चालतो. तरी त्यानें त्या गोष्टीकडे दुर्लक्ष करून शुभांगीसारख्या एका कुरूप स्त्रीशीं लग्न केलें होतें. सर्व ईश्वरकृपेवर सोडून द्यावें असें मनाशीं ठरवून तो वागे. ईश्वराचा वास आपल्याच हृदयांत असतो "शिवोहम्"चा मंत्र ज्या वेळीं मला माझ्या गुरुवर्यांनीं शिकविला त्या वेळीं त्याचा अर्थ "मी शिव आहें." असा त्यांनीं मला सांगितला होता.

हृदयांत वास करणाऱ्या त्या शिव शंकराची आराधना करून आपल्या कुरूप स्त्रीला सुस्वरूप बनवायचें असा त्यानें मनांत निश्चय केला. तो आपल्या बायकोला म्हणाला—"उद्यां मला एका कामानिमित्तें बाहेर जावयाचें आहे. दशम्या बांधून एक तांबलीभरून तूप तयार ठेव." शुभांगीनें त्याप्रमाणें सर्व तयार करून ठेवलें.

काशीनाथ एका निर्जनस्थानीं जाऊन बसला. हृदयांत वसणाऱ्या परमेश्वराचें स्मरण करून दशमीचा एकेक तुकडा तुपांत बुडवून "शिवोहम्"चा जाप करीत तो आपल्या तोंडांत टाकूं लागला. त्यानें इतकें खाल्लें कीं त्याचें पोट गच्च भरलें. त्याचें पोट टरटरून फुगलें व त्याच्या वेदना त्याला असह्य होऊं लागल्या. पार्वतीला त्याची दया आली. तिनें सांगितल्यावरून शंकरानें प्रत्यक्ष होऊन काशीनाथाला वर मागायला सांगितलें.

काशीनाथ खालीं मान करून बसला. आपल्या बायकोला सौंदर्य द्यावें हा वर मागायचें देखील राहून गेलें त्याची ती स्थिति ओळखून शंकरानें त्याच्या हातांत तीन दगड दिले व म्हणाला—"यांच्या सहाय्यानें तुझ्या कोणत्याहि तीन इच्छा पुऱ्या होतील. इच्छा मनांत आणून एक दगड फेंकून दे." असें सांगून शंकर अंतर्धान पावला.

शिव पार्वती अंतर्धान पावल्यावर त्यानें ते तिन्ही दगड उचलले आणि घरीं गेला. "माझी बायको सर्वांग सुंदरी होऊं दे." असा मनांत संकल्प करून त्यानें एक दगड फेंकला. त्याबरोबर त्याची अष्टावक्र बायको एक जगन्मोहिनी सुंदर स्त्री झाली.

शुभांगीला तिच्या रूपांत झालेला बदल पाहून आश्चर्य वाटलें. ती कांहीं बोलणार एवढ्यांत काशीनाथानें त्याची तपश्चर्या फळास आल्याचें सांगितलें. तें ऐकून शुभांगी म्हणाली—"अजून दोन दगड आहेत ना तुमच्या जवळ? राजा होण्याची इच्छा करून एक दगड फेंका!"



"छेछे! नको बुवा तें. राजा झालों कीं युद्ध करावें लागणार. "अहिंसा परमोधर्मः" मी ज्या इच्छेनें तपश्चर्या केली होती ती पूर्ण झाली आहे. बाकी पुढें पाहून घेऊं." असें सांगून त्यानें ते दोन्ही दगड कोनाड्यांत ठेवून दिले.

दुसऱ्या दिवशीं जेव्हां काशीनाथ भिक्षेला निघाला तेव्हां शुभांगी कमरेवर घागर घेऊन नदीवर निघाली. तिचें तें सौंदर्य पाहून सर्वांचे डोळे दिपून गेले. कित्येक परिचित लोकांनीं जवळ येऊन तिच्याजवळ चवकशी केली—"कोण बाई तुम्ही?" ती

शुभांगीच आहे हें जेव्हां तिच्या तोंडून लोकांना समजलें तेव्हां त्या गोष्टीवर कोणाचा विश्वासच बसला नाहीं. वाटेंत जो कोणी भेटे त्याच्याशीं ती उभी राहून बोलत राहाली. त्यामुळें नदीवर पोंचायला तिला फार उशीर झाला.

अदल्या दिवशीं रात्रीं एक राजनर्तकी राजवाड्यांतून पळून गेली होती. तिच्या शोधार्थ राजाचे शिपाई हिंडत होते. कांहीं शिपाई घाटावर शोध काढीत आले. शुभांगीला पाहून त्यांना तीच राजनर्तकी असेल असें वाटलें. तिनें अनेक प्रकारें त्यांना 'सांगितलें कीं ती काशीनाथाची बायको शुभांगी आहे, परंतु शिपाई ऐकत ना. तिकडून त्याच वेळीं काशीनाथ भिक्षा मागत निघाला असतां शुभांगीला राजाचे शिपाई धरून घेऊन जात असल्याचें कळलें. तो पळत पळत घरीं गेला व एक दगड हातांत घेऊन मनांत म्हणाला—"माझी बायको अस्वल होऊन शिपायांच्या हातून आपली सुटका करून घेऊन येऊं दे." असें म्हणून त्यानें दगड फेंकला.

थोड्या वेळानें शुभांगी अस्वलाच्या रूपें घरीं परत आली. अस्वलाला पाहून स्वत: काशीनाथ पण थरथर कांपूं लागला. त्यानें इच्छिल्याप्रमाणें त्याची बायको अस्वल झाल्याचें आठवेपर्यंत तो तसाच कांपत राहाला. पण त्यानंतर पुन्हां तो धांवत गेला आणि तिसरा दगड उचलून मनांत म्हणाला—"माझ्या बायकोला तिचें मूळ रूप येवो." आणि असें म्हणत दगड फेंकून दिला. शुभांगी पुन्हां आपल्या अष्टावक्र रूपें त्याच्यासमोर उभी राहाली.





# परोपकारी गोपाळ

एकदां कांतिलाल बायको व मुलांसह गोपाळच्या घरीं आला व म्हणाला—"अहो गोपाळराव! तुमच्याशिवाय आम्हांला मदत करणारा कोणी नाहीं हो, मी याच गांवीं लहानाचा मोठा झालों. व्यापार करण्यासाठीं म्हणून मोठ्या गांवीं जाऊन राहालों. व्यापारांत नुकसान झालें. बारा वर्षें झालीं तेथें जाऊन. सर्व घालवून बसलों आणि आतां आलों आहे हातांत करवंटी घेऊन. डोक्यावर कर्ज चढलें आहे. तुम्ही थोडा हातभार दिलात तर उद्धार होईल बघा गरिबाचा. यापुढें मी येथेंच राहीन म्हणतों. मग काय हुकूम?"

"माझ्याकडून होईल तेवढें मी स्वखुशीनें करीन एवढें तुम्हांला वचन देतों." गोपाळ म्हणाला.

पूर्वीं कांतिलाल याचें गांवांत घर होतें. थोडी फार जमीन पण होती. त्याचें घर गांवाबाहेर होतें. घर जुनाट होतें. बारा वर्षांपूर्वीं तो गांव सोडून गेला तेव्हां त्यानें जमिनीबरोबर घर पण विकून टाकण्याचें ठरविलें होतें. पण कोणी तें विकत घेतलें नाहीं. आतां घराच्या भिंती पडूं लागल्या होत्या व त्यांवर गवत उगवलें होतें.

जमीन विकून जे पैसे मिळाले ते कांतिलालनें व्यापारांत लावले. इमारती लाकडाचा धंदा केला व चोर बाजारी करून खूप पैसे मिळविले. तसा स्वभावानें तो आळशी आणि थोडा रंगेल होता. मनोविनोदाखातर त्यानें पुष्कळ पैसे वाया घालवले. वाईट संगतींत आणि ऐश आरामांत राहून पुष्कळ पैसे गमावून बसला. त्यांत



त्याला जुगारीचा पण नाद लागला. त्याच्या बायकोनें पण त्याला सावध केलें नाहीं. उलट ती सुद्धां मोकळ्या हातानें खर्च करीत राहाली. डोक्यावर कर्ज वाढलें. दिवाळें वाजवून तो आपल्या गांवीं परत आला.

त्याचें घर होतें ती जमीन विकून दोन तीनशें रुपये मिळाले तर एक लहानसें झोंपडें बांधून राहण्याचा त्याचा विचार होता. उरलेल्या पैशांत दोन गाई ठेवून व रतिबानें दूध विकून उदार निर्वाह करण्याचा पण त्याचा विचार होता. पण ती जमीन इतके पैसे देऊन कोण विकत घेणार?

कोणी त्याला सुचविलें कीं अशी मदत करणारा या गांवांत फक्त एक गोपाळ आहे. त्याच्याकडे जाऊन मदत मागितली तर तो खात्रीनें मदत करील असेंदेखील गांवकऱ्यांनीं त्याला सांगितलें होतें. त्याला दोन तीनशें रुपये तसे जास्त नाहींत, असें कळल्यावरच कांतिलाल बायकोला व मुलांना घेऊन आला होता.

गोपाळला त्याची कींव आली. त्या वेळीं गोपाळजवळ दोनशें रुपये नव्हते. तरी त्यानें लक्ष्मीचे दागिने गहाण ठेवून दोनशें रुपये कांतिलालला दिले व जमीन खरेदी केली. कांतिलालनें दोन तीन दिवसांत एक झोंपडें उभें केलें. गोपाळनें ते तीन दिवस सर्वांना आपल्या घरींच ठेवून घेतलें.

झोंपडें बांधून तयार झाल्यानंतर कांति-लाल जवळ थोडे पैसे उरले. तेवढे पैसे गाय विकत घ्यायला पुरले असते. परंतु गमतींत पैसे उडवण्याची संवय झाली होती, ते पैसे कसे पुरणार? हातांत पैसे होते तोंपर्यंत रोज घरीं कांहीं तरी गोडधोड होई आणि पंधरा दिवसांत होते नव्हते ते सर्व पैसे संपले आणि निर्वाहाचा प्रश्न सुटायचा राहूनच गेला.

कांतिलाल पुन्हां गोपाळकडे गेला आणि म्हणाला—"तुम्ही शंभर रुपये कर्जाऊ दिलेत तर मी दोन गाई विकत घेऊन दूध विकून चार पैसे मिळवीन."

"हें पहा, माझ्याजवळ आतां फुटकी कवडीदेखील नाहीं. तुझ्याकडून घेतलेल्या जमिनींत रताळी लावण्याचा विचार करतों आहें मी. तूं मजुरी करतोस का? जोंपर्यंत पीक निघत नाहीं तोंपर्यंत माझ्या हातांत पैसे तरी कोठून येणार सांग. तोंपर्यंत मिळेल त्या मजुरीवर तुझें काम भागेल." गोपाळ म्हणाला.

"मी इतके दिवस शहरांत काढले. आतां कुदळफावडें हातांत घेणें शक्य आहे का मला? तसा मी ठरलों व्यापारी. फावडें कधीं हातांत घेतलें असेल तर शपथ. तुमचें पीक निघेपर्यंत मी वाट पाहतों. काढीन कांहीं तरी उपाय." असें सांगून कांतिलाल निघून गेला.

तो गांवांतल्या एका व्यापाऱ्याच्या घरीं मुनिमाची नोकरी करूं लागला. त्यानें मालकाच्या डोळ्याआड चार पैसे मिळविले पण. लोकांना फसवून पैसे मिळविण्याची त्याला जुनी संवय होती.



गोपाळनें स्वत: कुदळफावडें घेऊन काम करण्याचें ठरविलें. गवत व जीं झाडें झुडपें उगवली होतीं तीं छाटून टाकलीं आणि जमीन खणूं लागला. खणत असतां एका जागीं एक दगड लागला. तो दगड नागाच्या आकृतीचा होता. तो दगड काढून त्याची कोठें तरी प्रतिष्ठा करावी, असा विचार करून गोपाळनें तो जमिनींतून काढला' तेव्हां त्या दगडाखालीं त्याला हंडा सांपडला. हंड्याला झांकण होतें. त्यानें हंडा हलवून पाहिला तेव्हां आंतून खण-खणल्यासारखा आवाज ऐकूं आला. तो



ऐकून गोपाळ स्वतःशींच पुटपुटला—"कांति-लालचें भाग्य बलवत्तर आहे बरं का?" असें म्हणत गोपाळनें तो हंडा उचलला व कांतिलालकडे घेऊन जाऊन त्याला म्हणाला— "हा पहा, तुझ्या पूर्वजांनीं तुझ्यासाठीं पुरून ठेवलेला ठेवा. पहा किती पैसे आहेत. आतां घे गाई विकत आणि दूध वीक."

गोपाळचें तें औदार्य पाहून कांतिलाल थक्कच झाला. त्यानें गोपाळच्या समोर हंड्यावरचें झांकण उघडलें. आंत शंभर रुपये होते.

कांतिलालनें दोन दुभत्या गाई विकत घेतल्या आणि दूध विकून पैसे मिळवूं लागला. खेडेगांवापेक्षां शहरांत दूध महाग होतें, म्हणून कांतिलालचा मुलगा शहरांत जाऊन दूध विकूं लागला आणि पैसे आणून देऊं लागला. तसें थोडें दूध व दही गांवांत पण विकलें जाई. दुधांत पाणी घालून विकायला कांतिलाल मागें पुढें पहात नसे. म्हणून दुधाच्या व्यापारांत खूप फायदा होऊं लागला. शिवाय गाईंच्या चाऱ्यासाठीं पण खर्च होत नसे. कारण गांवाजवळच्या रानांत गाई खूप चरून येत.

गोपाळनें पिंपळाच्या पारावर त्या नाग-शिळेची प्रतिष्ठा केली. गांवकरी नागशिळे-समोर श्रद्धा भक्तीनें पैसे, फुलें व फळें आणून ठेवीत. नवस करीत व दुग्धाभिषेक करीत. अभिषेकाला लागणारें दूध कांति-लालकडूनच घेत.

नागपंचमीला गोपाळ सकुटुंब नागपूजेला गेला. नैवेद्य दाखविण्यासाठीं लक्ष्मीनें पंचपक्वान्नें बरोबर घेतलीं होतीं. गोपाळचा मुलगा गडूंत दूध घेऊन आला. परंतु वाटेंत त्याला ठेंच लागली. गडू जमिनीवर पडला व सर्व दूध वाहून गेलें.

वाटेंतच कांतिलालचें घर होतें. गोपाळ त्याच्याकडे गेला आणि कुशलवार्ता विचारून त्याला म्हणाला—"हें पहा कांतिलाल! आम्ही नागपुजेसाठीं घरून जें दूध घेऊन निघालों होतों तें सर्व सांडून गेलें आहे. म्हणून थोडेंसें दूध हवें आहे."

"अहो गोपाळराव! घरून दूध आणायची तुम्हांला गरजच काय होती? मी नाहीं का येथें? नागराजाच्या अभिषेकासाठीं सर्व माझ्या घरचें दूधच घेऊन जातात. तुमच्यासारखे लोक येतात व दूध घेतात म्हणून व्यापार चालतो." कांतिलाल म्हणाला.

कांतिलालच्या बायकोनें दूध आणून गडूंत घातलें. अभिषेक झाल्यावर लक्ष्मी कांतिलालच्या बायकोकडे तीर्थ-प्रसाद देऊन आली.

दुसऱ्या दिवशीं कांतिलालच्यां घरीं एक विचित्र गोष्ट घडली. कांतिलालची बायको दूध एका भांड्यांत ओतायला गेली तर भांड्यांतून एक सांप फूत्कार सोडीत बाहेर आला आणि निघून गेला. कांतिलालची बायको सांप पाहून मोठ्यानें किंचाळली. मुलें घाबरलीं. कांतिलालच्या सर्व अंगाला



घाम सुटला. त्यादिवशीं सर्व दूध फेंकून द्यावें लागलें.

संध्याकाळींपण तशीच गोष्ट घडली. सांप त्या भांड्यांतच येऊन कां बसतो, हें कोणाला कांहीं कळेना. गांवभर त्या गोष्टीची चर्चा सुरू झाली. लोक म्हणूं लागले कीं कांतिलाल दुधांत इतकें पाणी घालतो कीं नागराजाला सुद्धां तें असह्य झालें असावें. देवानें चांगली खोड मोडण्याचें ठरविलेलें दिसतें आहे. कांहीं लोक त्याचें उत्तर देत विचारीत—"अहो, पण देव इतके दिवस कां गप्प बसला?"

"नागराजाच्या अभिषेकाला तो जें दूध विकतो त्यांत सुद्धां तो पाणी घालतो म्हणून देव रागावला असणार." कांहीं लोक म्हणाले.

कांतिलालची बायको पतीला म्हणाली– "तुम्ही गोपाळला दूध विकून त्याच्याकडून पैसे घेतलेत म्हणून देव रागावला असेल. नेऊन द्या त्याचे पैसे परत."

कांतिलालनें त्याप्रमाणें पैसे परत नेऊन दिले. परंतु पुन्हां तसाच सांप भांड्यांतून निघाला. तो रोज दूध काढी आणि रोज तें फेंकून द्यावें लागे.

ती गोष्ट गोपाळला कळली. असें कां होतें हें पाहण्यासाठीं गोपाळनें नागपूजा व दुग्धाभिषेक मोठ्या समारंभानें सुरू केला. एका पुजाऱ्याच्या अंगांत सांप आला व तो बडबडूं लागला–"अरे पापी कांतिलाल! मी तुझा सर्वनाश करीन. तूं पाणी घालून दूध विकतोस आणि माझ्या अभिषेकाच्या दुधांतसुद्धां पाणी घालतोस का? तुला स्वतःच्या पायावर उभा रहायला ज्यानें हातभार लावला आणि माझी पारावर प्रतिष्ठा केली त्याला देखील तूं पाणी घालून दूध विकलेंस काय? मी तुला सोडणार नाहीं. लक्षांत ठेव!"

"मी धनलोभानें हें सर्व केलें. मला माफ कर नागदेवा! मी कान धरतों, पुन्हां असली चूक करणार नाहीं. क्षमा कर!" असें म्हणून कांतिलाल व त्याच्या बायकोनें हात जोडून नाक घासलें.

त्यानंतर कांतिलालला नागदेवानें त्रास दिला नाहीं. तो शुद्ध दूध विकूं लागला आणि एक प्रामाणिक दूधवाला म्हणून प्रसिद्ध झाला.





# कृष्णावतार

कुंभिकाच्या गोठ्यांत जन्मलेल्या सात राक्षसी पोळांनीं जो धुमाकूळ मांडला होता त्याच्या कागाळ्या मिथिलेच्या राजाच्या कानावर येऊं लागल्या, तेव्हां तो कुंभिकाला बोलावून म्हणाला–"तुझे सांड राज्यांत उत्पात करीत आहेत तरी त्यांना ताळ्यावर आणण्यासाठीं काय तो लवकर उपाय कर. त्यांना बडवून बैल तरी करून टाक किंवा जंगलांत नेऊन सोड."

त्यांना ताळ्यावर आणणें कुंभिकाच्या शक्तिबाहेर होतें. त्या प्रयत्नांत कित्येक जखमी झाले व कित्येक ठार झाले. कांहीं उपाय सुचला नाहीं तेव्हां त्या पोळांना ताळ्यावर आणील त्याच्याशीं आपली मुलगी नीला हिच्याशीं लग्न करून देईन असें त्यानें दवंडी पिटून जाहीर केलें.

दवंडी ऐकून कित्येक तरुण गवळी आले. गुरांना ताळ्यावर आणणें मोठें काम नाहीं. सहज एका सुंदर मुलीशीं आपलें लग्न होईल या आशेनें ते आले होते.

प्रत्येकानें आपल्या शौर्याच्या वल्गना सुरू केल्या. एक जण 'त्या पोळांचीं शिंगें मोडून टाकतों' असें देखील म्हणाला. आणखी एक जण त्यांचीं हाडें मोडून टाकण्याच्या गप्पा सांगूं लागला.



दवंडी पिटविली तेव्हां कुंभिकानें नंदाला पण तें सर्व कळविलें. कुंभिकाच्या दूतांनीं सात सांडांनीं सर्व प्रजेला कसें भयभीत करून सोडलें आहे त्याचें वर्णन नंदासमोर केलें. तें ऐकून नंद यशोदा, बरोबर बलराम व कृष्ण दोघांना व आणखी कांहीं गवळयाच्या मुलांना घेऊन निघाले.

कुंभिक आपली ताई व मेहुणा दोघांच्या स्वागतासाठीं सामोरा गेला. कुंभिकाची बायको धर्मदा आपल्या नणदेला प्रेमानें भेटली व तिला बोलावून घरांत नेलें. कुंभिकाचा मुलगा श्रीधाम आपल्या आते भावंडांना भेटला.

त्या दिवशीं रात्रीं त्या सातहि राक्षसी सांडांना कृष्ण आल्याचें कळलें व आपला प्रताप दाखविण्यासाठींच कीं काय त्यांनीं गाईंना दुशी मारून गोठ्यांत गडबड सुरू केली. नंतर कुंभिकाच्या अंगणांत येऊन मोठेमोठ्यानें डरकाळ्या फोडूं लागले आणि खुरांनीं जमीन ओरबाडूं लागले. नंतर त्यांनीं मडकीं फोडलीं, भिंती पाडल्या, दारें तोडलीं, गाड्या मोडल्या, मांडव पाडले व नाना तऱ्हेचें उपद्रव सुरू केले. बायका व मुलें भिऊन मोठ्यानें ओरडूं लागलीं. फुशारक्या मारणारे तरुण गोप मल्ल जाऊन दडून बसले.

उजाडल्यावर कुंभिकानें सर्व गोप तरुणांना बोलाविलें. आपल्या मुलीला वस्त्रालंकारांनीं सजवून सर्वांसमक्ष उभी केलें व म्हणाला—"गोपतरुण हो! पाहिलेंत ना? हे माजलेले पोळ म्हणजे दिग्गजांसारखे सिंहासारखे बलिष्ठ आहेत. यांना वठणीवर आणावयाचें आहे. आमच्या या प्रयत्नाला तुमच्या मदतीनें यश येईल अशी अपेक्षा करून मी तुम्हां सर्वांना बोलाविलें आहे. यांना वठणी-वर आणूं शकलों नाहीं तर राजा जी शिक्षा देईल किंवा दंड करील ती भोगायला तयार व्हावें लागेल. तुमच्यापैकीं जो कोणी या कामीं यशस्वी होईल त्याच्याशीं मी आपल्या एकुलत्या एका मुलीचें लग्न करून देईन."

तरूण गोप ती अट ऐकून माघेंपुढें करूं लागले. नीलाचें सौंदर्य पाहून त्यांचा उत्साह उचंबळून येई. पण त्या राक्षसी पाड्यांकडे पाहिलें कीं त्यांचा धीर खचून जाई आणि पाय थर थर कांपूं लागत. म्हणून एकहि गोप पुढें पाऊल टाकायला तयार होईना. किंकर्तव्य विमूढ होऊन पहात उभे राहाले.

तेव्हां नंदाचा एक दूरचा नातेवाईक घोषवंत नांवाचा गवळी म्हणाला—"या माजलेल्या बैलांना ठार करतां आलें नाहीं तर माझें एवढें बळ व पराक्रम व्यर्थच. पहातर एका क्षणांत यांची मस्ती जिरवितों." असें सांगून ते बैल होते तिकडे गेला. इतर सर्व दुरून झाडावर चढून, उंचवट्याच्या जागेवर चढून दृश्य पाहूं लागले.

घोषवंतानें एका मस्त पाड्याला जोरानें गुद्दा मारला. त्या बरोबर पाहणारांनीं हर्ष-ध्वनि करून टाळ्या वाजवल्या. दुसऱ्या क्षणाला सातहि पोळ त्याच्या अंगावर तुटून पडले. कृष्ण तें पाहून मनांतल्या-.



मनांत म्हणाला—"याला कोणी सांगितलें होतें आपला जीव धोक्यांत टाकायला? हे बैल त्याची कुट्टी करून टाकतील. त्याला जिवंत सोडतील असें वाटलें होय त्याला?" व तसेंच झालें. बैलांनीं त्याला शिंगावर उचलून खालीं जमिनीवर पाडलें आणि पायांखालीं तुडवून लाथा झाडून दूर फेंकून दिलें.

हाहाकार उडून गेला. घोषवंताला दूर फकून दिल्यावर ते सांड गंमत पहायला उभे असलेल्या गवळ्यांच्या अंगावर धांवले व त्यांना मारूं लागले. गोंधळ उडून गेला,



तेव्हां कृष्ण बलरामाला म्हणाला—“ हे बैल नसून राक्षस आहेत. नाहीं तर बैलांच्या मनांत इतकी सुडाची भावना कोठून असणार ! इतकें साहस तरी कोठून असणार ! कुंभिकाला मीच मदत करतो.” असें सांगून तो बैल होते त्या बाजूला निघाला. तें पाहून नंद यशोदा ओरडूं लागले—“ नको रे बाबा ! नको ! तूं तिकडे नको जाऊं.”

कृष्ण मुठी आवळून येत असलेला पाहून बैल रूपांत असलेले सातहि भाऊ एकदम त्याच्यावर तुटून पडले. कृष्णानें समोरून येणाऱ्या पहिल्या बैलाच्या मुस्कुटांत अशी एक भडकावली कीं त्याला तिरिमिरी आल्यासारखें झालें. त्याचीं शिंगें धरून कृष्णानें त्याला लोटलें व इतर दोघां तिघां बैलांना अडवलें. एका बैलाची शेपटीच हातीं आली ती धरून कृष्णानें त्याला आपल्या चारी बाजूला असें गिरगिर फिरविलें कीं इतर बैल परस्परांच्या अंगावर आदळले. कृष्णाचें तें अद्भुत कार्य पाहून प्रेक्षक गोप तरुणांनीं तोंडांत बोटें घातलीं, जणुं कांहीं त्यांना दाखविण्या साठींच कृष्णानें तो डोंबाऱ्याचा खेळ मांडला होता. नीलानें पण कृष्णाचा पराक्रम पाहिला. ती कौतुकानें व प्रेमानें आपल्याकडे पहात आहे हें ओळखून कृष्णाला फार फार आनंद झाला.

कृष्णानें त्या बैलांना कांहीं वेळ माकडां-सारखें नाचवून शेवटीं एकेकाच्या डोक्यांत असा एकेक मुक्का मारला कीं त्यांचें तोंडच फुटलें व कालनेमीचे ते सातहि पुत्र भडभडा रक्त ओकूं लागले. कांहीं वेळानें त्यांनीं अंग टाकलें ते पुन्हां उठले नाहींत. नंद यशोदा दोघे धांवत आले व आपल्या लाडक्या व पराक्रमी मुलाला प्रेमानें पोटाशीं धरून त्याची पाठ थोपटली. कुंभीक आपल्या मुलीला घेऊन जवळ आला व तिचा हात कृष्णाच्या हातांत देत म्हणाला—“ तुझ्या पराक्रमाबद्दल तुला हें बक्षिस घे !”

नंतर त्यानें कृष्णाला व नंद यशोदेला वस्त्राभरणें देऊन त्यांचा सत्कार केला. त्यानें इतर गवळ्यांना व गोप तरुणांना इतर बहुमूल्य वस्तु देऊन त्यांचापण सत्कार केला. नंतर तो नंदाला म्हणाला—“ नंददादा ! तुमचा मुलगा शूर व पराक्रमी आहे. त्यानें आम्हांला व आमच्या सहकाऱ्यांना मोठ्या संकटांतून वांचविलें. मी तुम्हांला व तुमच्याबरोबर आलेल्या गवळ्यांना आपल्या सहस्रावधी गाईंचें दान करतो. नको म्हणूं नका.”

नंद म्हणाला—“ वेड्या ! माझ्याकडे गाई थोड्या का आहेत ? कृष्ण जन्मला तेव्हांपासून आमच्याकडे गोधन वाढत आहे व दूधपण किती देऊं लागल्या आहेत ! दुधा दह्याला तोटा राहिला नाहीं.”

तो दिवस फार आनंदानें घालवून नंद व यशोदा आपल्या सुनेला, तिचा भाऊ श्रीधाम याला व इतर लोकांना बरोबर घेऊन वृंदावनला आले.

कृष्ण पीतांबर नेसून मोर मुकुट धारण करून व फुलांचा हार गळ्यांत घालून



मुरलीगान करूं लागला आणि आपल्या सख्या गुराख्यांबरोबर गाई चरायला घेऊन जाऊं लागला.

एकदां कृष्ण व बलराम इतर गुराख्यां-बरोबर यमुनेच्या काठीं गाई चरायला घेऊन गेले. त्यांनीं गाईंना चरायला सोडलें व दोघे एका वडाच्या झाडाखालीं बसले. गुराखी एक न एक खेळ खेळत होते.

तेव्हां वामदेव व भरद्वाज दोघे मुनी तीर्थ यात्रा करीत तेथें आले. समोर एक भव्य वटवृक्ष पाहून झाडाजवळ आले व त्या झाडाला तीन प्रदक्षिणा घालून नमस्कार केला.



त्यांनीं तेथें खेळत असलेल्या गुराख्यांना विचारलें.–"मुलांनो! आम्हांला यमुनास्नान करावयाचें आहे. मगरी, सुसरी आणि सांपाचें भय नाहीं अशी निरापद जागा कोठली, सांगाल का?"

प्रत्येक गुराखी दुसऱ्याकडे बोट दाखवून म्हणाला–"त्याला विचारा" मुलें थट्टा-करीत आहेत व मुनींना राग येईल कदाचित असें वाटलें, म्हणून कृष्ण उठून पुढें आला व नम्रपणें म्हणाला–"मुनीश्वर! स्नानाला चांगला घाट कुठला हें या मुलांना काय कळणार? मी एक दिव्य घाट दाखवितों. आपण स्नानसंध्यादि आटोपून इकडे परत यावें. आमच्याजवळ पुष्कळ दही आहे व पोहे आहेत. खीरपण पुष्कळ आणली आहे आम्ही बरोबर, तुम्हांला जें आवडेल तें खा. तें नको असेल व धारोष्ण दूध हवें असेल तर आम्ही काढून देऊं. मी नंदाचा मुलगा, माझें नांव कृष्ण व हा माझा दादा बलराम."

दोघां मुनीश्वरांना त्या गुराख्याचा तेजस्वी चेहरा पाहून आश्चर्य वाटलें. इतका सुंदर व तेजस्वी मुलगा गवळ्याच्या घरीं कसा काय जन्मला बुवा? थोडा वेळ डोळे मिटून दोघे बसले. दोघें त्रिकालज्ञानी मुनी होतें. म्हणून त्यांना दिव्य दृष्टीनें सर्व कांहीं कळलें व त्यांच्या मनाचेंसमाधान झालें! म्हणाले–"आमचें केवढें भाग्य! ब्रह्मादिक देवांना मोठ्या कष्टानें कधींकधीं ज्याचें दर्शन घडतें त्याचें दर्शन आज आम्हांला इतकें सहजीं घडलें. तुला पुत्र म्हणून मांडीवर घेऊन ज्यांनीं खेळविलें ते आईबाप व बंधुबांधव किती भाग्यशाली आहेत." असें स्तवन करून दोघे पुढें गेले.

कृष्ण गोपबालकांसह नित्य गाई चरायला घेऊन जाई. तो मुरली वाजवी, मुलें खेळत,

नृत्य गान करीत. दिवसामागून दिवस आनंदानें जात होते.

एकदां कृष्ण गुराख्यांबरोबर यमुनेच्या काठानें दूर गाई घेऊन आला. दुरून एक मोठा डोह दिसला. समुद्रासारख्या त्यांत मोठ मोठ्या लाटा येत होत्या. आणखी एक आश्चर्य म्हणजे त्याच्या काठची हवा दूषित होती. इतकी कीं झाडांची व वेलींची पानें कोमेजून गेली होतीं. एक पक्षी किंवा प्राणी जिवंत दिसला नाहीं.

त्या डोहांत कालिया सर्प राहतो, त्याच्या तोंडांतून अग्निज्वाला येतात, त्याला गरुडाचें पण भय वाटत नाहीं, वगैरे गोष्टी कृष्णानें ऐकल्या होत्या. तो डोह पाहून कृष्णाला त्या सर्व गोष्टी खऱ्या असाव्याशा वाटल्या. त्या सापाचा गर्वभंग करून डोहाचें पाणी गाईगुरांना प्यायला शुद्ध केलें पाहिजे असें कृष्णानें ठरविलें. या शिवाय त्या सापाच्या ज्ञातीबांधव सापांनीं वृंदावनच्या जवळ पासच्या लोकांना भंडावून सोडलें होतें. म्हणून कालियामर्दन केल्यास त्याच्या बंधु-बांधवांना दहशत बसेल असें वाटून त्यानें या कामांत थोडादेखील उशीर करतां कामा नये असें मनाशीं ठरविलें.

कृष्ण डोहाजवळ गेला. एका कदंब-वृक्षावर चढून डोहांत उडी टाकण्याचें त्यानें ठरविलें. तो कोणाजवळ कांहीं बोलला नाहीं. त्यानें आपली मुरली व मोरमुकुट काढून एकाजवळ दिला. डोक्यावरचे केस छान बांधले. पायांतल्या वहाणा काढून ठेवून झाडावर चढला आणि डोहांत उडी टाकली. त्यानें उडी टाकली त्या जागीं डोहाचें पाणी इतकें उंच उडालें कीं आकाशाला जाऊन भिडलें.





# अरण्यपुराण

[९]

काळे कुळकुळीत रेडे काळवत्री डोंगराचा कडा कोसळावा तसे खालीं जाऊं लागले. त्यांच्यासमोर किती मोठा व्याघ्रराज असला म्हणून त्याचा कितीसा टिकाव लागणार? वाघोबाला आवाज ऐकूं आला. तो उठला व पळून जाण्यासाठीं वाट हुडकूं लागला. परंतु दरीच्या दोन्ही बाजूला उभा कडा होता. महिषवाहनाच्या सैन्याशीं झुंजण्याची वाघोबाच्या मनांत मुळींच इच्छा नव्हती.

इतक्यांत अडदांड 'रामू'च्या पायां-खालीं कांहीं तरी मऊसें तुडवलें गेलें. त्यानंतर आलेले रेडे पण तुडवीत गेले आणि दोन तीन पाय घसरून त्यावर पडले सुद्धां.

रेडे इकडून व गाईंबरोबर म्हशी तिक-डून दरीच्या तळाला जाऊन पोंचल्या. मौवली 'रामू'च्या पाठीवरून खालीं उतरला आणि मोठ्यानें ओरडून म्हणाला—"एकू! यांना निरनिराळे कर नाहीं तर यांची आपसांत टक्कर सुरू व्हायची. तो स्वतः 'चूचू' करून गुरांना शांत करूं लागला.

वाघोबांचें प्राणोत्क्रमण होऊन गेलें असल्यामुळें त्यांच्यावर गिधाडें आणि घारी घिरट्या घालूं लागल्या.

पुन्हां खोऱ्यांत खोल जाण्याची गरज नव्हती. म्हणून एकूनें व 'भावानें' त्यांना अडवलें.

"वाघोबाची जास्त दुर्दशा ती काय होणार होती? तसा मोठा बहादर तो









कधींच नव्हता. त्याचें कातडें काढून नेऊन पारावर बांधलें तर गंमत होईल." असा विचार करून मौवलीनें कंबरपट्ट्याला लोंबत असलेला आपला सुरा काढला.

मनुष्यांच्या वस्तींत वाढलेला दुसरा तरुण मुलगा एकटा वाघाचें कातडें काढण्याची हिंमत कधींच दाखविणार नाहीं. त्याला तें येणार पण नाहीं. पण मौवलीला तो खेळ वाटला. दोघां लांडग्यांनीं तोंडांत कातडें धरून त्याला मदत केली. एक तास लागला पुरें कातडें काढायला.

इतक्यांत कोणाचा तरी हात मौवलीच्या खांद्यावर पडला. त्यानें तोंड वर करून पाहिलें, तेव्हां बंदूक घेऊन बलदेव उभा असलेला त्याला दिसला. मनुष्य जवळ येत असलेला पाहून दोन्ही लांडगे दूर बाजूला जाऊन पाहूं लागले.

"तुझें डोकें फिरलें आहे का ? एकट्यानें वाघाचें कातडें काढणें शक्य आहे का ? रेड्यांनीं याला कोठें ठार केलें ? हाच तो लंगडा वाघ ना ? याला ठार करणाऱ्याला शंभर रुपयांचें बक्षिस मिळणार आहे. मी याला दाखवून तें बक्षिस मिळवीन तेव्हां



तुलादेखील एक रुपया इनाम म्हणून देईन. गुरांना तूं उगांच पळविलेंस. पण या खेपेस माफ करतों." बलदेव म्हणाला.

मौवलीचें कातडें काढण्याचें काम चालूंच होतें. तो म्हणाला—"ओहो ! म्हणजे हें कातडें दाखवून तूं बक्षिस मिळवणार आहेस आणि एक तुकडा माझ्यासमोर फेंकणार आहेस ! पण मला हें कातडें दुसऱ्याच कामासाठीं हवें आहे."

"वाघाला मारलें कीं गांवकरी त्याच्या मिशा जाळून टाकतात नाहीं तर त्याचा आत्मा गांवाच्या चारीबाजूला घिरट्या घालून गांवकऱ्यांना त्रास देत राहातो." असें सांगून बलदेव वाघाच्या मिशा जाळून टाकायला थोडा पुढें झाला. मौवलीनें त्याला अडविलें.

त्यावर बलदेव रागावून म्हणाला—"मी कोण आहे मला ओळखलें नाहींस तूं ? मी गांवांतला एक मोठा शिकारी आहें. मला जें बक्षिस मिळेल त्यांतला तुला पाव आणा देखील मिळणार नाहीं. त्यानंतर गांव पाटलाकरवीं तुझी पाठ चांगली मऊ करवीन. सोड त्या वाघाला आणि ये इकडे."

"मला काय रे याच्याशीं काम, एकू ? हा मनुष्य पहा मला त्रास देतो आहे !"



मौवली लांडग्यांच्या भाषेंत ओरडला. दुसऱ्या क्षणाला बलदेव जमिनीवर धूळ खात पडला होता व त्याच्या उरावर एक लांडगा उभा होता. मौवली आपल्या कामांत गर्क होता. काम करीतच म्हणाला—"बलदेव! तूं म्हणालास तेंच खरें, मला तुझ्या हातचा पाव आणादेखील मिळणार नाहीं. या वाघाशीं माझें जुनें हाडवैर होतें. मी आज सूड घेतला."

दहा वर्षांपूर्वी बलदेवला एकू असा ओळखूं शकला नसता. याशिवाय वाघापासून सूड उगवणाऱ्याला मदत करणाऱ्या लांडग्यांचा सामना कसा असतो हें नव्हतें त्याला माहीत.

"बाबा रे! मी म्हातारा झालों. तुला साधा गुराखी समजत होतों. ती चूक होती माझी. सोड मला, मी जातों, तुझ्या वाटेला मी जाणार नाहीं. तुझे हे नोकर माझे लचके तर नाहीं तोडणार?" बलदेव गयावया करूं लागला.

"चालता हो! पुन्हां माझी खोडी काढायला येऊं नकोस! एकू, सोड त्याला!" मौवली म्हणाला.

एकू बाजूला होतांच बलदेवनें गांवाची वाट धरली. मागें वळूनदेखील पाहिलें नाहीं. तरी तिरक्या डोळ्यांनीं घाबरत मौवलीकडे पहात विचार करीत चालला होता कीं याच्या अंगांत भूत तर शिरलेलें नाहीं! त्यानें गांवांत जाऊन भुतांचें तिखट मीठ लावून वर्णन केलें. पुजारी तोंड वासून तें वर्णन ऐकत निश्चेष्ट उभा राहाला. कांतडें काढून पुरे होईपर्यंत काळोख पडूं लागला.

[ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]





# ६३. नायगारा—अमेरिकेंतील धबधबा

नायगारा (म्हणजे जलगर्जन) चा धबधबा अमेरिका व कॅनडाच्या सरहद्दीवर आहे. हे दोन धबधबे आहेत. कॅनडांतल्या धबधब्याला 'हॉर्स श्यू' (म्हणजे घोड्याचा नाल) म्हणतात. या चित्रांत अमेरिकेंतील धबधबा आहे. याची रुंदी १,००० फुट आहे व उंची १६७ फुट.





# भारताचा इतिहास



**सन्** १६०५ नंतर डच लोग पोर्तुगिजांना जिंकूं लागले. त्यांनीं १६३९ मध्यें गोव्याला वेढा दिला. १६५८ मध्यें सिलोन मधील पोर्तुगीज ठाणीं डचांच्या हातांत आलीं. व्यापारासाठीं डच भारतांत आले. त्यांनीं गुजराथ, कोरोमंडळ (चोळ मंडळ) चा समुद्र किनारा, बंगाल, बिहार, ओरिसा वगैरे प्रदेशांत वखारी स्थापन केल्या. १७ व्या शतकांत मसाल्याच्या पदार्थांचा सर्व व्यापार त्यांच्याच हातीं होता. सुदूर पूर्वेकडील प्रदेशांत त्यांनीं इतका व्यापार वाढवला कीं विजयनगर साम्राज्याच्या काळांतील व्यापाराचे संबंध पुन्हां जोडले गेले. देशांतल्या निरनिराळ्या प्रदेशांतून इतर माल म्हणजे, नीळ, रेशीम, सुती कापड, तांदूळ, अफू वगैरे माल डच लोकांकडे सुरतेला येत असे.

सतराव्या शतकांत डच व इंग्रज यांची परस्परांशीं चढाओढ वाढली. पोर्तुगीज व इंग्रज यांचें आपसांत जें थोडें वैर होतें तें हळूहळू कमी होत गेलें. पोर्तुगीजांनीं इंग्लंडचा राजा दुसरा चार्ल्स याला मुंबई बंदर आंदण म्हणून दिलें. परंतु इंग्रजांचा व्यापार डचांनीं वाढूं दिला नाहीं.

डच लोकांचें मुख्य ठाणें मलायांत होतें तर इंग्रजांचें हिंदुस्तानांत. परंतु दोघांत चढाओढ झाली ती मात्र हिंदुस्तानांतच झाली.

१६७२–७४ च्या दरम्यान डच लोकांनीं आपलें बंदर सुरत व इंग्रजांचें मुंबई यांच्या मधील मार्ग रोखून ठेवले. बंगालच्या आखातांत त्यांनीं इंग्रजांचीं तीन जहाजें काबीज केलीं. १७५९ पर्यंत उभय पक्षांत पूर्वेकडील व्यापारांतली ही चढाओढ जास्तच वाढली.

इंग्रजांच्या ईस्ट इंडिया कंपनीनें सर्वांत प्रथम १६०८ मध्यें आपली वखार स्थापन करण्याचा प्रयत्न केला. कंपनीच्या तर्फे कॅप्टन हॉकिन्स १६०९ मध्यें जहांगीर बादशाहाच्या दरबारांत आला. सुरतेला इंग्रजांची वखार स्थापन करण्यास त्यानें परवानगी मिळविली. परंतु सुरतेचे व्यापारी व पोर्तुगीज यांनीं बादशाहानें दिलेला परवाना मोडला. १६११ सालीं हॉकिन्स आग्र्याहून निघाला. तो सुरतेला पोंचला तेव्हां सर हेन्री मिडलटन यानें तीन जहाजांतून येऊन सुरतेच्या व्यापारांना धाक घातला व धमकी दिली. नंतर त्यांनीं १६१२ मध्यें कॅप्टन बेस्ट याला दोन जहाजांबरोबर सुरतेच्या बंदरांत प्रवेश करूं दिला. पोर्तुगीजांनीं त्याला अडवलें व युद्धाला आव्हान केलें तेव्हां बेस्टनें त्यांचा पराभव केला. इंग्रजांना वखार उघडण्यास कायमची परवानगी देऊन १६१३ मध्यें जहांगीर बादशाहनें एक फर्मान काढलें.

त्याच वेळीं ब्रिटीश राजाचा एक दूत मुगल दरबारीं आला व त्यानें परस्पर व्यापार संबंध वाढविण्यासाठीं तह करण्याचें ठरविलें. या राजदूताचें नांव सर टामस रो असें होतें. तो एक हुशार मुत्सद्दी पण होता. तो



१६१५ च्या शेवटीं आला व १६१८ अखेरपर्यंत मोंगल दरबारांत होता. हा व्यापाराचा तह त्याच्या पदरांत पडला नाहीं. परंतु अनेक ठिकाणीं इंग्रजांच्या वखारी उघडण्यास व व्यापारासाठीं अनेक सवलती बादशाहाकडून मिळविण्यांत त्याला यश आलें. म्हणून सुरत, आग्रा, अमदाबाद, भडोच वगैरे जागीं इंग्रजांच्या वखारी सुरू झाल्या.

इंग्लंडच्या राजानें त्याला आंदण म्हणून मिळालेलें मुंबई बंदर १६६८ मध्यें दहा पौंड सालाना भाड्यानें कंपनीला देऊं केलें. कांहीं वर्षांत मुंबई एक मोठें शहर झालें. तें

म्हणून त्यांची निवड झाली. म्हणून भारता-तर्फे ते अधिकारयुक्त वाणीनें बोलूं शकले.

फैजपुर, लखनौ येथील कांग्रेसच्या अधिवेशनांत जवाहरलालजींच्या मतांचा पुरस्कार झाला आणि ब्रिटीश सरकारच्या धोरणांचें खंडन करण्यांत आलें.

मध्यंतरी २८ फेब्रुवरी १९३६ या रोजीं सौ. कमला नेहरू यांना देवाज्ञा झाली. सर्व भारतांत शोकसभा झाल्या.

"कमला नेहरू यांच्या मृत्यूनें भारताचें जें नुकसान झालें आहे तें भरून येणें अशक्य" असें गांधीजी म्हणाले होते.

११ मार्च १९३६ या रोजीं जवाहर-लालजी भारतांत परत आले.

१९३६ मध्यें 'लखनौ येथें कांग्रेसचें अधिवेशन जवाहरलाल नेहरू यांच्या अध्यक्षतेखालीं भरलें. हें अधिवेशन फार महत्वाचें होतें. "भांडवलशाहीनें आतां फॅसिसम स्वीकारला आहे. साम्राज्यशाही जें धोरण आपल्या उपनिवेशांत ठेवीत आहे फॅसिस्टांनीं तें धोरण आपल्या देशांत आरंभिलें आहे. दोघे एकच असा जवाहर-जींनीं आपल्या भाषणांत उल्लेख केला

ब्रिटीशांच्या कांहीं उपनिवेशांत स्वायत्त सरकार स्थापन झालें. कांग्रेसनें निवडणुकींत भाग घेण्याचें ठरविलें. मंत्रीमंडळ स्थापन करावें कीं नाहीं हें निवडणूक झाल्यानंतर ठरवावें असें ठरलें. त्यासाठीं कांग्रेसचें खास अधिवेशन घ्यायचें पण ठरलें.

जवाहरलालजींनीं साम्यवादाचा पुरस्कार केल्यानें थोडी खळबळ उडाली. ते आपल्या विरोधी गटाला म्हणाले—"सामाजिक सुधारणा झाली नाहीं तर क्रांति झाल्या-शिवाय राहणार नाहीं."





# पाताळ कोट

[ ११ ]

[ विरुपाच्या मदतीनें सोमक व धूमक गरुडाच्या हातून आपलें रक्षण करून नदी पार करून आले. त्यांना एक भेसावणा विचित्र मनुष्य दिसला. त्यानें सांगितलेल्या वाटेनें जात असतां त्यांना दूर डोहांत एक नाव दिसली, नावेच्या चारी बाजूला सुसरी व मगरी होत्या. सोमकनें एक तीर एका मगरीला मारला.—पुढें.]

सोमकनें मारलेला बाण लागतांच मगर पाण्यांत तडफडून गटांगळ्या खाऊं लागली. बाण वर्मी लागला होता. गटांगळ्या खातांना मगरीचें कातडें बाजूला सरकलें व एक मनुष्याकृति दिसली.

ज्या मगरी पाण्यांत डुंबत होत्या त्या आपलीं कातडीं फेंकून ओरडत किनाऱ्याकडे मनुष्यरूपें पोहोत येऊं लागल्या. त्या मगरी नव्हत्याच. मगरीचें कातडें पांघरून मनुष्यच पाण्यांत डुंबत होते.

तें पाहून सोमक चकित होऊन म्हणाला—"विरूपा! तुलासुद्धां थक करून सोडलें कीं नाहीं या मगरींनीं? हीं मगरमाणसें कोण बुवा? आणि ही नाव कोणाची?"

धूमकनें खूण करून थोडें हळू बोलायला सांगून सावध रहायला सांगितलें व म्हणाला—



"मरण्यापूर्वी त्या प्रेतवजा माणसानें जें सांगितलें तें विसरलास वाटतें? हे त्या कालीकली राक्षसाच्या सैन्यांतले लोक आहेत. नावेजवळ कोणी येऊं नये म्हणून मगरीच्या रूपें हे पाहारा देत होते. त्यांच्यापैकीं एकाला ठार करून आपण स्वत: होऊन संकटाला बोलावणें दिलें आहे. तें सर्व काठावर येऊन आपल्या या झाडीकडेच पहात आहेत."

"मला सुद्धां बाण सोडण्यापूर्वीं अंमळ शंका आली, हीं माणसें तर नसतील? पण मी बोलण्यापूर्वीं सोमकाउंनीं बाण सोडला कीं. आतां काय करायचें? ते इकडेच येत आहेत." विरूप म्हणाला.

धूमक एक क्षणभर कांहीं बोलला नाहीं, नंतर त्यानें कांहीं तरी विचार करून व तें करायचें ठरवून डोकें हलविलें.

"बाण कोठून कोणत्या दिशेनें आला हें यांनीं ओळखलें आहे. पण आपण झाडांवर बसलों आहों हें नाहीं यांना माहीत. ते येण्यापूर्वीं चला आपण खालीं उतरून झाडीजवळच्या वळणावरून पलीकडे जाऊं या आणि झुडपांत लपून बसूं या." धूमक म्हणाला.

लगेच तिघे झाडाची फांदी किंवा पानें हलूं दिल्याशिवाय झपझप खालीं उतरून आले. झाडांच्या आड मागें गेले आणि झुडपांत जाऊन बसले.

तिकडे मगरमाणसें दोन तुकड्या करून झाडींत शिरलीं. एक तुकडी सोमक वगैरे ज्या झाडावरून खालीं उतरले होते त्या बाजूला गेली आणि दुसरी तुकडी शस्त्रें घेऊन दुसऱ्या बाजूनें डोंगराच्या वळणाकडे जाऊं लागली.

"धूमकू! अरे हे तर ... विसरून ... दिसत आहेत व आपण अवघे तिघे जण.



चांगले च फंसलों बाबा!" सोमक हाताच्या मुठी वळीत म्हणाला.

"कष्ट सहन केल्याशिवाय राज-कन्येला आपण सोडवून आणूं शकूं असें वाटलें होतें वाटतें तुला? तुझ्या साहसावर व शौर्यावर मला पूर्ण विश्वास आहे. गरज पडल्यास दहा दहा जणांचा मुडदा पाडून डोंगरावर पळून जाणें आपल्याला कठीण आहे का?" धूमक तलवार उपसून म्हणाला.

विरूपानें आपला भाला हातांत घट्ट धरला. सोमकानें धनुष्यावर बाण ठेवून धूमककडे पाहिलें. त्यावेळीं मगरमाणसें आपल्या हातांतल्या भाल्यांनीं झाडाझुडपांत कांहीं दिसतें का पहात पुढें येत होतीं. मधून मधून तीं झाडांच्या बुंधांत भाला खुपसून मोठ्यानें ओरडत पण होतीं—"कोण आहे तो? एक जण कीं दोघे? निघा बाहेर. आमच्या हातांतून जिवंत कसे निसटतां पाहातों आम्ही. कालकली राक्षसा-च्या एका सैनिकाला ठार केल्याबद्दल काय शिक्षा मिळते याची कल्पना आहे का तुम्हांला? तुमची कातडी लोळविली जाईल लक्षांत ठेवा."



धूमक आपल्या दोघां साथीदारांना सावध रहायला सांगून आपल्याकडे येणाऱ्या मगरमाणसांपासून आपला बचाव करण्यासाठीं डोंगराच्या वळणाकडे जाऊं लागला.

मगरमाणसांपैकीं एकाला तेथें जवळ झुडुप हलल्यासारखें दिसलें व तो ओरडून म्हणाला—"तें पहा तें झुडुप हलत आहे. आपल्या साथीदारावर बाण सोडणारा त्या झुडपाआड लपलेला असणार." असें म्हणत तो व त्याच्या पाठोपाठ इतर मगरमाणसें जाऊं लागलीं.



विरूपाला येत असलेल्या संकटाची चांगली कल्पना होती. त्यानें धूमक व सोमक दोघांना थोडें पुढें यायला सांगितलें व आपल्या गुडघ्यावर बसून व थोडा वांकून आणि शुडूप जोर जोरानें हलवून तो असा कांहीं विचित्र आवाज काढून ओरडला कीं सोमक व धूमक पण थक झाले. विरूपा जंगलांत जन्मला व जंगलांतच लहानाचा मोठा झाला होता. आपल्या सवंगड्याबरोबर खेळा खेळांत त्यानें रानटी श्वापदांचें ओरडणें शिकून घेतलें होतें व तें त्याला आज उपयोगी पडलें. वाघासारखी त्यानें एक डरकाळी फोडली व ती ऐकून मगर माणसांची गाळण उडून गेली. त्यांच्या पैकीं जो पुढें होता तो घाईत तोंडघशीच पडला. मागचे दोघे तिथे जागच्या जागीं उभे राहाले व अगदीं सर्वांमागें जे होते ते पळूं लागले. एक जण ओरडला–“ वाघ....! मोठा वाघ....पळा !”

“ हा साधा वाघ नसून उपाशी वाघ दिसतो आहे.” दुसरा म्हणाला.

“ अरे ठोंब्यासारखा उभा काय आहेस ? पहिल्यानें बाहेर पळ काढ. नुकतीच व्यायलेली वाघीण वाटते आहे.” आणखी एक जण म्हणाला.

तिकडे ते सर्व असे बोलत असतां इकडे धूमक व त्याचे दोघे साथी झुडपांतून मागें मागें सरकत डोंगराकडे जाऊं लागले. संकट टळल्यासारखें वाटून त्यांना थोडा धीर आला.

सोमकनें विरूपची पाठ थोपटली व स्मित करून म्हणाला–“ विरूपा ! तूं काय पण युक्ति काढलीस रे ? थर थर कांपत आहेत ते सर्व !”

पण धूमकला तें संकट त्या वेळेपुरतेंच टळल्यासारखें वाटलें. तो कांहीं तरी विचारांत गर्क झालेला दिसला. त्या दोघांनीं फार मोठी जबाबदारी स्वत: वर घेतली होती. कालिकली राक्षसाच्या हातांतून राजकन्येला सोडविणें म्हणजे थट्टा नव्हती. पण हिंमत हारून बसणारा पैकीं तो नव्हता. तरी संकट कांहीं वेळापुरतेंच टळलें आहे, या गोष्टीची पुरी कल्पना त्याला होती. म्हणाला–“ यांच्या हातांतून आपण वांचलों, समज ! पण ती दुसरी तुकडी कोठें आहे कोणास ठाऊक ?” असें म्हणत त्यानें सहज, ते ज्या झाडावरून खालीं उतरले होते त्या झाडाकडे पाहालें आणि दचकून मागें सरकला. दोघे झाडावर चढून त्यांच्याकडेच पहात होते. म्हणाला–
“ सोमू ! विरूपा ! त्यांनीं पाहालें आहे आपल्याला. आतां सुटका नाहीं. दोन्ही तुकड्या एक होऊन आपल्याला गाठणार. त्या फांदीवर उभे आहेत ते दिसले का तुम्हांला ?”

धूमक इकडे विचारीतच होता. फांदीवरून ते दोघे ओरडले–“ अरे वाघ बीघ कांहीं नाहीं. ते तिथे आहेत. उंचवट्याच्या आड उभे आहेत. त्यांना रानांत पळूं देऊं नका. त्यांना चारी बाजूनें गराडा घालून पकडा. चला !”



“ अस्सं ! तरमग राक्षसाच्या नोकरांनो ! तुम्ही आम्हांला पाहिलेंत काय ? धूमका त्या दोघांना बाण मारून आतां खालीं पाडतों.” असें म्हणत सोमकनें एक बाण चढवलाच.

“ पहिल्यानें एकच बाण सोड. ते घाबरून झाडावरून खालीं उतरतील. नंतर कोणी उंचावरून आपण कोठून पळतो आहों पाहणार नाहीं आणि आपल्या विषयीं कांहीं सांगूं पण शकणार नाहीं.” धूमक सोमकला म्हणाला.

त्या पूर्वींच सोमकनें बाण सोडला देखील आणि त्याचा नेम झाडावर चढलेल्या एकाला

लागला. तो ओरडून खालीं पडणार होता. पण त्यानें पडत असतां दुसऱ्याची कंबर धरली. म्हणून तोल न राहल्यानें दुसऱ्याच्या हातांतली फांदी निसटली व दोघे धाड दिशी खालीं पडले.

"एक बाण व दोन शिकार!" विरूप मोठ्यानें ओरडला. ओरडल्यानें त्यांच्यावर केवढें मोठें संकट ओढवणार आहे, तिकडे त्याचें लक्षच गेलें नाहीं.

"पळा पळा! डोंगराच्या वळणावर दाट जंगल आहे. तेथपर्यंत आपण जाऊं शकलों तर हे राक्षससेवक आपलें कांहीं एक करूं शकणार नाहींत. आपली वाट त्यांनीं अडवून धरली नाहीं म्हणजे पुरे. इकडून भाल्याचा मारा पण करतील." धूमक म्हणाला.

डोंगराच्या वळणापर्यंत एक पाऊल-वाट जात होती. त्या पाऊल वाटेनें राक्षससेवक येत जात असत. जवळ पासच्या गांवांची लुटालूट करायला ते याच वाटेनें जात.

धूमक व त्याचे दोघे मित्र त्याच वाटेनें पळूं लागले. त्याच वळणावर शत्रूची नाव काठा[illegible] होती.



धूमकला भीति वाटत होती तशी शत्रूच्या दोघा टोळ्यांनीं मिळून त्यांच्यावर हल्ला केला नाहीं. त्यांच्या पैकीं एक टोळी डोंगराच्या बाजूला धांवली. तेथेंच त्यांना अडवून धरण्याचा धूमकचा विचार होता. पण दूसरी टोळी त्यांच्या पाठीमागून त्यांचा पाठलाग करीत येऊं लागली.

धूमकनें दोन्ही टोळ्यांच्या हातांतून सुटका करून घेण्यासाठीं हुलकावणी देऊन पळण्याचें ठरविलें. तो पळायला वाट कोठें मिळते हें पाहूं लागला. पण वाट दिसेना. तेथें इतके दगड व झाडें झुडपें होतीं कीं

 Fullscreen    



कोठेंहि पाय ठेवायला जागा नव्हती. ते होते तेथूनच शत्रूला तोंड देण्याशिवाय दुसरा मार्ग उरला नाहीं.

सोमू, आपला पाठलाग करणारांवर बाणांचा वर्षाव कर. मी आणि विरूप त्यांचे भाले तुझ्यावर येऊन आदळणार नाहींत हें पाहातों. कर सुरवात." धूमक म्हणाला.

सोमक एका गुढग्यावर उभा राहून जरा वांकला आणि त्यानें एका मगरमाणसाला बाण मारला. बाण लागतांच तो "मेलों, मेलों!" असा ओरडत खालीं लोळूं लागला. सोमकनें दुसरा बाण आणखी एकावर सोडला. पण तो त्याच्या छातीला लागला नाहीं. खांद्याला लागला. तो ओरडत खालीं पडला. मगरमाणसांनीं पाय मागें घेतला आणि पळूं लागले.

"सोमू, विरूपा, डोंगराच्या वळणाच्या बाजूनें जे आपल्याला अडवण्यासाठीं येत आहेत त्यांच्यावर देखील हाच मंत्र टाकला पाहिजे. शत्रूनें आपल्यावर फेंकलेले भाले कोठें आहेत?" असें म्हणत धूमक दोन भाले उचलून घेऊन समोर पळूं लागला. विरूप व सोमकदेखील आणखी भाले उचलून त्याच्या पाठोपाठ पळूं लागले.

या अवधींत मगरमाणसांची दुसरी टोळी डोंगराच्या वळणावर येऊन पोंचली. भाले घेऊन समोर धांवत येत असलेल्या धूमक वगैरेंना पाहून ते म्हणाले--"शस्त्रास्त्र खालीं ठेवा! आम्ही रक्तपात केल्याशिवाय तुम्हांला कालिकेली राक्षसाच्या पाताळ-कोटांत घेऊन जाऊं. पण तुम्ही आमचें ऐकलें नाहीं तर तुमचें आयुष्य संपलें, एवढें लक्षांत असूं द्या." ते ओरडून सांगूं लागले.

[पुढील गोष्ट पुढील अंकीं]



# विजयपाल

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतलें आणि श्मशानाच्या दिशेनें चालूं लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तूं हें काम कोणत्या तरी कुमुहूर्तावर सुरू केलें असावेंस असें मला वाटतें. म्हणूनच मागें विजयपाल नांवाच्या राजाच्या शत्रूंना त्याच्याशीं युद्ध करीत असतां विजयप्राप्ती झाली नाहीं. तुला मी त्यांची गोष्ट सांगतों. लक्ष देऊन ऐक." असें सांगून तो गोष्ट सांगूं लागला.

एके काळीं हस्तिनापुर येथें विजयपाल नांवाचा राजा राज्य करीत असे. त्याच्या राज्याच्या सरहद्दीला लागून पांच लहान लहान राज्यें होतीं. तेथील राजांचीं नांवें अनुक्रमें समरबल, समरशूर, समरजीत,



प्रतापचंद्र व प्रतापसेन अशीं होतीं. विजयपालाच्या राज्याच्या मानानें त्यांचीं राज्यें फार ल्हान होतीं. अर्थातच त्यांना नेहमीं विजयपाल याचा वचक भासत असे. विजयपालच्या वैभवासमोर त्यांचें वैभव त्यांना फिकें वाटे व त्यामुळें त्यांना त्याच्या वैभवाचा हेवापण वाटत असे.

परंतु त्यांच्या पैकीं एकाच्याहि अंगांत एकट्यानें विजयपालशीं युद्ध करण्याची छाती नव्हती. म्हणून पांचहि जणांनीं मिळून सला करून एकदम त्याच्या राज्यावर स्वारी करण्याचें ठरविलें. तो एकटा किती मोठें सैन्य घेऊन आला तरी त्याची शेखी जिरवितां येईल अशी त्यांना खात्री वाटत होती. एकदां त्याची मान खालीं झाली कीं प्रत्येक जण आपला मानमरातब वाढविण्यास स्वतंत्र होईल असा त्यांनीं विचार केला असावा.

त्यांनीं विजयपालाच्या राज्यावर स्वारी करण्याचें ठरवून एका ज्योतिष्याला युद्ध सुरू करण्यास चांगला मुहूर्त पाहून सांगायला सांगितलें. म्हणाले—"हस्तिनापुरच्या राज्यावर स्वारी करावयाची आहे."

ज्योतिष्यानें आडव्या उभ्या रेषा काढून व तिथि, नक्षत्र पाहून सांगितलें कीं यावर्षी युद्ध सुरू करण्यास एकही चांगला मुहूर्त नाहीं. म्हणून या वर्षी युद्धाचा विचार करूं नये. आपद्धर्म म्हणून हवा असेल तर एक मुहूर्त हुडकून सांगूं शकेन. परंतु त्या मुहूर्तावर युद्ध सुरू केल्यास युद्धांत यश मिळेलच याची निश्चिती नाहीं.

पांचहि जणांना ज्योतिष्याचें बोलणें मुळींच आवडलें नाहीं. म्हणाले "जय कीं पराजय तो आमच्यावर सोडून द्या. युद्ध सुरू करण्यास प्रस्थान करण्यासाठीं चांगला मुहूर्त सांगा. तेवढा आम्हांला पुरे."

ज्योतिष्यानें त्या परिस्थितींत त्याला बरा वाटला तो मुहूर्त सांगितला.

त्या मुहूर्तावर पांचहि जण आपापलें सैन्य घेऊन युद्धाला निघाले. त्यांच्या संयुक्त आघाडीच्या सैन्यांत एकूण तीस हजार हत्ती, तीन लाख घोडे व दहा लाख पायदळ सैन्य होतें.

विजयपालचें सैन्य त्या मानानें ल्हान होतें. त्याच्या सैन्यांत फक्त दहा हजार हत्ती एक लक्ष घोडे, व पांच लाख पायदळ सैन्य होतें. शत्रूचें सैन्य त्याच्या सैन्याच्या दुप्पट होतें. पण विजयपालला त्याचें मुळींच भय वाटलें नाहीं. आपल्या शूर सरदारांना बरोबर घेऊन तो युद्धाला निघाला.

त्या युद्धांत त्याला जय मिळाला. एवढेंच नव्हें तर त्याचे तीन शत्रू युद्धांत कैद पण झाले. त्यांच्या सैन्याची पांगापांग झाली. विजयपालनें तिघां शत्रूंना कांहीं दिवस कैदेंत ठेवलें व त्यानंतर त्यांना नुसतें सोडलेंच नाहीं, तर त्यांना त्यांचीं राज्यें पण परत दिलीं.

वेताळ येथवर गोष्ट सांगून राजाला म्हणाला—"विजयपालचें सैन्यबळ शत्रूच्या मानानें पुष्कळच ल्हान होतें. तरी युद्धांत



त्यांचा पराभव झाला, याला कारण काय? चांगला मुहूर्त पाहून ते निघाले नाहींत म्हणून कीं विजयपाल हा त्या सर्वांहून जास्त पराक्रमी होता म्हणून? रणांगणावर विजयपालला पाहतांच त्यांचा धीर खचला असावा असें वाटतें का तुला? या सर्व प्रश्नांचें उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीत आहेच, तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

विक्रमार्क म्हणाला—"निरनिराळीं सैन्यें एकत्र झाल्यानें सैन्यबळ वाढलें नव्हतें. कारण सर्वांना एकत्र युद्धाचें शिक्षण मिळालेलें नव्हतें. मग त्यांच्यांत एक सूत्रता किंवा एकी कशी उत्पन्न होणार? ज्योतिष्यानें सांगितल्याप्रमाणें एक वर्ष थांबून त्यांनीं त्या अवधीचा उपयोग एकत्र होऊन शत्रूला तोंड देण्यास आवश्यक तें शिक्षण सैन्याला देण्यासाठीं केला असता तर ते विजयपाल याला खात्रीनें जिंकूं शकले असते. आपलें मोठें सैन्य व सर्व एकत्र होऊन युद्धाला आलों आहों हें पाहूनच विजयपाल पळून जाईल असें त्यांना वाटलें होतें. म्हणूनच त्यांचा पराभव झाला. त्यांनीं एकेकट्यानें युद्ध केलें असतें तर त्याचा जो परिणाम झाला असता तोच एकत्र होऊन युद्ध केलें असून सुद्धां झाला. मुहूर्त बरोबर होता कीं नाहीं, याचा विचार करण्याची गरजच नाहीं. कारण चांगला मुहूर्त विजयपालला तरी कोठें मिळाला होता? पण त्याला युद्धांत यश मिळालें."

अशा प्रकारें राजाचें मौनभंग होतांच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व जाऊन झाडाला लोंबकळूं लागला. (कल्पित)





# पूरणदास

पूरणदास याचे वडील मोहिनीवाल नांवाच्या एका छोटेखानी संस्थानांत एक अधिकारी होते. जुन्या पद्धतीवर दरबारचीं कामें चालत. पाश्चिमात्य सभ्यतेविषयीं महाराजांच्या मनांत आदर बेताचाच होता. आगगाड्या, तार आणि टेलीफोन हें सर्व महाराजांना मुळींच आवडत नसे.

परंतु पूरणदासच्या वडिलांना मनू पालटत असल्याचें स्पष्ट दिसत होतें. म्हणून त्यांनीं आपल्या मुलाला इंग्रजी शाळेंत घातलें. तो मॅट्रिक पास झाला.

पूरणदास मुंबई विश्वविद्यालयांत शिकून पदवीधर झाला आणि संस्थानच्या एका ऑफिसांत नोकरीला लागला. त्यानें महाराजांच्या जुन्या विचारांना धक्का पोंचेल असें कधीं कांहीं केलें नाहीं. पायरी पायरी चढत जाऊन तो संस्थानचा दिवाण झाला. त्या काळांत राजापेक्षां संस्थानांत दिवाणालाच जास्त अधिकार असत.

वृद्ध महाराजांच्या मृत्यूनंतर युवराज गादीवर आले. पूरणदासचा मानमरातब वाढला. कारण नव्या महाराजांना इंग्रजी शिक्षण मिळालें होतें व त्यांना इंग्रजांविषयीं तिटकारा वाटत नसे.

नव्या महाराजांच्या राणीच्या नांवावर पूरणदासनें एक मुलींची शाळा काढली, रस्ते बनविले व शेतकी कामाला उपयोगी पडणारी साधनें व हत्यारें यांचें एक प्रदर्शन भरविलें.

हें सर्व पाहून भारत सरकार व इंग्रज सरकार दोघांची पूरणदासावर फार मर्जी बसली. व्हायसराय व गव्हर्नर साहेब यांच्याशीं त्याची ओळख झाली. त्याला



इंगलंडमधून खास निमंत्रण आलें. तेथें जगप्रसिद्ध पुढाऱ्यांशीं व विद्वानांशीं त्याची ओळख झाली. तेथें त्यानें व्याख्यानें दिलीं व फार मोठी कीर्ति संपादन केली.

स्वदेशीं परत आल्यावर त्यानें प्रायःश्चित्त केलें आणि दानधर्म केला.

पूरणदासनें विलायतचा प्रवास केला त्याचा परिणाम म्हणून महाराजांवर इंग्रज सरकारची मर्जी झाली व इंग्लंडच्या राजानें त्यांना एक पदवी व सुवर्णपदक देऊन त्यांचा सन्मान केला. पूरणदासला 'सर' ही पदवी आणि के. सी. आय. ई. ही उपाधि मिळाली.

त्यानंतर एका महिन्यानें पूरणदासनें सर्व संगपरित्याग करून संन्यास घेतला. कालपर्यंत जो एक दिवाण होता तो सर्व अधिकार सूत्रें सोडून हातीं कुबडी व कमंडलु घेऊन आणि भगवीं वस्त्रें परिधान करून घराबाहेर निघाला.

अशा तऱ्हेनें पूरणदासनें अकस्मात् सर्वस्वावर पाणी सोडलेलें त्याच्या इंग्रज मित्रमंडळींना आवडलें नाहीं व त्याचें कारणहि कळलें नाहीं. मनुष्य मळकीं जुनीं वस्त्रें सोडून देतो तसें पूरणदासनें स्वतःचा वाडा, दीवाणाचा पोशाख, नातेंगोतें, मानमरातब सर्व सोडून दिलें आणि पायीं हिंडूं फिरूं लागला. त्याच्याबरोबर कोणी नव्हतें. कोणी जें देईल तें खावयाचें. कांहीं जमवून ठेवायाचें नाहीं कीं एका जागीं रहावयाचें नाहीं. काळोख पडला कीं तो कोणत्या तरी मठांत किंवा आश्रमांत व तें हि नसेल तर मैदानांतच आपलें आसन अंथरून त्याच्यावर विश्रांती घेई.

अशा तऱ्हेनें अनेक दिवस पायीं प्रवास करीत तो हिमालयापर्यंत पोंचला. आतां लोक त्याला पूरणदास या नांवाऐवजी पूरणभक्त या नांवानें ओळखूं लागले. तो





तिबेटच्या वाटेनें हिमालय पर्वत चढूं लागला. कित्येक दऱ्याखोऱ्यांतून ती वाट गेली होती. त्या वाटेनें जात तो हिमालयाच्या उंच शिखरावर येऊन पोंचला. तेथें जिकडे पहावें तिकडे बर्फ दिसे. मधून मधून एखादें देवदारूचें झाड नजरेस येई. एका देवदारूच्या झाडींत काळीमातेचें एक देऊळ होतें. त्यानें तें देऊळ झाडून स्वच्छ केलें. देवीच्या देवळामागें त्यानें एक धुमी पेटविली आणि तिच्या जवळ कांहीं वेळ विश्रांती घेतली.

त्या देवळासमोर एक मोठी खोल दरी होती. त्या दरींत एक गांव होतें.

ओसाड पडलेल्या देवळाजवळून धूर आकाशांत वर येत असलेला पाहून गांवाचा पुरोहित देवीच्या नव्या भक्ताच्या स्वागतासाठीं आला.

पूरणभक्ताला पाहून त्यानें त्याला नमस्कार केला आणि कांहीं बोलल्याशिवाय निघून गेला. तो भिक्षापात्र घेऊन गांवभर हिंडत गांवकऱ्यांना सांगूं लागला कीं कोणी तरी महापुरुष आला आहे. कोणी परदेशी दिसतो आहे.

गांवकऱ्यांनीं आपापल्या शक्तिप्रमाणें निरनिराळे पदार्थ शिजवून भिक्षापात्रांत घातले. पुरोहितानें ते सर्व पदार्थ पूरणभक्ताला नेऊन दिले.

पूरणभक्त देवीच्या मूर्तीसमोर देहभान विसरून बसून राही. देवी, देऊळ, पर्वतशिखर, झाडेंझुडपें हीं सर्व त्याच्याहून कांहीं निराळी आहेत असें त्याला वाटत नव्हतें. त्याचा जीव आणि आत्मा त्या सर्वांत व्याप्त होऊन गेला होता. क्वचित कधीं त्याला त्या आत्मविस्मृतींतून जाग येई.

दररोज त्या खेडेगांवांतून कोणी तरी येऊन त्याच्यासाठीं पुरेसें जेवण ठेवून जाई. तो येण्यापूर्वीं त्या देवळांत अनेक रानटीं



जनावरें येत व तो आल्यानंतर देखील येत जात. पण त्याला ध्यानमग्न स्थितींत बसलेला पाहून व ती मूर्तच असेल असें समजून तीं निघून जात.

सुरवातीला माकडें येऊं लागलीं. तीं प्रत्येक वस्तु हाताळून पहात. कमंडलु, काठी, आसन सर्व उचलून व दातांनीं चावून पहात. खाण्यासारखें कांहीं नाहीं हें समजल्यावर टाकून निघून जात.

त्या साधूपासून आपल्याला कांहीं भीति नाहीं हें कळल्यानंतर संध्याकाळच्या सुमारास माकडें झाडावरून उतरून येत व तो खायला देई ते खात. थंडी वाजूं लागली कीं शेकोटीजवळ जाऊन बसत. एक माकड रात्रीं त्याच्याजवळ घोंगडीखालीं पडून राही.

माकडांच्या पाठोपाठ हरणें येऊं लागलीं. तो हळुवारपणानें त्यांच्या अंगावर हात फिरवी. पुढें एक कस्तूरी मृग व एक अस्वलपण येऊं लागलें. तो त्यांना 'भाई' म्हणून हांक मारी.

अशींच कांहीं वर्षे लोटलीं. एके वर्षी पावसाळ्यांत खूप पाऊस पडला. कालीच्या देवळापर्यंत ढग पोंचत नसत. खालीं खोऱ्यांपर्यंतच ते पोंचत. म्हणून पूरणभक्ताला एकेक महिना खोऱ्यांतलें गांव दिसत नसे.

एकदां रात्रीं त्याची झोप मोडली. कोणी त्याची शाल ओढीत होतें. त्यानें चांचपून पाहिलें तर माकडाचा हात. त्याला वाटलें माकड शालीखालीं झोपायला आलें असेल. पण तें तर त्याचा हात धरून ओढीत होतें. कदाचित त्याला थंडी वाजत असेल किंवा भूक लागली असेल असा विचार करून तो शेकोटीजवळ गेला, पण माकड दरवाज्याकडे जाऊं लागलें. पुन्हां परत येऊन त्याला बाहेर येण्यासाठीं ओढूं लागलें. त्याला काय हवें आहे, पूरणभक्ताला कळेना.

इतक्यांत एक हरण आलें व त्याला पाठीमागून डोक्यानें ढकलूं लागलें. तेवढ्यांत देवळाच्या जमिनीचे दगड दुभंगल्याचें त्याच्या नजरेस आलें. पलीकडे खालीं पायऱ्यांवर त्याला कोणी चालत असल्याची चाहूल लागली. पण डोंगरच कोसळत घसरत होता. तें सर्व प्राणी त्याला सावध करण्यासाठीं आले होते.

पूरणभक्तानें लगेच आपली कुबडी उचलून घेतली आणि हरणाच्या पाठीवर हात ठेवून कालीच्या देवळांतून खालीं उतरूं लागला. वाटेंत खांच खळगे होते. पाऊस पडत होता. पण पूरणभक्ताचें तिकडे मुळींच लक्ष नव्हतें. त्याच्या पाठोपाठ त्याची मित्रमंडळी माकडें व हरणें पण येत होतीं.

खोऱ्यांत खालीं गांवांत पोंचतांच त्यानें लोहाराच्या घराचें दार खडखडवलें व म्हणाला—" बाहेर या !"

त्याचा आवाज कोणी ओळखला नाहीं व आंतूनच विचारलें—" कोण ?"



" डोंगर कोसळत आहे ! लवकर बाहेर या !" तो म्हणाला.

ती बातमी गांवभर पसरली. त्या खेडेगांवांत सुमारें सत्तर लोक रहात असत.

" दरीच्या पलीकडच्या डोंगरावर सर्व पळा, कोणी इकडे राहूं नका." तो म्हणाला.

दरींतली नदी ओलांडून सर्व पलीकडचा डोंगर चढूं लागले. त्यांच्या पाठीमागून पूरणभक्त आपल्या हरणांबरोबर डोंगर चढूं लागला. तो देवदार वृक्षांच्या एका झाडींत जाऊन उभा राहिला. तो जेथें उभा होता ती जागा दरीच्या तळापासून सुमारें पांचशें










फुट उंचावर होती. तेथें पूरणभक्त घेरी येऊन जमिनीवर पडला.

सुरवातीला हळूहळू वारा सुरू झाला. नंतर तो वाढत गेला आणि शेवटीं एक प्रलयकाळच सुरू झाल्यासारखा भयंकर आवाज ऐकूं येऊं लागला. ज्या डोंगरावर सर्व गांवकरी उभे होते तो डोंगर एकदां हादरला. नंतर पांच मिनिटांनीं सर्वत्र शांत झालें. कळोखांत काय झालें, कोणाला कांहीं कळलें नाहीं.

गांवकरी उजाडेपर्यंत झाडाखालीं वाट पहात बसले होते. उजाडल्यावर सर्व दरी, कोसळलेल्या डोंगराच्या मातीनें व खडकानें भरून गेलेली दिसली. समोर डोंगरावर झाडें नव्हतीं कीं तें देऊळ नव्हतें. देवळा-पर्यंत जाणारा रस्तापण दिसत नव्हता. तांबड्या मातीचें एक मैदान दिसत होतें. एक मैलभर लांबरुंद उंचवटा कोसळून खोऱ्यांत पडलेला होता. नदीचें पाणी अडवलें गेलें होतें व तांबड्या पाण्याचें एक मोठें सरोवर झालेलें दिसत होतें.

गांवकरी पूरण भक्त होता तेथें आले. त्याच्याजवळ हरण उभें होतें तें त्यांना पाहून पळून गेलें. पूरणभक्त एका झाडाला टेंकून कुबडी धरून निश्चेष्ट बसला होता. तो इहलोकाचा प्रवास पूर्ण करून परलोकीं निघून गेला होता.

"एका उत्तम संन्याश्यानें समाधींत असतां देह ठेवावा तसाच या भक्तानें आपला देह ठेवला आहे." पुरोहित म्हणाला.

पूरणभक्ताच्या पहिल्या पुण्यतिथीला त्याच्या नांवानें एक देऊळ त्या जागीं बांधण्यांत आलें व त्या दिवसापासून त्या पर्वताला भक्तपर्वत हें नांव पडलें.





# परोपकारी गोपाळ

एकदां लक्ष्मी शेजारच्या मैत्रिणींबरोबर दुसऱ्या एका गांवीं आठवड्याच्या बाजाराला गेली असतां वाटेंत एका झाडाखालीं एक बाई कण्हत असलेली त्यांना दिसली. तिचें पोट दुखत होतें. ती एक भिकारीण होती व गरोदर होती.

लक्ष्मी तिला आपल्या घरीं घेऊन गेली. तिचें नांव शारदा असें होतें. एक खोली रिकामी करून तिला अंथरूण घालून झोंपविलें आणि सुईणीला बोलवून आणलें. यथासमयीं ती बाळंत झाली.

काळोख पडल्यावर गोपाळ घरीं आला तेव्हां तान्ह्या मुलाचें रडणें ऐकून त्याला आश्चर्य वाटलें. लक्ष्मीनें आश्चर्य करण्याचें कांहीं कारण नाहीं असें स्मित करून सांगितलें. घडलेलें वृत्त ऐकून व बायकोनें दाखवलेली कर्तव्यबुद्धि पाहून गोपाळला आनंद झाला.

शारदाला पाहून ती भिकारीण असेलसें लक्ष्मीला वाटलें नाहीं. तिच्या बोलण्या वागण्यावरून ती चांगल्या घराण्यांतली दिसली. तिच्या गळ्यांत सोन्यानें गांठवलेलें मंगळसूत्र होतें. एवढेंच नव्हे, तर आपल्या गाठोड्यांतून दोन सोन्याच्या बांगड्या लक्ष्मीच्या हातांत देत ती म्हणाली—"माझ्याजवळ आहे तें एवढेंच आहे. माझ्यावर तुमचे जे उपकार आहेत त्यांची फेड एवढ्यानें होणें शक्यच नाहीं. अशाच प्रसंगासाठीं मी हें जपून ठेवलें होतें."

लक्ष्मी म्हणाली "आमचे उपकार ते काय आणि कर्ज तें काय? तें फेडण्याचा विचार मनांतून काढून टाक. अडीअडचणी-



साठीं हें आपल्याजवळच ठेव. आणि हां ग, तूं चांगल्या घरची दिसते आहेस. मग हा प्रसंग तुझ्यावर कसा काय आला?"

"दैव! आणखी काय? माझे आईवडील आतां या जगांत नाहींत. एका गरिबाशीं कोणाला कळल्याशिवाय माझें लग्न झालें. त्यामुळें आमची नातेवाईक मंडळी आमच्यावर रागावली. मी गरोदर आहे हें कळल्यावर त्यांनीं मला घराबाहेर काढलें. मी आपल्या पतीबरोबर मोलमजुरी करीत व भीक मागत आपला उदर निर्वाह करीत आलें. आम्ही दोघं मिळून भीक मागायला जात होतों तेव्हां आम्हांला कोणी भीक घालीत नसे. म्हणून आम्ही निरनिराळे भीक मागूं लागलों. संध्याकाळीं आम्ही भेटत होतों. मी ज्या झाडाखालीं बसलें होतें तेथेंच आम्ही दोघं भेटत होतों. पण तें आज होऊं शकलें नाहीं." शारदा म्हणाली.

तें सर्व ऐकून लक्ष्मी व गोपाळ दोघांना आश्चर्य वाटलें.

अकराव्या दिवशीं सोयरांतून बाहेर आल्यावर देखील शारदाला तिचा नवरा भेटला नाहीं. तो आला नाहीं याबद्दल शारदाला आश्चर्य किंवा काळजी वाटलेली दिसली नाहीं. तें पाहून गोपाळला थोडी शंका आली.

दोन दिवसांनीं गोपाळच्या घरीं पोलिसांनीं येऊन चवकशी केली "काय हो? तुमच्या घरीं शारदा नांवाची कोणी बाई आली आहे का."

"कोण शारदा? काय भानगड आहे?" गोपाळनें त्यांना विचारलें."

तिचा परदेशी नांवाचा नवरा फरार आहे. त्यानें एका सरकारी अधिकाऱ्याचा खून केला आहे. त्याला कैद करण्यासाठीं गेले सहा महिने शोध चालू आहे. परदेशीला कैद करतां आलें नाहीं तर त्याच्या बायकोला कैद करावें, अशी राजाज्ञा आहे. तिला तिच्या पतीची माहिती नक्कीच असणार. चवकशी करतां आम्हांला कळलें कीं ती गरोदर स्थितींत आपणांकडे आली व प्रसूत होऊन तूर्त आपल्याकडे राहाते. तिला कैद करण्यासाठीं आम्ही आलों आहों."

"अरे, पण बाळंतिणीला तुम्ही कसं काय कैद करणार? शारदा गरोदर आहे हें महाराजांना कळलें असतें तर त्यांनीं तिला कैद करण्यासाठीं आज्ञा कधींच काढली नसती." गोपाळ म्हणाला.

कैद करायला आलेला फौजदार जरा रागानें म्हणाला—"या सर्व उठाठेवी तुम्हांला कशाला? आम्ही परदेशीचा शोध लागावा म्हणून त्याच्या बायकोला कैद करून नेणार! आमचें काम आम्हांला केलेंच पाहिजे."

"मीच तो परदेशी आहें!" गोपाळ म्हणाला. फौजदार व शिपाई परस्परांकडे पाहूं लागले. फौजदारानें गोपाळच्या हातांत हातकड्या घातल्या व म्हणाला—"चल!" आणि तो गोपाळला बरोबर घेऊन निघाला.

लक्ष्मी हें सर्व पहात तेथेंच उभी होती. पण ती कांहीं बोलली नाहीं. पण





शिपाई गोपाळला धरून घेऊन चालले तेव्हां शारदा रडत बाहेर आली व म्हणाली—"त्यांना पकडूं नका. ते नाहींत माझ्या मुलाचे वडील. त्यांनीं कोणाचा खून केला नाहीं."

"तूं कांहीं घाबरूं नकोस. माझ्यावर कोणतेंहि संकट येणार नाहीं." गोपाळ म्हणाला.

लक्ष्मीनें शारदाला नीट समजावून सांगितलें. म्हणाली—"तूं गप्प रहा. कांहीं घाबरण्याचें कारण नाहीं. जें कांहीं होत आहे तें पहात रहा."

गोपाळला हातकड्या घालून पोलीस धरून घेऊन जात असलेले पाहून गांवकरी चकित होऊन पाहूं लागले. गोपाळशीं ज्यांचें पटत नव्हतें ते म्हणूं लागले—"हा गोपाळ म्हणजे तुम्हांला सामान्य मनुष्य वाटला होय? जगाच्या दृष्टीआड यानें दुसऱ्याची बायको घरांत आणून बसविली आहे. तिचें तोंड यानें काळें केलें आणि ती कोठें जायला तयार नाहीं. बिंग बाहेर पडलें तेव्हां पोलीस स्वारीला धरून घेऊन निघाले आहेत."

पोलीस ठाण्यावर गोपाळला घेऊन जाऊन पोलीस शिपाई म्हणाले—"हाच तो परदेशी नांवाचा गुन्हेगार!"

कोतवाल गोपाळला मॅजिस्ट्रेटच्या कोर्टांत घेऊन गेला. मॅजिस्ट्रेटनें गोपाळला पाहून कोतवालाला विचारलें—"डोकें ठिकाणावर आहे ना कोतवाल साहेब? अहो, हा मनुष्य खुनी? तुम्हांला हाच वाटला का तो परदेशी? पहिल्यानें यांच्या हातांतल्या हातकड्या काढा पाहूं?"

इतक्यांत एक मनुष्य धांवत येऊन कोर्टांत हजर झाला व म्हणाला—"यांना सोडा! हे एक धर्मात्मा देवमाणूस आहेत. मीच तो परदेशी!"

गोपाळनें चकित होऊन त्याच्याकडे पाहिलें. त्याची दाढी वाढलेली होती. केस पिंजारलेले होते. बरेच दिवस आजारी असलेल्या माणसासारखे डोळे खोल गेले होते. अंगांत फाटके कपडे होते.

मॅजिस्ट्रेटनें त्याला विचारलें—"तूं आहेस का परदेशी? तुला पकडण्यासाठीं किती प्रयत्न चालू होते? बस तेथें. तुझा गुन्हा काय हें आतां कळेल तुला.

नंतर मॅजिस्ट्रेटनें गोपाळला खरी हकीगत सांगितली. माजी मॅजिस्ट्रेटचा खून या परदेशीनें केला नसून दुसऱ्याच एका दुष्टानें केला होता. त्या दुष्टानें खून केल्यावर सुरा या परदेशीच्या पुस्तकांखालीं लपवून ठेवला होता. परदेशी मॅजिस्ट्रेटच्या कचेरींत कारकून होता. संशयावरून त्याला अटक झाली. कदाचित फांशीची शिक्षा होईल या भीतीनें हा कैदेतून पळाला. म्हणून याला फरार खुनी समजून शोध सुरू झाला. पण कांहीं दिवसांपूर्वीच खरा खुनी कोठेंतरी दंग्यांत ठार झाला. मरतेवेळीं त्यानें शिपायांजवळ, त्यानेंच मॅजिस्ट्रेटचा खून केला असल्याचें सांगितलें. म्हणून



      



परदेशीवर जो आरोप होता तो दूर झाला. परदेशीला पुन्हां कामावर रुजूं व्हायला परवानगीचें पत्र महाराजांकडून आलें. परंतु ही गोष्ट पोलीसांना कळली नव्हती. व परदेशीला पण कळलेली नाहीं. म्हणून तो आपला जीव वांचविण्यासाठीं लपत छपत फिरत आहे.

परदेशीचा शोध लागला नाहीं तेव्हां महाराजांनीं नुकसानभरपाईचे पैसे त्याच्या बायकोला द्यावे अशी आज्ञा काढली. कोतवाल व पोलीस हें सर्व माहीत नसल्यामुळें परदेशीचा शोध लागावा म्हणूनच त्याच्या बायकोचा शोध काढून तिला कैद करण्यासाठीं प्रयत्न करीत होते.

मैजिस्ट्रेटनें गोपाळची माफी मागितली. गोपाळ म्हणाला—"अशा तऱ्हेची आनंदाची बातमी मिळण्यासाठीं कांहीं दिवस तुरुंगांत रहावें लागलें तरी मला हरकत नाहीं. बरें तर मी परदेशीला प्रथम आपल्याबरोबर घरीं घेऊन जातों आजच त्याच्या मुलाचें बारसें आहे. या आनंदाच्या वेळीं तो हजर राहूं शकेल."

"हो हो, घेऊन जा त्यांना! त्यांच्यावर कांहीं आरोप नाहीं." असें सांगून मैजिस्ट्रेटनें खजीनदाराला बोलावून परदेशीला सरकारकडून मंजूर झालेली नुकसान भर-पाईची रक्कम आणि गोपाळला वाटखर्चाला पैसे देवविले.

गोपाळ तिच्या नवऱ्याला बरोबर घेऊन येत असलेला पाहून शारदाला परमानंद झाला. परदेशीनें व शारदानें गोपाळचे व लक्ष्मीचे आभार मानून त्यांना नमस्कार केला.



# मंत्रप्रभाव

काशीचा राजकुमार चंद्रभानु आपल्या वडिलांना किंवा आपल्या भावंडांना कांहीं कळविल्याशिवाय एकदां देशभ्रमणाला निघाला. तो दाट रानांत पोंचला. त्याला रानाबाहेर कसें व कोठून निघावें हें कळेना. संध्याकाळच्या सुमारास त्याला एक घर दिसलें. त्या घरांत एक म्हातारी व एक मुलगी रहात होती. चंद्रभानूला हें कळेना कीं अशा दाट रानांत सोबतीला पुरुष नसतां दोघी बायका कशा काय राहात आहेत. त्यानें तसें म्हातारीला विचारलें.

"सर्वांचें रक्षण करणारा तो परमेश्वर आहे. मला जागचें हलणें देखील अशक्य झालें आहे. पण माझी मुलगी ही चंद्रिका मला कसलीहि उणीव भासूं देत नाहीं." म्हातारी म्हणाली.

चंद्रिकेनें त्यादिवशीं उत्तम सैंपाक केला. चंद्रभानु जेवायला बसला व सर्व तयारी पाहून चकित झाला. ती मुलगी त्या म्हातारीची मुलगी असेल या गोष्टीवर त्याचा विश्वासच बसेना. कारण दोघांच्या रंगा-रूपांत त्याला पुष्कळच फरक दिसला.

ती रात्र त्या म्हातारीच्या घरींच राहण्याचें चंद्रभानूनें ठरविलें. पण त्याला झोंप येईना. जेव्हां आली तेव्हां विचित्र स्वप्नें पडूं लागलीं. स्वप्नांत तो कुत्रा होऊन एका जागीं त्याला बांधून ठेवल्याचें आणि तो भुंकत असल्याचें त्याला आढळलें. त्याची झोंप मोडली तेव्हां तो भिंतीला टेंकून बसला होता व समोर चंद्रिका उभी होती.

"मी थोडक्यांत सावध करून देतें. सूर्योदय होतांच म्हातारी येईल. त्याच्या



आधीं मी तुम्हांला जंगलाबाहेर पोंचती करीन." चंद्रिका म्हणाली.

चंद्रभानू कांहीं बोलल्याशिवाय चकित होऊन तिच्याबरोबर निघाला. वाटेंत तिनें त्याला म्हातारी विषयीं सांगितलें. त्या म्हातारीला मंत्रबळ अवगत होतें. ती केशवपूरच्या राजवाड्यांत एक दाई म्हणून काम करीत होती. त्याच वेळीं राणी बाळंतीण होऊन तिला एक मुलगी झाली. ती तिची दुसरी मुलगी. त्या मुलीच्या जागीं म्हातारीनें स्वतःची मुलगी आणून ठेवली व राजकन्येला उचलून घेऊन गेली. चंद्रिकाच ती राजकन्या होती. म्हातारी दररोज रात्रीच्या वेळीं कोठें तरी निघून जाते व उजाडल्यावर घरीं परत येते. घरांतली सर्व कामें चंद्रिका करते. म्हातारीनें चंद्रिकेला कांहीं मंत्र शिकविले होते. चंद्रिकेनें म्हातारीच्या मदतीशिवाय कांहीं मंत्र स्वतःच शिकून घेतले होते वगैरे वगैरे. हें सर्व सांगून चंद्रिका म्हणाली–

"रात्रीं तुम्ही झोपलां असतां म्हातारीनें मंत्र टाकून तुम्हांला कुत्रें केलें व एकाजागीं बांधून ठेवलें होतें. मी तुम्हांला पुन्हां मनुष्य रूप दिलें आहे. म्हातारी आल्या-नंतर तुमच्या विषयीं चवकशी करील तेव्हां मला कांहीं माहीत नाहीं असें उत्तर देईन. कारण जनावराचे मनुष्य करण्याची मंत्रशक्ति मला अवगत आहे हें म्हातारीला माहीत नाहीं. तुम्ही कुत्र्याच्या रूपानेंच कोठें तरी निघून गेलांत असें ती मनाचें समाधान करून घेईल. उजाडण्यापूर्वीं तुम्ही या जंगला-बाहेर पोंचलांत कीं तिच्या मंत्रबळाचा तुमच्यावर परिणाम होणार नाहीं."

"माझ्याबरोबर तूं देखील कां नाहीं म्हातारीच्या दाढेंतून आपली सुटका करून घेत?" चंद्रभानूनें विचारलें.

"मी कशी जाऊं? आमचें गांव फार दूर आहे. मी एकटी कोठें जाणार? मी आपल्या घरीं गेलें तरी मीच त्यांची मुलगी आहें, हें माझे आईवडील कसे मानतील? म्हातारी मला स्वतःच्या मुलीसारखी वागवीत आहे. अशा स्थितींत तिला सोडून जाण्यांत काय हित?" चंद्रिकेनें विचारलें.

"तुला या रानांत काय सुख मिळणार? तूं चल आमच्या गांवीं. मी तुझ्याशीं लग्न करून घेईन." चंद्रभानु म्हणाला.

"लहानपणापासून जंगलांत राहाल्यावर अंतःपुरांत मला कसें काय सुख वाटेल? माझ्याशीं लग्न केल्यानें तुम्हांला तरी काय सुख मिळेल?" चंद्रिकेनें विचारलें.

"तुझ्याशीं माझें लग्न होणार नसेल तर मी लग्नच करणार नाहीं." तो म्हणाला.

"बरें तर मी येतें. पण माझी सर्व जबाबदारी तुमच्यावर!" ती म्हणाली.

तोंपर्यंत उजाडलें नव्हतें दोघं जंगलाबाहेर पोंचलीं आणि अनेक देश हिंडत फिरत महिन्याभरानें काशीनजीक पोंचलीं. चंद्रभानूनें चंद्रिकेला एका झाडाखालीं थांबायला सांगितलें आणि म्हणाला–"राजकुमाराच्या वधूनें पायीं



राजधानींत प्रवेश केलेला मला नाहीं आवडायचा. तुला पालखींत बसवून दासदासी समवेत मंगलवाद्यें वाजवीत राजधानींत घेऊन जाईन."

"पण एकटेच घरीं गेलांत तर मला विसरून जाल. मला पायीं जाण्यांत कांहीं गैर दिसत नाहीं. मिरवणुकीची काय गरज आहे?" चंद्रिका म्हणाली.

"तूं सर्व जबाबदारी माझ्यावर टाकली आहेस ना? मग मला माझ्या मनासारखें करूं दे!" चंद्रभानु म्हणाला आणि राजवाड्यांत निघून गेला.



राजकुमार असा अचानक परत आलला पाहून सर्व चकित झाले. त्यानें त्यांच्या प्रश्नाचीं उत्तरें देण्यांत वेळ घालवला नाहीं. "मी सर्वांचीं उत्तरें देईन. पण प्रथम एक पालखी, मंगलवाद्यें आणि इतर स्वागताची तयारी करा." त्यानें आज्ञा केली.

त्याच दिवशीं चंद्रभानूच्या वडील भावाचा लग्न समारंभ होता. वधू व तिची धाकटी बहीण बायकांच्या घोळक्यांत दिसल्या. पण त्याचें मन त्याला झाडाखालीं बसलेल्या चंद्रिकेकडे ओढत होतें.

"अरे आतां तर आलास आणि लगेच कोठें जाण्याची घाई करतो आहेस. कांहीं खाऊन पाणी तर पिशील कीं नाहीं?" त्याची आई म्हणाली.

"मला वेळ नाहीं. परत आल्यावर एकदम जेवायलाच बसेन." चंद्रभानु म्हणाला.

"जेवायला वेळ नसेल तर एवढें एक फळ तरी खाऊन घ्या." असें सांगून वधूच्या धाकट्या बहिणीनें एक फळ त्याला खायला दिलें.

तें फळ हातांत घेतल्याबरोबर चंद्रभानूला चंद्रिकेचा विसर पडला आणि ज्या मुलीनें त्याला तें फळ दिलें होतें तिच्याकडे तो टक लावून पहात बसला. तिचें नांव चंद्रकला होतें. ती व तिची मोठी बहीण केशवपूरच्या राजाच्या मुली होत्या.

चंद्रकलेचें रूप पाहून चंद्रभानूला तिच्याहून सुंदर जगांत दुसरी कोण असणार असें वाटलें. त्याच्यावडील भावाबरोबर त्याचें लग्न पण चंद्रकलेशीं झालें तर किती बरें होईल असें पण त्याला वाटलें.

त्याला चंद्रकलेकडे टक लावून पहात उभा असलेला पाहून त्याची आई त्याला म्हणाली— "तुमचें दोघांचें लग्न झालें तर सर्वांना किती



बरें वाटेल! देवानें कसा वेळवर तुला घरीं आणून पोंचता केला आहे!"

चंद्रभानूनें तें ऐकून होकारार्थी स्मित केलेलें पाहून चंद्रकला गालांतल्या गालांत हंसत लाजेनें मान खालीं करून उभी राहाली.

इतक्यांत एक नोकर आला व म्हणाला— "राजकुमार! आपल्या आज्ञेप्रमाणें आम्ही पालखी व मंगलवाद्यें तयार केली आहेत. आतां पुढें काय करावयाचें याविषयीं आज्ञा व्हावी."

"मी आज्ञा केली होती? मला पालखी व मंगलवाद्यें यांची काय गरज? तुमच्या समजण्यांत कांहीं तरी चूक झाली असावी." राजकुमार म्हणाला.

तिकडे चंद्रिका चंद्रभानूची वाट पहात बराच वेळ बसली. तिचा त्याला विसर पडला असावा असें तिला वाटलें. ती पायींच राजवाड्यापर्यंत गेली. राजवाड्या-समोर एक मोठें पटांगण होतें. त्याच्या पलीकडे एक झोंपडी होती. चंद्रिका त्या झोंपडींत गेली. आंत एक म्हातारी रहात होती. चंद्रिकेनें तिला विचारलें—"आजी! मी तुमच्याकडे कांहीं वेळ राहालें तर तुम्हांला कांहीं हरकत आहे का?"



"मला काय हरकत? रहा पाहिजे तर!" म्हातारी म्हणाली.

"तुमची परवानगी असेल तर मी हें झोंपडें थोडें सुंदर करूं का?" चंद्रिकेनें विचारलें.

म्हातारी म्हणाली—"मुली! मी आहें जन्माची गरीब! माझ्याकडे फुटकी कवडी-देखील नाहीं. तुला पाहिजे तर स्वतःच्या बळावर तूं पाहिजे तें कर! मला नाहीं हरकत."

चंद्रिका बाहेर गेली आणि एका टोपलींत थोडी माती व वाळू घेऊन मंत्रवली आणि



झोंपडीच्या चारीबाजूला भिंतीवर, खिडक्या-दरवाज्यावर व छपरावर ती फेंकली. एकदम त्या झोंपडीच्या जागीं एक सुंदर सोन्याचें घर दिसूं लागलें.

आपलें घर असें बदललेलें पाहून म्हातारी भ्याली. तिला वाटलें कीं चंद्रिका कोणी भूत किंवा मायावी राक्षसीण तर नाहीं! ती घर सोडून पळून गेली.

दोघां राजकुमारांच्या विवाहाची तयारी चालू होती. वधूवरांना लग्नापूर्वी देवीची पूजा करावयाची होती. म्हणून दोन्ही जोडपीं रथांत बसून पुरोहिताबरोबर राजधानी-बाहेरच्या देवळांत निघालीं. रथ चंद्रिकेनें निर्मिलेल्या घरासमोर येतांच रथाची धुरा तुटली.

एवढ्यांत एक दरबारी मनुष्य जवळच सोन्याचें एक घर पाहून त्यांत कोण रहातो हें पाहण्यासाठीं गेला.

चंद्रिकेनें त्याला विचारलें—"कोण तुम्ही? आणि रस्त्यावर ही गडबड कसली?"

तो दरबारी म्हणाला—"दोघे राजकुमार आपापल्या वधूबरोबर देवीच्या दर्शनाला निघाले आहेत. रथाची धुरा तुटली. नवी बसवली तीदेखील तत्क्षण तुटली. काय करावें कळत नाहीं."

"एवढेंच ना! मी हा लोखंडी दाभण देतें, तो धुरा तुटलेल्या जागीं ठेवा." असें सांगून चंद्रिकेनें एक दाभण त्याला दिला.

कांहीं वेळ तर तो चकित होऊन तिच्याकडे पहात राहाला, पण नंतर त्यानें रथाच्या तुटलेल्या धुरेवर तो ठेवला. आणि खरोखरच धुरा तुटली नाहीं.

"चला तर...." पुरोहित म्हणाला.

तो एवढें म्हणाला मात्र रथाचें छप्पर दुभंगलें. सर्व घाबरले. आणखी एक छप्पर



आणून बसविण्यांत आलें. पण तें पण तुटलें.

चंद्रिकेकडून जो मनुष्य दाभण घेऊन आला होता तो पुन्हां तिच्याकडे गेला आणि म्हणाला—"रथाचें छप्पर मोडलें आहे, म्हणून पुन्हां आम्ही सर्व अडकलों आहों."

"त्यांत काय? मी घराचें सोन्याचें एक दार देतें तें बसविलेंत कीं छप्पर बरोबर बसेल." चंद्रिका म्हणाली.

त्या दरबाऱ्यानें सोन्याचें दार छप्पराच्या जागीं नेऊन लावलें व खरोखरच तें छान बसलें.

सर्व ठीक आहे असें पाहून सारथी रथांत बसला. पण घोडे जागचे हालत ना. तेव्हां रथाला चार घोडे जोडले होते. आणखी चार घोडे जोडून पाहिले. पण आठ घोडे असूनहि रथ ओढला जात नव्हता. त्या दरबाऱ्यानें पुन्हां चंद्रिकेला ती गोष्ट सांगितली.

"ते घोडे सोडून त्यांच्या ऐवजीं आमचा एक पाडा जोडा. रथ चालूं लागेल." ती म्हणाली.

दरबाऱ्याला तिचें बोलणें विचित्र वाटलें. पण दोनदां ती म्हणाली त्याप्रमाणें झालें



होतें. तेव्हां या खेपेस होणार नाहीं असें म्हणायला जागा नव्हती. म्हणून त्यानें घोडे सोडून त्यांच्या ऐवजीं पाडा जोडला आणि आश्चर्य म्हणजे रथ चालूं लागला. सारथ्यानें जिकडे वळवलें तिकडे पाडा गेला. पण शेवटीं चंद्रिकेच्या घरासमोर रथ उभा झाला.

चंद्रभानूला फार राग आला. तो त्या घरांत राहणाऱ्या बाईला शिक्षा देण्यासाठीं तावातावानें रथांतून उतरून खालीं आला आणि त्या घरांत शिरला. परंतु चंद्रिकेला पाहतांच त्याची स्मृति जागृत झाली.





"तुमच्यासाठीं मी झाडाखालीं किती वेळ वाट पाहिली. तुम्हांला विसर पडला असणार असा विचार करून हें घर बांधून राहूं लागलें. तुमचा लग्नसोहळा चालू आहे असें कळलें. त्यांत विघ्नें आलेलीं कळलीं तेव्हां मी यथामति तीं दूर करण्याचा यत्न केला." चंद्रिका म्हणाली.

चंद्रभानूनें तिची माफी मागितली. "मी तुला कसा काय विसरलों ? काय बरें झालें असावें ?"

"कांहीं तसें विशेष नाहीं. तुमचा दोष नाहीं त्यांत. तुमचें लग्न जिच्याशीं होत आहे तीच त्या म्हातारीची मुलगी आहे. निळादेखील तिच्या आईमार्फत मंत्रबळ अवगत आहे. तिनेंच माझी आठवण तुम्हांला राहूं नये असा मंत्र टाकला होता. "तर मग, आतां मी तिच्याऐवजीं तुझ्याशींच लग्न करणार. चल आमच्या-बरोबर." असें म्हणत चंद्रभानु तिला हात धरून बाहेर घेऊन आला. तो चंद्रकलेला म्हणाला—"तुझ्यामुळेंच आमचा रथ दोनदां मोडला व घोडे चालायचे थांबले. तूं अपशकुनी वधू आहेस. तुझ्याशीं लग्न झाल्यास आमच्या घरावर संकट येईल. तुझ्याशीं मी नाहीं लग्न करीत."

त्यानें एक नवा रथ मागविला आणि त्यांत चंद्रिकेबरोबर बसला. आपल्या मोठ्या भावाला व आपल्या होणाऱ्या भावजयीला पण त्या रथांत बसवून घेतलें. ते सरळ देवीच्या देवळांत गेले. वाटेंत एकहि विघ्न आलें नाहीं. सर्व ऐकल्यावर चंद्रभानूच्या वडिलांनीं चंद्रिकेला आपली सून म्हणून कबूल केलें. दोघां भावांचा लग्नसमारंभ दोघां बहिणींशीं थाटामाटानें झाला.





# गोष्टींची भूक

एका गांवीं शिवू नांवाचा मातीच्या बाहुल्या करणारा एक मनुष्य रहात असे. त्यानें दशावताराच्या मूर्ती व इतर बाहुल्या करून त्यांना सुंदर रंग दिला आणि विकायला बाजाराच्या गांवीं निघाला. वाटेंत एका जागीं जवळ पास कोठें वस्ती नव्हती अशा जागीं काळोख पडला. तो तसाच धीर करून त्या काळोखांत चालत राहाला. दूर त्याला एका जागीं दिव्याचा उजेड दिसला. त्याच्या जिवांत जीव आला.

तो दिवा एका घरांत जळत होता. त्या घरांत एक म्हातारा रहात होता. शिवूनें त्याला विचारलें—"आजोबा ! मी फार दुरून येतों आहें. ही रात्र तुमच्या आसऱ्याला काढावी म्हणतों."

"रहा ना, खुशाल रहा ! होय पण तुझ्या त्या मूर्तींचें टोपलें तेवढें दूर बाहेर ठेव आणि तूं येऊन झोंप आंत. तुझ्या-जवळ कांहीं वेळ बोलत राहीन. वेळ तरी जाईल माझा. मी सैंपाक करतों, दोघे जेऊं बरोबरच." म्हातारा म्हणाला.

शिवू म्हाताऱ्याच्या त्या प्रेमळ वागणुकीचें कौतुक करूं लागला. झाडाखालीं धुळींत पडून रात्र काढण्यापेक्षां म्हाताऱ्याच्या घरीं रहायला मिळालें याहून स्वर्गसुख तें जास्त काय असणार ? म्हातारा सैंपाक घरांत गेला आणि लवकरच बाहेर परत आला. म्हणाला—"मी चुलीवर भात टाकला आहे. होईल लवकर. तुला गाणेंबिणें कांहीं म्हणतां येतें का ? म्हण बघूं एखादें." शिवूच्यासमोर बसत म्हातारा म्हणाला.

श्री रा. सा. पाटील



"मला नाहीं येत गाणें, आजोबा!" शिवू म्हणाला.

"अरे! म्हणजे गाणेंसुद्धां म्हणतां येत नाहीं म्हणतोस? तर मग गोष्टच सांग एखादी." म्हातारा म्हणाला.

शिवू म्हणाला—"मला गोष्ट पण येत नाहीं."

म्हातारा अकस्मात खिसकावून ओरडला—"तुला गाणें येत नाहीं, गोष्ट सांगता येत नाहीं, एक क्षणभर देखील मी तुला घरांत राहूं देणार नाहीं. नीघ बाहेर!"

शिवूला काय करावें कळेना. त्या म्हाताऱ्याच्या वागणुकींत त्याला विक्षिप्तपणा दिसला. तो आपलें टोपलें घेऊन घराबाहेर पडला. त्याला वाटलें होतें कीं म्हातारा पुन्हां परत बोलवील. पण तसें कांहीं झालें नाहीं.

शिवू पुढें फार गेला नाहीं, परत वाटेवरच्या एका गांवीं कोणाकडे तरी रात्र काढावी असें त्यानें ठरविलें आणि टोपलें डोक्यावर ठेवून निघाला.

वाटेंत त्याला रस्त्याच्या कडेला एक जण चूल पेटवून सैंपाकाला लागलेला दिसला. काळोखांत त्या माणसाचें तोंड त्याला स्पष्टपणें दिसत नव्हतें. पण त्यानें जो प्रश्न केला तो ऐकून शिवूला आश्चर्य वाटलें. त्या माणसानें विचारलें—"तूंच नाहीं का शिवू? ही पळी घे आणि ढवळत बस. मी आलोंच परत."

कोण बरें असेल हा? यानें आपल्याला कसें काय ओळखलें? शिवूला कळेना. त्यानें सांगितल्याप्रमाणें तो पळीनें ढवळत बसला. हांडींत काय होतें, त्याला माहीत नव्हतें. हांडी भरली होती आणि खायला जवळपास दुसरा कोणी नव्हता. एकट्याला जेवायला इतकें कशाला? शिवूला वाटलें त्याला देखील खायला मिळेल.

पळी घेऊन गेलेला तो मनुष्य बराच वेळ झाला तरी परत आला नाहीं. "अहो, येणार होता ना....?" पण उत्तर आलें नाहीं.

"इकडे तिकडे काय पाहातो आहेस? हात कां थांबला?" हांडींतून आवाज आला.

शिवू घाबरला व त्यानें हातांतली पळी फेंकून दिली. त्याला वाटलें त्याला भुतांनीं घेरलें आहे आणि तें खरें आहे असें पण त्याला दिसलें. हातांतून फेंकून दिलेली पळी ढुणूण दिशी उभी राहाली आणि म्हणाली—"एवढा राग का?" आणि त्याच्या डोक्यांत तिचा मार बसूं लागला. शिवू जास्तच घाबरला. त्याला आतां आपल्या टोपलीची आठवणपण राहाली नाहीं आणि तो तेथून धूम पळत सुटला. ती पळी त्याचा पाठलाग करीत मागें येऊं लागली. आणि पाठींत जोरजोरानें तिचा मार बसत राहाला.

सुदैवानें शिवूला वाटेंत एक घर दिसलें. घराचें दार उघडें होतें. आंत गेल्यावर त्यानें दार बंद केलें व मागें वळून पाहिलें. तें त्याच म्हाताऱ्याचें घर होतें.

"काय झालें? असा घाबरून पळून कां आलास?" म्हाताऱ्यानें विचारलें.

शिवूनें घडलेली गोष्ट सांगितली. ऐकून म्हाताऱ्याला आनंद झाल्यासारखें दिसलें. "तूं ही गोष्ट पहिल्यानेंच कां नाहीं सांगितलीस? तुला मी घराबाहेर काढलें नसतें! चल जेवायला बसूं." म्हातारा म्हणाला.











# अशिक्षित संस्थानिक

स्पेन देशांत एक संस्थानिक रहात असे. त्याच्याकडे पुष्कळ गांवांची मालकी होती व खजिन्यांत अलोट पैसा होता. त्याला आपल्या मोठेपणाची घमेंडपण फार होती. त्याला वाटे कीं लिहितां वाचतां आलें नाहीं म्हणून काय झालें. शिकल्या सवरल्या विद्वानांना पदरीं नोकरीला ठेवण्याची शक्ति आहेच कीं आपल्याला. त्यानें एका गरीब सुशिक्षित तरुणाला लिहिण्यावाचण्याचें काम करण्यासाठीं नेमलें.

एकदां राजाकडून त्या संस्थानिकाकडे एक हुकूम आला. कोठें तरी शत्रूशीं युद्ध चालू होतें. तेथें आपलें सैन्य घेऊन जायला हुकूम होता. मदत करावी असा विचार करून संस्थानिक सैन्य घेऊन व लेखकाला बरोबर चलायला सांगून निघाला.

लेखक दररोज युद्धाचें टिपण लिहून काढी आणि संस्थानिकाची मुद्रा त्यावर लावून राजाकडे पाठवून देई. पण एकदां एक बाण नेमका त्या लेखकाला लागला व तो मेला.

संस्थानिकाला नवीन मनुष्य नेमावा लागला. पण तसा हुशार मनुष्य त्याला रणांगणावर कोठून मिळणार ? पण संस्थानिकाची घमेंड उतरली नव्हती. आपल्याला लिहितां वाचतां आलें असतें तर किती बरें झालें असतें, एवढा विचारदेखील त्याच्या मनांत आला नाहीं.

तेव्हांच आणखी एक गोष्ट घडली. राजाकडून एक दूत पत्र घेऊन आला आणि संस्थानिकाला तें पत्र देऊन निघून गेला. महाराजांनीं काय निरोप पाठविला आहे हें देखील संस्थानिकाला कळायला मार्ग नव्हता. पुढें हल्ला करायचा हुकूम आहे कीं मागें पाय घ्यायचा हें त्याला कळलें नाहीं. संस्थानिक त्या विचारांत पडला असतां त्याला समोर एक सैनिक दिसला. तो संस्थानिकाच्या एका गांवांतलाच होता. त्याला लिहितां वाचतां येत होतें. म्हणून संस्थानिकानें त्याला बोलाविलें व म्हणाला—" "इकडे येरे हें पत्र वाच पाहूं. चूक झाली तर पोट चिरीन तुझें आणि यांत जें लिहिलें आहे तें तुझ्याशिवाय किंवा माझ्याशिवाय आणखी कोणाला कळतां कामा नये."

तो मनुष्य संस्थानिकाला चांगला ओळखत होता. कोणत्या तरी कारणावरून संस्थानिकानें त्याला चाबकानें फोडून काढलें होतें. तेव्हां पासून तो संधीची वाट पहात होता. आतां त्याला चांगली संधी मिळाली होती. राजाचें पत्र वाचून त्यानें असें दाखविलें कीं मोठें संकट ओढवलें आहे. उघड म्हणाला—"युद्ध थांबवून तावडतोब दरबारांत हजर व्हावें." नंतर तो थोडें मागेंपुढें केल्यासारखें दाखवून म्हणाला—"किती खोटा आरोप हा ? आपण राजद्रोही आहां अशी



सौ. [illegible]



आपल्या विरुद्ध कोणी महाराजांजवळ तक्रार केली आहे."

"मी राजद्रोही! ज्यानें हा खोटा आरोप माझ्यावर लावून महाराजांच्या मनांत माझ्या विरुद्ध विष कालवलें आहे त्याचें डोकें कापलें नाहीं तर मी आपलें नांव बदलून देईन." संस्थानिक म्हणाला.

तो लगेच राजधानीकडे निघाला. प्रवास दूरचा होता. काळोखपण पडला होता. जवळ गांव किंवा वस्तीपण नव्हती. संस्थानिक एका जागीं झाडाला घोडा बांधून ठेवून झाडाखालीं विश्रांती घेण्यासाठीं झोंपला. उजाडल्यावर त्याची झोंप मोडली तेव्हां त्याला समोर एका दगडावर कांहीं तरी लिहिलें असल्याचें दिसलें. काय लिहिलें आहे त्याला कळलें नाहीं. कदाचित एखादी खूण असेल दगडावर असा विचार करून तो जवळ गेला व पाय सरकून एका खड्ड्यांत पडला.

"धोका! जवळ येऊं नये!" असें दगडावर लिहिलें होतें.

खड्ड्यांतून बाहेर यायला त्याला फार त्रास झाला. त्याची कंबर लचकली व जागचें हालतां येईनासें झालें. तरी कसाबसा उठून लंगडत शेजारच्या गांवीं गेला आणि धर्मशाळेंत पडून रहायला जागा विचारून पडून राहिला.

त्या धर्मशाळेंत त्या गांवचा एक गांवकरी आला. तो त्याच संस्थानिकाच्या भीतीनें कोठेंतरी जात होता. म्हणून त्याला संस्थानिक नेमका त्या धर्मशाळेंत दिसला तेव्हां त्याला प्राण गेल्यासारखें वाटलें. पण संस्थानिकाला मात्र जिवांत जीव आल्यासारखें वाटलें. कारण त्याला लिहितां वाचतां येत होतें. त्याला जवळ बोलाविलें व म्हणाला— "कसा वेळवर भेटलास बघ! मला राजधानींत जाणें आतांच शक्य नाहीं. महाराजांना जाऊन माझा एवढा निरोप लिहून कळव कीं मी या स्थितींत येथें पडून आहें. माझ्या विरुद्ध त्यांचे कान ज्या कोणी भरले आहेत त्याची मान उडविल्याशिवाय माझ्या मनाचें समाधान होणार नाहीं."

त्या माणसानें त्याला संस्थानिकानें लिहायला सांगितलें होतें तें न लिहितां, महाराजांना संबोधन करून कांहीं अपशब्द लिहिले. व त्यावर संस्थानिकाची मुद्रा घालून पत्र पाठवून दिलें. राजानें तें पत्र वाचलें. त्याला मनस्वी राग आला. त्यानें हुकूम सोडला कीं त्या संस्थानिकाला जिवंत किंवा मेलेला कैद करून दरबारांत हजर करावा.

संस्थानिकाला कैद करून तुरुंगांत टाकण्यांत आलें. तो घमेंडखोर होता म्हणून त्यानें महाराजांजवळ माफी मागितली नाहीं कीं कांहीं जबानीपण दिली नाहीं. जें होणार असेल तें होईल असा विचार करून तो स्वस्थ बसला.

संस्थानिकाकडून खरें बोलवून घेण्यासाठीं राजानें निरनिराळ्या प्रकारें त्याचे हाल केले पण "मी पूर्ण निर्दोष आहें!" एवढे











शब्द तोंडाबाहेर काढण्यांत देखील त्याला कमीपणा वाटला.

राजानें त्याला राजद्रोह केल्याबद्दल शिरच्छेदाचा दंड दिला. न्यायाधिशानें व प्रधानानें राजाला समजावून सांगितलें कीं अशी घाई करूं नये. ज्या पत्रावर संस्थानिकाची मुद्रा आहे तें पत्र संस्थानिकानें वाचलें असावें असें वाटत नाहीं.

एक अधिकारी म्हणाला—" महाराज! या संस्थानिकाला लिहितां वाचतां येत नाहीं असें देखील ऐकतो."

" तो माझी बरोबरी करायला निघाला आहे तर त्याला लिहितां वाचतां देखील येत नाहीं म्हणतोस? पण त्याला वाचतां येत नाहीं हें कशावरून!" राजानें विचारलें.

न्यायाधिशानें शिरच्छेदाची आज्ञा लिहिलेला कागद संस्थानिकाला नेऊन दाखविला आणि म्हणाला—" तुम्ही यावर सही केलीत तर तुम्हांला सुटका मिळेल."

" यांत काय लिहिलें आहे?" त्यानें विचारलें.

" तुम्ही निर्दोषी आहां व तुमच्यावर जो आरोप आहे तो खोटा आहे, असें लिहिलें आहे." न्यायाधीश म्हणाला.

असें असेल तर मी सही करायला तयार आहें." असें सांगून संस्थानिकानें त्यावर आपली मुद्रा लावली.

तेव्हां संस्थानिक अशिक्षित असल्याचें राजाला कळलें. राजानें त्याला सुटका देऊन ज्या दोघांनीं राजाच्या मनांत विष कालविलें त्या दोघांना जन्मठेप शिक्षा केली. कारण अशिक्षित असणें हा अपराध होत नाहीं. या उलट सुशिक्षितानें आपल्या शिक्षणाचा दुरुपयोग करावा हा मोठा गुन्हा होय.





# कृष्णावतार

कृष्णानें कालियाच्या डोहांत उडी मारल्याबरोबर पाणी इतकें उसळलें कीं क्षीरसागरांत मंदराचल पर्वतच येऊन पडल्यासारखें भासलें.

कालिया खवळून वर आला. तो आपले पांचहि फण उभारून उभा राहाला व त्याच्या तोंडांतून विषारी ज्वाळा बाहेर येऊं लागल्या. त्यानें कृष्णाला कवटाळून आवळण्याचा प्रयत्न सुरू केला. कालियाच्या नायकापोरांनीं आणि बंधु बांधवांनीं येऊन कृष्णाला चारी बाजूंनीं घेरलें आणि त्याच्या सर्व अंगाला चावूं लागले. कृष्ण बेशुद्ध झाला.

गोपबाळकांचा सखा कृष्ण त्या संकटांत पडला होता व असहाय स्थितींत तें दृश्य पाहणेंच त्यांच्या भाग्यांत लिहिलें होतें. ते घाबरून गेले होते. कांहीं जण दक्षिणेकडील खेडेगांवांत गेले आणि म्हणाले—" नंदगवळ्याचा कृष्ण कालियाच्या डोहांत पडला आहे. कालियानें त्याला आवळून धरलें आहे. नंद आतां या वेळीं कोठें असेल कोणास ठाऊक? तुम्ही येतां का थोडे मदतीला? सर्व मिळून कृष्णाला सोडवूं!"

ती बातमी वणव्यासारखी वृंदावनपर्यंत जाऊन पोंचली. नंदयशोदेवर तर वज्रपातच झाला. नंद " कोठें कोठें!" असें वेड्या-



सारखा ओरडत कालियाच्या डोहाकडे धांवत गेला. इतर गवळीपण बरोबर धांवले. यशोदा भोंवळ येऊनच खालीं पडली. थोड्या वेळानें उठून रडत गवळिणींचा हात धरून डोहाकडे धांवली.

'हें नवीन संकट कोठून ओढवलें' प्रत्येकाच्या मनांत हा एकच एक विचार होता. परंतु "कृष्णाचा खट्याळपणा दिवसे-दिवस वाढतच गेला आहे. नसते उद्योग करायला त्याला कोणीं सांगितलें होतें?" कांहीं वृद्ध मंडळी म्हणालीं. आणखी इतर लोक म्हणाले—"अहो असें घाबरण्याचें कारण नाहीं. याहूनहि मोठ मोठ्यांना त्यानें या पूर्वी लोळवलें आहे. तो कालियाचें मर्दन केल्याशिवाय राहणार नाहीं. तो त्याची खोड मोडील आणि त्याच्या स्वतःच्या केसालाहि धक्का लागणार नाहीं. तुम्ही पहा तर!"

सर्व यमुनेकाठीं जमा झाले. कृष्णाची ती करुण स्थिति पाहून सर्व भीतीनें घाबरून झाले. नंदयशोदा तर बेशुद्ध होऊन पडले. इतरांनीं त्यांच्या तोंडावर पाणी शिंपडून वारा घातल्यावर ते शुद्धीवर आले.

नंद म्हणाला—"मी मागच्या जन्मीं असें कोणतें पाप केलें होतें कीं देव मला हें सर्व दाखवितो आहे? सर्व माझ्या पराक्रमी मुलाची प्रशंसा करून माझ्या भाग्याचा हेवा करीत होते. त्यानें पूतनेला मारलें, शकटासुराचीं हाडें मोडलीं तर हा, या सांपाला मारणार नाहीं का असेंहि एक मन सांगतें. तरी पोटच्या मुलाला या स्थितींत पाहून त्याच्या आईच्या जिवाची काय दशा होत असेल, तें तो परमेश्वरच जाणें! तिची समजूत कशी कोण घालणार?"

यशोदा कळवळून रडत म्हणत होती—"कृष्णा! गोपींनीं तुझ्या विरुद्ध तक्रारी केल्या म्हणून मी तुला उखळीला बांधून ठेवलें होतें. त्याची मला अद्दल घडावी म्हणून का तूं डोहांत उडी मारलीस. पण तूं इतका पराक्रमी आहेस कीं हा सांप तर काय त्याचा बाप आला तरी त्याला ठार करण्याची शक्ति तुझ्या अंगांत आहे, हें मी सांगतें. तूं माझ्या भावाच्या घरच्या मस्त पोळांना लोळविलेलें मी स्वतः डोळ्यांनीं पाहिलें नाहीं का? विषारी झाडें तूंच नाहीं का छाटून टाकलीस? पण तूं माझ्यावर रागावला असलास तर मात्र मी हारलें. विषवृक्षांचें जंगलचें जंगल ज्यानें उध्वस्त केलें त्याला हा सांप काय करूं शकणार?"

सर्व यशोदेची समजूत घालीत होते कीं भाग्यांत असतें तेंच होतें. यशोदे! चांगल्यांनाच देव उचलून नेतो. नंतर ते म्हणाले- "हें सर्व पहात बसण्यापेक्षां चला आपण सर्व डोहांत उडी टाकून त्या सांपाशीं युद्ध करूं या. त्या प्रयत्नांत मरण आलें तरी पत्करलें."

बलराम तोंपर्यंत स्वस्थपणें सर्व ऐकत होता. पण आतां गंमत पहात बसण्यांत अर्थ नाहीं असा विचार करून कृष्णाला म्हणाला—"कान्हा! शेषशैयेवर शयन



करणारा तूं लोककल्याणासाठीं येऊन या सांपाच्या हातीं फंसलास का रे? या दुष्टाचा गर्व परिहार करून सर्वांच्या मनाचें समाधान कर."

बलरामाचे शब्द कानीं पडतांच कृष्ण झोंपेतून जागा आल्यासारखा उठला आणि सांपाच्या पकडीतून स्वतःला सोडवून सांपाच्या फणांवर जाऊन उभा राहाला. हातानें कालियाची शेपटी धरून तो पिळवटूं लागला आणि फणांवर नाचूं लागला. यमुनेच्या लाटा जणुंकांहीं ताल देत होत्या. गोपबालक पण त्या तालावर आनंदानें नाचूं






लागले. आकाशांत उभे राहून देव तें मनोहर दृश्य पाहूं लागले. त्यांना त्यावेळीं शंकराच्या तांडव नृत्याची आठवण झाली असावी कदाचित.

कालियाच्या फणांची हाडें मोडलीं व तो रक्त ओकूं लागला. त्याचे दांत गळून पडले व त्यानें मान टाकली. हत्ती कमळनाल तोडून टाकतो तशी कृष्णानें त्याची गत केली होती. तो केविलवाण्या आवाजांत म्हणाला—" देवाधिदेवा! मी अज्ञानानें तुला सामान्य मनुष्य समजून आपल्या शक्तीचा दिमाख दाखविला. त्याबद्दल तूं मला उचित तोच दंड दिलास. या निमित्तें तुझा चरण स्पर्श माझ्या या डोक्यांना झाला. माझें केवढें भाग्य! मला क्षमा कर! माझ्या विषाचे दांत तुटले आहेत. माझी अक्कल ठिकाणावर आली आहे. मी तुझा दासानुदास होऊन राहीन. तूं सांगशील तसा वागेन. तूं माझ्यावर आज हा जो राग दाखविलास तो माझ्यावर तुझा मोठा अनुग्रहच झाला."

कृष्णाला कालियाची दीन वाणी ऐकून दया आली. म्हणाला—" मी तुला माफ करतों. पण एका अटीवर. तूं या पुढें यमुनेंत राहतां कामा नये. तूं आपल्या सर्व बायकां मुलांसह दूर समुद्रांत जाऊन रहा. तूं निघून गेल्यावर नदीचें पाणी स्वच्छ होईल व तें लोकांना उपयोगी पडेल. तुझ्या मस्तकावर माझ्या पायाच्या खुणा कायमच्या आहेत. त्या पाहून गरूड तुला यापुढें कधीं त्रास देणार नाहीं. हाच तुला माझा वर आहे."

कालिया आपल्या बायका मुलांसह समुद्राकडे निघून गेला. कृष्ण नदींतून बाहेर काठावर आला. नंद यशोदेनें त्याला पोटाशीं धरून आशीर्वाद दिला. कृष्णानें सर्व वृद्ध गवळ्यांना नमस्कार



केला. नंतर त्याच्या सख्या सवंगड्यांनीं त्याला घेऊन घेरलें आणि त्याच्या शौर्याची स्तुति करूं लागले.

गवळ्यांपैकीं कांहीं जणांना कृष्ण देवाचा अवतार वाटूं लागला. नाहींतर इतकें बळ आणि पराक्रम आणखी कोणांत असणार? "तुझा महिमा या जगतांत पसरला पाहिजे. तूं आमचा रक्षक आहेस, आमच्या गाई गुरांचा रक्षक आहेस. तुझ्या कृपेनें आमच्या गाई निरापद कोठें हि हिंडतात व फिरतात. आतां या पुढें या नदींत कोणतीहि भीति उरली नाहीं. आतांपर्यंत आम्ही तुला ओळखूं शकलों नव्हतों." सर्व म्हणूं लागले.

कृष्णानें सर्वांना त्यांचें वय व मान लक्षांत घेऊन जें उत्तर द्यायचें तें दिलें व सर्व वृंदावनला आनंदानें परतले.

असाच कांहीं काळ लोटला. गाईंना गवत मिळत नव्हतें. कृष्णाशीं गवळ्यांनीं त्यागोष्टी विषयीं सल्ला विचारला. त्यांच्या पैकीं प्रमुख गवळी म्हणाले—

"गोवर्धन पर्वताच्या उत्तरेकडे एक मोठें तालवन आहे. त्यांत गवताचें कुरण आहे. पण त्यांत धेनुक नांवाचा एक राक्षस



गाढवाचें रूप घेऊन राहातो. त्याच्या भीतीनें त्या कुरणांत पाऊल टाकण्याची कोणाला हिंमत होत नाहीं."

तें ऐकून कृष्ण व बलराम दोघांना उत्साह चढला. ते साहसी गवळ्यांना म्हणाले— "गुरांना गवत पाहिजे. राक्षसाच्या भीतीनें का त्यांना उपाशी ठेवणार? चला!" ते गवळ्यांना बरोबर घेऊन त्या तालवनांत निघाले. त्यांत पहावें तिकडे हिरवेंगार गवत होतें. तें पाहून तें चरायला गाई धांवल्या. कृष्ण गुराख्यांबरोबर गवतात खेळूं नाचूं लागला.



कृष्णाला तें सुंदर कुरण पाहून आनंद झाला. मोठ मोठीं ताडाचीं झाडें जणुं कांहीं पाताळांतून निघालेल्या सापांच्या फणांसारखीं भयंकर भासत होतीं. त्यांचा काळा रंग हिरव्या गवतांत विचित्र व भयंकर वाटे. सुंदर वास सुटला होता. कृष्ण बलरामाला म्हणाला—"दादा! तूं झाडावर चढून ताडफळें खालीं पाड. मी खाणार आहें. गाईंना पण खायला घालूं."

"चढायला वेळ लागेल रे! मी झाडें हालवून फळें पाडतों." गवळ्यांना हें सांगून बलराम एक झाड हलवूं लागला आणि आश्चर्य म्हणजे खरोखरच फळें टपटप गळून पडूं लागलीं.

फळांचा आवाज धेनुकाला ऐकूं आला. धेनुक आपल्या सारख्याच सहस्रावधी गर्दभ राक्षस अनुयायांसह बलराम व कृष्ण आपल्या मित्र मंडळीं बरोबर खेळत होते तेथें आला. गाढवांच्या खुरांची धूळ आकाशाला जाऊन भिडली. सर्व आकाश गढूळ झालें आणि गाढवांच्या रेंकण्याच्या आवाजानें आसमंत हादरलें. बलराम गाढवांची गर्दी थांबविण्या-साठीं कांहीं शस्त्रास्त्र घेतल्याशिवाय त्यांच्या-समोर जाऊन उभा राहला. त्याला समोर उभा पाहून धेनुक आपल्या लाथा झाडूं लागला. बलरामानें त्याचे मागचे पाय धरले आणि त्याला आकाशांत गरगर फिरवून दूर भिरका-वून दिलें. धेनुक ताडांच्या झाडांवर आदळला. आणि त्याचें शरीर रक्त बंबाळ झालें.

बलरामानें त्याच्या अनुयायी गाढवांच्या शेपट्या धरधरून त्यांना एकमेकावर आदळून किंवा ताडाच्या झाडांवर आपटून ठार केलें. कृष्णानें पण गर्दभसेनेचा समाचार घेतला. ताडाचीं झाडें उपटून पडलीं आणि सर्व कुरणभर गाढवें आणि ताडाची उपटून पडलेलीं झाडें दिसूं लागलीं. सर्व गुराख्यांनीं









कृष्ण बलरामांच्या पराक्रमाची प्रशंसा केली. जें कुरण पूर्वी भयाण वाटत होतें तें राक्षसांचा संहार झाल्यानें शांत व मनोहर दिसूं लागलें.

एकदां गोपबालक भांडीर प्रदेशांत गुरें चरायला घेऊन गेले असतां प्रलंब नांवाचा राक्षस गवळ्याचें रूप घेऊन आला. गुराखी हरणाचा खेळ खेळण्यासाठीं दोन गट करून उभे होते. कृष्ण व त्याचा मामेभाऊ श्रीधाम दोघांनीं आपापले गट पाडले. त्याच प्रमाणें उभय पक्षांच्या जोड्या ठरल्या. कृष्ण व श्रीधामाची जोडी ठरली तशी बलराम व प्रलंब दोघांची जोडी ठरली. अशातऱ्हेनें अर्धे कृष्णाकडे व अर्धे श्रीधामाकडे झाले. हरणासारखे उड्या मारीत जाऊन भांडीर नांवाच्या वटवृक्षाला शिवायचें असा खेळ होता. त्या खेळांत कृष्णाचा गट जिंकला. पहिल्यानें ठरल्याप्रमाणें श्रीधामाच्या गटांतल्या गवळ्यांनीं जिंकणाऱ्या गटांतल्या आपल्या जोडीदाराला पाठीवर बसवून झाडापर्यंत न्यायचें होतें.

त्याप्रमाणें प्रलंब बलरामाला पाठीवर बसवून निघाला आणि पाहतां पाहतां त्यानें आपलें राक्षसी रूप प्रगट केलें. त्याचें डोकें आकाशाला जाऊन लागलें. बलराम चकित झाला. काय करावें त्याला सुचेना. त्यानें ओरडून कृष्णाला हांक मारली. "अरे पाहतोस काय दादा? त्याची पाठ मऊ कर!" कृष्ण म्हणाला. बलरामानें त्याच्या पाठींत व डोक्याला एकेक बुक्का मारला. त्याचें डोकें फुटलें आणि तो भड भडा रक्त ओकीत जमिनीवर पडला. प्रलंबाला ठार केलें त्या दिवसापासून बलरामाचें बलदेव नांव पडलें.





# अरण्यपुराण

[१०]

मौवलीचें काम संपलें. सर्व कांतडें काढून झाल्यावर तो म्हणाला—"एकू! हें कांतडें लपवून ठेवलें पाहिजे आणि गुरांना घरीं पोंचविलें पाहिजे."

ते निघाले तेव्हां काळोख पडूं लागला होता. गांवाजवळ पोंचले तेव्हां त्यांना मशाली दिसूं लागल्या. देवळांत घंटा वाजत होत्या. देवळाच्या दारांत लोक उभे होते.

मी वाघ्याला ठार केलें म्हणूनच सर्व माझ्या गौरवार्थ उभे असावेत, त्याला वाटलें. पण त्याच्यावर दगडाचा वर्षाव होऊं लागला. लोक ओरडत होते "लांडग्यांच्या लबाड पोरा, रानटी कुत्ता! जा पळून! नाहीं गेलास तर पुजारी तुला पुन्हां लांडगा करून टाकील. बलदेव झाड गोळी!"

बलदेवनें गोळी झाडली व एक वासरूं कळवळून ओरडलें.

"पाहिलीस त्याची जादू! तो गोळीनें मरणेंच शक्य नाहीं. त्याच्या ऐवजीं तुझ्याच वासराला गोळी लागली रे बलदेव!" लोक म्हणाले.

"ही सर्व काय भानगड आहे?" मौवली घाबरून म्हणाला.

"तुझ्या या मनुष्यजातीच्या भावंडांत आणि लांडग्यांत कांहीं फरक नाहीं दिसत. याचा अर्थ असा कीं ते तुला जातीबाहेर काढण्याच्या प्रयत्नांत आहेत." एकू म्हणाला.

पुजारी हातांतली माळा फिरवीत ओरडून म्हणाला—"ए लांडग्या! अन् लांडग्याच्या पोरा! नीघ इथून!"












"पहिल्यानें मला मनुष्य म्हणून काढलेंत, आतां लांडगा म्हणून कादतां आहां? चल रे एकू!" मौवली म्हणाला.

एक बाई धांवत पुढें आली. ती ओरडून म्हणाली—"बाळा! हे लोक तुला जादुगार, लबाड लांडगा समजत आहेत. मला तें खरें वाटत नाहीं. पण तूं निघून जा! हे लोक तुझा जीव घेतील."

"मेस्सुवा बाजूला हो! नाहीं तर तुला पण ठार करूं!" लोक ओरडले.

एक दगड मौवलीच्या तोंडाला लागला. तो हंसत म्हणाला—"मेस्सुवा! ही गोष्ट पिंपळाच्या पारावरच्या गोष्टीसारखीच आहे. तूं बाजूला हो! मी गुरांना जोरानें पळवणार आहें." असें सांगून तो एकूला म्हणाला—"हांक गुरांना!" म्हशी घरीं जाण्याच्या घाईंत होत्या. एकू ओरडण्या पूर्वींच वावटळी-सारखीं सर्व गुरें दारांतून आंत शिरलीं. गांवकरी घाबरून पळून गेले. त्यांची पांगापांग झाली.

"मोजून घ्या आपल्या गाई म्हशी! मी एखादी ठेवून घेतली तर नाहीं ना, पाहून घ्या नीट! आतां मी नाहीं तुमचीं गुरें चरायला नेणार! लहान थोर सर्वांना नमस्कार!" मेस्सुवाकडे पाहून म्हणाला—"मी इच्छा असून हि तो विचार सोडला. नाहींतर लांडग्यांच्या कळपांच्या धाडी तुमच्या गांवावर होतील असें केलें असतें." असें सांगून मौवली मागें फिरला आणि एकू बरोबर निघून गेला.

आकाशांत तारे चमकत होते. त्याला आनंद वाटला. म्हणाला—"आतां या पुढें माणसांच्या पिंजऱ्यांत झोंपण्याची गरज राहाली नाहीं. वाघ्याचें कातडें घेऊन जाऊं. परत नाहीं यायचें. मेस्सुवा माझ्याकडे केंविलवाण्या नजरेनें पहात होती?"

इतक्यांत चंद्रोदय झाला. चांदण्यांत गांवकऱ्यांना एक विचित्र दृश्य दिसलें. मौवली डोक्यावर कांहींतरी ठेवून जात होता. त्याच्या मागें दोन लांडगे चालत होते. हें पाहून गांवकऱ्यांनीं आणखी जोरानें देवळाच्या घंटा वाजवल्या. जोरजोरानें शंख फुंकले. एकटी मेस्सुवा ओक्सा बोक्शी रडत होती. बलदेव, रानांत त्यानें पाहिलेलें दृश्य तिखटमीठ लावून सांगत होता. तो असें हि म्हणाला—"मी स्वतः डोळ्यांनीं त्या लांडग्याला मागच्या पायांवर उभा राहून माणसांच्या भाषेंत बोलतांना पाहिलें.





    



मौवली निराश होऊन दोन्ही लांडग्यांना बरोबर घेऊन लांडग्यांची सभा भरे त्या शिखरावर येऊन पोंचला तों पर्यंत चंद्र अस्त होऊन गेला होता. ते लांडगिणीच्या गुहेंत शिरले.

"मनुष्यांनीं मला आपल्या जातींतून काढून टाकलें आई! हें पहा, वाघो-बाचें कातडें आणलें आहे." मौवली म्हणाला.

लांडगीण उठून आली. कौतुक करीत ती तें कातडें पाहूं लागली. तो तुझ्यासाठीं आला होता तेव्हां मी तुला नव्हतें का सांगितलें? काय पण काम केलेंस बहादरासारखें!

"आलास, बरें केलेंस, तुझ्या वांचून आम्हांला करमत नव्हतें बघ." म्हणत झाडींतून काळा वाघ आला.

मौवलीनें जमिनीवर वाघ्याचें कातडें अंथरलें आणि तें ताठ रहावें म्हणून चार जागीं बांबूच्या खुंट्या लावून ठेवल्या. एकू त्यावर झोंपला व मौवलीला प्रथम घेऊन आणलें त्यावेळीं तो म्हणाला होता तेंच म्हणाला—"पहा! लांडग्यांनो पहा! नीट डोळे उघडून पहा!"

एकू नायक राहला नाहीं तेव्हां पासून लांडग्यांच्या कळपाचें बरेंच नुकसान झालें. इतर लांडग्यांनीं एकूप्रमाणेंच मौवलीला आपला नायक कबूल करायला सांगितलें. पण मौवली तयार नव्हता.

"मला माणसांनीं जातीबाहेर काढला आहे आणि लांडग्यांनींपण काढलें आहे. मी एकटाच या पुढें शिकार करणार!" मौवली म्हणाला.

[पुढील गोष्ट पुढील अंकीं.]



# ६४. वाहिगीच्या खोऱ्यांतलें प्रस्तरयुग

न्यू गिनींत वाहिगीचें खोरें सुंदर पर्यांसाठीं प्रसिद्ध आहे. येथें सहस्त्रावधी लोक अद्याप प्रस्तर युगांतील सभ्यतेचेंच पालन करीत आहेत. ते दगडाचींच हत्यारें वापरतात. ३५ वर्षांपूर्वींपर्यंत त्यांचा इतर जगाशीं संबंध नव्हता. चित्रांत चिबू नदी दिसत आहे.











# भारताचा इतिहास



सतराव्या शतकाच्या पूर्वार्धांत इंग्लंडच्या ईस्ट इंडिया कंपनीला कांहीं विशेष फायदा झाला नाहीं. परंतु त्या शतकाच्या उत्तरार्धांत कंपनीला ब्रिटीश सरकारकडून कांहीं सवलती मिळाल्या आणि कंपनीची भरभराट होऊं लागली.

त्याच वेळीं कंपनीनें लाथा झाडायला सुरवात केली. जी कंपनी त्या वेळपर्यंत शांतपणें व्यापार करीत आली होती, तिचें बळ एकाएकीं इतकें वाढलें कीं तिनें कांहीं प्रदेश बळकावण्यासाठीं तयारी सुरू केली. देशांतली अराजकता कंपनीला जास्त फायद्याची वाटली. जीराल्ड अँगियर १६६९ पासून मुंबईला गव्हर्नर म्हणून काम करीत होता. त्यानें कंपनीला एका पत्रांत लिहिलें—"या पुढें तुम्हांला तलवार हातीं धरून आपला व्यापार करावा लागेल."

कंपनीच्या धोरणांत बदल झाला. भारताला इंग्रजी सत्तेखालीं आणण्यासाठीं यत्न सुरू झाले. कंपनीच्या प्रमुखांपैकीं सर जॉन चाइल्ड यानें १६८८ च्या डिसेंबर महिन्यांत मुंबईचें बंदर व पश्चिमी किनाऱ्यावरचीं मोगलांचीं कांहीं बंदरें यांना वेढा दिला आणि अनेक मोंगल जहाजें काबीज केलीं. पण ही घाईच ठरली. कारण इंग्रजांना वाटलें होतें तितकें मोंगल साम्राज्य दुबळें नव्हतें. त्याबद्दल सर जॉन चाइल्ड याला औरंगजेब बादशाहाची फक्त माफीच मागावी लागली नाहीं तर, वर दीड लाख रुपये नुकसान भरपाई म्हणून भरावे लागले. १६९० मध्यें औरंगजेब बादशाहानें इंग्रजांना व्यापार करण्यास परवानगी दिली.

बंगालमध्यें इंग्रज व्यापाऱ्यांना व्यापाराच्या सवलती देऊन सुलतान शुजानें १६५१ मध्यें एक फर्मान काढलें. परंतु त्याच्या वारसदारांनीं १६५६ मध्यें त्या सर्व सवलती मागें घेतल्या. १६७२ मध्यें शाहिस्ते खानानें जें फर्मान काढलें होतें, इंग्रज त्याचा फायदा करून घेण्यांत यशस्वी झाले नाहींत. म्हणून कंपनीनें बळजबरीनें आपला हेतू साध्य करून घेण्याचा विचार केला. कंपनीनें हुगळीला एक किल्ला बांधला. १६८६ च्या ऑक्टोबर महिन्यांत इंग्रज व मोंगल यांचें आपसांत युद्ध झालें. इंग्रजांनीं हुगळीहून पळ काढला आणि नदीच्या मुखाजवळच्या एका बेटांत राहून तेथून तहाचीं बोलणीं सुरू केलीं. तह झाला. परंतु पुढल्या वर्षीं कॅप्टन विलियम हीथ याच्या नेतृत्वाखालीं इंग्लंडमधून एक आरमार आलें आणि इंग्रजांनीं चितागांग बंदर काबीज करण्यासाठीं स्वारी केली. शेवटीं हीथच्या हातीं अपयशच आलें.



१६९० मध्यें औरंगजेब बादशाहाशीं झालेल्या संधीनंतर इंग्रजांनीं आपल्या माकडचेष्टा बंद केल्या. जाब चारनेक हा इंग्रज एजंट चतुर होता. १६९० मध्यें त्यानें सुतमती नामक स्थानीं एक वखार बांधली. १६९१ च्या फेब्रुवारींत मोंगल बादशाहांच्या हुकमानें बंगालचा नबाब इब्राहीमखान यानें एक फर्मान काढलें. या परवान्याप्रमाणें वार्षिक तीन हजार रुपये सरकारांत इंग्रजांना भरून इतर कोणत्याहि प्रकारचा दुसरा कर दिल्याशिवाय बंगाल मध्यें व्यापार करण्याची परवानगी मिळाली.

बर्दवान जिल्ह्याचा जमीनदार शोभासिंह याच्या बंडाचें मिश करून १६९६ मध्यें इंग्रजांनीं आपल्या किल्ल्याची डागडुजी केली. दोन वर्षांनंतर त्यांनीं सुतमती, कलकत्ता व गोविंदपुर नामक तीन गांवें १२०० रुपये

देऊन विकत घेतली. इंग्रजांच्या या वस्तीचें नांव फोर्ट विलियम ठेवण्यांत आलें.

चार्लस् द्वितीय व जेम्स् द्वितीय यांच्या काळांत कंपनीला पुष्कळ फायदा झाला. परंतु १६९४ मध्यें ब्रिटीश पार्लमेंटनें कंपनीला हिंदुस्थानांत व्यापार करण्यासाठीं दिलेला सर्वाधिकार काढून घेतला. पार्लमेंटनें प्रत्येक इंग्रजाला हिंदुस्थानांत व्यापार करण्याचा अधिकार दिला. १६९८ साली त्याला कायद्याचें रूप पण मिळालें. जनरल सोसायटी नांवाची आणखी एक कंपनी स्थापन झाली. जुनी कंपनी आपले अधिकार सुरक्षित व्हावे या हेतूनें १७०७ मध्यें या नव्या कंपनींत सामील झाली. परंतु आणखी एक कंपनी 'इंग्रजी व्यापारी कंपनी' ह्या नांवानें स्थापन झाली. या नव्या कंपनी तर्फे सर विलियम नोरीस नांवाचा दूत मोंगल दरबारीं आला. त्यानें आपल्या कंपनीला सवलती देण्याचा प्रयत्न केला. त्याला यश मिळालें नाहीं. शेवटीं दोन्ही कंपन्या एक होऊन १७०३ पर्यंत कोणत्याहि प्रकारची चढा-ओढ न करीता व्यापार करीत राहाल्या.

अठराव्या शतकांत सुरवातीचीं ४० वर्षे ईस्ट इंडिया कंपनीचा व्यापार देशांत अराजकता असूनहि निर्विघ्नपणें व शांतपणें चालू होता. १७१५ पासून मोंगल दरबारांत कंपनीच्या तर्फे एक दूत सुद्धां राहूं लागला. दूतावासांतील विलियम हेमिल्टन नांवाच्या एका डाक्टराच्या औषधानें फर्रुकसिअर बादशाहाला गुण पडला. त्याचा कंपनीला फायदा झाला. तों पर्यंत इंग्रज जे कर देत होते ते रद्द करण्यांत आले. मुंबईला जीं नाणीं सुरू करण्यांत आलीं होतीं तीं मोंगल साम्राज्यांत सर्वत्र मान्य झालीं.



# नेहरू चरित्र

[ ३४ ]



१९३६ च्या ऑगस्ट महिन्यांत कांग्रेसनें निवणुकीची तयारी सुरू केली. जवाहरलालजींनीं भाषणें करीत देशभर भ्रमण केलें.

११ डिसेंबर १९३६ या रोजीं जवाहरलालजी तिसऱ्या वेळीं कांग्रेसचे अध्यक्ष म्हणून निवडून आले. लागोपाठ तीन वर्षे कांग्रेसचे अध्यक्ष राहाणें त्यांना पसंत नव्हतें. परंतु गांधीजींनीं सुद्धां त्याचें अनुमोदन केलें. फैज़पूरच्या अधिवेशनांत जवाहरलालजींनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत भारतीय स्वातंत्र्याविषयीं प्रामुख्यानें उल्लेख केला. ब्रिटीश सरकारच्या साम्राज्यांतर्गत स्वराज्याच्या धोरणाचें त्यांनीं खंडन केलें.

निवडणूक संपली व सात प्रांतांत कांग्रेसला यश मिळालें. दिल्ली येथें कौन्सिलांत निवडून आलेल्या सभासदांची एक बैठक झाली व मंत्रिपद स्वीकारण्याचा निर्णय घेण्यांत आला. जवाहरलालजींना हा निर्णय पसंत नव्हता.

कांग्रेसला मुसलमानांचीं मतें जास्त मिळालीं नाहींत. मुसलमानांचे प्रश्न अगदीं निराळ्या स्वरूपाचे आहेत असें जिन्नांचें मत होतें. शेतकऱ्यांच्या दृष्टीनें हिन्दू मुसलमान असा भेद होत नाहीं असें नेहरूंचें म्हणणें होतें.

१९३८ च्या प्रारंभीं मुंबई येथें कांग्रेस कार्यसमितीची एक सभा झाली. त्या बैठकींत कांग्रेस मंत्र्यांच्या कामाविषयीं टीका झाली. कांग्रेस व सरकार याच्यांत वाढत चाललेल्या मतभेदाचीं लक्षणें दिसूं लागलीं होतीं. सरकारनें राजकीय कैद्यांना सुटका

कामीं यश लाभलें नाहीं. कांग्रेसचे प्रतिनिधि म्हणून जवाहरलाल नेहरू व आझाद त्यांना भेटले. ब्रिटन भारतावरची आपली पकड सोडायला तयार नव्हता.

"भारत स्वतःच्या बळावर स्वातंत्र्य मिळवील." असा ठराव कांग्रेसनें केला.

१९४२ च्या ऑगस्ट महिन्यांत मुंबई येथें कांग्रेसचें अधिवेशन भरलें. 'चले जाओ!' हा ठराव तेथेंच पास झाला. 'भारत छोडो' हा एक भारतीय स्वातंत्र्याचा मंत्र झाला. राष्ट्रीय चळवळ इतकीं वर्षें चालू राहल्यानंतर स्वतः महात्मा गांधीजीच क्रांतिकारी झाल्यासारखें वाटूं लागलें.

कांग्रेसची ही चळवळ सुरू करण्यापूर्वीच दुसऱ्या दिवशीं पहाटे सरकारनें कांग्रेसच्या पुढाऱ्यांना अटक केली. सर्व मिळून २० जणांना अटक झाली. हे सर्व कांग्रेसच्या अधिवेशनाला हजर होते. गांधीजींना चिंचवडनजीक उतरविण्यांत आलें आणि आगाखान यांच्या बंगल्यांत ठेवण्यांत आलें. मुंबईच्या पुढाऱ्यांना येरवड्याच्या तुरुंगांत ठेवण्यांत आलें. कांग्रेस कार्य कारिणीच्या बाकी सभासदांना पुण्याला घेऊन जाऊन तेथून अहंमदनगरच्या किल्ल्यांत नेण्यांत आलें.

पुढाऱ्यांना अटक झाल्याची बातमी कळतांच देशांत क्रोध व क्षोभ यांचा ज्वालामुखीच फुटल्याचा भास झाला. पुढाऱ्यांच्या अभावीं प्रजेनें स्वतः सरकारला तोंड दिलें. नाना तऱ्हेचीं संकटें हंसत हंसत सहन केलीं. विटेचें उत्तर दगडानें देण्याचा यत्न केला. १८५७ नंतर देशांत इतक्या मोठ्या प्रमाणावर झालेली चळवळ हीच होय.






# पाताळ कोट

[ १२ ]

[धूमक व त्याचे साथी कोठें लपले होते, हें मगर-माणसांनीं पाहिलें होतें. ते जवळ पोंचण्यापूर्वीं डोंगराच्या वळणाकडे ते पळूं लागले. शत्रु त्यांचा पाठलाग करूं लागले. एका तुकडींतल्या मगर-माणसांनीं भाले घेऊन त्यांची वाट रोखून धरली. पुढें—]

धूमक मुळींच भ्याला नाहीं. त्यानें फक्त एकदांच मागें वळून पाहिलें. जे जिवंत राहिले होते ते भिऊन पळाले नव्हते, या उटल ते पाय वाटेनें पाठीमागून धांवत पाठलाग करीत होते.

"सोमू! हे लोक येत आहेत ना, त्यांच्या समाचाराला मी आहें येथें उभा. तूं आणि विरूप दोघे त्या ओरडणाऱ्यांवर भाले फेंका." असें सांगून धूमकनें स्वतः एक भाला पाठलाग करणाऱ्या मगर माणसांवर फेंकला.

भाला येत असलेला पाहून मगर-माणसे पाय वाटेच्या दोन्ही बाजूला पांगलीं. तिकडे सोमक व विरूपनें फेंकलेले भाले आणि बाण डोंगराच्या वळणाच्या बाजूनें येणाऱ्या मगर माणसांवर पडले.

"काय पण हिंमत आहे!" त्यांच्या पैकीं एक जण ओरडून म्हणाला. तो होता

इतक्यांत धूमक व त्याचे दोघे साथी नदी काठीं येऊन पोंचले. त्यांना पाहून पुलिंदला देव पावल्यासारखा आनंद झाला. तो पळत पळत पुढें गेला आणि धूमकला कडकडून भेटून म्हणाला— "धूमक दादा! माझी धाकटी बायको त्या होडक्यांत कैदेंत आहे. 'वांचवा!' म्हणून ओरडत आहे. आतां तें होडकें कसें धरायचें हो?"

धूमकनें होडक्याकडे पाहिलें. मगर-माणसांपैकीं कांहीं ओरडत बुडत तरंगत होडक्याच्या पुढें पुढें ओघांत वाहात चालले होते. कांहीं होडक्याजवळ जाण्याचा जिवा-पाड यत्न करीत होते.

"पुलिंद तूं दोरखंड कापायला नको होतें. तें दोरखंड धरूनच होडकें बाहेर ओढतां आलें असतें. राक्षसाचे नोकर पाण्याच्या ओघांत मरणार. एक जण देखील वांचणें शक्य नाहीं. होडक्याकडे जाणाऱ्यांपैकीं एक दोघे पोंचतील कदाचित. सर्वांच्या सर्व कां बरें आपल्यावर धांवून आले? एक जण देखील होडक्यांत कां राहाला नाहीं?" धूमकची ही शंका दूर करण्यासाठीच जणुंकांहीं त्याचें बोलणें





संपण्यापूर्वींच होडक्याच्या पेटींतून एक खुजा राक्षस लंगडत बाहेर सुकाणूंजवळ आला. त्यानें सुकाणूं धरल्याबरोबर होडक्याचें डोलणें बंद झालें.

त्या खुजा राक्षसानें दांत ओठ चावून धूमककडे एकदां पाहिलें आणि होडक्याकडे पोहोत येणाऱ्या एका मगर-माणसाच्या डोक्यांत वल्ह्यानें मारलें आणि ओरडला— "मूर्खांनो! मरा! तुम्हांला व कालिकली राक्षसाला माझा हा शेवटचा नमस्कार! होडकें माझें आहे आणि ही बाईपण माझीच बायको आहे. आम्ही दोघं या जंगलांत कोठेंतरी झोंपडें बांधून सुखानें राहूं."

तें ऐकून पुलिंदाच्या अंगाचा भडका उडून गेला. म्हणाला—"दुष्टा! तिचा नवरा मी जिवत असतां माझ्या देखत तिला पळवून नेणार आहेस तूं?" असें म्हणत त्यानें नदींत उडी टाकली आणि पोहोत होडक्याकडे निघाला.

परंतु विरूपनें हात धरून त्याला बाहेर ओढलें. म्हणाला—"इतकी घाई कशाला? एकटा जवळ पोंचलास तरी तो तुला ठार केल्याशिवाय राहील का? थोडा धीर धर. तुझीं होडकीं येऊं तर देत. नंतर त्या होडक्याचा पाठलाग कर. तुझ्या मदतीला आम्ही आहोंच. त्या राक्षसाला ठार करून आम्ही तुझ्या बायकोला सोडवूं."

तिकडे तो खुजा राक्षस गाढव रेंकूं लागल्यासारखा जोरानें हंसला. म्हणाला— "आमचें परस्परांवर प्रेम झाल्यावर आणि लग्न करून घेतल्यावर पळवून नेलें असें कोण म्हणणार रे?" असें म्हणत होडक्या-जवळ येणाऱ्या आणखी एका मगर-माण-साच्या डोक्यांत त्यानें वल्हें मारलें आणि होडकें जोराचा ओघ होता तिकडे वल्हवून झपझप नेऊं लागला.

"गेली हो गेली....माझी लाडकी धाकटी गेली हो...." असें ओरडत पुलिंदनें पुन्हां एकदां पाण्यांत उडी मारली, परंतु त्याची कंबर धरून विरूपनें त्याला बाहेर ओढलें.

तेवढ्या अवधींत सोमकनें एक बाण नेम धरून त्या खुजा राक्षसाच्या गुडघ्याला मारला. बाण लागतांच त्याच्या हातांतली सुकाणूंची दांडी सुटली व तो होडक्यांत पडला.

"याला म्हणतात नेम! तो मरणार नाहीं व होडकें पण चालवूं शकणार नाहीं."








धूमकनें पाठ थोपटून सोमकला शाबासकी दिली.

होडकें एका भोंवऱ्यांत सांपडलें आणि चक्कर खाऊं लागलें. खुजा राक्षस लंगडत लंगडत उठला. त्यानें बाण काढून फेंकून दिला आणि सुकाणूं धरून होडकें भोंवऱ्या-च्या बाहेर काढलें.

इतक्यांत भिल्लांच्या दोन्ही होड्या आल्या. त्याच होड्यांत बसून धूमक व सोमक नदी पार करून आले होते. एका होडींत तो गरुडपक्षीपण तडफडत पडला होता.

होड्या जवळ किनाऱ्याला लागतांच धूमक व विरूप एका होडींत चढले. सोमक व पुलिंद दुसऱ्या होडींत बसले. पुलिंदनें आपल्या अनुयायांना काठाकाठानें पळत राक्षसाच्या होडक्यावर फक्त राक्षसालाच लागतील असे दगड फेंकायला सांगितलें. नंतर त्यानें असेंदेखील बजावून सांगितलें कीं जर का होडकें तुटून पाण्यांत बुडालें तर एकेकाची चामडी लोळवीन.

वल्हीं जोरानें मारून धूमकनें होड्या त्या होडक्याजवळ लवकर न्यायला सांगितलें. होडकें बुडालें तरी चालेल. पण तो राक्षस



जिवंत सांपडला तरी पुरे. म्हणजे आपल्याला कालिकली राक्षसाच्या पातालकोटाची वाट मिळेल."

"होडकें बुडालें आणि माझी बायको बुडाली तर मी कोणाच्या तोंडाकडे पाहूं?" पुलिंद घाबरल्यासारखा म्हणाला.

"धूमूदादा! मला वाटतें कीं कालशंबर मांत्रिकपण त्याच होडक्यांत कैदेंत आहे. म्हणून होडकें पण आपण बुडूं देतां कामा नये. त्या खुजा राक्षसाला आपण चौघे मिळून धरूं शकणार नाहीं का? सहजीं पकडूं." विरूप म्हणाला.







जंगलांत कोठेंतरी झोपडें बांधून सुखानें राहूं."

तें ऐकून पुलिंदाच्या अंगाचा भडका उडून गेला. म्हणाला–"दुष्टा! तिचा नवरा मी जिवंत असतां माझ्या देखत तिला पळवून नेणार आहेस तूं!" असें म्हणत त्यानें नदींत उडी टाकली आणि पोहोत होडक्याकडे निघाला.

परंतु विरूपनें हात धरून त्याला बाहेर ओढलें. म्हणाला–"इतकी घाई कशाला? एकटा जवळ पोंचलास तरी तो तुला ठार केल्याशिवाय राहील का? थोडा धीर धर. [illegible] नंतर त्या होडक्याचा पाठलाग कर. तुझ्या मदतीला आम्ही आहोंच. त्या राक्षसाला ठार करून आम्ही तुझ्या बायकोला सोडवूं."

तिकडे तो खुजा राक्षस गाढव रेंकूं लागल्यासारखा जोरानें हंसला. म्हणाला–"आमचें परस्परांवर प्रेम झाल्यावर आणि लग्न करून घेतल्यावर पळवून नेलें असें कोण म्हणणार रे?" असें म्हणत होडक्या-जवळ येणाऱ्या आणखी एका मगर-माण-साच्या डोक्यांत त्यानें वल्हें मारलें आणि होडकें जोराचा ओघ होता तिकडे वल्हवून झपझप नेऊं लागला.

"गेली हो गेली....माझी लाडकी धाकटी गेली हो...." असें ओरडत पुलिंदनें पुन्हां एकदां पाण्यांत उडी मारली, परंतु त्याची कंबर धरून विरूपनें त्याला बाहेर ओढलें.

तेवढ्या अवधींत सोमकनें एक बाण नेम धरून त्या खुजा राक्षसाच्या गुडघ्याला मारला. बाण लागतांच त्याच्या हातांतली सुकाणूंची दांडी सुटली व तो होडक्यांत पडला.

"ह्याला म्हणतात नेम! तो मरणार नाहीं व होडकें पण चालवूं शकणार नाहीं."





होडकें जोरानें वाहूं लागलें. राक्षसानें पण होडकें जोरानें चालवायला सुरवात केली. दोन्ही होड्या त्याचा पाठलाग करीत येत असलेल्या पाहून त्याच्या अंगांत एकदम कोठून स्फुरण चढलें कोणाला ठाऊक?

पुलिंदच्या अनुयायांनीं राक्षसाच्या होडी-वर दगडांचा वर्षाव चालू ठेवला होता. दगड पाण्यांत होडीजवळ पडत व त्यामुळें पाण्यांत जोरानें लाटा उसळून होडीचा वेग थोडा कमी करीत. राक्षसाला पण हात थांबवून कांहीं वेळ बसून रहावें लागे. आतां होडकें बुडणार अशी भीति पण त्याला वाटूं लागली.

हळू हळू पाठलाग करणाऱ्या होड्या आणि राक्षसाच्या होडक्यांतलें अंतर कमी होऊं लागलें. पुलिंदचे अनुयायी तें पाहून मोठमोठे दगड होडक्याच्या आजूबाजूला फेंकूं लागले. धूमक व त्याच्या साथ्यांना वाटूं लागलें कीं होडकें हातांत येणें आतां तितकेंसें कठीण नाहीं. विरूप होडींतल्या गरूड पक्षाजवळ बसून प्रेमानें त्याला गोंजारीत चुटक्या वाजवून मोठ्या उत्साहानें त्याला बेशुद्ध स्थितींतून जागा करीत होता. गरूड पक्षी उडत नव्हता, बसल्याबसल्याच डोकें खालीं करून शीळ वाजवीत होता.

"हा गरूड जर का वळला तर त्या राक्षसाच्या डोक्यावर आणि खांद्यावर चोंचीनें एक दोन टोंची मारून येईल." विरूप म्हणाला.

इतक्यांत भिल्लांनीं टाकलेला दगड चुकून विरूप बसला होता त्या होडीला लागला. त्याच्या धक्क्यानें होडी उलटली आणि सर्व पाण्यांत पडले. नाव सरळ करून पुन्हां सर्व होडींत बसले. गरूडपण पाण्यांत पडला होता. तो पंख फडफडवून विरूपच्या खांद्याजवळ घिरट्या घालूं लागला. तें पाहून विरूपला आनंद झाला.

एकाएकीं पाण्याचा ओघ वाढला. एवढेंच नव्हे तर नदींत मोठमोठे खडक व दगड-पण दिसूं लागले. खुद्द राक्षस, होडकें त्या दगडांवर आपटून फुटूं नये अशा बेतानें होडकें संभाळून नेऊं लागला. पुलिंदच्या अनुयायांचा दगडांचा वर्षाव चालू होता.

"मला वाटतें कीं जवळच कोठें तरी धबधबा असावा. म्हणूनच पाण्याचा ओघ इतका वाढलेला दिसतो आहे. आपण आपल्या होड्या काठावर नेऊन जाण्यांत शहाणपण आहे." विरूप म्हणाला.

"मग तो राक्षस आणि माझी बायको ?" पुलिंद घाबरून म्हणाला.

"ती लागेल कोठें तरी कांठाला, नाहीं-तर........" तो असें बोलतच होता कीं होडकें एका खडकावर आपटलें आणि [illegible] मारली. नदींत तरंगत वहात चाललेल्या एका बाईकडे तो पोहोत गेला. नंतर तिला आपल्या खांद्यावर घेऊन तो पोहोत काठाकडे जाऊं लागला.

"होड्या लवकर चालवा !" धूमक म्हणाला. भिल्लांनीं एक दोन मिनिटांत होड्या काठाला आणल्या. परंतु तोंपर्यंत राक्षस बराच खालीं वाहून गेला होता आणि काठावर आला पण होता. धूमक व त्याचे साथी आणि राक्षस यांच्या मध्यें एक देऊळ होतें. देवळाच्या चारी बाजूला मोठमोठीं झाडें होतीं व त्यांवर वनमाणसें लोंबत उड्या मारीत होतीं. त्यापैकीं एक वनमाणूस जोरानें ओरडला आणि धूमक होता त्या बाजूला येऊं लागला.

(पुढील गोष्ट पुढील अंकीं)



# शाप कीं दंड

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं.

तो पुन्हां झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतलें आणि स्मशानाच्या दिशेनें नेहमींप्रमाणें मौनपणें चालूं लागला. तुझ्या सरस्यांनीं तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा ! आपल्या शक्ती-बाहेरचें काम करण्याची जबाबदारी आपल्या शिरावर घेतली तर त्यानें कनकवर्ष नांवाच्या राजपुत्रासारखें असामान्य मंत्रबळ संपादन करून घेतलें पाहिजे. मी तुला त्याची गोष्ट सांगतों. नीट लक्ष देऊन ऐक !" असें सांगून तो गोष्ट सांगूं लागला.

गंगेच्या कांठीं कनकपुर नांवाच्या गांवीं प्रियदर्शन नांवाचा राजा राज्य करीत असे. तो नागराज वासुकी याचा मुलगा होता. त्याच्या राणीचें नांव यशोधरा. कनकवर्ष हा

**वेताळाच्या गोष्टी**



त्यांचा मुलगा. कनकवर्ष इतका सुंदर होता कीं प्रत्येक तरुण स्त्रीला, तो आपला पति व्हावा असें वाटे.

त्याचें रूपवर्णन ऐकूनच मदनसुंदरी नांवाची राजकन्या त्याच्यावर भाळली. ती विदर्भ देशांतल्या कुंडिननगरच्या राजाची कन्या होती. ती देखील कनकवर्षला साजेल अशीच रूपवती होती. तिनें रोलदेव नामक एका चित्रकाराला आपलें चित्र देऊन कनकवर्ष याच्याकडे आपला मानस कळविण्यासाठीं पाठविलें. रोलदेवनें मदनसुंदरीचें चित्र देऊन कनकवर्षला राजकन्येचा प्रेम-संदेश कळविला. कनकवर्ष मदनसुंदरीचें चित्र पाहून तिच्यावर मोहित झाला. दोघांचें पुढें थाटामाटानें लग्न झालें. बरेच दिवस झाले तरी त्यांना मूल झालें नाहीं. तेव्हां कनकवर्षाला काळजी वाटूं लागली कीं पुढें कुलोद्धार कोण करणार? त्या काळजींत राजाला झोंप लागेना. एकदां तो अंथरुणावर या कुशीवरून त्या कुशीवर वळत असतां त्याला समोर एक वयस्क स्त्री दिसली. तिला पाहतांच कनकवर्षाच्या मनांत तिच्याविषयीं श्रद्धा व भक्ति उत्पन्न झाली. त्यानें उठून तिला नमस्कार केला.

त्या स्त्रीनें त्याला आशीर्वाद दिला व म्हणाली—"मुला! मी तुझी आते, तुझ्या वडिलांची मोठी बहीण रत्नप्रभा. आम्ही दोघे बहीण भाऊ नागराज वासुकी यांचीं मुलें. मी आजवर अदृश्यपणें तुझें रक्षण करीत आलें आहे. तूं असा उदास कां?"

"आत्याबाई! मी तुमच्या दर्शनानें धन्य झालों. मला मूल नाहीं, फक्त याच गोष्टीचें दुःख आहे."

"मी एक उपाय सांगतें. तूं कुमारस्वामी याची आराधना कर! त्याच्या अनुग्रहानें तुला पुत्रप्राप्ति होईल. अनेक [illegible] तुझ्या [illegible] पण त्यांना तोंड देण्यास मी तुझ्या पाठीशीं आहें." असें सांगून रत्नप्रभा अदृश्य झाली.

कनकवर्ष राज्यकारभार प्रधानाच्या हातीं देऊन कुमारस्वामीची आराधना करण्यासाठीं निघाला. त्यानें घोर तपश्चर्या केली. कांहीं दिवसांनीं त्याच्या डोक्यावर धबधब्यासारखें पाणी पडूं लागलें. तो कष्ट सहन करण्यास रत्नप्रभेनें अदृश्यपणें शक्ति पुरविली. कुमारस्वामीनें त्याच्या तपश्चर्येची परीक्षा घेण्यासाठीं विघ्नेश्वर गणनायकाला नेमलें. त्यानें धबधब्याच्या पाण्यांत सापाचें विष कालविलें. रत्नप्रभेनें तें विष सहन करण्याची शक्ति पण त्याला दिली. गणनायकानें आपले सुळे त्याच्या छातीवर रोवून पाहिले. श्री गजवदनाला समोर पाहून गद् गद् कंठानें कनकवर्ष त्याचें स्तोत्र गाऊं लागला. गजाननानें प्रसन्न होऊन त्याला आशीर्वाद दिला आणि निघून गेला. तेव्हां कुमारस्वामीनें प्रसन्न होऊन दर्शन दिलें आणि म्हणाला—"मी तुझी तपश्चर्या पाहून प्रसन्न आहें. पाहिजे तो वर मागून घे!"

"देवाधिदेवा! माझ्यावर अनुग्रह करून पुत्रप्राप्तीचा वर दे!" कनकवर्ष म्हणाला.



"तथास्तु! तुला एक मुलगा होईल. त्याचें नांव हिरण्यवर्ष असें ठेव. तूं आंत गाभाऱ्यांत ये, थोडा वेळ." कुमारस्वामी म्हणाला.

राजाच्या देहांत राहून राजाबरोबर ती गाभाऱ्यांत गेली तर देवाचा कोप होईल असा विचार करून रत्नप्रभा बाहेरच राहली. तरी देवापासून कांहीं लपतें का? देव त्याला म्हणाला—"तूं मला फसविलें आहेस. म्हणून तुला आपल्या पुत्रकलत्राचा विरह एक वर्षभर सहन करावा लागेल." असें सांगून कुमारस्वामी अदृश्य झाला.



कनकवर्ष आपल्या राज्यांत परतला. देवाच्या अनुग्रहानें त्याला एक मुलगा झाला. त्यानें कुमारस्वामीच्या इच्छेप्रमाणें मुलाचें नांव हिरण्यवर्ष असें ठेवलें आणि आश्चर्य म्हणजे त्याच्या नांवाला साजेल अशी सुवर्णवृष्टिपण त्या दिवशीं झाली.

पाऊस पडूं लागल्यानंतर बाळंतिणीच्या खोलीचें रक्षण करण्यासाठीं सर्व काळजी घेण्यांत आली. पाऊस जोराचा पडत होता. वादळ पण सुरू झालें. झाडें उपटून पडूं लागलीं. अशा समयीं एक भयंकर आकृतीची स्त्री बाळंतिणीच्या खोलीचें दार उघडून आंत [illegible] घेतलें आणि पळून गेली. राणी "माझा मुलगा! माझा मुलगा!" असें ओरडत उठली आणि काळोखांत त्या राक्षसिणीच्या मागें निघाली. राक्षसिणीनें एका सरोवरांत बुडी मारली. मुलाच्या मोहानें राणीनें पण सरोवरांत उडी टाकली.

लगेच वादळ थांबलें. आकाश निरभ्र झालें. वारा व पाऊस पण थांबला.

दुसऱ्या दिवशीं कनकवर्ष मुलाला व त्याच्या आईला पाहण्यासाठीं आला तेव्हां दोघं अदृश्य झालेली पाहून बेशुद्ध होऊन पडला. शुद्धीवर आल्यानंतर भ्रमिष्टासारखा पळत सुटला. त्याच्या मनाचें कोणी सांत्वन करूं शकला नाहीं. तो नगराबाहेर रानांत निघून गेला.

जंगलांत त्याला अनेक कष्ट सहन करावे लागले. सुदैवानें तो सर्व संकटांतून वांचला. विंध्य पर्वताच्या डोंगराळ भागांत तो पुष्कळ हिंडला. एका वर्षानंतर रत्नप्रभा एकाएकीं त्याच्या समोर दत्त म्हणून उभी राहाली व म्हणाली—"हा घे तुझा मुलगा व तुझी बायको. मीच दोघांना, कुमारस्वामीनें दिलेला शाप पुरा व्हावा म्हणून नेलें होतें."

[illegible] आणि मुलगा सुरक्षित [illegible] आनंद झाला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा! माझ्या मनांत एक शंका आहे. कुमारस्वामी राजावर रागावला तेव्हां त्यानें फक्त पुत्रवियोगाचा शाप कां दिला नाहीं? बायकोचा विरहसुद्धां सहन करावा लागेल असा शाप कां दिला? पुत्रप्राप्तीसाठींच नाहीं का तो देवाच्या गाभाऱ्यांत गेला होता आणि त्यामुळें देवाला फंसविल्याचा अपराध त्याच्या हातून घडला? या प्रश्नांचीं उत्तरें माहीत असून तूं दिलीं नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

तें ऐकून विक्रमार्क म्हणाला—"देव वर देतो ते अयोग्य व अपात्र अशा व्यक्तीला देत नसतो. राजाची पात्रता ओळखण्यासाठींच नाहीं का त्यानें गणपतीच्या सहाय्यानें त्याची परीक्षा घेतली? त्या सर्व परीक्षेंत राजा स्वतःच्या बळावर यशस्वी झाला नाहीं हें कळलें तेव्हां त्यानें त्याला शाप देऊन त्याची परीक्षा घेतली. खरें पाहिलें तर तो शाप नव्हताच दंड होता. कारण जन्मल्याबरोबर मुलाला अदृश्य करून देवानें राजाला फार मोठा दंड दिला. राणीच्या विरहानें तर त्याचा आधारच तुटला. तो दंड फक्त राजाला नसून रत्नप्रभेला पण होता. त्याचें प्रायश्चित्त म्हणून तिनें स्वतःच राणीला व मुलाला अदृश्य करून तो शाप यशस्वी होण्यास हातभार लावला."

राजाचें मौन अशा तऱ्हेनें भंग होतांच वेताळ अदृश्य झाला व प्रेतासह झाडाला जाऊन लोंबकळूं लागला. (कल्पित)





# मंदबुद्धि

एका नदीकाठच्या गांवीं रामण्णा नांवाचा एक जमीनदार रहात असे. स्वभावानें तो फार सुशील होता. म्हणून गांवकरी त्याचा फार आदर करीत. त्याला मूल नव्हतें. परंतु ईश्वरकृपेनें त्याला एक मुलगा झाला. त्यानें आपल्या मुलाचें नांव वीरण्णा असें ठेवलें. आईवडिलांचा तो फार लाडका होता. परंतु फार लाड झाल्यानें तो बिघडला. ल्हानपणींच त्याचा उडाणटप्पूपणा सुरू झाला. ल्हान व थोर गांवकऱ्यांना तो तोंडाला येईल तें बोले. कोणी त्याचें ऐकलें नाहीं तर तो मारहाण करायलादेखील मागेंपुढें पहात नसे. बापाकडे पाहून मुलाचा हा खट्याळ-पणा गांवकरी निमूटपणें सहन करीत. गांवांतल्या बायका वीरण्णाच्या आईला त्याच्या विरुद्ध रोज एक न एक तक्रार येऊन सांगत.

"अहो, किती झालें तरी तीं मुलेंच! मुलें भांडतातहि आणि पुन्हां एकत्र खेळ-तातहि. म्हणून कोणी अशी तक्रार करतें का? थोडा कानाडोळा करायला नको का?" वीरण्णाची आई म्हणे.

वीरण्णाला शाळेंत घातलें. पण त्याला लिहितां वांचतां आलें नाहीं. त्याचा उडाण-टप्पूपणा वाढतच गेला. लोक त्याला भिऊं लागले. त्याचा दांडगेपणा इतका वाढला कीं गांवांतल्या बायका नदीवर पाणी आणा-यला जात तेव्हां त्याला समोर पाहून भिऊन पळून जात. वीरण्णाच्या दांडगेपणाच्या गोष्टी ऐकून रामण्णाला काळजी पडली कीं या मुलाला कसें वळण लावायचें?

सौ. सरलाबाई नाईक

स्वभावांत कांहीं सुधारणा करणें सोपें नव्हतें. एकुलता एक मुलगा आणि असा कुलांगार निघाल्यावर कोणा आईबापाच्या हृदयाला धक्का नाहीं बसणार! वीरण्णाच्या आईची मान पदोपदीं खालीं होऊं लागली.

परंतु आईबापाला जमलें नाहीं तें गांवांतल्या एका शेतकऱ्याच्या मुलीनें करून दाखविलें. त्या मुलीचें नांव होतें गौरी. ती सुंदर होती तशीच समजूतदार आणि चतुर व हुशारपण होती. ती वीरण्णाला पाहून कधीं भिऊन पळून गेली नाहीं. तिचें रूप लावण्य व धैर्य पाहून वीरण्णानें तिच्याशींच लग्न करण्याचें ठरवून आपल्या आईबापांना कळविलें. गौरीला अर्थातच ती गोष्ट कळली तेव्हां तिनें मनाशीं ठरविलें कीं ज्या दिवशीं तो तिच्याशीं लग्नाची गोष्ट काढील त्या दिवशीं त्याची बरोबर छान खोड मोडायची.

गौरीच्या मैत्रिणींना वीरण्णा तिच्याशीं लग्न करणार असल्याचें कळलें होतें. उन्हा-ळ्याचे दिवस सुरू झाले होते. गौरीच्या घरीं तिच्या मैत्रिणी जमा झाल्या होत्या. नेमका त्याच वेळीं वीरण्णा तिच्या घरा-



समोरून जात होता. तें पाहून एका मैत्रिणीनें थट्टेत त्याला ऐकूं जाईल असें विचारलें—"हो का ग गौरी? वीरण्णाशीं का तुझें लग्न ठरलें आहे? केव्हां गडे?"

गौरी म्हणाली—"जा ग! माझें लग्न इतकें सोपें वाटलें होय तुला? माझ्याशीं लग्न करणाराची मी पहिल्यानें परीक्षा घेणार आहें!" असें म्हणून ती मोठ्यानें हंसली व तिच्या बरोबर तिच्या मैत्रिणीपण खूप हंसल्या.

वीरण्णानें तें सर्व ऐकलें व तें सर्व त्याच्या कानांत खूप झोंबलें. तरमग गौरी



माझी परीक्षा घेणार आहे का? काय विचारणार आहे कोणास ठाऊक? तो घरीं गेला, पण त्याला करमेना. तेच तेच विचार त्याच्या मनांत घोळूं लागले. तो सरळ गौरीच्या घरीं गेला.

"म्हटतें, इकडे कसें काय येणं झालं?" गौरीनें विचारलें.

"मी तुलाच भेटण्यासाठीं आलों आहें. म्हणें, तुझ्याशीं लग्न करणाराची प्रथम तूं परीक्षा घेणार आहेस? ऐकूं तर दे कीं कशी काय परीक्षा आहे ती?" वीरण्णानें ऐटींत विचारलें.

करण्याची इच्छा असेल त्याची परीक्षा मी घेणार आहें." गौरी म्हणाली.

"मीच लग्न करणार आहे, असें कां नाहीं समजून चालत?"

"हें पहा, परीक्षेंत तूं पास नाहीं झालास तर आयुष्यभर माझी चाकरी करावी लागेल? तेव्हां तूं कशाला या भान-गडींत पडतोस?" गौरीनें थट्टेंत विचारलें.

वीरण्णा जास्तच संतापला. म्हणाला—"मी नाहीं यशस्वी झालों तर कोण आहे ग माझ्याहून जास्त मोठा?"

"तूं म्हणतोस तें बरोबर आहे. पण माझी अट आहे ना कबूल, पहिल्यानें तें सांग. मी कांहीं फार मोठी आणि कठीण परीक्षा नाहीं घेणार तुझी!" गौरी म्हणाली.

"बोल तर काय करायचें तें!" वीरण्णा म्हणाला. "पहा हो, तूं माझी अट कबूल केलीस ना?" गौरीनें पुन्हां विचारलें.

वीरण्णानें मानेनें होकर दिल्यावर गौरी म्हणाली—"तर मग चल माझ्या बरोबर!" असें सांगून ती एक घागर व एक लहान पातेली घेऊन नदीवर निघाली. वीरण्णा तिच्याबरोबर गेला. नदींत वाळूच वाळू



होती. तिनें वीरण्णाला वाळूत एक खळगा खणायला सांगितलें. वीरण्णानें खळगा खणल्यावर त्यांत पुष्कळ पाणी आलें.

"हें पाणी चांगलें नाहीं. या पातेलीनें हें घाणेरडें पाणी उपसून काढ. मग मी भरून घेईन स्वच्छ पाणी." गौरी म्हणाली.

वीरण्णा पाणी उपसूं लागला. पाणी मुळींच कमी होत नव्हतें. तो पाणी काढी तेवढें लगेच पुन्हां खड्ड्यांत जमा होई. असें तासभर होत राहलें. वीरण्णा दमून गेला.

"हें काय अजून नाहीं का रिकामा झाला खड्डा?" गौरीनें विचारलें.

"नाहीं बुवा! मी हारलों. कबूल करतों." वीरण्णा म्हणाला आणि त्यानें पातेली भिरकावून दिली.

"तूं या पहिल्या परीक्षेंतच हात टेकलेस? जाऊं दे. आणखी एक दोन परीक्षा आहेत त्यांत यशस्वी होतोस कीं नाहीं पाहूं या." म्हणत गौरी वीरण्णाला आपल्या घरीं बोलावून घेऊन गेली. गौरीच्या मैत्रिणी वीरण्णाकडे पाहून तोंडावर हात ठेवून हंसूं लागल्या.

गौरीनें घरीं पोंचल्यावर एका परातींत निखारे आणले आणि एक रिकामा डबा व थोडा धूप देत वीरण्णाला म्हणाली—"हा



धूप निखाऱ्यावर टाक आणि धूर येईल तो डब्यांत भरून ठेव. मी जाऊन आलेंच आंघोळ करून. मला तो धूर ओल्या केसांना लावायला हवा आहे."

मंदबुद्धी वीरण्णानें विस्तवावर धूप टाकला आणि डबा उलटा करून धूर धरूं लागला. थोड्या वेळानें गौरी न्हाऊन आली व विचारलें—"धरला का धूर? बघूं?"

वीरण्णानें डबा तिच्या समोर ठेवला. पण त्यांत धूर कोठून असणार?"

"एवढें लहानसें काम सुद्धां तुला करतां येऊं नये, आश्चर्य आहे. दुसऱ्या परीक्षेंत

पण तूं नापास. पाहातें आतां तिसरी परीक्षा घेऊन." गौरी म्हणाली.

या खेपेस गौरीच्या मैत्रिणी जास्तच मोठ्यानें हंसल्या. वीरण्णाला मूग गिळून सर्व सहन करावें लागलें.

गौरी घरांत गेली व एका तांब्यांत दूध घेऊन आली. म्हणाली—"यांत अर्धें पाणी घातलेलें आहे. तेवढें बाजूला करून चांगलें दूध भांड्यांत राहूं दे."

वीरण्णाला काय करावें, हें सुचेना. तेव्हां मात्र त्याला स्वतःचीच लाज वाटूं लागली व शाईटपण वाटलें.

"हें काम नाहीं होत माझ्याकडून!" असें म्हणत तो जाण्यासाठीं निघाला.

"कोठें निघालास? तूं सर्व परीक्षांत नापास झाला आहेस. आतां तूं माझा नोकर व दास झाला आहेस. मी सांगितल्या-शि[illegible] तूं [illegible] कामा नये. मी जें सांगेन, ते तुला करावें लागेल." गौरी म्हणाली.

गौरीच्या मैत्रिणी डोळे मिचकावून हंसूं लागल्या—"बाई बाई! कवडीची अकल नाहीं आणि काय सर्व गांव डोक्यावर घेतलें होतें स्वारीनें. म्हणें, गौरीशीं लग्न करणार! ताडासारखें वाढल्यानें काय होतें! साध्या गोष्टीसुद्धां नकोत का कळायला?"

सर्व गांव गौरीच्या घरासमोर जमा झालें. गौरीनें वीरण्णाची कशी खोड मोडली तें ऐकून सर्वांना आनंद झाला. सर्वांत जास्त आनंद वाटला तो रामण्णाला, कारण वीरण्णांत एकदम पालट झाला होता. त्यानें गौरीच्या बापाशीं बोलून तिला आपली सून करून घेतलें.





# मणिद्वीप

कांहीं व्यापारी एका जहाजांत बसून पूर्वेकडील बेटांच्या दिशेनें निघाले. तेथें व्यापाऱ्याच्या मालाची देवाण घेवाण करून ते श्वेत द्वीपांत पोंचले तेव्हां त्यांच्या जहाजांत सिंहलद्वीपाचा रहिवाशी एक तरुण येऊन बसला. जहाज समुद्रांत खोल पाण्यांत चालूं लागल्यावर एकाएकीं वादळ सुरू झालें आणि सुकाणू एका खडकावर आदळून तुटलें. म्हणून वादळांत जहाज कोणत्या दिशेनें चालत आहे हें त्यांना कळेना. दुसऱ्या दिवशीं त्यांचें जहाज एका बेटाकडे जात असल्याचें दिसलें. थोड्यावेळानें खड-काळ बेटावर जहाज आदळून फुटणार अशी भीति सर्वांना वाटूं लागली.

इतक्यांत जहाजाचा कप्तान म्हणाला—"हें समोर जें द्वीप येत आहे तें मणिद्वीप आहे. या बेटाच्या खडकांत मणी असतात. इतके चांगले मणी जगांत इतरत्र कोठेंच मिळत नाहींत."

तें ऐकून सर्वांना जिवांत जीव आल्या-सारखें वाटलें. सिंहल द्वीपावरचा तरुण रहिवाशी म्हणाला—"अहो, जहाज फुटणारच असेल तर तें दगडावर किंवा हिऱ्यामाणकांवर आदळून फुटलें तरी एकच नाहीं का?"

परंतु जहाज मणिद्वीपापासून एका मैलावर असतांनाच वादळ थांबलें. आतां जहाज काठावर कसें पोंचणार हा प्रश्न समोर होता. त्या बेटावर बंदरपण नव्हतें. म्हणून लहान लहान होडकीं पाण्यांत सोडून लोक किनाऱ्याकडे निघाले.

सिंहल द्वीपाचा रहिवाशी तरुण जहाजां-तून उतरला नाहीं. "मला त्या रत्नांची

श्री का. ना. सोमण



गरज नाहीं. तुम्हांलाच तीं लखलाभोत. मला आमच्या ताम्रमणी नगरीं जावयाचें आहे. हें जहाज मला खात्रीनें त्या गांवीं पोंचतें करील. मी नाहीं उतरत." तो म्हणाला. सर्व त्याला वेडापीर समजून मणिद्वीपाकडे होडकीं घेऊन निघाले.

काठावर पोंचतांच जहाजाचा कप्तान म्हणाला—"या बेटावर खुजांचें राज्य आहे. संभाळून बोलावें व वागावें सर्वांनीं. कारण या खुजांना एकदां राग आला कीं स्वतः ब्रह्मदेव उतरला तरी तो देखील त्यांच्या हातांतून वांचवूं शकणार नाहीं. विषारी बाणांनीं ते शत्रूचा वध करतात. या उलट त्यांच्याशीं सलोख्यानें वागलें तर ते आप-ल्यासाठीं स्वतःचा जीवदेखील द्यायला तयार होतील."

"म्हणून यांच्याशीं सावधगिरी बाळगून सर्वांनीं बोलावें. तो समोर जो डोंगर दिसतो आहे त्यावर रत्नें व मणि माणिक्यें आहेत. त्या डोंगराच्या पायथ्याशीं खुजांची वस्ती आहे. डोंगराचा कडा चारी बाजूंनीं सरळ उभा आहे. त्याच्यावर चढून जाणें अशक्य आहे. पण चढायला पायऱ्या आहेत. त्या पायऱ्या ज्या बाजूला आहेत ती वाट खुजांच्या गांवांतून जाते. पायऱ्यांवर खुजांचे पाहारेकरी डोळ्यांत तेल घालून पाहारा देतात. तेव्हां त्या खुजांशीं मैत्रीभाव दाखवूनच बोललें पाहिजे."

कप्तानानें सांगितल्याप्रमाणें सर्व त्या डोंगराकडे निघाले. थोडें अंतर चालून गेल्यावर त्यांना खुजांची वस्ती दुरून दिसली. वस्तीपासून ते बरेच दूर होते. पण त्यांच्यासमोर खुजांनीं सोडलेले बाण येऊन पडूं लागले. सुदैवानें कोणाला बाण लागला नाहीं.





"आपण सर्व येथेंच बसूं या. नाहींतर त्यांना वाटेल कीं आपण त्यांच्यावर स्वारी करण्यासाठीं आलों आहों." कप्तान म्हणाला. त्यानें सांगितल्याप्रमाणें सर्व जमिनीवर पडून राहाले.

कांहीं वेळानें खुजांचा एक नायक कांहीं सैनिकांना बरोबर घेऊन आला व दरडावून विचारूं लागला—"कोण तुम्ही सर्व? आमच्या द्वीपावर कशासाठीं आलां आहां?"

"आमचें जहाज वादळांत सांपडून मोडलें आहे. आम्ही तुमची मदत मागायला आलों आहों." कप्तान म्हणाला.

"आम्ही तुम्हांला तुमच्या डोळ्यांना पट्टी बांधून राजाकडे घेऊन जाऊं. तुम्हांला जें कांहीं सांगावयाचें असेल तें आमच्या महाराजांजवळ सांगा." खुजे सैनिक म्हणाले. तें कबूल करून घेतल्यावर खुजांनीं सर्वांच्या डोळ्यांना पट्टी बांधली व त्यांचे हात बांधून त्यांना राजासमोर हजर केलें.

"तुम्ही वादळ म्हणतां तें आम्हांला कांहीं माहीत नाहीं. तुम्ही ज्या दिशेकडून आलांत त्या दिशेला आमच्या अनुयायांना एकहि जहाज दिसलें नाहीं. आमच्या या बेटावर जो एकदां पाऊल टाकतो तो जिवंत परत जात नाहीं हें तुम्हांला कदाचित माहीतच असेल. या बेटावर येण्यांत तुमचा हेतू कांहींतरी निराळाच होता यांत आम्हांला तरी कांहीं शंका वाटत नाहीं. म्हणून आम्ही तुम्हांला कैदेंतच ठेवण्याचें ठरविलें आहे." राजा म्हणाला.



खुजांसाठीं तयार केलेल्या तुरुंगांत त्या सर्व व्यापाऱ्यांना कोंडून ठेवण्यांत आलें. अर्थातच ती जागा त्यांना पुरेशी नव्हती.

खुजांचा राजा म्हणाला तसें खुजांना समुद्रांत दूरवर कोठेंच जहाज दिसलें नाहीं. कारण त्या बेटाच्या चारी बाजूंच्या पाण्याला



ओघ होता आणि त्या ओघामुळें जहाज वहात जाऊन बेटाच्या पलीकडल्या बाजूला किनाऱ्याला लागलें होतें. तेथें एक बंदरपण होतें. सर्व होडक्यांत बसून निघून गेल्यावर सिंहल द्वीपावरचा तो रहिवासी शांतपणें जहाजांत झोंपला आणि त्याची झोंप मोडली तेव्हां जहाज बंदरांत उभें होतें.

"ताम्रमणी बंदर आलें वाटतें!" असें म्हणत बंदरांत उतरला. त्यावेळीं बंदरांत कोणी नव्हतें. जवळच एक डोंगर त्याला दिसला. तो त्या दिशेनें जाऊं लागला. थोडें अंतर चालून गेल्यावर त्याला दोन खुजीं मुलें गोट्या खेळत असलेलीं दिसलीं. संध्याकाळच्या आडव्या सूर्यकिरणांमुळें गोट्या चकाकत होत्या. तो चकित झाला.

त्या सिंहली तरुणाला पाहून मुलें म्हणालीं—"बापरे बाप! हा कोणी राक्षस आलेला दिसतो आहे." तीं पळूं लागलीं. पण त्यानें त्यांना धरलें व म्हणाला—"खुज्यांनो! मी तुमच्या सारखा एक मनुष्यच आहें. थोडासा उंच आहें व लठ्ठपण आहें. मला लागली आहे भूक. कांहीं तरी खायला द्या."

मुलें त्या सिंहलीला बरोबर घेऊन आपल्या घरीं गेलीं. जातांना तीं त्याला म्हणालीं—"तुझ्या सारख्याच कांहीं राक्षसांना आमचा राजानें कैद करून ठेवलें आहे."

आपल्या बरोबर जहाजांत प्रवास करणारे ते व्यापारीच बहुतेक असावेत. त्यांना सोडवलें पाहिजे, असा त्यानें विचार केला, पण उघड बोलला नाहीं.

खुजीं मुलें त्याला घरीं घेऊन गेल्यावर त्याला धरायला राजाचे शिपाई नाहीं आले. कारण तो एकटाच होता. पण इतर खुजे पुष्कळ जमा झाले. चवकशी करतां त्यांना कळलें कीं त्या राक्षसानें रत्न किंवा मणि कशाचीच चोरी केली नाहीं, एवढेंच नव्हे तर एक गोटी देखील उचलली नाहीं. म्हणून त्यांचा त्याच्यावर विश्वास बसला. त्याला पोटभर जेवूं घातलें. त्यानें गाणें गाऊन व गमतीदार गोष्टी सांगून खुजांना आपलेंसें करून घेतलें.

दुसऱ्या दिवशीं सिंहली खुजा मुलांना म्हणाला—"एकदां तुमच्या राजाला भेटण्याची इच्छा आहे."

"तर मग चल, ते आतां बागेंत फिरायला गेले असतील." मुलें म्हणालीं. त्या दोघांना खांद्यावर बसवून घेऊन सिंहली राजाच्या बागेंत गेला.

"ते पहा आमचे महाराज! आम्हांला खाली उतरव. राजानें आम्हांला पाहिलें तर आम्हांला दंड करील." मुलें घाबरून गेलीं होतीं.

सिंहलीनें त्यांना खांद्यावरून खालीं उतरविलें आणि राजाजवळ गेला. त्याची कंबर धरून सिंहलीनें लहान बाहुला उचलावा तसें त्याला उचललें. तो मोठ्यानें ओरडला. त्याचें ओरडणें ऐकून राजाचे शिपाई धनुष्य बाण घेऊन धांवले.



"त्यांनीं माझ्यावर बाण सोडला तर लक्षांत ठेव, तुझी मान पिळवटून तुला जागच्या जागीं ठार करीन." सिंहलीनें धमकावलें. तेव्हां राजानें सर्वांना दूर निघून जायला सांगितलें.

"तूं माझ्या मित्रांना तुरुंगांत डांबून ठेवलें आहेस म्हणें? पहिल्यानें त्यांना सुटका दे. त्यांनीं काय केलें रे? नाहींतर तुला समुद्रांत फेंकून देईन व तुझ्या जागीं मी दुसऱ्याला राजा करीन." सिंहली म्हणाला.

"तूं म्हणशील तसें करतों बुवा. प्रथम मला उतरूं तर देशील." राजा म्हणाला.

सिंहलीनें त्याला खालीं उतरविलें. राजानें आपल्या शिपायांना बोलावून सर्व व्यापाऱ्यांना सोडून घेऊन यायला सांगितलें. थोड्याच वेळांत सर्व व्यापारी तेथें आले.

"हे सर्व खोटें बोलले. म्हणाले, मोठें वादळ आलें आणि वादळांत आमचें जहाज मोडलें आणि कांहीं उपाय नाहीं म्हणून आमच्या बेटावर यावें लागलें. म्हणून मला त्यांच्यावर संशय आला व मी त्यांना तुरुंगांत टाकलें." राजा म्हणाला.

"तें बोलले तें सर्व खरें आहे. आमच्या जहाजाचें सुकाणूं मोडलें आहे, पहा जाऊन पाहिजे तर. जहाज बंदरांत उभें आहे. नवीन सुकाणूं तयार होईपर्यंत तुमच्या बेटावर आम्हांला रहावें लागणार. नंतर आम्हीं पुढें निघून जाऊं." सिंहली तरुण म्हणाला व राजा त्याला कबूल झाला.

[illegible] जहाजाला बसविण्यांत आलें.

"चला, निघूं या आतां." सिंहली म्हणाला.

"रत्न माणिक्यें घेतल्याशिवाय कसें काय जायचें?" दुसरे विचारूं लागले.

सिंहली तरुणानें आपल्या ओळखीच्या खुजा मुलांना बोलाविलें आणि म्हणाला—"आम्हांला पण खेळायला गोट्या हव्या आहेत. तुम्ही आपल्या मित्रांबरोबर डोंगरावर जाऊन गोटे दगड घेऊन येतां का? तुमच्यासारख्या लहानलहान गोट्या आमच्या काय कामाच्या?"

संध्याकाळपर्यंत दहा बारा मुलांनीं मिळून मोठमोठे मणी उचलून आणून सिंहली तरुणा समोर ठेवले. सिंहलीनें आपल्या साथी मित्रांना ते वाटून दिले. नंतर ते जहाजांत बसून पुढच्या प्रवासाला निघाले.





# गुरूची विद्या गुरूस फळली

एका जंगलाच्या कडेला सई नांवाची एक गरीब बाई एक झोपडें बांधून एकटीच रहात असे. तिला जवळच्या नात्यांतलें कोणी नव्हतें म्हणून तिचें लग्नपण झालें नाहीं. म्हणून तिनें गाई म्हशी ठेवून व रतिबानें चार घरीं दूध लावून चार पैसे जमा केले होते.

रानांत एक रानटी जातीचें कुटुंब रहात असे. त्या कुटुंबांत लहान थोर सर्व मिळून सुमारें तीस चाळीस जण होते. रानांतच थोडी उघडी जमीन दिसेल तेथें भाताचें पीक काढून ते लोक आपला उदर निर्वाह करीत. एकदां त्या रानटी कुटुंबाच्या प्रमुखानें येऊन सईला विचारलें—"सईअक्का! मला वीस रुपये कर्जाऊ देतेस का? एका वर्षानें व्याजा सकट फेडीन."

सईनें आढेवेढे घेतल्याशिवाय वीस रुपये दिले. एक वर्ष लोटलें. दुसरें वर्षपण अर्धें अधिक लोटलें. तो रानटी कुटुंबाचा प्रमुख कर्ज फेडायचें तर दूरच त्या बाजूला आला देखील नाहीं. म्हणून सई वेळांत वेळ काढून जंगलांत त्याला भेटण्यासाठीं त्याच्या घरीं गेली. ती पोंचली तेव्हां जवळच त्या कुटुंबांतलीं पांचसहा जणें शेतांतलें पीक काढीत असलेलीं दिसलीं. परंतु सईला त्यांच्यापैकीं तिच्याकडून कर्ज घेणारा प्रमुख कोण हें ओळखतां आलें नाहीं. त्यांच्यापैकीं कोणी तिला ओळखण्या पूर्वींच ती आपल्या घरीं कांहीं बोलल्याशिवाय परत आली.

परत येत असतां वाटेंत तिला गोपू भेटला. त्यानें तिला विचारलें—"कोठून

सौ. शांताबाई सोनार

आलीस अक्का? कोणत्या कामावर गेली होतीस?"

गोपू त्या जंगलांत रहात नसे व दुसऱ्या कोणत्याहि वस्तींत पण रहात नसे. तो नेहमीं भटकत असे व असेंच कोणाकडे तरी भात भाकर जें मिळे तें खाऊन त्याचें पोट भरे. सर्व त्याला हुशार व चतुर मानत. सईनें आपलें मन थोडें हलकें व्हावें म्हणून त्याला सर्व सांगून टाकलें.

गोपू म्हणाला—"होय अक्का, हे सर्व रानटी लोक सारखेच दिसतात. तूं माझें ऐकलेंस तर तुझें काम फत्ते होईल बघ. [illegible] पीक कापीत होते ना? उद्यां ते भात झोडपून वारवण्याचें काम करतील. तेव्हां तूं जाऊन त्यांना म्हण—"काय वाटेल तें म्हणा, मोठा शेवटीं मोठाच ठरतो. त्याचें थोरपण इतरांच्या अंगांत कोठून येणार?"

सई दुसऱ्या दिवशीं पुन्हां तें रानटी कुटुंब रहात असे तिकडे गेली. गोपूनें सांगितल्याप्रमाणें झोडपणें व वारवणें चालू होतें. सई कांहीं वेळ पहात उभी राहाली व म्हणाली—"काय वाटेल तें म्हणा, मोठा शेवटीं मोठाच ठरतो. त्याचें थोरपण इतरांच्या अंगांत कोठून येणार?"





[illegible] व तो पुढें येऊन म्हणाला—"सई अक्का! तूं हेंच पाहातें आहेस. तरुणपणीं पहा, मी सर्व एकट्यानें करीत असें."

"अरे होय, पण तुझी ही कर्तबगारी दुसऱ्याकडून घेतलेलें कर्ज फेडण्यांत कां नाहीं दिसत? तूं माझ्या जवळून घेतलेलें कर्ज अजून दिलें नाहींस." सई म्हणाली.

लहानांसमोर त्याची मान खालीं झाली. त्याचा पाणउतारा झाला. तो म्हणाला—"आतां मी कोठें कोठें आणि कशा कशासाठीं धावूं म्हणतेस? पैसे मी काढून ठेवले आहेत. तुझ्या घरीं जायला निघालों कीं एक न एक काम निघतें बघ." असें सांगून तो घरांत गेला व तीस रुपये आणून त्यानें सईच्या हातांत ठेवले.

सई रुपये घेऊन आनंदानें घरीं निघाली. गोपू तिला वाटेंत भेटला. तिनें त्याचे आभार मानले. म्हणाली—"तूं सांगितलास तोच मंत्र उपयोगी पडला बाबा!"

"असले मंत्र म्हणशील तर आपल्याकडे तोटा नाहीं. डोक्याच्या पेटींत भरून ठेवले आहेत मी. आणखी एकादा सांगूं का? तुझ्या घरासमोर डबकें आहे ना? त्यांत पुष्कळ चिखल आहे. तूं पलीकडे गेलीस तर तुला शेतांत काम करीत असलेले लोक दृष्टीस पडतील. तूं आपले पैसे घरीं नेऊन ठेव आणि शेतांत काम करणाऱ्यांकडे जाऊन सांग कीं तुझे पैसे त्या चिखलांत पडले आहेत आणि त्यांनीं काढून दिले तर त्यांतले अर्धे त्यांचे. ते डबक्यांतला सर्व चिखल बाहेर काढतील. त्यानंतर चिखलांत मासे सांपडतील. मग तूं त्यांचें वाटेल तें कर. वाटतील तेवढे खा आणि उरलेले विकून पैसे मिळव." गोपूनें फसवून पैसे मिळविण्याचा एक उपाय सांगितला.

सईनें तसें केलें. शेतांत काम करणारे धांवले व त्यांनीं सर्व चिखल बाहेर काढला. पुष्कळ मासे चिखलांत होते. तिनें तिला शक्य झाले तेवढे मासे टोपल्यांत वेंचून घेतले आणि "मला नाहीं उभें रहावत" असें सांगून घरांत निघून गेली. जातांना म्हणाली–"पैशाची पिशवी मिळाली तर अर्धे पैसे ठेवून घ्या व अर्धे मला आणून द्या, बरें का?" असें डोळे मिचकावून सांगून ती घरीं निघून गेली.

त्यानंतर दोन दिवसांनीं गोपूनें सईकडे निरोप पाठविला–"जगांत मी एकटा आहें [illegible] तर?" सईनें पण पुष्कळदां विचार केला कीं हुशार नवरा मिळाला कीं ल्हान ल्हान हलकीं कामें स्वतः करून बाकी नवऱ्यावर टाकतां येतील. म्हणून निरोप मिळतांच तिनें होकार दिला.

दोघांचें लग्न झालें. गोपूच्या आयुष्यांत हा नवा बदल झाला. आतां त्याला घर-बसल्या जेवायला मिळूं लागलें. सई घरांतली सर्व कामें स्वतःच करी. तिच्याकडे चार गाईचें दुभतें होतें. रानांत चरायला गवत होतें. म्हणून गाई दूधपण बरेंच देत. दुधाचें [illegible] लोणी शेजारच्या मोठ्या गांवीं जाऊन विकून पैसे मिळवी.



एकदां सईनें तीन मोठ्या मांड्यांत लोणी भरलें आणि दुसऱ्या दिवशीं विकण्यासाठीं ठेवून दिलें. ती कोठें तरी कामानिमित्तें बाहेर गेली होती. गोपूनें शिंक्यावर लोणी पाहिलें आणि त्याला त्याचें मन आवरेना. एक भांडें काढून लोणी खायला बसला. तें भांडें रिकामें झाल्यावर दुसरें काढून खायला बसला. तें भांडें पण रिकामें झालें. नंतर त्यानें ही चोरी लपविण्यासाठीं रिकाम्या भांड्यांत पांढरी चिकण माती भरून तीं एकावर एक रचून ठेवलीं व सर्वांत वर लोणी भरलेलें भांडें ठेवलें.



सई दुसऱ्या दिवशीं बाजाराला निघाली तेव्हां गोपूनें सर्व भांडीं तिच्या डोक्यावर ठेवायला हात लावला. सईनें बाजारांत वाण्याच्या दुकानासमोर मडकीं उतरून पाहालीं तेव्हां फक्त वरच्या मडक्यांत लोणी पाहून ती चकित झाली व तिला दुकान-दारासमोर खालीं पहावें लागलें.

तिचा नवरा किती हुशार असला म्हणून काय झालें, त्यानें तिचीच अशी केलेली फसवणूक तिला नाहीं खपली. बाजारांतून परत येत असतां केसू धनगर भेटला. त्याच्याकडे सर्व मिळून शंभर बकऱ्या व मेंढरें होतीं. पण काळी मेंढी त्याच्याकडे एकच होती. केसू तिच्यावर जीव देई.

"समज, आजपासून ती काळी मेंढी तुझ्याकडे राहली नाहीं." सई म्हणाली.

"तें कां?" केसूनें थोडेंसें रागानेंच विचारलें.

"आज रात्रीं कोणीतरी येऊन तिला उचलून नेणार आहे." सई म्हणाली.

"खरेंच!" केसूनें विचारलें.

"म्हणून तर मी आलें आहें सांगायला. तूं तिला कसें वांचवितोस हें मी पाहणार आहें." असें सांगून सई निघून गेली.

सई आली तेव्हां गोपू घरांतच होता. तिनें बाहेरून आल्याची चाहूल दिली, पण घरांत गेली नाहीं. ती काय करते आहे हें पाहण्यासाठीं गोपू बाहेर आला. तेव्हां सई अंगणांत घेरी येऊन पडल्यासारखी पडून होती.

गोपू घाबरला. त्यानें जवळ जाऊन तिला हलवून पाहिलें, तेव्हां ती प्रेतासारखी पडलेली होती. तिचा श्वासोच्छवास पण बंद पडल्यासारखा भासला. गोपू तिला [illegible] पाणी शिंपडलें. सई श्वास घेऊं लागली. कांहीं वेळानें डोळे उघडून म्हणाली– "अशीच बेशुद्ध होऊन मी कधीं मरणार आहें."

"पण ही अशी घेरी येण्याचें कारण काय? पूर्वीं कधीं तूं याविषयीं कां नाहीं सांगितलेंस मला? कांहीं इलाज आहे का याला?" गोपूनें विचारलें.

"मागें एकदां असेंच होऊं लागलें तेव्हां काळ्या मेंढीचें मांस खाल्ल्यावर बरें वाटलें होतें." ती म्हणाली.



"काळी मेंढी आतां कोठून मिळणार? केसू धनगराकडे आहे खरी एक. त्याला किती पैसे दिले तरी तो विकणार नाहीं ती." गोपू म्हणाला.

"ठीक! तरमग जाऊं दे! अशीच मिटीन एक दिवशीं डोळे!" सई म्हणाली.

त्या दिवशीं रात्रीं केसू डोळ्यांत तेल घालून व आपल्या शिकारी कुत्र्यांना सावध ठेवून मेंढरांच्या कळपावर पाहारा देत बसला. गोपूला वाटत होतें कीं कोणी जागा नसेल. काळोखांत त्यानें काळी मेंढी कोठें दिसते का पाहालें व शेवटीं ती त्याला दिसली. तो कळपांत शिरला आणि घाईघाईनें काळी मेंढी होती तिकडे निघाला. इतक्यांत एक शिकारी कुत्रा पळत त्याच्या जवळ आला. स्वतःला वांचविण्यासाठीं त्यानें पाय काढला. पण कोठून तरी एक काठी त्याच्या पाठींत बसली. कसा बसा आपला जीव वांचवून गोपू घरीं धांवत धापा टाकीत आला. तेव्हां सई नुकतीच खाऊन पिऊन बाहेर खाटेवर बसली होती. त्याला पाहून तिनें विचारलें–"इतक्या रात्रीं कोठें गेला होतास? आतांच उठले बघ खाऊन पिऊन हात धुऊन बाहेर येऊन बसलें, एवढीच!"

"तूं बेशुद्ध पडली नाहींस ना?" गोपूनें विचारलें.

"मी आणि बेशुद्ध? स्वप्न पाहतो आहेस कीं काय?" सईनें विचारलें.

त्याचे डोळे उघडावे व त्यानें आपला लबाडपणा बंद करावा म्हणून सईनें तें बेशुद्धीचें सोंग केलें होतें व काळ्या मेंढीच्या मांसाचें औषध सांगितलें होतें, हें कळायला गोपूला वेळ लागला नाहीं. तेव्हांपासून त्यानें कान धरला.





# परोपकारी गोपाळ

एकदां गोपाळला राजधानीच्या गांवीं जावें लागलें. तेथें परत येतें वेळीं त्यानें त्याच्या जवळ जे पैसे होते ते गरजू लोकांना देऊन टाकले. एवढेंच नव्हें तर तो वाटपण चुकला. तेवढ्यांत मोठें वादळ आलें आणि पावसामुळें एका जागीं चिखलांत पाय घसरून तो खालीं पडला. सर्व कपडे घाण झाले. तो एका गांवांत शिरला. त्याला भूक लागली होती. तेथें त्यानें एकाला विचारलें—"काय हो! येथें एखादी धर्मशाळा आहे का?"

"नाहीं, तूर्त तरी नाहीं. लवकरच आपचे महाराज एक धर्मशाळा बांधणार आहेत. तुला जेवायलाच हवें असेल तर राजाचें एक अन्नछत्र आहे. तेथें वाटसरूंना जेवायला मिळतें." तो मनुष्य म्हणाला.

गोपाळनें अन्नछत्राची वाट विचारून घेतली आणि तेथें जाऊन हात पाय धुवून एका जागीं बसला. अन्नदान चालू होतें. त्यानें सर्व माहिती विचारून घेतली.

तेव्हां त्याला कळलें कीं राजाला मूल बाळ नाहीं. कोणी राजाला सांगितलें कीं धर्मशाळा, विहिरी, तलाव वगैरे बांधून गोर-गरिबांना मदत केली तर कदाचित ईश्वराची कृपा होईल. त्याप्रमाणें राजानें दानधर्म सुरू केला आणि राजाला एक मुलगा झाला. एक विहीर, एक धर्मशाळा व एक तलाव बांधायला दहा हजार रुपये लागतील असें राजाला सांगण्यांत आलें. तेव्हां त्यांतले शेतकऱ्यांनीं एक तृतियांश द्यावेत व राजानें दोन तृतियांश लावावेत असें ठरलें. तलाव बांधल्यानें शेताला पाणी मिळेल. म्हणून शेतकऱ्यांनीं खर्चाचा थोडा भार स्वतः वर घ्यावा यांत कांहीं गैर नव्हतें. महाराजांनीं जी रकम देऊं केली होती ती शंकराच्या पिंडीसमोर ठेवून पाणी सोडण्याचें ठरविलें होतें. जेवतांना गोपाळ हें सर्व शांतपणें ऐकत होता.

धर्मशाळ ] [श्री. मा. गो. मोरे

जेवून जाणारासाठीं एक वाट ठरविण्यांत आली होती. ती वाट राजाच्या दरबारांत जात होती. तेथें राजा सिंहासनावर बसलेला असे. लोक जेवून येत व राजाला—"अन्नदाता! सुखी भव! आपले उपकार जन्मोजन्मीं फिटणें शक्य नाहीं. परमेश्वर आपल्याला दीर्घायु करून व पुत्रपौत्रादि देऊन सुखी करो." असा आशीर्वाद त्यांना द्यावा लागे. एक नोकर प्रत्येकाच्या हातांत एक पावली दक्षिणा म्हणून ठेवी. सर्व पान सुपारी घेऊन निघून जात. त्याप्रमाणें सर्व करीत. गोपाळला तें सर्व विचित्र वाटलें तरी त्यानें तसें केलें.

गोपाळ आपलें नांव सांगून जेव्हां दक्षिणा घेऊं लागला तेव्हां त्याचें नांव ऐकून राजा दचकल्यासारखा त्याच्याकडे पाहूं लागला. राजानें जवळ बोलवून चवकशी केली तेव्हां राजाला कळलें कीं तोच



परोपकारी गोपाळ आहे. त्यानें गोपाळचा नांव लौकिक ऐकला तेव्हांपासून त्याच्या मनांत गोपाळचा हेवा वाटूं लागला होता. इतक्या प्रसिद्ध परोपकारी गोपाळचा सर्वां-समक्ष एकदां पाणउतारा झाला पाहिजे असें त्याला वाटलें.

त्या अन्नछत्रांत त्याला कां जेवावें लागलें हें गोपाळनें सांगितलें तेव्हां राजा म्हणाला—"हें पहा, गोपाळ! तूं आजवर दुसऱ्याला मदत करीत आलास आणि आज मी तुला मदत केली आहे. म्हणून तुझ्या सारख्यांनीं नुसते तोंडानें आभार मानून मोकळे झाल्यानें



तुझ्या किंवा माझ्या कोणाच्याच मनाचें खरें समाधान होणें शक्य नाहीं. म्हणून तूं उपकाराची फेड म्हणून कांहींतरी केलें पाहिजेस."

"बोला, मी कोणती सेवा केल्यानें आपल्या मनाचें समाधान होईल आणि उपकाराची फेड पण होईल"? गोपाळनें विचारलें.

"धर्मशाळेचें बांधकाम लवकर पुरें व्हावें या गोष्टीची सर्वत्र चर्चा तूर्त आहे. काम करायला मजूर नाहींत. तूं नोकरी करायला तयार आहेस का, हें मी नाहीं विचारणार तुला. तें बरोबर होणार नाहीं. तूं स्वतःच माझ्याकडे चार दिवस राहून काम केलेंस तर माझ्या मतें बरोबर होईल." राजा म्हणाला.

"कबूल, आज तुम्ही मला जेवायला घालून माझ्यावर इतके उपकार केले आहेत. वास्तव मला आपला सेवक म्हणून ठेवून घ्यावें." गोपाळ म्हणाला.

जग जिंकल्यासारखें राजाला वाटलें. गोपाळ जें बोलला तें सर्वांनीं ऐकलें होतें. राजा खूष होऊन थोडासा तोऱ्यांत म्हणाला—"ठीक, तूं चार दिवस माझ्याकडे नोकर म्हणून काम कर."

खरें बोलावयाचें म्हणजे गोपाळ कडून करवून घेण्यासारखें एकहि काम राजाकडे नव्हतें. परंतु दहापांच जणांसमोर कांहीं तरी काम सांगून राजानें गोपाळला पाठवून दिलें. त्याला वाटत होतें कीं अशा तऱ्हेनें त्याला प्रसिद्धी मिळेल.

देवाला धन समर्पण करून धर्मशाळेची स्थापना करण्याचा मुहूर्त आला. शंभर शंभर रुपये एकेका हळदीनें रंगविलेल्या वस्त्रांत बांधून अशा पांच पांच ल्हान गाठोड्यांचें एकेक गाठोडें बांधण्यांत आलें व अशीं



पंधरा गाठोडीं पंधराजण घेऊन देवळाकडे निघाले. राजानें स्वतः एक गाठोडें उचललें होतें. बाकी चवदा गाठोडीं नोकरांच्या हातांत दिली होतीं. त्या चवदा नोकरांत एक गोपाळ होता. सर्व मिळून एका चिंचोळ्या वाटेनें जात असतां राजा पाय घसरून पडला व त्याच्या हातांतलें गाठोडें खड्यांत पडलें. खड्डा म्हणजे तो एक चांगला खोल खड्डा होत. लगेच कांहीं नोकर तें गाठोडें आणायला खालीं गेले. पण गाठोडें सुटलें होतें व पांच ल्हान गाठोडी इकडे तिकडे चिखलांत पडलीं होतीं. नोकरांना चारच गोठाडीं सांपडलीं व त्यांनीं तसें राजाला सांगितलें. राजा म्हणाला—"हरकत नाहीं. खजिन्यांतून आणखी शंभर रुपये घेऊन या." त्याप्रमाणें आणखी शंभर रुपये आणून समर्पण समारंभ उरकून घेण्यांत आला.

परंतु एकटा गोपाळ त्या खड्यांत शोधत राहला व शेवटी त्याला शंभर रुपयांचें तें गाठोडें सांपडलें. परंतु तोंपर्यंत रात्र होऊन गेली होती. तरी तो राजाकडे गेला. त्यानें आंघोळ करून चिखल लागलेले रुपये स्वच्छ धुवून राजासमोर नेऊन ठेवले आणि



म्हणाला—"ही पहा, हें शंभर रुपयांचें गाठोडें चिखलांत पडलेलें."

देवाला म्हणून निराळे काढलेले रुपये होते ते. परत घ्यावे कीं नाहीं या विचारांत राजा पडला. दिलेलें दान कसें घ्यायचें? म्हणून तो गोपाळला म्हणाला—"मी दान केलेले ते रुपये आहेत. म्हणून तूंच ते ठेवून घे. तूं चार दिवस माझ्याकडे नोकरी केलीस. म्हटल्याप्रमाणें अवधी संपला आहे. उद्यां तूं गेलास तरी चालेल."

दुसऱ्या दिवशीं गोपाळ ते शंभर रुपये घेऊन आपल्या गांवीं निघाला. गांवच्या

जमीनदाराच्या घरासमोरून जात असतां त्याला तहान लागली. तो एका शेतकऱ्याच्या घरीं गेला आणि त्यानें प्यायला पाणी मागितलें.

"घी बावा! पोटभर पिऊन घे. या पाण्यानें उद्यां आमचें कर्ज फिटेल." शेतकरी म्हणाला.

गोपाळनें विचारलें—"कसलें कर्ज आणि तें कसें काय फिटणार?" तेव्हां शेतकरी म्हणाला—"राजा धर्मशाळा बांधतो आहे ना त्यांत माझा वांटा शंभर रुपयांचा होता. मी किती प्रयत्न केला, पण शंभर रुपये जमा होऊं शकले नाहींत. माझ्याकडे एक कवडी देखील नाहीं. मी राजाकडे दोन महिन्याचा अवधी मागितला पण राजा म्हणाला, तरमग निघून जा माझ्या राज्यांतून."

तें ऐकून गोपाळ त्याच्या जवळ जें शंभर रुपयांचें गाठोडें होतें तें शेतकऱ्याला देत म्हणाला—"हे नेऊन दे राजाला शंभर रुपये. हे पैसे राजाचेच आहेत; परंतु ते आतां माझे झाले आहेत. म्हणून मी तुला देतों. तूं राजाला नेऊन कर्जांतून मुक्त हो."

शेतकऱ्यानें दुसऱ्या दिवशीं ते रुपये दरबारांत राजा बसला होता, तिकडे नेऊन दिले. पिवळ्या चिखल लागलेल्या वस्त्रांत शंभर रुपये पाहून राजाचा अधिकारी म्हणाला—"महाराज! हे तर आपलेच पैसे दिसत आहेत."

राजानें शेतकऱ्याला विचारलें तेव्हां त्यानें गोपाळकडून ते पैसे मिळाल्याचें उत्तर दिलें.

गोपाळनें दिलेलें धन असें परत केलेलें पाहून राजाला आश्चर्य वाटलें व तो खजिलपण झाला.





# वैद्य विदूषक

कुंभी नगर येथें एक लबाड वैद्य रहात असे. त्याचें शिववैरागी असे नांव होतें. त्याची बरोबरी करूं शकेल असा एकहि वैद्य दुनियेंत मिळणें शक्य नाहीं अशा वढाया तो मारी. लबाडीवरच त्याचें पोट भरे. त्याच्या जवळ कांहीं भस्में, आसवें व गोळ्या वगैरे ठेवलेल्या असत.

त्या देशांतला युवराज कसल्या तरी विचित्र आजारानें आजारी पडला. त्याला भूक लागत नसे कीं पाणी पिण्याची इच्छा होत नसे. तो सदा बिछान्यावर पडून राही.

राज वैद्यानें अनेक प्रकारें औषधोपचार करून पाहिला पण गुण पडला नाहीं. राजा फार काळजींत पडला. मंत्र्यांनीं राजाला सुचविलें कीं शिववैरागीला बोलावून एकदां युवराजांना दाखवून पहावें."

"त्याला? तो वैद्य आहे का? धन्वंतरी सारख्याला जें शक्य झालें नाहीं तें त्या लबाडाला शक्य होईल का?" राजानें विचारलें.

"महाराज! मोठमोठ्या वैद्यांनीं हात टेंकले अशा रोग्यांना याच्या औषधानें गुण पडला. कित्येकांना त्यानें पुनर्जन्म पण दिला म्हणें. राजवैद्यांना शक्य झालें नाहीं, तें कदाचित शिववैराग्याच्या औषधानें होईल." राजाचे अधिकारी म्हणाले.

विचार करून राजा म्हणाला—"तुमचें सर्वांचेंच तसें मत असेल तर प्रथम त्याला अशाच कांहीं कठीण रोग्यांना औषध द्यायला सांगा. मी मनाची खात्री करून घ्यावी, म्हणतों." शक्य झालें नाहीं तर त्याला

श्री वा. शं. बोकील



शिरच्छेदाची शिक्षा दिली जाईल. बजावून सांगा त्याला." राजा म्हणाला.

राजाचें म्हणणें मंत्र्यांना रास्त वाटलें. त्यांनीं शिपायांना पाठवून कांहीं रोग्यांना हुडकून आणायला सांगितलें. त्यांना राजवाड्यांतच एका जागीं पलंगावर झोंपविण्यांत आलें. नंतर शिववैराग्याला बोलावून आणण्यांत आलें. राजा त्याला म्हणाला—"तूं लबाड वैद्य आहेस हें मला कळलें आहे. तुला वैद्यकीची खरी माहिती नसून तूं गोर गरीबांना फंसवून पैसा लबाडीवर मिळवीत आहेस हें साबित झालें तर तुला दंड होईल. तुझें काय म्हणणें असेल तें प्रथमच सांग."

"महाराज! मी कित्येक रोग्यांना नुसतें बरे तर केलेंच आहे, एवढेंच नव्हे तर यमपाशांतून त्यांना सोडविलें पण आहे. माझा हेवा करणाऱ्यांनीं माझी नालस्ती सुरू केली आहे. मी कोणा कोणाचें तोंड धरूं? त्यांच्या बोलण्यावर विश्वास करून मला दंड देणें हा न्याय होणार नाहीं." शिव वैरागी म्हणाला.

"तर मग तुला वैद्यकी येते हें तुला सिद्ध करून दाखविलें पाहिजे. माझ्याकडे जुने रोगी आहेत. त्यांना तूं बरे करून दाखविलेंस तर मी तुला राजवैद्याची पदवी देईन. पण जर का कोणाला गुण पडला नाहीं तर तुझें डोकें उडवून किल्ल्याच्या फाटकाला टांगून ठेवीन." राजा म्हणाला.

शिव वैराग्याची बोबडीच वळली. शिपाई त्याला रोग्यांच्या खोलींत घेऊन गेले. राजाचे कांहीं प्रमुख अधिकारी पण बरोबर गेले.

"मी रोग्यांना कांहीं प्रश्न एकांतांत विचारणार आहें." असें सांगून वैद्यानें सर्वांना बाहेर काढलें आणि आंतून दाराला कडी लावून घेतली.



शेजारच्या खोलींत स्वतः युवराज आहेत, हें त्याला माहीत नव्हतें.

नंतर तो लबाड वैद्य रोग्यांना म्हणाला—"माझ्याजवळ एक रामबाण लेप आहे तो लावला कीं तुम्हांला काय वाटेल तो रोग असला तरी बरा होईल. माणसाचें एक हृदय काढून तें पाकांत टाकून त्याचा लेप तयार करावा लागतो. इतर द्रव्यें व औषधी वनस्पती माझ्याकडे आहेत. फक्त तीनदां तो लेप लावला कीं तुमचा सर्व आजार पळून जाईल. सर्वांत जास्त जो कोणी आजारी असेल त्याचें हृदय काढून त्याचा लेप तयार करावा असा माझा विचार आहे." असें सांगून त्यानें एका क्षयरोग्याकडे पाहिलें.

तो क्षयरोगी घाबरून गेला आणि उभा राहून म्हणाला—"मी आजारी आहे असें कोण म्हणतो? मी छान हिंडतों फिरतों. सर्व कामें स्वतः करतों. मला कोणाचें औषध नको." असें सांगून तो उठला आणि धांवत जाऊन दाराची कडी उघडून पळून गेला.

त्याच्या पाठोपाठ "मी आजारी नाहीं." असें म्हणत दुसरा रोगी पळाला. असें ओरडत तो गेला. एकेक करून सर्व तेंच



म्हणत बाहेर आलेले पाहून राजाला आश्चर्य वाटलें. स्वतः अश्विनी कुमारांनीं येऊन औषध पाणी केलें असतें तरी एकहि जण उठून जाऊं शकला नसता, आणि हे सर्व स्वतःच्या पायांनीं कसे काय उठून पळून गेले, राजाला कळेना. तें पाहण्यासाठीं राजा स्वतः आपल्या मंत्र्याबरोबर त्या खोलींत गेला. तेव्हां तेथें शिववैरागी एकटा बसलेला होता. शेजारच्या खोलींतून युवराजाचें हंसणें राजाला ऐकूं आलें.

इतक्या दिवसांनंतर मुलाला हंसत असलेला पाहून राजाला फार आनंद झाला. जवळ जाऊन राजा म्हणाला—"बाळा! तुला बरें वाटतें आहे ना आतां? कां, हंसत कां होतास?"

"मला काय झालें होतें? मला कांहीं झालें होतें का? मी आजारी नव्हतोच!" असें म्हणून तो आणखी मोठ्यानें हंसला. त्याच्याकडून राजाला जें घडलें तें सर्व कळलें. लबाड वैद्य मुठींत जीव धरून मान खालीं करून उभा होता. आतां डोकें उडणार, यांत त्याला शंका उरली नव्हती.

राजा त्याच्याकडे वळून म्हणाला—"तूं लुच्चेगिरीनें आजवर पैसे मिळवीत आलास. तरी मी तुला माफ करतों. तूं हा वैद्यकीचा धंदा सोडून दे कसा, आणि आमच्या दरबारीं एक विदूषक म्हणून रहा. युवराज नेहमीं दुःखी असतात. त्यांचें दुःख, थोडें का होईना, हलकें करणें हें तुझें काम."

शिव वैरागी वैद्याचा विदूषक झाला आणि त्यानें निरनिराळ्या गंमती करून युवराजांची करमणूक करून त्यांना खूष ठेवलें.

म्हणून सांगतात थट्टामस्करी देखील कधीं कधीं औषध ठरते.






त्या वर्षी पाऊस चांगला पडला. गाई गुरें निरोग होतीं. पीकें पण चांगलीं निघालीं. गुरांना पुरेसें पुष्कळ गवत होतें. सर्वत्र हिरवळ होती. त्या वर्षी दुभतें पण चांगलें होतें.

शरद ऋतु आला. हें सर्व इंद्राच्या कृपेनें झालें म्हणून नंद वगैरे गवळ्यांनीं त्या वर्षी इंद्राचे आभार मानण्यासाठीं इंद्रोत्सव करण्याचें योजलें. त्यासाठीं आवश्यक ती सर्व तयारी सुरू झाली. सर्व लहानथोर स्त्री-पुरुष त्या कामाला लागले.

कृष्णानें ती सर्व तयारी पाहून प्रमुख गवळ्यांना त्या सर्वाचें कारण विचारलें—"ही सर्व तयारी कशासाठीं? एवढा उत्साह आणि खर्च कोणासाठीं? कोण्या देवाची पूजा आहे कीं काय? त्यांत काय मिळणार तुम्हांला?"

कांहीं वृद्ध गवळी कृष्णाला म्हणाले—"कृष्णा! सर्व लोकपालक आणि दिक्पालकांचा प्रमुख इंद्र नाहीं का? त्याच्याच कृपेनेंच चांगला पाऊस पडतो. त्याच्याच कृपेनें गाईगुरांना चारा व आपणां सर्वांना दूध दुभतें मिळतें आणि पिकें निघतात. म्हणून त्याला प्रसन्न करण्यासाठीं व त्याचे आभार मानण्यासाठीं उत्सव साजरा करण्याचें सर्वांनीं योजलें आहे."

## ८. गिरी पूजा



तें ऐकून कृष्ण म्हणाला—“आपण मुख्य करून तीन वृत्ती करतों—शेतकी, व्यापार आणि पशुपालन नाहीं का? जो जी वृति करतो ती वृत्तीच त्याचा देवी असतो. आपण गवळी. रानावनांत राहतों. पशु-पालन ही आपली वृत्ति. गुरांना गवत हवें व सांवलीसाठीं वृक्ष वनस्पती. ते आमल्याला वनांत आणि पर्वतावर मिळतात. म्हणून आपल्याला वन, पर्वत व पशु हेच देव देवी. जें ज्याचें कुलदैवत त्याचीच पूजा करावयाची असते. शेतकरी शेत नांगरतात. नांगर त्यांचा देव. ब्राह्मण यज्ञ यागादि करतात म्हणून अग्नि त्यांचा देव. आपण डोंगरावर आणि पर्वतावर गुरें चरायला घेऊन जातों. पर्वतच आपला देव. म्हणून आपण पर्वताची पूजा करावी. तुम्ही माझें ऐकलें नाहीं तर मला तें मुळींच तुमच्या हिताची गोष्ट मी तुम्हांला सांगत आहें. पण आवडणार नाहीं.”

कृष्णानें आपलें निश्चित मत त्या विषयीं दिलें तेव्हां सर्व गवळ्यांनीं विचार करून पाहिला व त्यांना तें बरोबर वाटलें व त्यांनीं तें कबूल केलें. ते असें हि म्हणाले कीं कृष्ण जें म्हणेल तें करायला ते तयार आहेत. कारण तोच त्यांचा रक्षक आहे. त्यानें निरनिराळे पराक्रम दाखवून त्यांची खात्री पटवून दिली होती कीं तो सर्व समर्थ आहे. एवढेंच नव्हें तर देवाचा अवतारच नव्हें तर प्रत्यक्ष देवच आहे.

सर्व गवळ्यांनीं एक मनानें इंद्रोत्सवाचा विचार सोडून दिला आणि पर्वतोत्सव करण्याचें ठरविलें,

पेढे, बरफी, श्रीखंड, बासुंदी, खीर व इतर पक्वान्नें तयार करविलीं. दही, दूध, मध, लोणचीं, चटण्या कोशिंबिरी पापड फेण्या, कुरड्या, लाडू, जिलब्या वगैरे अनेक





पदार्थ टोपल्यांत घालून गाड्यांत भरून किंवा कावडी भरून गोकुल वृंदावन वासि-यांनीं गोवर्धन पर्वताकडे प्रस्थान केलें. लहान थोर स्त्री पुरुषांना हा एक नवा आणि गमतीदार उत्सव वाटला.

गोवर्धन पर्वतावर एक सपाटशी जागा पाहून शेणानें ती सारवून स्वच्छ करून बैठकी टाकण्यांत आल्या आणि तेथें गिरिपूजा कृष्णाच्या खास देखरेखीखालीं सुरू झाली.

जे जे खाद्यपदार्थ आणण्यांत आले होते त्यांचा नैवद्य पर्वताला दाखविण्यांत आला. गवळ्यांनीं फुलें वाहून पर्वताला श्रद्धा व बक्तिपूर्वक नमस्कार केला.

सर्व पुजा करण्यांत मग्न असतां स्वत: कृष्ण पर्वताच्या शिखरावर प्रगट झाला. सर्व चकित होऊन त्याच्या कडे पाहूं लागले. तो आपल्या एका हातानें सर्व नैवेद्य उचलून खात होता. नंतर म्हणाला—“मी तुमची सर्वांची भक्ति पाहून प्रसन्न आहें. मीच पर्वत रूपीं येथें हजर आहें. म्हणून तुम्ही माझीच आराधना करावी. असें केल्यानें तुमच्या सर्व इच्छा पूर्ण होतील, गोधन वाढेल व त्या अमृतास रखें गोड दूध देतील. मीच कामरूपें सर्वदा तुमच्या हृदयांत वास करतों.” असें सांगून पर्वत शिखरावरचा तो कृष्णरूप देव अदृश्य झाला.

गोपपालकांनीं पर्वतशिखरावरचा पर्वता-कार कृष्ण व त्यांच्या मधला कृष्ण दोघांना एकाच वेळीं पाहून हात जोडून त्याला नमस्कार केला.

नंतर त्यांनीं आपल्या गुरांच्या शिंगांना रंग लावून त्यांची पुजा केली. त्यांच्या गळ्यांत घंटा बांधल्या. लता व वेल त्यांच्या मस्तकावर बांधून त्यांना सजवलें आणि त्यांच्यासह गोवर्धन पर्वताला प्रदक्षिणा घातली. नंतर त्यांनीं ब्राह्मण संतर्पण केलें.



तो यज्ञ संपल्यानंतर जें कांहीं उरलें तें प्रसाद म्हणून वांटून घेतलें. उत्सव संपला. सर्व कृष्णाबरोबर वृंदावनला परत आले.

तिकडे स्वर्गांत इंद्राला कृष्णाच्या चिथावणीनें गवळ्यांनीं आपला अपमान केल्याचा राग आला. त्यानें संवर्त वगैरे मेघांचें आवाहन केलें आणि म्हणाला—"पाहिलेंत वृंदावनचा नंद व त्याचे अनुयायी गवळी यांना गर्व झालेला दिसतो आहे. त्यांनीं या वर्षीं माझी पूजा करण्याचें सोडून कृष्णाच्या सांगण्याप्रमाणें एका लहानशा डोंगराची पूजा केली आहे. पण मी हा अपमान निमूटपणें सहन करून स्वस्थ बसणार नाहीं. तुम्ही वृंदावनला जाऊन लागोपाठ सात दिवस इतका पाऊस पाडा कीं गवळ्यांना धांवत माझे पाय धरायला यावें लागलें पाहिजे. त्यांचें गोधन वाहून गेलें पाहिजे तेव्हां त्यांची खोड मोडेल. तुम्ही ही कामगिरी बजाविलीत तर माझ्या मनाचें समाधान होईल. मी तुमच्याबरोबरच येईन व आकशांतून तुमचा पराक्रम पहात राहीन."

गोकुळांतल्या रहिवाश्यांना ईशान्य दिशेकडून आकाशांत विजा चमकूं लागलेल्या दिसल्या. सोसाट्याचा वारा सुरू झाला. उष्मापण इतका वाढला कीं घरांत बसून राहाणें असह्य झालें. जमिनी तापल्या व शरद ऋतूंत ग्रीष्म ऋतूचा भास होऊन सर्व चकित झाले.

पूर्वेकडे मेघ गर्जना सुरू झाली. "ही अकाल वृष्टि कोठून?" सर्वांच्या मनांत हा एकच प्रश्न होता. पाहतां पाहतां काळ्या ढगांनीं सूर्याला झांकून टाकलें. सर्व आकाश काळें झालें आणि दिवसा रात्रीसारखा पडला. विजा चमकूं लागल्या, गारा पडूं लागल्या आणि इतका मोठा पाऊस पडूं लागला कीं आकाश व जमीन एक दिसूं लागली.

तो पाऊस पाहून गवळी घाबरून गेले. प्रलयकाळ येऊन ठेपला असेंच सर्वांना वाटूं लागलें आणि आतां आपलें कसें रक्षण होणार याची काळजी वाटूं लागली. पळायचें तरीं कोठें? कारण जिकडे पहावें तिकडे पाणी. झाडें तुटून पडत होतीं. घरांची छपरें उडून गेलीं. गोठ्यांतून पाणी शिरलें. गुरें घाबरून ओरडूं लागलीं आणि सैरावैरां पळूं लागलीं सर्व दृश्य भयंकर होतें.

सर्व गवळी घाबरून कृष्णाकडे आले आणि म्हणाले—"कान्हा! तूंच आतां आमचें रक्षण कर! तूं तारलेंस तरच तरणार आम्ही."

इंद्रानें कोप केला आहे त्याचा मत्सराग्नि भडकला आहे, हें कृष्णानें ओळखलें. सुडाच्या भावनेनें तो हें सर्व करीत आहे. त्याला वाटत असावें कीं गवळी त्याच्याकडे धांवत येऊन क्षमा मागतील व कृष्णाला नांवें ठेवतील. अशा तऱ्हेनें कृष्णाचा गर्वभंग होईल. परंतु कृष्णानें इंद्राचाच गर्वभंग करण्याचें ठरवून गोवर्धन पर्वतच उचलला आणि छत्रीसारखा हाताच्या आधारें डोक्यावर धरला. त्याबरोबर पर्वतावरचे मोठमोठे दगड कोसळले. सांप घाबरून बिळांतून बाहेर आले. झाडें उपटून पडलीं. वाघ गुहेंतून बाहेर आले. गुहेंत बसून तप करणाऱ्या तपस्वी मुनींची तपश्चर्या भंग झाली.



कृष्णानें गोवर्धन पर्वत उचलून सर्व गवळ्यांना आपल्या गाई गुरांसह त्या पर्वताच्या खालीं निवाऱ्याला यायला सांगितलें. म्हणाला—"तुमच्या केसालाहि धक्का लागणार नाहीं. सर्व गवळी आपापलें सामान, बायका, मुलें व गुरें घेऊन पर्वताखालीं येऊन उभे राहाले.













सात दिवस पाऊस पडल्यावर इंद्र आपल्या मेघांच्या सैन्यासह परत गेला. आकाश पुन्हां निरभ्र झालें. गवळी आपल्या गाई गुरांना घेऊन परत आपापल्या घरीं गेले. कृष्णानें यथास्थानीं पर्वत ठेवून दिला आणि झाडावर बसून डोंगरावर चरूं लागलेल्या गाईंचीं गंमत पाहूं लागला.

कृष्णानें दाखविलेला तो चमत्कार पाहून इंद्राला स्वस्थ कसें बसविणार? त्याला कृष्णाची दहशत बसल्यासारखी झाली. म्हणून तो ऐरावतावर बसून व वज्र धारण करून कांहीं अनुयायांसह भूलोकीं, गोवर्धन पर्वतावर बसलेल्या कृष्णाजवळ आला. कृष्णाकडे पाहतांच त्याला कृष्णाचें सत्स्वरूप दिसलें. तो ऐरावतावरून खालीं उतरला व कृष्णाला साष्टांग प्रणिपात केला.

कृष्ण, इंद्राकडे जणुं कांहीं त्यानें पाहिलेंच नाहीं अशा तऱ्हेनें जागच्याजागीं हलल्या डुलल्याशिवाय बसून होता. त्यावरून कृष्णाला फार राग आला आहे हें इंद्रानें ओळखलें आणि तो कृष्णाचें स्तोत्रगान करूं लागला. गोपबालकाचें घेऊन रूप स्वत: देवाधिदेव विष्णूनें अवतार धारण केला आहे हें त्यानें ओळखलें नव्हतें आणि दुरभिमानें अतिवृष्टि करून स्वत:वर देवाचा कोप करून घेतला होता. नंतर त्यानें गोपति म्हणून कृष्णाचा अभिषेक करून त्याला दिव्य आभरणें देऊन त्याचा सत्कार केला.

शेवटीं इंद्र म्हणाला–"कंस व त्याचे अनुयायी तुझा नाश करण्याचा विचार करीत आहेत. तुझ्या हातीं त्या सर्वांचा संहार होईल. कंसाचा वध करून तूं राजा होशील. तुझ्या आतेच्या पोटीं युधिष्ठिर व भीम यांचा जन्म झ.त्यानंतर माझा अंश



अर्जुन जन्मला आहे. तो तुझा सखा भक्त होऊन तुझ्या आश्रयाला येईल. तूं त्याचें रक्षण कर आणि कीर्ति संपादन करून दे. पुढें कौरव पांडवांचें युद्ध होईल. त्या युद्धांत तुझ्या मदतीनें त्याला जय लाभेल असें कर. एवढें माझें मागणें आहे."

कृष्ण म्हणाला—"माझी आते कुंती हिचीं मुलें व ती पांच हि भावंडें पराक्रमी आहेत. त्यांच्यांत देवांचा अंश आहे. ते सर्व भूमीचे अधिपती होतील. त्यांच्यापैकीं मधला अर्जुन असामान्य पराक्रमशाली होईल. हें सर्व मला प्रथम पासूनच माहीत आहे. तूं जें मागणें मागितलें आहेस तें मी सर्व करीन. तूं आलास हें पण बरें झालें. आतां तूं निश्चिंत रहा."

इंद्रानें कृष्णाला साष्टांग नमस्कार केला आणि ऐरावतावर बसून आपल्या अनुयायांसह इंद्रलोकीं परत गेला. नंतर कृष्ण डोंगरावरून उतरून खालीं वृंदावनला घरीं आला.

तो आल्याबरोबर सर्व गवळ्यांनीं त्याला घेरलें. तो सामान्य मनुष्य नसून देवाचा अवतार आहे हें त्यांना छान कळलें होतें. हात जोडून त्यांनीं त्याला विचारलें—"कृष्णा! अरे, खरें सांग, तूं कोण आहेस आणि असा आम्हां गरिबांच्या मध्यें लपून कां बसला आहेस? तूं तर त्रिलोक रक्षक आहेस. मग गाई चरायला गवळ्यांच्या घरीं कां जन्मलास! तुझें भय वाटूं लागलें आहे आम्हांला."

कृष्ण हंसून म्हणाला—"मी तुमच्या पैकींच एक आहें. मग हा प्रश्न कशाला?" तें ऐकून सर्व आश्चर्यचकित होऊन आनंदानें कौतुक करीत कृष्णाकडे पाहूं लागले.





# अरण्यपुराण

[११]

मौवलीला मनुष्यांनीं आपल्या समाजांतून पळवून लावलें. म्हणून पुन्हां रानांत रानटी जनावरासारखें आयुष्य कंठणें हा एकच मार्ग त्याला उरला. लांडग्यांचा कळप जेथें जमा होई त्या डोंगराच्या शिखरावर वाघोबाचें कातडें एका जागीं ठेवून तो म्हणाला—"मला आतां तुमच्या कळपाबरोबर राहून शिकार करणें शक्य नाहीं. फक्त चार लांडग्यांना बरोबर घेऊन शिकार करण्याचें ठरविलें आहे."

त्यानें लांडगा व लांडगीण दोघांना त्याला जो अनुभव आला होता तो समजावून सांगण्याचा यत्न केला. वाघोबाचें कातडें काढण्यासाठीं जो सुरा त्यानें वापरला होता तो दाखविला. एकू व 'मोठा भाऊ' दोघांनीं गाई म्हशींना वाघोबाच्या अंगावर पळविण्यासाठीं काय युक्ति केली हें वर्णन करून सांगितलें. तें सर्व ऐकण्यासाठीं अस्वल डोंगरापलीकडून तेथें आलें होतें. मौवलीनें दाखविलेला पराक्रम ऐकून काळ्या वाघाला परमानंद झाला.

तोंपर्यंत छान उजाडलें होतें. परंतु कोणाला झोंपण्याचें भान नव्हतें. एका बाजूनें सूर्य वर येत होता व दुसऱ्या बाजूनें वाघाच्या कातड्याचा सुटलेला वास घेऊन लांडगिणीच्या मनांत गुदगुल्या होत होत्या.

मौवली म्हणाला—"हें सर्व एकू व 'मोठा भाऊ' दोघांच्या मदतीशिवाय शक्य झालें नसतें.

शेवटचें मलपृष्ठ



लांडगा म्हणाला—"बरें झालें, आमचा मुलगा आम्हांला परत मिळाला. किती अनुभव घेऊन आला आहे? त्याचे पाय चाटण्यालायक देखील मी नाहीं. मनुष्य जातीशीं नाहीं तरी आपलें काय काम?"

"खरेंच कीं, काम काय आपल्याला?" अस्वलानें व काळ्या वाघानें दुजोरा दिला.

मौवलीनें लांडगिणीच्या पोटावर खुशींत डोकें ठेवलें व स्मित करून म्हणाला—"मी मनुष्यांचें तोंडदेखील पाहूं इच्छित नाहीं."

"पण त्यांनीं संबंध जोडायचा ठरविलें तर तूं काय करणार?" एकूनें विचारलें.

"आम्ही पांच जण आहों कीं!" 'मोठा भाऊ' म्हणाला.

"या शिकारीच्या वेळीं कदाचित आम्ही सुद्धां राहूं." काळा वाघ आपली शेपटी ऐटींत हलवीत व अस्वलाकडे पहात म्हणाला. नंतर तो एकूकडे वळून म्हणाला—"आतां मनांत मनुष्यांचा विचार कशाला आणतोस?"

"ऐक, सांगतों, कां तें!" म्हणत एकू सांगूं लागला—"मौवलीनें वाघाचें कातडें पुरून टाकल्यानंतर मी गांवापर्यंत गेलो होतों आणि रानटी लोक ज्या पायवाटेचा उपयोग करीत असत ती वाट मी दिसणार नाहीं अशी करून आलों आहें. परंतु एक वटवाघूळ या झाडावरून त्या झाडावर जात असतां म्हणालें—"मनुष्यांचें गांव मध-माशीच्या पोळ्यासारखें कामांत गर्क दिसलें."

"तूं काय पाहिलेंस रे?" मी विचारलें.

"गांवाच्या फाटकाजवळ 'तांबडें फूल' (म्हणजे पेटलेला जाळ) उमललें आहे. त्याच्या चारी बाजूला लोक बंदुकी घेऊन बसले आहेत." वटवाघूळ म्हणालें.

एवढें सांगून एकू पुढें म्हणाला—"मनुष्य उगाच बंदूक घेऊन बसत नाहीं, हें मला





छान ठाऊक आहे. ते लवकरच आपली वाट अडवून बसणार. कदाचित येत हि असतील. म्हणून सर्व सावध व्हा!"

"पण कां? त्यांनींच मला जातीबाहेर काढलें. त्यांना आतां माझ्याशीं काय काम?" मौवली रागानें म्हणाला.

"बाबा रे तूं मनुष्यच. किती झालें तरी तुझे मनुष्य कां आणि काय काय करतात हें तुलाच माहिती!" एकू म्हणाला.

लगेच मौवलीचा सुरा चमकला व त्यानें तो जमिनींत खोचला. एकूच्या पायाला लागतां लागतां चुकला.

"तूं पुन्हां मला मनुष्यांतला सांगून हिणविलेंस तर सांगून ठेवतों, मला खपणार नाहीं." मौवली चाकू ठेवीत म्हणाला.

एकू चाकू रोंवला होता ती जागा पाहून म्हणाला—"मनुष्यांत कांहीं काळ राहल्यानें तुला कमी दिसूं लागलें आहे असें वाटतें. चाकू मारायला तुला जितका वेळ लागला तेवढ्यांत मी हरणाला धरून आणीन."

काळा वाघ एकदम उभा राहून व दूरवर एकदा पाहून चोबडी वळल्यासारखा सर्वांकडे पाहूं लागला. 'मोठा भाऊ' पण काळ्या वाघाजवळ येऊन उभा राहाला व त्यानें तसेंच दूर वर पाहिलें. त्याची चर्यापण बदललेली दिसली. एकू पन्नास पाऊणशें पावलें त्या दिशेनें धांवून पाहून आला व त्याचे पाय-देखील गारठले. त्यांना नुसत्या वासानें जें कळे तें मौवलीला कळत नव्हतें. त्याला पूर्वी तें जितकें कळे तितकें, मनुष्य वस्तींत राहून आल्यामुळें कीं काय कळतनासें झालें.

"मनुष्य...." एकू समोरच्या पावलावर डोकें ठेवून म्हणाला.

"बलदेव आपला पाठलाग करीत येत आहे. ती पहा, त्याच्या बंदूकीची नळी." मौवली खाली बसत म्हणाला.

"मनुष्य या बाजूला येणार, हा संशय मला पहिल्यापासूनच होता." एकू म्हणाला.

मौवलीचे चारी भाऊ दबा धरून डोंगराच्या पायथ्याकडे जाऊन झुडपाच्या आड लपून बसले.

"कोठें निघालांत?" मौवलीनें त्यांना विचारलें.

"दुपारपर्यंत त्यांच्या समाचाराला जात आहों. त्यांचा खूप समाचार घेऊन येतों." मोठा भाऊ म्हणाला.

"परत या बरें का? मनुष्य मनुष्याला खात नाहीं." मौवली म्हणाला.

"या पूर्वीं मी तुला नुसना मनुष्य म्हटला त्या रागांत तूं मला सुरा मारायला निघाला होतास." एकू म्हणाला.

भाऊ भीत भीत परत आले.

"मी जें कांहीं करतों, त्या सर्व गोष्टींचा जाब द्यायला हवा का?" मौवली रागानें म्हणाला.

"हाच तो मनुष्य! हेंच मनुष्यासारखें बोलणें झालें. उदयपुराच्या पिंजऱ्याजवळ मनुष्य असेंच कांहीं तरी बोलत होते." वाघ्या मनांतल्या मनांत म्हणाला. परंतु उघड म्हणाला—"या खेपेस हा म्हणतो आहे तें बरोबर आहे. हे लोक टोळी करून येतात शिकारीला. इतर काय करतील हे समजून घेतल्याशिवाय एकट्याला मारणें वेडेपणाचें होईल. ह्या मनुष्याला काय हवें आहे हें पाहायला हवें."

"आम्ही नाहीं येत. तूं एकट्यानें कर शिकार. एवढ्या वेळांत आम्ही त्याचें मुंडकें आणून टाकलें असतें." 'मोठा भाऊ' म्हणाला.

[पुढील अंकीं चालू]



# ६५. मार्तंडाचें देऊळ

हें एक फार जुनें काश्मीरच्या खोऱ्यांत पठारावर बांधलेलें सूर्याचें देऊळ आहे. १२०० वर्षांपूर्वीं हें देऊळ बांधलें, असें सांगतात. याच्या शिल्पकलेवर ग्रीक छाप दिसते. हें अनंतनाग (इस्लामाबाद) पासून कांहीं अंतरावर आहे. हें देऊळ मोडकळीस येण्यास काय कारण झालें, सांगतां येत नाहीं.



इच्छा होती. म्हणून त्यांनीं २७ जुलाई या रोजीं जिन्नांना बोलणीं करण्यासाठीं पाचारण केलें. जिन्ना व जवाहरलालजी यांच्या मध्यें बोलणीं झाली. पण समेट होऊं शकला नाहीं. तरी जिन्नांनीं व्हॉइसरॉय साहेबांच्या सल्ल्यानें मुस्लिम लीगला सरकारांत भाग घेण्यास प्रेरित केलें. दोन्हीं पक्षांच्या पुढाऱ्यांनीं एक सम्मिलित सरकार कायम केलें. या सरकारांत कांग्रेस व मुस्लिम लीग दोन्ही पक्षांचे प्रत्येकी सहासहा मंत्री होते.

या सरकारांत सामील होण्यास नेहरूंनीं दोन अटी लावल्या--(१) घटनासमेंत भाग घेतला पाहिजे व (२) सामूहिक जबाबदारी. मुस्लिम लीगनें घटना समेंत भाग घेण्यास नकार दिला आणि दूसरी अट मोडण्याचा शक्य तेवढा यत्न केला. हें सरकार मोडून हाणून पाडण्यासाठीं व्हॉइसरॉय साहेबांच्या इंगितावर मुस्लिम लीग आंतून यत्न करीत राहिलें. मंत्रिमंडळांत कांग्रेसचे मंत्री व लीगचे मंत्री यांचें आपसांत कधींच ऐक्य स्थापन झालें नाहीं.

जवाहरलालजी एका पेच प्रसंगांत सांपडले होते. त्यांनीं राजिनामा देण्याचा विचार केला, पण दिला नाहीं. धार्मिक दंगे होऊन त्यांत रावळपिंडी, लाहोर, अमृतसर, मुल्तान इत्यादि नगरांतून असंख्य लोक प्राणास मुकले. १९४७ च्या मार्च महिन्यांत कांग्रेस कमेटीची बैठक झाली व तींत पंजाबांतील परिस्थितिविषयीं विचार झाला आणि असें ठरलें कीं पंजाब प्रांताची विभागणी करावी आणि मुस्लिम बहुसंख्य-कांचा व हिंदुबहुसंख्यकांचा असे निरनिराळे भाग करण्यांत यावे.





# पाताळ कोट

[ १२ ]

[ गिड्ड्या राक्षसानें आपलें होडकें नदीच्या ओघांत सोडलें. भिल्ल होडक्यावर दगड फेकीत होते. होडकें एका खडकावर आदळून फुटलें आणि गिड्डा राक्षस एका खोबरोबर किनाऱ्यावर आला. धूमक व त्याचे साथी जेव्हां नदी तीरावर उतरले तेव्हां एका ओसाड पडलेल्या सोवाच्या देवळांतून एक वनमाणूस त्यांच्याकडे येऊं लागला.—पुढें ]

धूमक सर्वांपुढें होता. त्यानें प्रथम त्या वनमाणसाला व त्याच्या पाठीमागें झाडावर बसलेल्या इतर प्राण्यांना पाहिलें. वनमाणूस व ते प्राणी त्यांच्या कडेच टक लावून पहात आहेत, हें त्यानें ओळखलें.

"विरूपा! मनुष्याला पाहून क्रूर हिंस्र पशुसुद्धां भिऊन दूर पळून जातात आणि हे अगदीं निराळे प्राणी दिसत आहेत. कदाचित यांनीं पूर्वी कधीं मनुष्यांना पाहिलें नसावें." धूमक म्हणाला.

धूमकचें बोलणें विरूप ऐकत होता आणि आपल्या खांद्यावरच्या गरुड पक्षाच्या पाठीवर प्रेमानें हात फिरवीत होता. तो एकेक पाऊल पुढें टाकीत ओरडणाऱ्या वनमाणसाकडे पहात होता.



धनुष्यावर बाण ठेवून सोमक वाट पहात होता.

पुलिंदाचें लक्ष या गोष्टीकडे नव्हतें. त्याची नजर त्या गिड्डया राक्षसावर व जमिनीवर बेशुद्ध स्थितींत पडून असलेल्या त्या स्त्रीवर खिळून होती.

होडी चालवणारे चारही भिल्ल थरथर कांपत होते. ते आपल्या सरदाराचा हुकूम होतांच उडी टाकायला तयार होते.

सोमक नेम धरून उभा होता. बाण मारूं नकोस असें खुणेनें सांगत धूमक म्हणाला—"हा वनमाणूस झाडावर बसलेल्या सर्व प्राण्यांचा सरदार दिसतो आहे. आपण त्याला ठार केलें तर सर्व आपल्यावर हल्ला केल्याशिवाय राहणार नाहींत. म्हणून याला भीति दाखवून पळवून लावतां आलें तर बरें होणार आहे.

इतक्यांत पुलिंद जोरानें ओरडत होड्यांच्या बाजूला धांवला—"तो गिड्डा राक्षस! माझी बायको! अहो तो तिला घेऊन रानांत पळतो आहे हो. येथें बसून काय करायचें! धरा त्या गुलामाला, माझ्या बायकोला आधीं सोडवा."

भिल्लाच्या सरदाराचें म्हणणें धूमकला पण बरोबर दिसलें, परंतु दुसऱ्या कारणानें. त्यानें विचार केला कीं त्या गिड्डया राक्षसाला धरलें तर त्याच्याकडून महाकली राक्षसाविषयीं पुष्कळ माहिती कळेल.

सोमकनें व धूमकनें कांतिसेनेला सोडवून आणण्याची जबाबदारी स्वतःवर घेतली होती. या प्रयत्नांत यश येण्यास पुलिंदाच्या मदतीची त्यांना गरज होती. अर्थात ती मदत मिळण्यासाठीं त्याच्या बायकोला सोडवून आणण्यास मदत करणें आवश्यक होतें. कालशंबरला मंत्रतंत्र किती येतात व तो कसा आहे हें विरूपच्या मदतीनें कळणें शक्य होतें.



म्हणून धूमक ओरडला—"पुलिंद! थांब! आम्ही पण येतों. या रानटी जनावरांशीं वितुष्ट आणून वेळ घालविण्यांत शहाणपण नाहीं. होडक्यांत बसून जाऊंया चला तिकडे. एवढ्यांत तो राक्षस कोठें जात नाहीं.

तें ऐकून सर्व होड्यांकडे धांवले. धूमक व सोमक वनमाणसाला पाठ न दाखवितां त्याच्यावर बाणाचा नेम धरून हळूं हळूं मागें येत होते. परंतु सर्वांना होड्यांकडे धांवत जात असलेले पाहून वनमाणूस मोठमोठ्यानें ओरडूं लागला आणि झाडावर बसलेले सर्व प्राणी उड्या मारून धूमकच्या अंगावर धांवले.

प्रसंग मोठा आणीबाणीचा होता. मागें वळून पळून जाऊन होड्यांत जाऊन बसावें तर होड्यांपर्यंत पोंचण्यापूर्वींच वनमाणूस व अस्वलें वगैरे प्राण्यांनीं त्यांच्यावर हल्ला चढविला असता आणि हिंमत करून धैर्यानें त्यांना तोंड द्यायचें तर तिघेचौघे किती जणांना तोंड देणार?

धूमक असा विचार करीत वळून सोमकला कांहीं सांगण्याच्या विचारांत होता परंतु सोमक पाय सरकून नेमका त्याच वेळीं खालीं पडला.



तें पाहून वनमाणूस त्याच्या अंगावर धांवलें. परंतु विरूप इतक्यांत जोरानें ओरडला—"देवी शांभवी! कालगुरू, तूं दाखव आपला पराक्रम. आणखी याहून चांगली संधी कोठून मिळणार?" असें म्हणत त्यानें खांद्यावरच्या गरुड पक्ष्याला त्या वनमाणसावर सोडला.

गरुड पक्षानें वनमाणसावर झडप मारली आणि त्याच्या डोक्यावर चोंचीनें प्रहार करूं लागला. त्यामुळें वनमाणसाचा धीर खचल्यासारखा दिसला. तरी स्वतःला सावरून तो गरुड पक्षाची नरडी हातानें










धरण्याचा प्रयत्न करूं लागला. पण गरुड एकदोनदां त्याच्या मानेला इतक्या जोरानें चावला की वनमाणूस खालीं पडला आणि लोळत मागें फिरला.

आपल्या नायकाची ही दुर्दशा झालेली पाहून इतर प्राणी जेथल्या तेथें निस्तब्ध उभे राहाले. त्या संधीचा फायदा घेऊन धूमक व सोमक आपल्या साथीदारांसह होड्यांकडे धांवले. सर्वांत शेवटीं विरूप होडींत चढला. चुटक्या वाजवून शीळ वाजवून तो गरुड पक्ष्याला आळवून जवळ बोलावीत होता. पण तो उडत जाऊन देवळाच्या कळसावर जाऊन बसला. नंतर 'ची' 'ची' करून विव्हळत पडलेल्या वनमाणसाच्या चारीबाजूला जमलेल्या प्राण्यांच्या डोक्यावर तो घिरट्या घालूं लागला.

"विरूपा! तो गरुड निसटला तुझ्या हातांतून! विसर त्याला. आपल्याला हवी होती तेवढी मदत त्यानें केली. आतां आपण काठावर जाऊन त्या राक्षसाला धरलें पाहिजे."

पण विरूपाची दृष्टि अद्याप गरुड पक्ष्यावर खिळलेली होती. जी दोरी त्यानें त्याच्या पायाला बांधली होती ती अजून लोंबत होती. "तो माझा पाळलेला पक्षी आहे. तो नाहीं पळणार. तुम्हीं पहा तर! ये बेटा! इकडे ये!" टाळ्या वाजवून तो गरुडाला आपल्याकडे बोलवीत होता.

सर्व बसले होते त्या दोन्ही होड्या बऱ्याच पुढें गेल्या. पुलिंद जोरानें वल्हीं मारण्यास सांगत होता. पोंचण्यापूर्वी राक्षस पळून गेला तर काय करायचें ही भीति त्याला वाटत होती.

परंतु गिद्ना राक्षस पळण्याच्या विचारांत दिसला नाहीं. तो त्या खीच्या खांद्यावर



हात ठेवून स्मित करून हंसत होता. एवढेंच नव्हें तर त्याच्याकडे येणाऱ्या होड्यांकडे बोट दाखवून तिला दाखवीत होता आणि पुलिंदकडे बोट दाखवून तो तिला कांहीं विचारीत होता.

ती कांहीं तरी उत्तर देऊन हंसली. गिड्डा राक्षस पण जोरानें हंसला. तो हंसत हंसत नदी तीराकडे आला आणि ओरडून विचारूं लागला—"तुम्ही मला पकडण्यासाठीं येतां आहां कीं माझ्या बायकोला!"

सर्वांची प्रश्नसूचक नजर पुलिंदकडे वळली. त्यांना वाटत होतें कीं पुलिंद नदींत उडी टाकून धांवत जाऊन राक्षसाशीं मारमारी करणार. परंतु तो तर टक लावून स्तब्धपणें त्याच्याकडे पहात बसला होता. तो काठावर बसलेल्या त्या स्त्रीकडे पण चकित होऊन पहात होता.

"ती माझी बायको नाहीं. माझी बायको पाण्यांत नाव बुडली तेव्हां बुडून मेली तरी असावी, नाहींतर राक्षसानें जादू करून तिचें रूपच बदलून टाकलें असावें. तरमग माझा सर्व यत्न फुकट गेला म्हणावयाचा." पुलिंद निराश होऊन म्हणाला. होडी काठाला लागल्यावर सर्वांत प्रथम धूमकनें तीरावर उडी मारली.

गिड्डा राक्षस त्या स्त्रीला बरोबर घेऊन वीस फूट मागें उभा राहाला. तो म्हणाला—"तुमचें माझ्याशीं कांहीं भांडण नाहीं. ही स्त्री तुमच्यापैकीं कोणाची बायको नाहीं. हिच्यासाठींच तुम्ही इतक्या दुरून माझा पाठलाग करीत आलांत. आतां तुम्ही आपल्या वाटेनें जा आणि मी आपल्या वाटेनें जातों."

तें ऐकून धूमक हंसून म्हणाला—"आमच्याकडे एक म्हण आहे कीं गिड्ड्याला





दीडभर अक्कल असते. तुम्हां राक्षसांच्या जातींत पण ही म्हण असेल. तूं तसाच वस्ताद दिसतो आहेस. पण तूं म्हणालास तें बरोबर आहे. तुझ्याशीं आमचें वैर नाहीं. आम्हांला फक्त त्या कालकली राक्षसाच्या पाताळ कोटाची वाट दाखव. नंतर तूं तुला वाटेल तिकडे जा आणि आम्ही आपल्या वाटेनें जाऊं."

"जरा माझें ऐका, त्या पाताळकोटांत गेलेला मनुष्य कधीं परत आला नाहीं, हें तुम्हांला माहीत नसेल कदाचित. म्हणून तुम्ही व्यर्थ आपला जीव कां धोक्यांत घालतां आहां एक दोन महिने तुम्ही येथेंच असे फिरत राहलात तर त्या राक्षसाचे लोक येऊन तुम्हांला धरून घेऊन जातील." गिड्डा राक्षस म्हणाला.

"तसें नाहीं. आम्हांला त्याच्या नकळत त्याच्या किल्ल्यांत जायचें आहे आणि एका राजकन्येला सोडवून आणावयाचें आहे. तिला वांचवून परत आणण्याची जबाबदारी आम्ही आपल्यावर घेतली आहे." धूमक म्हणाला.

"माझी बायको पण त्याच्या तुरुंगांत असणार, मला मुळींच शंका नाहीं. त्याचे नोकरच तिला बंगलांतून धरून घेऊन गेले होते. त्या राक्षसाला ठार करून त्याचें रक्त प्राशन केल्याशिवाय माझी तहान भागणार नाहीं. त्याला मी जिवंत सोडणार नाहीं." पुलिंद म्हणाला.

गिड्डा राक्षस कांहीं बोलल्याशिवाय धूमकजवळ आला आणि म्हणाला—"मी तुम्हांला सावध करायचें तें केलें, पुढें तुमची मर्जी. बरें वाईट कांहीं झालें तर मला नांवें ठेवूं नका. पाताळकोटापर्यंत जाण्याची एक वाट मी तुम्हांला दाखवितो. चला माझ्या बरोबर."

तो त्यांना बरोबर घेऊन त्या पडक्या देवळाजवळ गेला. देऊळ दूर असतांना धूमकनें त्याला विचारलें–"त्या देवळाच्या अंगणांत जायचें आहे का आपल्याला? तेथें एकाहून एक भयंकर वनमाणसें व अस्वलें आहेत ना? थोड्यावेळापूर्वींच त्यांच्या हातांतून आपला जीव कसाबसा वांचवून आम्ही आलों."

तुम्हांला माहीत नव्हतें म्हणून तुम्हीं त्यांना भ्यालांत. तीं रानटी जनावरें पाळ-लेल्या जनावराहून गरीब आहेत. त्यांच्या-समोर खायला फळें टाकलीं कीं तीं कोणाच्या वाटेस जात नाहींत." तो म्हणाला. असें सांगून राक्षसानें एका झाडाचीं फळें तोडून आणलीं.

धूमक व त्याच्या साथीदारांनीं पण कांहीं फळें तोडलीं आणि देवळानजीक पोंचतांच त्यांनीं तीं फळें त्या माकडांअस्वलांसमोर टाकलीं आणि खरोखरच तीं पाळलेल्या कुत्र्यामांजरासारखी शांत झालीं.

गिद्धा त्यांना देवळांत घेऊन गेला. कांहीं काळोखाच्या खोल्यांतून निघत तो एका मोडक्या भिंतीपर्यंत घेऊन गेला. भिंतीवरून खालीं उडी मारून तो एका खड्ड्याकडे बोट दाखवून म्हणाला–"पाताळ-कोटाकडे जायला एकच वाट आहे आणि ती ही."

धूमक व त्याच्या साथीदारांनीं वांकून त्या खड्ड्यांत पाहिलें. त्यांत मोठमोठ्या मगरी व सांप दिसले. त्यांचें आपसांत परस्परांशीं भांडण चालत असल्यासारखें दिसलें. परंतु वर खड्ड्याच्या तोंडाशीं मनुष्यांना पाहून ते आ वासून त्याच्याकडे पाहूं लागले.

[पुढील गोष्ट पुढील अंकीं]



# वेताळाच्या गोष्टी

## विक्षिप्त बायको

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं.

तो पुन्हां झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतलें आणि स्मशानाच्या वाटेनें मौनपणें चालूं लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तूं एवढे परिश्रम करीत आहेस, पण तुला यश कां मिळत नाहीं, हें नाहीं मला कळत. समीर नांवाच्या एका क्षत्रिय तरुणासारखा कांहीं तरी नेम धरून तूं तो नकळत मोडला असावास. तुझी करमणूक व्हावी म्हणून मीं तुला त्याची गोष्ट सांगतों. नीट लक्ष देऊन ऐक." असें सांगून तो गोष्ट सांगूं लागला.

गंधमादन पर्वतानजीक एक क्षत्रिय रहात असे. त्याच्याकडे वडिलोपार्जित थोडें शेत होतें. पण शेतकी त्याच्या वंशांत कोणी



कधीं केली नाहीं. म्हणून पितापुत्र आपल्या क्षत्रिय धर्माला शोभेल असेंच काम करीत. त्याला व त्याच्या तिघां मुलांना नेहमीं कोणत्यातरी मोहिमेवर जावें लागे व युद्ध करीत असतांच सर्वांना त्यांना मरण आलें. त्यांच्या कुटुंबांत शेवटीं उरला काय तो सगळ्यांत धाकटा मुलगा समीर व त्याची आई.

पति व तीन मुलगे अकालीं मरण पावले तेव्हां समीरच्या आईनें विचार केला कीं यापुढें कांहीं तरी दुसरें काम मुलाला शिकवावें आणि करायला लावावें. क्षत्रिय धर्माचें पालन झालें तेवढें आतां पुरें आहे. म्हणून तिनें समीरला शेतकीच्या कामाला लावलें. गाई गुरांना चरायला नेणें, शेणगोठा करणें वगैरे कामें तो करूं लागला. पाहतां पाहतां त्याला विसावें वर्ष लागलें.

आपला मुलगा सुंदर तरणा बांड आहे. त्याला बायको कशी मिळते कोणास ठाऊक? आईच्या मनांत नेहमीं तोच विचार येई.

एकदां समीरनें स्वतःच आईला विचारलें—"आई! मी लग्न करावें का?"

"होय बाळ! लग्न केलेंच पाहिजे. पण तुला सुखी करील अशी मुलगी अजून नजरेस आली नाहीं. तूं पाहिली आहेस का एखादी?" आईनें विचारलें.

"मी तरी कोठें पाहिली आहे?" समीर म्हणाला.

मायलेकांचें असें बोलणें झाल्यानंतर कांहीं दिवसांनीं समीर आपल्या गाईगुरांना चरायला एका सरोवराच्या काठीं घेऊन गेला होता. गुरें चरत होतीं आणि समीर एका झाडाच्या बुंधाला टेंकून डोळे मिटून बसला असतां त्याला गोड आवाजांत कोणी तरी हे शब्द बोलल्याचें ऐकूं आलें—



"आहे माया झोप तुझीही
उघडि नयन स्वप्नें खोटी हीं"

समीर दचकून डोळे उघडून पाहूं लागला तेव्हां आपण स्वप्नतर पहात नाहीं ना असें त्याला वाटलें. कारण त्याला कांहीं अंतरावर पाण्यांत पाय सोडून बसलेली एक अप्सरे-सारखी सुंदर स्त्री दिसली. खांद्यावर पसरलेले काळे भोर व लांब केस सोन्याच्या फणीनें ती विंचरीत होती.

त्याच्या तोंडांतून एक शब्ददेखील उमटला नाहीं. इतकें सौंदर्य त्यानें एकाच जागीं पूर्वीं कधीं पाहिलें नव्हतें. आपण बोललों तर कदाचित ती अप्सरा अदृश्य होईल असें त्याला वाटलें. तरी थोड्या वेळानें थोडा धीर करून तो उठला व आईनें बांधून दिलेली भाकर हातांत घेऊन ती सुंदर स्त्री बसली होती तिकडे गेला व तिला ती भाकरी देण्याच्या हेतूनें त्यानें आपला हात पुढें केला.

"शिळी भाकरी ही जळकी
योग्य पती हा होईल की?"

असें म्हणत जोरानें ती हंसली व तिनें पाण्यांत उडी मारली. ती पुन्हां वर आली नाहीं. तो शुद्धीवर आहे कीं नाहीं, हें कळायला समीरला थोडा वेळ लागला. तो



मंत्रमुग्ध होऊन तासन् तास ती बसली होती त्या जागेकडे पहात बसला. संध्याकाळ झाली. घरीं जाण्याची वेळ झाली तेव्हां गुरें गांवाकडे निघालीं. तो पण त्यांच्या पाठोपाठ यंत्रवत चालूं लागला.

घरीं आल्यावर त्याला उदास बसलेला पाहून आईनें विचारलें—"काय झालें रे? असा कां बसला आहेस?"

समीरनें सरोवराच्या काठीं घडलेली सर्व गोष्ट आईला जशीच्या तशी सांगितली.

"तरमग सर्व चूक माझीच आहे तर! मी काल रात्रीं केलेली भाकरीच बांधून



दिली होती. उद्यां पहाटे उठून तुला ताज्या व छान भाकऱ्या करून देते, बघ." आई म्हणाली.

दुसऱ्या दिवशीं समीर ताज्या भाकऱ्या घेऊन निघाला. गुरांना चरायला सोडून तो त्या झाडाला टेंकून डोळे मिटून बसला. त्याला तो गोड आवाज ऐकूं येतांच त्यानें डोळे उघडून पाहिलें व आईनें करून दिलेली भाकरी घेऊन सरोवराच्या कांठीं गेला. भाकरी पाहून ती म्हणाली—

कशी भाकरी खाऊं कधी
खुळा पती पण मी का बधी!

असें म्हणत तिनें लगेच पाण्यांत बुडी मारली व संध्याकाळ झाली तरी दिसली नाहीं.

समीरनें घरीं जाऊन घडलेली गोष्ट आईला सांगितली. म्हणाला—"काल तूं जळकी भाकरी दिली होतीस आणि आज कच्ची दिलीस."

"बरें या खेपेस पहा, बाळ!" असें सांगून त्याच्या आईनें तिसऱ्यानें छान भाकऱ्या भाजल्या.

या खेपेस समीरला ती मुलगी सरोवराच्या कांठीं दिसली. "ही भाकर खाऊन तूं माझ्याशीं लग्न करून राहशील का? मी तुला फुलासारखी ठेवीन. तूं माझ्याशीं लग्न करून माझ्या घरीं राहायला आलीस तर माझ्यासारखा भाग्यशाली मग कोण असणार?"

छान भाकरी पती चांगला।
आज जीव हा सुखी जाहला॥

असें म्हणत ती जवळ आली व त्याचा हात धरून कांठावर आली. म्हणाली—"मी तुझ्याशीं लग्नाला तयार आहें. परंतु एक अट आहे माझी. तूं विनाकारण मला तीनदां दुखविलेंस तर मी तुझ्याबरोबर राहणार नाहीं. तूं ही अट कबूल केलीस



तर ठीक, नाहीं तर मी घरीं निघून जाईन."

समीर चकित होऊन तिच्याकडे पाहूं लागला. म्हणाला—"मी एकदांतरी कारणाशिवाय कां दुखवीन. हा विचारच मनांत आणवत नाहीं. तुझी अट मला कबूल आहे."

नंतर ती त्याच्याबरोबर त्याच्या घरीं गेली आणि त्याच्याशीं लग्न करून त्यांच्या घरीं राहूं लागली. समीरच्या आईला फार आनंद झाला. पूर्व पुण्याईमुळेंच अशी देवी सून म्हणून मिळाली असावी. असें तिला वाटलें. आपल्या आयुष्यांत ती सुनेला कधीं कोणत्याहि कारणावरून बोलली नाहीं.

तिच्या सहवासांत समीरला स्वर्गसुख काय असतें तेंच अनुभवायला मिळालें. त्याला तीन मुलगे झाले. परंतु त्यांच्या भाग्यानें पाठ फिरविली ती विचित्र तऱ्हेनें.

शेजारणीला एक मुलगी झाली. मुलीच्या बारशाला समीरला पत्नीबरोबर यायला बोलावणें आलें.

तो बायकोला म्हणाला—"मला थोडें काम आहे तें उरकून येतों. तोंपर्यंत तूं आंघोळ वगैरे आटोपून तयार रहा." असें सांगून समीर निघून गेला.



अर्ध्या तासानंतर तो परत आला तेव्हां त्याची बायको जागच्या जागीं बसून होती. समीर आलेला पाहून उठून उभी सुद्धां राहिली नाहीं. त्यानें खांदा धरून हलवून विचारलें—"अशी अजून बसली काय आहेस? लवकर तयार हो कीं!"

"तूं विनाकारण मला रागावला आहेस. हें एकदां झालें. मी पहिल्यानें बजावलें होतें, फक्त तीनदां मी सहन करीन." त्याची बायको म्हणाली.

समीरनें तिला विचारलें—"याला तूं दुखविणें समजतेस?"





"नाहींतर काय? आणि तें सुद्धां कारणाशिवाय." बायको म्हणाली.

तेव्हांपासून समीरला बायकोशीं बोलतांना व वागतांना भीतभीत वागावें लागलें. अगदीं फुंकर घालून पाऊल टाकावें लागे.

आणखी कांहीं दिवसांनीं आणखी एकाच्या घरीं लग्न होतें. समीरला सकुटुंब येण्यास बोलावणें आलें. दोघे लग्नाला गेले, नवरामुलगा नवऱ्यामुलीच्या गळ्यांत मंगळसूत्र बांधूं लागला तेव्हां समीरची बायको रडूं लागली. समीर जवळच बसला होता. त्यानें तिच्या हातावर हातानेंच हळुवारपणानें खूण करून समजावून सांगितलें, ही रडायची वेळ का? आनंदाची वेळ नव्हे का?"

"तिचें आयुष्य या पुढें बंधनांत दुःखांत लोटलें गेलें म्हणून मी रडत होतें. पुन्हां तूं विनाकारण मला रागावला आहेस. आणखी तिसऱ्या वेळीं असें कांहीं झालें तर मला नाहीं खपणार." बायको म्हणाली.

संसारांत इतके दिवस सुख उपभोगलें तें आतां संपुष्टांत आलें, असेंच समीरला वाटलें. कारण क्षुल्लक कारणें तिला दुःखी व्हायला पुरत होतीं.

आणखी कांहीं दिवसांनीं गांवांत कोणी तरी वारल्याचें ऐकून समीर बायकोबरोबर त्याच्या दुःखी नातेवाइकांना भेटायला गेला. प्रेताच्या चारीबाजूला घोळका करून लोक रडत होते. तें पाहून समीरची बायको हंसूं लागली. समीर तिच्या पाठीला बोटानेंच खूण करून हळूच म्हणाला—"वाईट नाहीं का दिसत हें?"

ती आणखी मोठ्यानें हंसूं लागली. म्हणाली—"जो मेला त्याचे सर्व कष्ट संपले. तो संसाराच्या सर्व बंधनांतून मुक्त झाला. अशा वेळीं रडायचें असतें का?" हेंच तिसऱ्या वेळीं तूं मला कारणाशिवाय दुखविलें आहेस. आतां मी कोणाची बांधलेली नाहीं. असें सांगून ती जी उठली ती सरळ सरोवरांत उडी टाकून अदृश्य झाली.

येथवर गोष्ट सांगून वेताळानें विचारलें—"राजा! समीरच्या बायकोनें असें मूर्खपणानें कां वागावें? नुसतें विचारणें म्हणजे रागावणें झालें का? हा हट्टीपणाच नव्हे का? या प्रश्नांचीं उत्तरें माहीत असून तूं दिली नाहींस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

विक्रमार्क म्हणाला—"समीरच्या बायकोच्या वागण्यांत तिच्या दृष्टीनें विचार केल्यास विक्षिप्तपणा दिसणार नाहीं. ती एक देवी किंवा अप्सरा असून मृत्युलोकीं राहायला तयार झाली होती. समीरवर तिचें प्रेम होतें, पण त्याच्या सुखदुःखाची ती भागीदारीण म्हणून नव्हती. विवाह बंधनांतून मुक्त होण्यासाठीं कांहींतरी सबब तिला हवी होती. तशी अट लग्नापूर्वींच तिनें घालून ठेवली होती. जन्म, विवाह व मृत्यु यांकडे मर्त्य ज्या दृष्टीनें पाहतात त्या दृष्टीनें स्वर्गांतले देव पहात नाहींत. मानव जन्म ही दुःखाची सुरवात, लग्न हें बंधन आणि मृत्यु म्हणजे मुक्ति असें त्यांना वाटतें. शेवटीं ती जी जास्त हंसली त्याचें कारण ती स्वतः संसाराच्या बंधनांतून मुक्त होण्याची संधी मिळाली म्हणून. असा विचार केल्यास तिच्या वागण्यांत विक्षिप्तपणा दिसून येणार नाहीं."

अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेताबरोबर अदृश्य झाला आणि नेहमी प्रमाणें झाडाच्या फांदीला लोंबकळूं लागला. (कल्पित)



     



# दानाचें रहस्य

एका गांवीं एक गरीब हरिभक्त रहात असे. तो पंचक्रोशींतल्या गांवोगांवीं फिरून हरिकीर्तन करी आणि लोक आनंदानें त्याला जें देत त्यावर त्याचा उदरनिर्वाह चाले. एकदां तो एका गांवीं गेला असतां गांवकऱ्यांनीं त्याचें कीर्तन आपल्या गांवीं करविण्याचें ठरविलें. ते त्या इनामदार नांवाच्या प्रमुख श्रीमंत गांवकऱ्याकडे घेऊन गेले. आणि म्हणाले–"आपल्या गांवीं बुवांचें कीर्तन झालें तर किती बरें होईल? आमच्या हातून जितकी सेवा होईल ती आम्ही करूंच. मग काय विचार आहे?"

इनामदारांना असल्या भजना कीर्तनाची विशेष आवड नव्हती. पण गांवकऱ्यांनीं त्याला एवढा मान दिला तेव्हां ते कबूल झाले. एवढेंच नव्हें, तर बुवांनीं त्यांच्याच घरीं रहावें असा त्यांनीं आग्रह केला.

त्याच दिवशीं इनामदारांच्या घरासमोरच्या अंगणांत कीर्तनाची तयारी झाली. देवाच्या तसबिरीसमोर एक मोठें तबक ठेवण्यांत आलें. कीर्तनाला येणाऱ्यानीं आपल्या ऐपतीप्रमाणें त्यांत धर्म करावा असा प्रघात होता. कांहीं जणांनीं तबकांत पैसे टाकले. इनामदारांनीं कीर्तन संपल्यावर बुवांचा सत्कार करण्यासाठीं एक शाल व शंभर रुपयांची एक थैली तयार करून ठेवली होती.

त्याच गांवीं लक्ष्मीधर नांवाचा आणखी एक सामान्य श्रीमंत असा गृहस्थ रहात असे. त्यानें आल्याबरोबर बुवांच्या गळ्यांत तीन रुपयांची एक शाल घातली आणि परातींत चार रुपये टाकले. नंतर तो समोर पाहिल्या ओळींत जाऊन बसला.

इनामदार कोण काय धर्म करीत आहेत हें तिरक्या नजरेनें पहात होते. लक्ष्मीधरनेंच तेवढी मोठी रक्कम तबकांत टाकली होती. दहा रुपयापर्यंत सुद्धां कोणाची मजल पोंचली नव्हती. त्यानें मात्र शंभर रुपये देऊन वर एक शाल देणें म्हणजे शिष्टपणा होणार नाहीं का? दहा रुपये व शाल दिली कीं पुष्कळ होईल असें त्यानें मनाशीं ठरविलें.

कीर्तन चालू होतें. इनामदार मध्येंच कांहींतरी महत्वाच्या कामासाठीं म्हणून उठले. त्यांनीं लोंकरी शाल काढून घेऊन तिच्या जागीं एक धोतर, उपरणें आणि शंभराच्या जागीं दहा रुपयांची नोट ठेवून दिली आणि आपल्या जागीं जाऊन बसला.

सुरवाती पासूनच इनामदारांच्या हालचालीवर कीर्तनकाराची नजर होती. इनामदारांच्या मनांत उठणारे विचार त्यांच्या चेहऱ्यावर स्पष्ट उमटत होते. इनामदार कीर्तन चालू असतां मध्येंच उठून घरांत कां गेला हें त्याच्या लक्षांत आल्याशिवाय राहालें नाहीं. म्हणून इनामदार पुन्हां आपल्या जागेवर येऊन बसल्यावर कीर्तनकारानें



कीर्तनांत एक कथा गोवून सांगितली. म्हणाला—"कर्ण मोठा दानी होता. कोणी दान मागायला आला कीं त्याच्या तोंडांतून कधीं नकार आला नाहीं. तो एकदां स्नानाला जात होता तेव्हां त्याच्या एका सेवकानें येऊन कोणी ब्राह्मण आल्याचें सांगितलें. कर्णानें त्या ब्राह्मणाला आदर-पूर्वक बोलाविलें. तो आला तेव्हां कर्ण डाव्या हातांत तेलाचें सुवर्णपात्र घेऊन उजव्या हातांत तेल ओतून अंगाला लावीत होता.

ब्राह्मण हात जोडून म्हणाला—"महाराज ! मी एक गरीब ब्राह्मण आहें. आपल्या रुचेल तें दान आपण करावें."

महादानी कर्णानें त्याच्या डाव्या हातांतलें सुवर्णपात्र दान म्हणून देऊन टाकलें. ब्राह्मणानें आनंदानें तें स्वीकारलें आणि म्हणाला—" महादानी आहां आपण ! पण कोणी डाव्या हातानें दान करतो का ? असें दान करण्यांत कांहीं गुपित आहे का ?"

कर्ण स्मित करून म्हणाला—"दान करतांना हें गुपित प्रत्येकानें लक्षांत ठेवलें पाहिजे. दान द्यायचें तर लगेच देऊन टाकावें. उशीर करूं नये. मी दान केलें तेव्हां हें पात्र माझ्या डाव्या हातांत होतें. मी तें उजव्या हातानें देण्याचा विचार केला असता तर तेवढ्या अवधींत माझा विचार कदाचित बदलला असता. म्हणून मी डाव्या हातानेंच दान केलें."

ही कथा सांगून हरिदास मूळ पदावर आला. इनामदारांना कोणी थोबाडींत मारल्यासारखें वाटलें. त्यांनीं हरिदासाला देऊं केलेलें दान पहिल्यापेक्षां वाढवून दिलें आणि त्यांचा सत्कार करून निरोप दिला.





# भोळसट

एका गांवीं एका शेतकऱ्याला तीन मुलगे होते. दोघे मोठे हुशार होते. पण तिसरा थोडा भोळसट होता. वडील वारल्यावर दोघां वडील भावांनीं बापाचा सर्व जमीनजुमला व इस्टेट वांटून घेतली आणि धाकट्याला कांहीं दिलें नाहीं.

"सर्व तुम्हीच घेऊन टाकलेंत आणि मला ?" धाकट्यानें विचारलें.

"तूं आहेस खुळा आणि भोळसट. तुझ्याजवळ काय शिलक राहणार ?" त्याचे दोघे भाऊ म्हणाले. पण तिसरा ऐकेना. तेव्हां दोघां भावांनीं त्याला एक म्हातारा बैल दिला व म्हणाले—"हा तुझा वांटा."

थोड्याच दिवसांनीं शेजारच्या गांवीं आठवड्याचा बाजार होता. बाजाराचें गांव एक जंगला पलीकडे होतें. धाकट्या भावानें आपला बैल विकून टाकण्याचें ठरविलें आणि बैल घेऊन बाजाराच्या गांवीं निघाला.

जंगलांतून जात असतां एका जागीं एक वाळकें झाड होतें. वाऱ्याचा झोंका लागला कीं तें वांके व 'किर किर' असा आवाज होई. धाकटा भाऊ बैल घेऊन त्या झाडा-जवळून जात असतां त्याला तो आवाज ऐकूं आला. त्याला वाटलें, तें झाड कांहीं तरी बोलत आहे. म्हणून त्यानें झाडाला विचारलें—"माझा बैल विकत हवा आहे का तुला ?"

झाडाचा पुन्हां 'किर किर' असा आवाज झाला.

"फक्त वीस रुपये. एक किंमत, कमी नाहीं जास्त नाहीं." तो म्हणाला.

पुन्हां 'किर किर' आवाज झाला.



“उद्यां पैसे मिळतील म्हणतोस? वचन देऊन मोडणार तर नाहींस? बरें तर ठेवून घे बैल!” असें सांगून त्यानें त्या झाडाच्या बुंधाला बैल बांधून ठेवला आणि घरीं निघून गेला.

“बैल विकलास का रे?” भावांनीं विचारलें.

“होय, विकला!” धाकटा भाऊ म्हणाला.

“पैसे? किती मिळाले बघूं?” दोघां वडील भावांनीं विचारलें.

“पैसे अजून हातांत आले नाहींत. उद्यां मिळतील वीस रुपये!” धाकटा म्हणाला.

“अरे खुळाच शेवटीं....” दोघे भाऊ हंसून म्हणाले.

दुसऱ्या दिवशीं तो त्या झाडाजवळ गेला तेव्हां तेथें बैल नव्हता.

“माझे पैसे?” त्यानें झाडाला विचारलें.

“किर किर” आवाज झाला.

“उद्यां? म्हणून तर मला राग येतो. बरें तर आणखी एक दिवसाचा अवधी देतों. जर तूं उद्यां पैसे दिले नाहींस तर पहा.” असें सांगून तिसरा भाऊ घरीं परत आला.

“मिळाले का रे पैसे?” दोघां भावांनीं त्याला विचारलें.

“नाहीं, उद्यां मिळतील.” तो म्हणाला.

“अरे पण तूं बैल कोणाला विकलास, हें तर सांगशील!” दोघांनीं विचारलें.

“रानांतल्या एका वाळक्या झाडाला.” तो म्हणाला.

“मूर्ख तो मूर्खच! खुळा!” भाऊ म्हणाले.

तिसऱ्या दिवशीं तो कुऱ्हाड घेऊन झाडाजवळ गेला आणि विचारूं लागला—“बोल, कोठें आहेत माझे पैसे?”

फक्त ‘किर किर’ असा आवाज झाला.

“पुन्हां तेंच उत्तर? माझ्याजवळ नाहीं चालायच्या तुमच्या गमजा वचनजी.” असें म्हणत त्यानें कुऱ्हाडीचा एक घाव जोरानें झाडावर मारला. त्या एका घावाबरोबर झाडाची फांदी तुटून पडली व सोन्याचीं नाणीं फांदीबरोबर जमिनीवर पडली.

त्या झाडाच्या पोकळींत चोरांनीं सोन्याचीं नाणीं लपवून ठेवलीं होतीं. तिसरा मुलगा त्याला जेवढें ओझें वाहवून नेणें शक्य होतें तेवढें घरीं घेऊन गेला आणि त्यानें तें आपल्या भावांना दाखविलें. एवढें सोनें पाहून दोघे भाऊ चकितच झाले.

“कोठें रे मिळालें तुला एवढें सोनें?” त्यांनीं विचारलें.

“त्या झाडानें माझा बैल विकत घेतला त्याच्या जवळ सोनें आहे. चला, जाऊन घेऊन येऊं या.” धाकटा भाऊ म्हणाला. तिघे जंगलांत निघाले. जेवढें सोनें मिळालें त्याचीं तीन गाठोडीं करून तिघे घरीं निघालेले.

वाटेंत त्यांना गांवचा पाटील भेटला “कायरे आहे यांत?” त्यानें तिघांना विचारलें.

“सुरण आणि रताळीं.” दोघे मोठे म्हणाले.













“खोटें! सोनें आहे. पाहिजे तर पाहून घ्या.” धाकटा म्हणाला आणि त्यानें आपलें गाठोडें सोडून दाखविलें. इतकें सोनें पाहून पाटील थक्कच झाला. तो तिसऱ्याच्या गाठोड्यांतलीं नाणीं दोन्ही हातांत जेवढीं आलीं घेऊं लागला. तें पाहून धाकट्यानें त्याच्या डोक्यांत कुऱ्हाड मारली. पाटलाला तत्काळ जागच्या जागीं मोक्षप्राप्ती झाली.

“अरे मूर्खा! तूं हें काय केलेंस? आतां हें प्रेत कोठें आणि कसें लपवायचें?” दोघे भाऊ घाबरून गेले.

त्यांना दुसरें कांहीं सुचलें नाहीं तेव्हां त्यांनीं प्रेत ओढून नेऊन शेजारच्या एका झोंपडींत नेऊन पुरून टाकलें. परंतु धाकटा भाऊ हें गुपित ओकून टाकणार अशी त्यांना धास्ती वाटत होती. म्हणून ते रात्रीं झोंपडींत गेले आणि प्रेत उचलून नेऊन तेथें एक मेलेला बकरा पुरून ठेवून दिला. पाटलाचें प्रेत त्यांनीं दुसऱ्या जागीं पुरून ठेवलें. दोन तीन दिवसांनीं, पाटील घरीं परतले नाहींत म्हणून चवकशी सुरू झाली. तिसरा भाऊ ज्या कोणाला भेटला त्याला म्हणाला—“पाटील कोठें आहेत हें मला कां नाहीं कोणी विचारीत? मीच लावला त्यांना वाटेला. माझ्या दोघां भावांनीं त्याचें प्रेत पुरून सुद्धां टाकलें. दाखवतों पाहिजे तर.”

तो झोंपडींत सर्वांना बोलावून घेऊन गेला आणि जागा दाखवून म्हणाला—“खणा येथें, मिळेल पाटलांचें प्रेत.”

गांवकऱ्यांनीं खणून पाहिलें तेव्हां त्यांना तेथ मेलेला बकरा दिसला.

“वेडा आहे झालें....” असें म्हणत गांवकरी निघून गेले.





# योग्य दंड

अकबर बादशाहाच्या दरबारीं बिरबला-बरोबर त्याचा एक मित्रपण रहात असे. बिरबलानें बादशाहाची मर्जी लवकरच संपादन केली. म्हणून त्याच्या मित्राला बिरबलाचा हेवा वाटे. बिरबलाची मान खालीं करायला लावून त्याची जागा पटकावण्याचा त्यानें मनाशीं निश्चय केला.

बिरबलाच्या चातुर्याचे पराक्रम ऐकण्यांत बादशाहाला फार आनंद वाटे. म्हणून एकदां बादशाहानें एक प्रश्न सर्वांसमोर टाकला. म्हणाला—“प्रत्येक निरर्थक गोष्टींत कांहीं तरी गूढ अर्थ असतो. हें खरें आहे का?”

लगेच बिरबल म्हणाला—“जी हुजूर, खरें आहे!”

बिरबलाचा मित्र उठून उभा राहाला व म्हणाला—“खोटें आहे! निरर्थक गोष्टींत गूढ अर्थ कोठून निघणार? मी अनेक निरर्थक उक्ती करूं शकेन.”

बिरबलाला त्याच्या मित्राचा कावा समजला. त्यानें त्याची खोड मोडण्याचें ठरविलें. म्हणाला—“ऐकूं तर द्या, तुमची निरर्थक उक्ती! मी सांगतों त्यांतला गूढार्थ!”

बिरबलाचा मित्र डोकें खाजवीत जरा खाकरत म्हणाला—“आई बापाच्या पोटीं न जन्मलेल्यानें खूप पिऊन बापाला ठार केलें.”

बिरबल फक्त एक क्षणभरच विचार करायला थांबला असेल. म्हणाला—“आपल्या आई बापाला कोणी मारायला जाईल का? असें कोणी केलें तर लोक म्हणतात कीं हा आपल्या आईबापांचा मुलगा नाहीं. आणि

श्री. मो. का. कासार










जो शिंगून वाघाला मारतो त्याला जर कोणी म्हणालें कीं हा आपल्या आईबापांचा मुलगा नाहीं तर त्यांत नवल तें काय ?"

तें उत्तर ऐकून बिरबलाचा मित्र थक्कच झाला. बिरबलाचें उत्तर ऐकून इतर दरबारी टाळ्या वाजवून त्याची वाहवाही करूं लागले तेव्हां त्यानें आणखी एक निरर्थक कोडें घातलें.

"बादशाह शिकारीला चालले असतां एक पक्षी घरट्याकडे जात होता तो बादशाहांना पाहून एकदम पाण्यांत शिरला."

बिरबल जास्त विचार करायला न थांबतां एकदम म्हणाला—"तें बरोबरच आहे. बादशाहांनीं त्याला नेम मारला आणि तो पक्षी पाण्यांत जाऊन पडला."

पुन्हां दरबाऱ्यांनीं टाळ्या वाजवून बिरबलाला शाबासकी दिली. या खेपेस बिरबलाचा मित्र म्हणाला—"गवत पुरेंसें उरलें नाहीं तेव्हां गाढवानें वाघाला लाथा मारल्या. याचा अर्थ काय ?"

"वाघ राजा आहे आणि गाढव नोकर. गाढवाला गवत पुरेंसें नाहीं याचा अर्थ त्याला पगार पुरत नाहीं. म्हणून गाढवानें सिंहाला लाथा मारायला सुरवात केली याचा अर्थ झाला कीं आपले बादशाह आहेत वाघ आणि त्यांचा नौकर म्हणजे माझा मित्र गाढव. त्याला जो पगार मिळतो तो पुरेसा नाहीं. म्हणून तो बंड करण्याच्या विचारांत आहे." बिरबलानें भाष्य केलें.

बिरबलाचा मित्र वारंवार सांगूं लागला कीं स्वप्नांतदेखील त्याच्या मनांत तसा विचार आला नाहीं. परंतु बिरबलानें त्याची अशी खोड मोडली कीं पुढें त्याची वाचाच बंद झाली.





# हुन्नर

जयपूरच्या राजाला जयंत नांवाचा एक मुलगा होता. त्याच्या एका जिवलग मित्राचें नांव जयपाळ असें होतें. दोघे सकाळीं रानांत शिकारीला जात आणि संध्याकाळीं काळोख पडल्यावर घरीं परत येत. ते शिकारीला जात तेव्हां दोघांचे कपडे इतके साधे असत कीं पाहणाऱ्याला हें कळत नसे कीं राजाचा मुलगा कोण व त्याचा मित्र किंवा नोकर कोण ?

एकदां जयंत व जयपाल शिकार संपल्यावर सायंकाळीं घरीं येत होते तेव्हां जयंतला तहान लागली. गांवाबाहेरच्या एका विहिरीवर दोघे गेले. विहिरीवर गांवच्या मुली पाणी भरीत होत्या. त्यांनीं पाणी प्यायला मागितलें. एका मुलीनें तांब्याभर पाणी भरून पुढें केलें, पण दुसऱ्या एका मुलीनें तिच्या हातांतला तांब्या घेऊन पाणी ओतून टाकलें. नंतर तिनें पुन्हां तांब्या भरला व तो ओतून टाकला. असें सहा वेळां पाणी ओतून टाकून सातव्या वेळीं तिनें तांब्या भरून प्यायला पाणी दिलें.

जयंतनें पाणी पिऊन घेऊन मुलीला विचारलें—"तूं मला पहिल्या तांब्यांतलेंच पाणी प्यायला कां नाहीं दिलेंस ? मला चिडवण्यासाठींच ना ?"

"अपरिचित लोकांना असें चिडवण्याची आम्हांला संवय नाहीं. पाणी फार गार होतें व तुम्ही दुरून दमून आला होतां. थोडें सुस्तावल्यावर पाणी द्यावें म्हणून मी थोडा उशीर लावला." ती म्हणाली.

सौ. कमलाबाई कासार



तिचें उत्तर ऐकून जयंत चकित होऊन तिच्याकडे पाहूं लागला. ती फार सुंदर होती. “तुझें नांव काय?” त्यानें तिला विचारलें.

“माझें नांव माधवी. माझे वडील धनगर आहेत. पण तुम्ही नांव कां विचारलेंत?” तिनें विचारलें.

“विचारण्यांत कांहीं चूक झाली का?” त्यानें विचारलें.

“रागावणार नसाल तर विचारतें, तुम्ही कोण हें आणि तुमचें नांव काय हें कां नाहीं सांगितलेंत?” माधवीनें विचारलें.

“खरें सांगूं कीं खोटें?” जयंतनें विचारलें.

“तुम्हांला आवडेल तसें सांगावें.” माधवी म्हणाली.

“खरेंच सांगेन. पण आतांच नाहीं. तुला लवकरच कळेल एवढें वचन मात्र देतों.” जयंत म्हणाला.

नंतर जयंत व जयपाल आपल्या गांवीं निघून गेले.

माधवीशिवाय दुसऱ्या कोणत्याहि मुलीशीं लग्न करावयाचें नाहीं हें जयंतनें आपल्या मनाशीं ठरवून टाकलें. त्याच्या आई-वडिलांना ती गोष्ट कळली. मुलगा ऐकणार नाहीं हें लक्षांत घेऊन दोघे त्या लग्नाला कबूल झाले.

राजाचे दूत साखरपुडा घेऊन जयपाल-बरोबर माधवीच्या गांवीं गेले आणि माधवीच्या वडिलांना भेटले. म्हणाले—“राजानें तुमच्या मुलीशीं युवराजांचें लग्न करून द्यावें अशी विनंति करण्यासाठीं आम्हांला पाठविलें आहे.”

आलेल्या लोकांना खायला फळफळावळ देऊन माधवी गालिचा विणायला जाऊन बसली. तिचे वडील म्हणाले—“हें पहा,



तिच्या लग्नाविषयीं आम्हांला नाहीं कांहीं बोलावयाचें. सर्व तिच्या इच्छेवर अवलंबून आहे.” असें सांगून त्यानें माधवीला बोलाविलें.

जयपालनें तिला बरोबर आणलेलीं वस्त्राभूषणें दाखविलीं आणि म्हणाला—“महाराजांनीं हीं तुला द्यायला आम्हांला पाठविलें आहे.”

तिनें त्या वस्त्रांभूषणांकडे उपेक्षेनें पहात विचारलें—“महाराजांची माझ्यावर एवढी कृपा होण्याचें कारण?”

“राजकुमार जयंत यांना तूं एकदां प्यायला पाणी दिलें होतेंस आठवतें का? युवराजांशीं तुझें लग्न व्हावें म्हणून महाराजांनीं ही भेट तुझ्याकडे पाठविली आहे.” जयपाल म्हणाला.

“म्हणजे मी त्या दिवशीं प्यायला पाणी दिलें तें युवराजांना का? ते आहेत तसे सुंदर. पण त्यांना कांहीं कामधंदा येतो का?” माधवीनें विचारलें.

“ते युवराज आहेत. सर्व कामधंदा करणारे त्यांचे सेवक व दास आहेत. म्हणून त्यांना कामधंदा शिकण्याची अगर करण्याची काय गरज?” जयपालनें विचारलें.



“असेल! पण काळवेळ कशी येईल हें कोणाला माहीत आहे का? आज जो राजा आहे उद्यां तो रंक होऊं शकतो. म्हणून राजा असो कीं रंक, प्रत्येकाला कांहीं तरी हस्तव्यवसाय आला पाहिजे. युवराजांशीं मी लग्नाला तयार आहें, परंतु ज्याला एकहि हस्तव्यवसाय माहीत नाहीं अशा तरुणाशीं मी लग्नाला तयार नाहीं. युवराजांना माझ्या वतीनें माफ करायला सांगा.” माधवी म्हणाली.

राजदूतांनीं माधवी जें म्हणाली तें जाऊन सांगितलें. तें ऐकून राजा व राणीला फार



आनंद झाला. त्यांना वाटलें कीं आतां जयंत हा मूर्खपणा सोडून राजघराण्याला साजेल अशा राजकन्येशीं विवाहाला तयार होईल.

परंतु जयंत म्हणाला—"माधवी जें म्हणाली तें खरें आहे. मला पण एक हस्तव्यवसाय शिकून घेतला पाहिजे."

राजानें आपल्या प्रधानांशीं सल्ला करून ठरविलें कीं मुलानें कलाबतूचें काम शिकावें.

दूरदूरच्या देशांतून कलाबतूच्या कामांत हुशार लोकांना आणण्यांत आले. त्यांनीं जयंताला कलाबतूचें रेशमाच्या कापडावर जरीचें काम कसें करावयाचें हें शिकवून दिलें. कांहीं दिवसांनीं त्यानें स्वतःच्या हातानें कलाबतूचें काम करून प्रेमाची भेट म्हणून एक सुंदर वस्त्र जयपालच्या हातीं माधवीकडे पाठविलें.

"ज्याच्या हातांत हें कसब आहे त्याच्या बरोबर कोणत्याहि परिस्थितींत आयुष्य घालविण्यांत भय वाटण्याचें कारण नाहीं." माधवीनें तें वस्त्र स्वीकारून लग्नाला आपला होकार कळविला.

यथावेळीं दोघांचा विवाह थाटामाटानें पार पडला.

या विवाहानंतर जयपाल कोठे तरी निघून गेला. त्याचा पुष्कळ शोध लावण्यांत आला, परंतु शोध लागला नाहीं.

कांहीं दिवसांनीं वृद्धापकाळीं महाराजांना देवाज्ञा झाली. पिकलेलें पान गळून पडलें. जयंत गादीवर बसला.

एकदां माधवी आपल्या पतीला म्हणाली—"तुम्ही गादीवर बसलांत म्हणून महाराज झालांत. परंतु राज्यकारभाराची किंवा प्रजा कशी सुखी होईल याची तुम्हांला माहिती आहे का? तुमचे प्रधान आणि कारभारी सांगतील तें खरें. तें तुम्हांला नेहमी हेंच सांगणार कीं राज्यांत सर्वत्र शांतता नांदत आहे व प्रजा सुखी आहे. म्हणून वेष पालटून, कधीं साधूचा, कधीं शिकाऱ्याचा व कधीं व्यापाऱ्याचा वेष धारण करून गुप्तपणें राज्यांत फिरून खरी वस्तुस्थिति ओळखून घेतली पाहिजे."

"तुझें म्हणणें बरोबर आहे, माधवी! मी साधा पोशाख करून शिकारीला जात असे तेव्हां गांवकरी कसे मोकळेपणें माझ्याशीं बोलत. परंतु आतां मी नांवापुरता राजा आहे. खरा कैदीच आहें. मी निघून गेलों तर राज्य कोण संभाळणार?" जयंतनें विचारलें.

"तुम्ही मुळीच काळजी करूं नका. याशिवाय महाराज राजवाड्यांत नाहींत हें प्रधानांना व इतर अधिकाऱ्यांना कळून देण्याचें कारणच काय?" माधवी म्हणाली.

जयंत शेतकऱ्याचा पोशाख करून राज्य-भर प्रजेच्या सुख दुःखाची कहाणी कळावी म्हणून निघाला. तो एका जागीं ओट्यावर बसला असतां तेथें एक वृद्ध साधू आला. त्या म्हाताऱ्याबरोबर त्याचे पुष्कळ शिष्य होते. समोर कांहीं नोकर "बाजूला व्हा, बाजूला व्हा!" असें म्हणत येत होते. कांहीं लोक त्या वृद्ध माणसाची चरणरज कपाळाला लावून नमस्कार करीत होते.



त्यानें बरोबर येणाऱ्या लोकांना विचारलें "कोण बुवा आहेत हे?"

"तुम्ही इतक्या थोर पुरुषाला ओळखत नाहीं? कालीमातेच्या देवळांतले पुजारी, एक महात्मा आहेत. पायाखालीं कीड मुंगी चिरडून मरेल म्हणून जमिनीवर पायच ठेवीत नाहींत. योगबलानें अधांत्री चलतात. त्यांना म्हणून शक्तियोगी म्हणतात." तो शिष्य म्हणाला.

शक्तियोगी ओट्याजवळ आला. नोकरांनीं पहिल्यापासून अंथरून ठेवलेल्या मऊ मख-मली गालिच्यावर तो विश्रांति घेऊं लागला.



लोक घोळका करून चारी बाजूला जमा झाले व साष्टांग नमस्कार करूं लागले.

जयंत पण सर्व लोकांना बाजूला सारीत पुढें गेला. शक्तियोगीनें नवा मनुष्य आल्याचें ओळखलें आणि त्याला विचारलें—"कोण रे बाबा तूं ! काय काम करतोस ?"

"मी दूरचा राहणारा आहें. कामाच्या शोधार्थ निघालों आहें." जयंत म्हणाला.

"कामच हवें ना ? माझ्यावरोबर चल," शक्तियोगी म्हणाला. जयंत बाट पाहूं लागला. शक्तियोगीनें आपल्या एका दोघां शिष्यांच्या कानांत कांहीं तरी सांगितलें. ते लगेच निघून गेले आणि मजुरांच्या डोक्यावर कांहीं माल घेऊन परत आले.

नंतर शक्तियोगीनें त्याच्या दर्शनार्थ आलेल्या भक्तजनांना आशीर्वाद दिला आणि मजुरांना बरोबर यायला सांगून शिष्यांसह निघाला. जयंतपण बरोबर गेला. कांहीं वेळानें ते गांवाच्या बाहेर एका छोटेखानी किल्ल्यांत शिरले. कोटाचें दार तसें जंगी होतें. शक्तियोगीनें एका मोठ्या किल्लीनें दाराचें कुलूप काढलें.

कोटाच्या आंत एक देऊळ होतें. त्याच्या चारी बाजूला खोल्या होत्या. मजुरांनीं सर्व माल देवळाच्या अंगणांत उतरविला. शक्तियोगी देवळामागें त्या मजुरांना व जयंतला बोलावून घेऊन गेला. नंतर त्यानें एक लोखंडी दार उघडून सर्वांना आंत जायला सांगितलें. "काय करायचें तें मी आंत गेल्यावर सांगतों." असें सांगून सर्व आंत गेल्यावर शक्तियोगीनें दार बाहेरून बंद करून कुलूप लावलें.

आंत काळोख होता. त्या भुयाराच्या वाटेनें कांहीं अंतर चालत गेल्यावर त्यांना नदीच्या काठीं उतरणीवर दूर एक टिमटिम जळत असलेला दिवा दिसला. त्याच वेळीं एक काळी आकृति मध्ये उभी असलेली त्यांना दिसली. जयंतनें जवळून ती आकृति पाहली—अस्थिपंजरासारखा एक पुरुष होता तो.

"या माझ्यावरोवर !" असें सांगून तो मनुष्य सर्वांना जमिनींतल्या निरनिराळ्या गुहांत घेऊन गेला. तें दृश्य पाहून जयंतला नरकलोकाची जणुंकांहीं आठवण झाली. एका गुहेंत प्रेतें पडलीं होतीं. दुसऱ्या एका गुहेंत कित्येक लोक निरनिराळीं कामें करीत होते. सर्व मृत्यूच्या दारांतच जणुंकांहीं उभे होते.

अस्थिपंजरासारखा तो मनुष्य म्हणाला—"तो पुजारी नसून राक्षस आहे. तुम्हांला त्यानें फंसवून या गुहेंत पाठविलें तसें आम्हांला पण आंत पाठविलें होतें. मला येथें येऊन कित्येक वर्षें लोटलीं. माझ्या-बरोबर आलेले सर्व एकामागून एक तडफडून मरून गेले. हा राक्षस पुजारी ज्या लोकांना काम येतें आणि ज्यांना येत नाहीं अशा दोन्ही प्रकारच्या लोकांना धरून आंत सोडतो. काम करणाऱ्यांकडून ढोरासारखें काम करून व त्यांच्यावर मारहाण करून त्यांचा जीव घेतो. ज्यांना





काम येत नाहीं त्यांना ठार करून तो व शिष्य सर्व मिळून खाऊन टाकतात. हा व त्याचे शिष्य नरभक्षक आहेत."

त्याचें बोलणें ऐकत असतां जयंतनें त्याला ओळखलें. तो त्याचा मित्र जयपाल होता. आश्चर्याचा व दुःखाचा धक्का लागून तो मरून जाईल या भीतीनें जयंतनें त्याला स्वतःची ओळख दिली नाहीं.

इतक्यांत कोणी तरी आल्याची चाहूल लागली. पुजारी सशस्त्र लोकांबरोबर गुहेंत आला होता. "आतां नवा आलेला तूंच नव्हे का?" पुजाऱ्यानें विचारलें.

"होय, धर्म प्रभो...." जयंत म्हणाला.

"तुमच्यापैकीं कोणाला विशेष कांहीं हुनर म्हणजे हस्तव्यवसायाची माहिती आहे?". पुजाऱ्यानें विचारलें.

"आम्हां सर्वांना एक न एक हुनर येते. मला कलाबतूचें काम येतें. मी कलाबतू काढलेल्या एकेका वस्त्राची किंमत एकेक लाख रुपये मिळते." जयंत म्हणाला.

"खरेंच?" पुजाऱ्यानें विचारलें.

"आपण स्वतःच पाहिजे तर पहावें." जयंत म्हणाला.

"बरें तर तुला या साठीं कोणकोणता माल पाहिजे?" पुजाऱ्यानें विचारलें.

जयंत म्हणाला—"आम्हीं शाकाहारी आहों. म्हणून आमच्या जेवणाची तशी व्यवस्था करण्याची कृपा करावी."

पुजाऱ्यानें त्याप्रमाणें त्याच्या व त्याच्या बरोबरच्या लोकांसाठीं जेवण पाठविलें. जयंतनें तें आपल्याबरोबर आलेल्या इतरांना, एवढेंच नव्हें तर जयपाल व पूर्वीच्या लोकांनापण खायला वांटून दिलें.

पुजाऱ्यानें शाली विणायला आवश्यक त्या सर्व वस्तू आणून दिल्यावर जयंतनें शालींवर सुंदर चित्रें तर काढलींच त्याच बरोबर आपला संदेश गुहेच्या बाहेर कळेल अशा तऱ्हेनें युक्तीनें विणून ठेवला.

पुजारी आला व त्यानें ती अद्भुत शाल पाहून जयंतच्या कौशल्याची पुष्कळ स्तुति केली.

"सोन्याच्या किंमतीनें ही शाल विकतां येईल. त्यांत पारखी लोकांच्या हातीं ही लागली तर या शालीची किंमत दहापट मिळाल्याशिवाय राहणार नाहीं. माधवी राणीला या कलेची पारख फार चांगली आहे." जयंत पुजाऱ्याला म्हणाला.

पुजाऱ्याला परमानंद झाला. त्याचा लोभ इतका वाढला कीं कोणाला न सांगतां तो स्वतःच शाल घेऊन राजवाड्यांत गेला.

नोकरांनीं राणीला येऊन सांगितलें कीं एक मनुष्य एक अनमोल शाल विकायला घेऊन आला आहे. राणीनें त्याला आंत बोलाविलें.

तिनें ती शाल नीट उघडून सुद्धां पाहिली नाहीं. फक्त किंमत विचारली.

"महाराणी! सोन्याहून शंभरपट किंमत आहे या शालीची. आपण काम पाहिलेंत तर माझें म्हणणें खरें वाटेल आपल्याला. आपल्याला या कामाची पारख आहे,



म्हणून मी इतका दूर आलों आहें." पुजारी म्हणाला.

माधवीनें चकित होऊन शाल उघडून पाहिली. तिची नजर राजानें पाठविलेल्या संदेशावरच प्रथम पडली.

तो गुप्त संदेश असा होता—

"प्रिय माधवी! मी तर नरकांतच सांपडलों आहें. ही शाल आणणारा एक यमदूत आहे असें समज. जयपाल पण येथेंच येऊन फंसला आहे. शक्तिपाद गांवाच्या पूर्वेला एका बालेकिल्ल्याच्या आंत गुहेंत आमचा शोध केल्यास आमचा

शोध लागेल. नाहीं तर मरण निश्चित आहे. तुझा—जयंत."

तो संदेश वाचून माधवीच्या पोटांत धस्स झालें. ती बराच वेळ त्या शालीवरचा तो संदेश चकित होऊन पहात राहली. पुजाऱ्याला वाटलें कीं राणी कौतुक करीत असावी. नंतर स्वतःला सावरून ती म्हणाली—"तूं म्हणालास तेवढीच याची किंमत लावणें चुकीचें ठरेल. मी त्याहून जास्त किंमत द्यायचें ठरविलें आहे." असें सांगून तिनें प्रधानांच्या नांवीं एक पत्र लिहून नोकराला दिलें व म्हणाली—"हें पत्र व या माणसाला प्रधानांकडे घेऊन जा."

पुजारी नोकरावरोबर प्रधानांकडे गेला. प्रधानानें माधवीचें पत्र वाचून पुजाऱ्याला कैद करून तुरुंगांत टाकलें.

नंतर माधवीनें ससैन्य शक्तिपाद नगराच्या पूर्वेला असलेल्या देवळाला वेढा घालून सर्व शिप्यांना कैद केलें आणि गुहेचें दार उघडवून पुजाऱ्याच्या हातीं सांपडलेल्या सर्व निरपराध लोकांना सोडविलें.

तेव्हां जयपालानें जयंतला ओळखलें. तो म्हणाला—"आज माधवी देवीनें आपल्या सर्वांना वांचविलें."

जयंत म्हणाला—"मित्रा! तिनें मला लग्नापूर्वींच नाहीं का वांचविलें होतें? कांहीं कामधंदा येत असल्याशिवाय माझ्याशीं ती लग्नाला तयार नव्हती. मी जें कला कुसरीचें काम शिकलों तेंच आज उपयोगी पडलें." जयंत म्हणाला.

नंतर जयंत व माधवी सर्व लोकांना बरोबर घेऊन राजधानींत परत आले. त्यांच्या राज्यांत सर्व प्रजा सुखी झाली.





# अढळ प्रेम

विक्रमपूरच्या राजाला एकच एक मुलगा होता. त्याचें नांव धीरमती असें होतें. तो स्वभावानें उदार, शांत व सर्वगुण संपन्न होता. परंतु क्षत्रियोचित युद्ध प्रेम, व शस्त्रास्त्र कौशल्य त्याच्या अंगीं नव्हतें.

विक्रमपूरच्या एका मांडलिक राजाला मंजरी नांवाची एक रूपवती कन्या होती. ती त्याची दत्तक पुत्री होती. ती लहान होती तेव्हांपासूनच धीरमती तिच्याबरोबर खेळत असे. पुढें त्या बालप्रेमाला प्रणय रूप मिळालें.

परंतु एकाद्या सामान्य सामंत राजाच्या मुलीशीं लग्न करून मुलानें आपली मान खालीं करविलेली राजाला कशी खपणार? तरी धीरमतीनें बापाला निक्षून सांगितलें कीं मंजरीशीं लग्न होणें शक्य नसेल तर मला लग्न करावयाचें नाहीं.

तें ऐकून राजाला राग आला. तो मंजरीच्या बापाला बोलावून म्हणाला—"तुम्ही मुलीला दूर कोठेंतरी पाठवून द्या. ती पुन्हां डोळ्यासमोर आली तर मी तिला जिवंत जाळून टाकीन."

तो सामंत राजा विचारा घाबरला. त्यानें आपल्या मुलीला एका अंधार कोठडींत बंद करून ठेवलें मुलीजवळ तिच्या सेवेला त्यानें एका म्हातारीला ठेवून दिलें. मंजरी बरेच दिवस दिसली नाहीं तेव्हां धीरमतीनें सामंत राजाजवळ जाऊन तिच्याविषयीं चवकशी केली. तेव्हां तो म्हणाला—"महाराजांनीं तुमची दोघांची कधीं भेट होऊं देतां कामा नये असें मला बजावून सांगितलें आहे."

श्री घा. ना. पडवळ



तें ऐकून धीरमती कांहीं उत्तर दिल्याशिवाय निघून गेला. तो एकांतांत राहूं लागला. त्याच सुमारास विक्रमपूरच्या किल्ल्यावर केशवपूरच्या राजानें स्वारी केली. तेव्हां धीरमतीच्या वडिलांनीं मुलाला रागावून म्हटलें—“तिकडे शत्रूनें किल्ल्याला वेढा दिला आहे आणि तूं एकांतांत रडत बसला आहेस. एका राजपुत्राला हें शोभत नाहीं.”

“माझें लग्न मंजरीशीं होणें शक्य नसेल तर राजधानी शत्रूनें जिंकली काय आणि जाळून टाकली काय मला सारखेंच.” धीरमती म्हणाला.

“तुझ्यासारख्या मूर्खानें एका खालच्या कुळांत जन्मलेल्या मुलीशीं लग्न करण्यापेक्षां शत्रूनें राजधानी जिंकून जाळून टाकलेलीच बरी.” राजा रागाच्या भरांत बोलत गेला. असें सांगून तो जाऊं लागला तेव्हां धीरमतीच्या मनांत एक विचार आला व तो उघड राजाला म्हणाला—“मी एका अटीवर रणांगणावर जायला तयार आहें. युद्ध करून परत आल्यानंतर मला मंजरीशीं फक्त एकदांच भेटण्याची परवानगी मिळाली पाहिजे.” राजानें तें कबूल केलें.

धीरमतीला आनंद झाला. लगेच तो शस्त्रास्त्र धारण करून घोड्यावर बसून युद्धाला निघाला. त्यानें सैन्याची वाट पाहिली नाहीं. सैन्य मागून आलें. शत्रूनें एकटा घोडेस्वार येत असलेला पाहून त्याला अडविलें आणि कैद केलें. त्याला निःशस्त्र करून त्याला आपल्या राजासमोर उभें केलें.

जो धीरमती शत्रूला जिंकून मंजरीची भेट कुठें अन कुठें होईल हें स्वप्न पहात होता, शत्रूच्या हातीं स्वतः कैद झाला.

“हा विक्रमपूरचा युवराज आहे. याचा शिरच्छेद करावा.” अशी राजाची आज्ञा झाली.





तें ऐकून धीरमतीला एकाएकीं अवसान चढलें. त्यानें एका शिपायाच्या कमरेची तलवार उपसून कैद करणाऱ्या शिपायांना ठार करून व स्वतःची सुटका करून घेऊन आपल्या राजधानीकडे भरधांव घोडा सोडला.

अनायास हातीं आलेला शत्रू असा पळून जात असलेला पाहून शत्रू राजाला पण उत्साह चढला व तो घोड्यावर बसून त्याचा पाठलाग करीत निघाला. धीरमतीनें शत्रुराजाला घोड्यावरून खालीं ओढलें आणि त्याची तलवार घेऊन आणि त्याला निःशस्त्र करून कैद केलें आणि ओढीत आपल्या राजधानींत घेऊन गेला. युद्ध संपलें.

“मी आपलें काम पुरें केलें आहे. आतां आपलें वचन पुरें करावें” अशी विनंति धीरमतीनें वडिलांजवळ केली.

“असलीं वचनें पालन करण्याची गरज नसते.” बापानें उत्तर दिलें.

लगेच धीरमतीनें शत्रुराजाला बंधन मुक्त केलें व स्वतःचा घोडा देऊन म्हणाला—“मित्रा! शूर वीर आहेस तूं....! स्वदेशीं जा. समज आपली कधीं भेटच झाली नव्हती. तूं मला कैद केलें नव्हतेंस की मी तुला कैद केलें नव्हतें.”

राजाला मुलाचा हा उर्मटपणा व अशिष्टपणा मुळींच आवडला नाहीं. त्यानें त्याला कैद करून अंधार कोठडींत टाकलें.

ही गोष्ट राजधानीभर पसरली. मंजरीला पण कळली. तिनें राजधानी सोडून जाण्याचें ठरविलें. काळोख्या रात्रीं काळी शाल अंगावर घेऊन ती कोणाला कळविल्याशिवाय नगराबाहेर निघून गेली. ती एका जंगलांत जाऊन एका झाडींत कोणाला दिसणार नाहीं अशा बेतानें पडून राहाली. तिला झोंप लागली. ती उठली तेव्हां तिला



कांहीं धनगरांची मुलें दिसली. तिनें त्यांना विचारलें—"तुम्ही रोज इकडे येतां का? या देशाचे युवराज कधीं शिकारीला या बाजूला आले तर सांगा कीं येथें त्यांना चांगली शिकार मिळेल."

धनगरांनीं होकार दिल्यावर मंजरी खोल जंगलांत निघून गेली. तेथें एक झोंपडी बांधून ती युवराजांची वाट पहात राहूं लागली.

आपली एकुलती एक व ती सुद्धां दत्तक मुलगी नाहींशी झालेली पाहून सामंत राजाच्या हृदयाला धक्काच बसला. तो राजाला म्हणाला—"महाराज! माझी मुलगी कोठें निघून गेली तें त्या देवालाच माहीत. आतां तुम्ही विनाकारण युवराजांना कैदेंत डांबून कां ठेवीत आहां?"

तेव्हां राजानें मुलाला कैदेंतून सुटका दिली. तो घोड्यावर बसून जंगलाकडे निघाला. त्याला तीं धनगराचीं मुलें भेटलीं. त्यांनीं त्याला विचारलें—"देशाचे युवराज आपणच का? या जंगलांत एक स्त्री आहे तिनें आपल्याला एक निरोप सांगायला आम्हांला सांगितला होता. तुम्हाला या जंगलांत चांगली शिकार मिळेल."

मंजरीनेंच तो निरोप सांगितला असावा हें ओळखून धनगरांनीं दाखविलेल्या दिशेनें तो जंगलांत गेला. आणि मंजरीच्या झोंपडींत आला. कित्येक वर्षांनीं त्यांची ही भेट झाली होती. म्हणून दोघांना परमानंद झाला. परंतु तेथें राहणें धोक्याचें होतें. मंजरी म्हणाली—"महाराज आपला शोध काढीत इकडे आले व त्यांना मी आपल्या बरोबर येथें रहात असल्याचें कळलें तर ते मला जिवंत जाळल्याशिवाय राहणार नाहींत."

दुसऱ्या दिवशीं मंजरीला घोड्यावर बसवून धीरमती समुद्रकाठीं निघाला. सुदैवानें त्यांना गजद्वीपाकडे जाणारें एक जहाज दिसलें. दोघे त्यांत बसून गजद्वीपांत गेले. तेथल्या राजाचे अतिथि म्हणून दोघांना कांहीं दिवस आराम मिळाला.

इतक्यांत व्याघ्रद्वीपाच्या राजानें ससैन्य स्वारी करून गजद्वीप लुटलें. त्यांनीं गजद्वीपाच्या राजाचा ख़जिना लुटला आणि राजवाड्यांतल्या स्त्रीपुरुषांना कैद करून घेऊन गेले. मंजरी व धीरमतीपण व्याघ्रद्वीपाच्या हातीं कैद झाले. सेनापतीनें मंजरीला एक खास नजराणा म्हणून व्याघ्रद्वीपाच्या राजासमोर नेऊन उभी केली. राजानें तिला आपल्या खास जहाजांत बसवून घेतलें. व्याघ्रद्वीपाचें सर्व आरमार गजद्वीपाहून व्याघ्रद्वीपाकडे निघालें. वाटेंत मोठें वादळ आलें आणि धीरमतीचें जहाज इतर जहाजांपासून दूर वाहून गेलें. विक्रमपुरनजीकच्या एका खडकावर आदळून तें जहाज फुटलें.

काठावर आल्यानंतर धीरमतीला कळलें कीं त्याच्या वडिलांना देवाज्ञा झाली आहे आणि युवराजांचा शोध चालू आहे. म्हणून तो सरळ राजधानींत गेला आणि तेथें थाटामाटानें त्याचा राज्याभिषेक झाला.



सुदैवानें मंजरीचें जहाज फुटलें व मंजरीपण विक्रमपूरच्या किनाऱ्यालाच येऊन लागली. तिला तो सर्व प्रदेश ओळखीचा भासला. ती व्याघ्रराजाला तसें म्हणाली देखील. व्याघ्रराजानें तिच्या विषयीं जास्त चवकशी केली तेव्हां त्याला कळलें कीं ती दुसरी कोणी नसून त्याची स्वतःचीच मुलगी आहे. पंधरा वर्षांपूर्वी तिला जांचेगिरी करणाऱ्यांनीं पळवून नेलें होतें. त्यांच्या हातून सामंत राजानें तिला वांचविलें होतें व आपली दत्तक पुत्री म्हणून वाढविलें होतें. आपली हरविलेली मुलगी परत मिळाली

म्हणून व्याघ्रराजानें स्वदेशांत गेल्यावर मोठा समारंभ केला. त्यानें खास दरबार बोलावून मुलीकरितां योग्य वर शोधून आणावयास दरबाऱ्यांना सांगितलें.

आईवडिलांची भेट झाली याचा मंजरीला मुळींच आनंद वाटला नाहीं. धीरमतीचा विरह तिला असह्य वाटत होता. म्हणून एके दिवशीं वेष पालटून व पुरुषवेष धारण करून ती राजवाड्याबाहेर पडली आणि व्यापाऱ्यांच्या जहाजांत बसून एका द्वीपावरून दुसऱ्या द्वीपांत जात विक्रमपूरला आली. त्या देशांत आल्यावर तिला कळलें कीं धीरमतीच आतां राजा झाला आहे. राजाची भेट काय वाटेल तें झालें तरी घ्यायची असें मनाशीं ठरवून ती राजवाड्यांत गेली आणि एक प्रेमगीत म्हटलें. तें गीत ऐकून धीरमतीला आनंद झाला. तो धांवत आला आणि विचारूं लागला—"तर मग मंजरीचा विवाह कोणाशीं झाला?"

"मंजरी कोणाशीं विवाह करणार?" पुरुषवेषांत असलेल्या मंजरीनें उत्तर दिलें.

"तरमग ती आपल्या प्रियकराच्या भेटीला कां नाहीं येत? तो तरी आणखी कोणाशीं लग्न करील का?" धीरमती दुःखी होऊन म्हणाला.

"म्हणूनच तर मंजरी आपल्या प्रियकराला भेटण्यासाठीं सप्त समुद्र पार करून आली आहे." असें सांगून मंजरी डोक्याचें पागोटें फेंकून देऊन आपल्या प्रियकराला भेटली.

धीरमतीच्या आनंदाला पारावार नव्हता. दोघांचें लग्न झालें. तिला आपली राणी करून घेऊन धीरमतीनें अनेक वर्षें राज्य केलें.





# कृष्णावतार

कृष्ण वयांत आल्यावर त्याच्या सौंदर्यावर गांवांतल्या तरुण मुली मुग्ध झाल्या. तो पावा वाजवूं लागला कीं त्या देहभान विसरून जात. आई, वडील, पति किंवा इतर नातेवाइकांच्या सांगण्याकडे किंवा रागावण्याकडे दुर्लक्ष करून लोहचुंबकासारख्या त्या बासरीच्या गोड आवाजाकडे आकर्षिल्या जात. त्याच्या बरोबर त्या वनविहार करीत. त्यांच्याबरोबर कृष्ण रासक्रीडा करी. लपंडाव खेळे. तो त्यांच्याच संगतींत नेहमीं राहूं लागला.

एकदां मध्यरात्रीच्या सुमारास गवळणींबरोबर रासनृत्य चालू असतां अरिष्ट नांवाचा एक राक्षस एका सांडाचें रूप घेऊन कृष्णाला मारायला आला. सांड येत असलेला पाहून सर्व गोपिका घाबरून गेल्या आणि कृष्णाच्या मागें येऊन उभ्या राहाल्या. त्यानें सर्वांना समजावून सांगितलें कीं घाबरण्याचें मुळींच कारण नाहीं आणि त्यानें त्या सांडाचीं दोन्हीं शिंगें इतकी घट्ट धरलीं कीं त्याला जागचें हालतां येईना. नंतर त्याची मान पिळवटून कृष्णानें त्याला दूर ढकललें. तो सांड भडभडा ओकला आणि पडल्या जागीं ठार झाला. तेव्हां गोपिकांनीं कृष्णाला चारीबाजूंनीं घेरलें आणि त्याच्या शौर्याची स्तुति करूं लागल्या.

## ९. कंसाचें आव्हान



कृष्ण इकडे आनंदमग्न असतां तिकडे कंसाला चैन पडत नव्हतें. रात्रंदिवस तो कृष्णाला पाण्यांत पाही. भीतीनें व काळजीनें तो अर्धा झाला.

एकदां त्यानें आपल्या दरबारांत उग्रसेन, वसुदेव, सत्यक, अंधक, कंपक, दासक, विभृथ, वपु आणि यदु यांना आणि पंचप्रमुखांना बोलविलें आणि म्हणाला— "तुम्ही सर्व विद्वान आहां. मोठमोठे प्रश्न तुम्ही सोडविले आहेत आणि मला मदत करण्याचें व्रत घेतलें आहे. परंतु मी एका मोठ्या संकटांत पडलों असून सुद्धां तुम्ही चुप्प कां हें नाहीं कळत मला. नंद गवळ्याचा पोर मला ठार करण्याची तयारी करीत आहे. तो नित्य वाढत आहे व त्याचा वाढता पराक्रम पाहून मला भीति वाटत आहे. तो वायुभक्षण करून मोठा झाला आहे व माझ्या राज्यांत विषवृक्षासारखा नित्य वाढत आहे. तो असा कसा काय वाढत आहे हें नाहीं मला समजत ! वाऱ्या-बरोबर मेघ जसे वेगानें भयंकर रूप धारण करतात तसा तो रोज वाढत आहे."

नंतर कंसानें कृष्णाच्या पराक्रमाचें व त्यानें जे निरनिराळे चमत्कार करून दाखविले त्यांचें सविस्तर वर्णन केलें. त्यानें बालपणीं पूतनेचा कसा वध केला, शकटा-सुराचा कसा ध्वंस केला, आईनें उखळीला बांधून ठेवलें असतां त्यानें दोन मोठमोठे वृक्ष कसे उपटून टाकले, कालियामर्दन कसें केलें, धेनुकासुराचा वध कसा केला आणि शेवटीं अरिष्ट राक्षसाला कसें ठार केलें हें वर्णन करून सांगितलें आणि म्हणाला— "लहान मुलांना काय मोठ्यांना देखील जें शक्य नाहीं असें एक काम त्यानें केलें. सात दिवस मुसळधार पाऊस पडत असतां त्यानें एक डोंगरच एकाद्या छत्रीसारखा उचलून



गोकुळ वृंदावनचें रक्षण केलें. हें एकच काम आपले सर्वांचे डोळे उघडायला पुरें आहे."

"हें सर्व सांगून कंस पुढें म्हणाला— "आतां फक्त केशी राक्षसच काय तो उरला आहे. कृष्णाच्या हातीं तो ठार झाला कीं मग माझीच पाळी आहे. ठार करण्याचा त्याला जणुंकांहीं छंदच लागला आहे तो मला का सोडणार आहे. याशिवाय त्याच्या इतकाच बलवान त्याचा मोठा भाऊ बलरामदेखील त्याच्याबरोबर आहे. खरी वस्तुस्थिति नारदानें स्वतः येऊन मला वर्णन करून सांगितली आहे. देवकीला मध्यरात्रीच्या वेळीं एक मुलगा झाला. त्याला वसुदेवानें उचलून नेऊन नंदाच्या बायकोच्या पुढें नेऊन निजवलें आणि तिच्या मुलीला उचलून आणून देवकीजवळ झोंपविलें. ती मुलगीदेखील माझ्या हातांतून निसटली आणि आकाशांत उडून गेली. तीच विन्ध्यवासिनी देवी झाली. वसुदेव माझा मेहुणा असला तरी तो मला फंसवीत आला. मी त्याला किती आदर दिला, पण शेवटीं त्यानेंच माझा गळा कांपला."

नंतर वसुदेवाकडे वळून कंस म्हणाला— "मला तुझा सर्व दुष्टपणा कळला आहे.



तूं माझा वध करवून स्वतः मथुरेचें राज्य बळकावण्याच्या खटपटींत आहेस. पण तुला माहीत नसेल. स्वतः इंद्र जरी आला तरी तो माझ्या केसालाहि धक्का पोंचवूं शकणार नाहीं. एवढी गोष्ट लक्षांत ठेव. तूं एका चक्रवर्तीच्या घरीं जन्मलास. लहानपणापासून तूं माझ्या घरीं वाढलास. माझ्या बहिणीशीं लग्न करून तूं यादवांचा गुरु झालास आणि तूं आमचें मीठ खाऊन शेवटीं असा विश्वासघात केलास. तुला आपल्या पापाचीं फळें चाखावी लागतील. मी तुझा वध करणार नाहीं. बंधु, मित्र व














ब्राह्मण यांचा वध मी केला नाहीं व करणारहि नाहीं. तुला येथून हाकलून लावणें मला शक्य आहे. असलें तरी मी तें करणार नाहीं. तुला जायचें असेल तर जा, राहायचें असेल तर रहा."

नंतर कंस अक्रुराकडे वळून म्हणाला— "मी आपल्या धनुष्याचा उत्सव करण्याचें योजलें आहे. त्या उत्सवाला दूरदूरचे राजे व महाराजे हजर राहणार आहेत. सर्वांना मेजवान्या दिल्या जातील. गोकुळांतून दूध, दही, लोणी, व मध आणावा लागेल. म्हणून तूं गोकुळांत जाऊन या उत्सवाला लागणाऱ्या पदार्थांचा पुरवठा करायला सांग. परत येतांना नंदाला व त्याच्या कुटुंबांतल्या सर्व मंडळींना बोलावून घेऊन ये. मी आपले भाचे कृष्ण व बलराम यांना कधींच भेटलों नाहीं. या निमित्तें भेट होईल. ते बलवान व पराक्रमी आहेत असें मी ऐकतों. मी त्यांना फक्त भेटण्यासाठींच प्रेमानें बोलवीत आहें असें त्यांच्या मनांत विश्वास बसेल अशातऱ्हेनें सांग. माझ्या-कडे मोठमोठे पहेलवान आहेत. त्यांच्याशीं त्यांची कुस्ती करवून कोण जास्त बलवान आहे हें मी पाहीन. तूं त्यांना घेऊन आलास तर माझ्यावर तुझे फार फार उपकार होतील. वसुदेव तुला कांहीं म्हणेल पण त्याच्याकडे दुर्लक्ष कर. नीघ, ताबडतोब जा."

कंसाच्या घरांत कृष्णाला अवतार पुरुष समजणारे पण होते. अक्रूर त्यांपैकींच एक होता. सहजीं कृष्णाचें दर्शन घडणार या आनंदांत तो कंसाचा निरोप घेऊन रथांत बसून वृंदावनला निघाला.

वसुदेवाविषयीं खुल्या दरबारांत कंसानें असें बोलावें हें पुष्कळांना आवडलें नाहीं. त्यांच्या पैकीं अंधक नांवाचा एक वृद्ध यादव होता. तो निर्भयपणें समोर उभा राहून म्हणाला—

"तूं जें कांहीं बोललास तें राजाला शोभेसें नाहीं. अविचारानें तूं एका सन्माननीय व्यक्तीविषयीं तोंडाला आलें तें बरळलास. तूं तसें बोलून आपल्या आई-वडिलांच्या नांवाला व वंशाला कलंक लावला आहेस. वसुदेव आपल्या मुलाला तुझ्या डोळ्यांत धूळ फेंकून लपवून आला आहे हा तूं आपला गैरसमज करून घेतला आहेस. आपल्या अपत्याच्या रक्षणासाठीं आईबाप कष्ट सहन करीत नाहीत का? तुझ्या आईबापांनीं कष्ट सहन केल्याशिवायच का तूं लहानाचा मोठा झालास? तुझें हें वागणें व बोलणें आम्हांला मुळींच आवडलें नाहीं. तुला सोडून इतके दिवस आम्ही गेलों नाहीं ही आमची चूक झाली. आमच्यांत हा अक्रूरच किती भाग्यशाली निघाला? कृष्णाला भेटून जेव्हां अक्रूर येईल तेव्हां त्याला पाहून आमच्या डोळ्याचें पारणें फिटेल. कृष्ण इकडे आला तर तुझा वध निश्चितच समज. म्हणून तूं स्वतः गुण्या गोविंदानें गोकुळांत जा, कृष्णाला भेट आणि त्याच्याशीं सख्य करून स्वतःचें हित साधून घे!"



अंधकनें केलेली कान उघाडणी ऐकून व तो सदुपदेश ऐकून कंसाला मनस्वी राग आला आणि तो तावातावानें दरबारांतून उठून निघून गेला. त्यानंतर इतर लोक पण उठून निघून गेले

अक्रूर अद्याप गोकुळांत पोंचला देखील नव्हता. तेवढ्यांत कंसानें केशी नांवाच्या राक्षसाला वृंदावनला पाठविलें. तो घोड्याचें रूप घेऊन वृंदावनला आला. रानांत गुरें चरत होतीं व गुराखी खेळत होते. तो त्यांना चावायला धांवला व लाथा झाडून मारूं लागला. त्या भयंकर घोड्याला पाहून



गोकुळवासी घाबरून गेले. तो घोडा गाईंचे लचके तोडूं लागला. कित्येक गुरांना खाऊन तो गोकुळांत शिरला. त्याला दुरून येत असलेला पाहून गवळी कृष्णाकडे धांवले. कृष्णानें त्यांना धीर देऊन केशीकडे वळून आरोळी दिली.

कृष्णानें त्याला अशातऱ्हेनें आव्हान केलेलें पाहून तो घोडा चवताळून कृष्णाला मारायला धांवला. कृष्णाच्या हातांत काठी किंवा इतर कांहीं शस्त्र नाहीं हें पाहून त्याला जास्तच चेव चढला. तो आपले भयंकर दांत बाहेर काढून 'हीं हीं हीं' करीत कृष्णाच्या अंगावर धांवला. मागच्या पायांवर उभा राहून तो कृष्णावर हल्ला करणार तेवढ्यांत कृष्ण निसटून बाजूला सरकला आणि त्याच्या जबड्यांत आपला डावा हात घालून उजव्या हातानें त्यानें त्याची जीभ ओढून बाहेर काढली. तेव्हां घोड्याचें डोकें ठिकाणावर आल्यासारखें झालें व तो सरळ उभा राहाला. कृष्णानें दोन बुक्के मारून त्याची मान पिळवटली आणि त्याची जीभ मधोमध चिंधीसारखी फाडून टाकली. नंतर त्यानें त्याचे सर्व दांत पाडले व त्याला जमिनीवर आपटलें. अशातऱ्हेनें केशीचा वध झाला.

गोकुळच्या रहिवासियांच्या जिवांत जीव आला. सर्वांनीं मिळून कृष्णाचें अभिनंदन केलें. गवळिणी धांवत आल्या आणि फुलांचे हार कृष्णाच्या गळ्यांत घालून त्याचा सत्कार केला.

तेव्हां नारद अदृश्य रूपें आकाशांतून आपलें नांव सांगून म्हणाला—"मी कळीचा नारद आहें. तुमचें भांडण लावून गंमत पहायला देवलोकांतून आलों आहें. तूं आज जो पराक्रम दाखविला आहेस तो

एकट्या इंद्राला किंवा शंकरालाच शक्य झाला असता. त्या केशीला ठार करणें कदाचित इंद्राला देखील साध्य झालें नसतें. पण तें तूं प्रत्यक्ष करून दाखविलें आहेस. तूं केशीचा वध केला आहेस, म्हणून आजपासून लोक तुला केशव या नांवानें ओळखतील. असें सांगून नारद निघून गेला.

मध्यंतरी अक्रूर रथांत बसून सरळ वृंदावनला आला. रथाला सुंदर घोडे जुंपलेले होते. तो सूर्यास्ताचा सुमार असेल. काळोख पडूं लागला होता, आणि अंधःकाराला फाडून जणुंकांहीं चंद्राची कोर वर येऊं लागली होती. गोकुळांत सर्वत्र आनंदी आनंद होता. जिकडे पहावें तिकडे गाई. गवळी त्यांना त्यांच्या त्यांच्या नांवानें हाक मारीत होते. धार काढण्याचा आवाज ऐकूं येऊं लागला. अक्रूरानें रथांतूनच दुरून कृष्ण व बलराम यांना आनंदानें पाहिलें. तो कृष्णाजवळ आला आणि आपलें नांव व गोत्र सांगून त्यानें कृष्णाच्या पायांवर डोकें ठेवलें. कृष्ण प्रेमानें त्याला भेटला आणि कुशल प्रश्न करून त्याला बलरामासह आपल्या घरीं घेऊन गेला.

अक्रुरानें कळविल्याप्रमाणें नंद व इतर गवळी त्याला भेटायला आले. त्यांना अक्रूर म्हणाला—"कंसानें आपल्या धनुष्याचा उत्सव थाटामाटानें करण्याचें योजलें आहे. म्हणून तुम्ही सर्वांनीं आपापला कर नेऊन द्यावा. मेजवानीसाठीं लागणारें दूध, दही व लोणी पाठवा. कंसाची आणखी एक इच्छा आहे. या उत्सवाला कृष्ण बलरामांनीं पण यावें. तुम्ही सर्व निघा. मी या दोघांना रथांत बसवून पाठीमागून येतों."





# अरण्यपुराण

[१२]

मौवलीनें आपल्या मित्रमंडळींकडे पाहून प्रसंग भयंकर आणीबाणीचा आहे हें ओळखलें. नंतर त्यानें आपल्या 'भावंडां'कडे पाहून विचारलें—"काय करावें हें मलादेखील सुचत नाहीं. माझ्या डोळ्यांशीं डोळे भिडवून पहा आणि बोला—"आपल्या पांच जणांत सरदार कोण?"

"तूंच धाकट्या!" असें म्हणत 'मोठा भाऊ' मौवलीच्या पायांना चिकटून ते लाडानें चाटूं लागला.

"तर मग चला, माझ्या बरोबर!" मौवली असें सांगून निघाला. काळा वाघ पण त्यांच्याबरोबर निघाला. अस्वल कांहींच बोललें नाहीं. तें काळजींत पडल्यासारखें दिसलें.

मौवली चुप्प होता. ज्या वाटेनें बलदेव येत होता त्याच वाटेनें तो कांहीं वेळ चालत राहाला. बलदेव खांद्यावर बंदूक ठेवून पळत येत होता.

मौवली आपल्या गांवांतून निघाला तेव्हां त्याच्या पाठीवर वाघाचें कातडें होतें. एकू व त्याचा 'मोठा भाऊ' दोघे त्याच्या पाठीमागून येत होते. तिघांच्या पावलांच्या खुणा स्पष्टपणें दिसत होत्या. परंतु ज्या जागीं पावलांच्या खुणा बुजवून ते पसार झाले होते, त्या जागीं आल्यावर त्याला पुढली वाट कळेना. तो वाट दिसते का पाहूं लागला. तेथून जवळच बारा डोळे त्याच्या हालचालीवर नजर ठेवून दबा धरून बसले होते.

शेवटचें मलपृष्ठ



मौवली व त्याच्या 'भावांनीं' बलदेव विषयीं आपसांत बरीच चर्चा केली. परंतु त्यांचा आवाज मनुष्याला कसा ऐकूं येणार?

बलदेव खालीं वांकून पहात स्वतःशींच कांहीं तरी पुटपुटत होता.

"काय बडबडतो आहे रे तो?" मोठ्या भावानें विचारलें.

"लांडगे त्याच्या चारी बाजूला उड्या मारीत आहेत असें त्याला भासत आहे. कारण अशीं पावलांचीं चिन्हें त्यानें पूर्वीं कधीं पाहालीं नव्हतीं. म्हणून त्याला फार राग आला आहे." मौवली म्हणाला.

"वाट हुडकून मिळण्यापूर्वींच त्याचा राग कायमचा नाहींसा होईल रे! बरें, हा करतो काय रे?" काळ्या वाघानें विचारलें.

"काय करतो! उद्योग काय दुसरा? पोटभर खायचें आणि चिलमीचा धूर सोडीत पडून रहायचें. क्षणभर तोंडाला विश्रांती असेल तर शपथ!" मौवली म्हणाला.

इतक्यांत रानांत कोळसा तयार करणारे मजूर बलदेवजवळ येऊन गप्पा करायला बसले. जवळपासच्या पंचक्रोशींत शूर बंदूकवाला म्हणून बलदेवची ख्याती होती. सर्व मिळून तंबाकू ओढीत बसले असतां बलदेवनें तिखटमीठ लावून मौवलीविषयीं खऱ्या खोट्या गप्पा सांगायला सुरवात केली. हें सर्व कळावें असें काळ्या वाघाला व इतरांना अर्थातच वाटलें. बलदेव सांगत होता—"त्या वाघाला मीच मारलें. तेव्हां मौवली एक लांडग्याचें रूप घेऊन माझ्याशीं भांडला. नंतर तो मनुष्य झाला आणि त्यानें माझ्या बंदुकीवर मंत्र टाकला. म्हणून मी बंदुकीनें गोळी झाडली ती त्याला न लागतां माझ्याच रेडकाला लागली. माझ्यासारखा दुसरा कोणी शूर गांवांत नाहीं, म्हणून गांवकऱ्यांनीं त्या दुष्टाला ठार करण्याची



जबाबदारी माझ्यावरच टाकली आहे. पण गांववाल्यांच्या मनाचें तेवढ्यावर समाधान झालें नाहीं. गांवकऱ्यांनीं मौवलीच्या आई-बापांना म्हणजे मेस्सुवा आणि तिचा नवरा दोघांना त्यांच्याच घरांत कैद करून ठेवलें आहे. त्यांनीं त्यांच्यावर मारहाण करून त्यांच्या तोंडून सर्व 'खरें' वदवून घेतलें आहे कीं त्यांना दोघांना त्यांच्या मुलासारखाच मंत्र वगैरे येतो. नंतर त्या दोघांना जाळून टाकायचें ठरविलें आहे.

"केव्हां जाळणार आहेत त्यांना?" ती गंमत पहायला मिळेल या हेतूनें कोळसे-वाल्या मजुरांनीं विचारलें.

"पहिल्यानें त्यांच्या त्या पोराला ठार केलें पाहिजे. मी परत जाईपर्यंत कोणी त्यांना जाळणार नाहीं." बलदेव म्हणाला. तो असें देखील म्हणाला कीं त्यांना जाळून टाकल्यानंतर त्यांची जमीन गांवकरी वांटून घेणार आहेत.

"पण हें जर इंग्रज अधिकाऱ्यांना कळलें तर सर्व गांवावरच संकट ओढवेल त्याची काय वाट? त्या इंग्रजांना काडीची अकल नाहीं. कारण त्यांना असें जाळून टाकलें तर इंग्रज स्वस्थ बसतील असें वाटलें का?" कोळसेवाल्यांनीं शंका केली.



"अरे, त्यांत काय घेऊन बसला आहेस? गांवचा पाटील रिपोर्ट लिहून टाकील कीं मेस्सुवा व तिचा नवरा सांप चावून मेले. ह्या सर्वांची व्यवस्था करून ठेवली आहे. उरलेलें काम आहे तें या रानटी पोराचा कांटा दूर करण्याचें. तो कारटा दिसला का तुम्हांला कोठें?" बलदेवनें विचारलें.

कोळसेवाले घाबरल्यासारखे चहूंकडे पाहूं लागले. म्हणाले—"देवाची शपथ, आम्ही नाहीं पाहिलें त्याला. परंतु दादा, अहो तुमच्यासारख्या शूरांची नजर चुकवून कोठें पळणार ती स्वारी? काळोख पडूं












लागला आहे. आम्ही गांवांत जाऊन त्या मंत्र टाकणाऱ्या नवराबायकोला पाहतों." ते म्हणाले.

"त्या रानटी कारट्याला ठार करण्याची कामगिरी मला बजावली पाहिजे. परंतु तुमच्या सारख्या निःशस्त्र लोकांपैकीं कोणी जंगलांत जाणें धोक्याचें आहे. तो लांडगा भूत होऊन केव्हां समोर उभा राहील कोणास ठाऊक? म्हणून मी येतों तुमच्या बरोबर तो रानटी कारटा दिसला कीं पहा, त्याची शिकार कशी करतो ती. माझ्यावर संकट येऊं नये म्हणून गांवच्या भटानें ताईत बांधून ठेवला आहे पहा." बलदेव म्हणाला.

"काय म्हणतो आहे रे, तो काय म्हणतो आहे?" लांडगे मौवलीला विचारीत होते. मौवली त्याला जेवढें ऐकूं येई व कळे तेवढें सांगत गेला. त्या दुष्टानें जें कांहीं सांगितलें तें सर्व त्याला कळलें नाहीं. एवढेंच कळलें कीं त्याला ज्या आईबापांनीं जन्म देऊन वाढवलें होतें त्यांना गांवकऱ्यांनीं तुरुंगांत टाकलें होतें.

"मनुष्यांनीं मनुष्यांना पिंजऱ्यांत टाकलें आहे म्हणतोस?" काळ्या वाघानें विचारलें.

"काय कोणास ठाऊक? त्यांचें सर्व बोलणें मला कळेल तर ना. मेस्सुवा व तिचा नवरा दोघांचा माझ्याशीं असा काय संबंध आहे कीं त्यांना पिंजऱ्यांत डांबून ठेवलें आहे त्यांनीं? लाल फुलाचें (आगीचें) बोलणें कां निघालें. कांहीं असो, बलदेव परत पोंचेपर्यंत त्यांच्या जिवाला अपाय नाहीं." म्हणत मौवली आपला सुरा मुठींत आवळून कांहीं तरी विचारांत मग्न झाला.

[ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]





# ६६. व्हेनीसचे जलमार्ग

व्हेनीस (इटली) या नगरांत रस्त्यांच्या ऐवजीं जलमार्गच आहेत. या कालव्यांत "गोंडोला" नांवाच्या होडक्यांत बसून पर्यटन करणारे लोक व्हेनीसच्या गमती पाहतात. कालव्यांवर पूल आहेत. चित्रांत "दुःखाचा पूल" दिसत आहे. जग प्रसिद्ध प्रवासी मार्कोपोलो येथलाच राहणारा.





# भारताचा इतिहास



इंग्रजांच्या आरमारानें फ्रेंचाचें आरमार धरलें. म्हणून ड्युप्लेनें मॉरिशस बेटांतून आठ युद्धनौका मागविल्या. इंग्रजांनीं या युद्ध नौकांशीं, कां कोणास ठाऊक, युद्ध केलें नाहीं. त्यांनीं मद्रासपर्यंतचा प्रदेश फ्रेंच लोकांच्या हातांत सोडला व बंगालमध्यें हुगलीकडे निघून गेले. फ्रेंचांनीं मद्रास शहराला समुद्राकडून व जमिनीकडून वेढा दिला. एका आठवड्याच्या आंत मद्रासनें आपला पराभव मान्य केला. या वेढ्यांत फक्त सहा जणच मृत्युमुखीं पडले.

पण तेवढ्यानें युद्धाचा शेवट झाला नाहीं. नुकताच नेमला गेलेला कर्नाटकचा गव्हर्नर अन्वरुद्दीन यानें फ्रेंचांविरुद्ध मोठें सैन्य पाठविलें. तोपर्यंत फ्रेंचांनीं आपलें बस्तान छान बसवलें होतें. त्यांनीं नबाबाच्या सैन्याचा संपूर्ण बिमोड केला.

नबाबाचें सैन्य परत जात असतां सँट होमनजीक तिकडून येणाऱ्या फ्रेंच सैन्यानें त्यांचा पुन्हां पराभव केला. या पराभवाचा परिणाम शेवटीं काय झाला हें पुढें कळेल.

इतक्यांत एक मोठें भयंकर वादळ आलें. युद्ध नौकांचें नुकसान झालें. मद्रास सोडून त्यांना जावें लागलें. ड्युप्लेनें सारें मद्रास शहर दिवसांढवळ्या लुटलें. फ्रेंचांनीं आपलें आरमार काढून घेतांच मद्रासचा किनारा पुन्हां इंग्रजांच्या हातीं आला. ड्युप्लेनें अठरा महिने फोर्ट सेंट डेव्हिड किल्ल्याला वेढा दिला होता. परंतु तो किल्ला त्याच्या हातीं आला नाहीं. १७४८ च्या जून महिन्यांत इंग्लंडहून एक मोठें आरमार आलें आणि त्या आरमारानें पांडिचेरीला चारहि बाजूंनीं वेढा दिला. पण फ्रेंच टिकाव धरून राहाले. इतक्यांत युरोप खंडांत युद्ध समाप्त झालें. इंग्लंड व फ्रान्स यांचा परस्परांशीं तह झाला आणि फ्रेंचांनीं मद्रास शहर पुन्हां इंग्रजांना परत दिलें.

या युद्धापासून ड्युप्लेनें एक नवा धडा शिकून घेतला. दोन एतद्देशीय संस्थानिकांत आपसांत वितुष्ट असेल तेव्हां दोघांपैकीं एकाला सर्व प्रकारें मदत करणें, हा तो धडा होय.

अन्वरुद्दीन याचें एवढें मोठें सैन्य होतें व त्या मानानें पाश्चिमात्यांचें सैन्य लहान असूनहि नबाबाचा पराभव झाला. यावरून इतकें स्पष्ट झालें होतें कीं संख्याबळापेक्षां सैन्यसंचालन व आधुनिक शस्त्रास्त्रांचा उपयोग यांचाच जास्त परिणामकारक उपयोग झाला होता. आशिया खंडाचे निवासी या दोन्ही दृष्टींनीं मागासलेले होते. एतद्देशीय लहानथोर संस्थातिकांना सैनिक साहाय्य देऊन त्यांना आपल्या बाजूला वळवून व संगठित करून ड्युप्ले इंग्रजांना खालीं दाखविण्याच्या प्रयत्नांत होता.



नशिबानें पण ड्युप्लेची बाजू संभाळली होती. त्यावेळीं दक्कन व कर्नाटक या दक्षिणेंतील राज्यांत गादी बळकावण्यासाठीं त्या राज्यांतील प्रमुखांची आपसांत चढा-ओढ चालू होती. कर्नाटकचा नवाब होण्याची महत्वाकांक्षा चंदासाहेब याच्या मनांत होती. त्याचप्रमाणें मुजफ्फरजंग याची नजर निजामाच्या गादीवर होती. ड्युप्लेनें या दोघांशीं मैत्री करून त्यांच्याशीं राजकीय संबंध स्थापित केले. (आसफ जाह निजामुलमुल्क यानें १७४८ मध्यें दक्कनच्या राज्याची स्थापना केली. त्याच्यानंतर त्याचा मुलगा नासिरजंग नवाब झाला. परंतु आसफजाह याचा नातू मुजफ्फरजंग याला मोंगल बादशाहानें दक्कनचा सुबेदार नेमलें.

३ ऑगस्ट १७४९ या रोजीं आंबूर-नजीक कर्नाटकच्या गादीसाठीं युद्ध झालें. या युद्धांत अन्वरुद्दीन ठार झाला. त्याचा मुलगा महंमद अली त्रिचनापल्लीला गेला. त्रिचनापल्लीला वेढा देण्याच्या हेतूनें फ्रेंच-सैन्याची एक तुकडी गेली.

डुप्लेच्या डावपेंचासमोर इंग्रजांची डाळ शिजेना. त्यांनीं महंमदअलीला मदत देण्या-साठीं सैन्य पाठविलें. परंतु डुप्लेच्या मदतीनें मुजफ्फर जंग यानें त्रिचनापल्लीशहर जिंकलें. त्यानें कृष्णेच्या दक्षिण भागाचा गव्हर्नर म्हणून डुप्लेची नेमणूक केली. त्यानें पांडी-चेरीच्या जवळपासचा व ओरिसा प्रांतांतील कांहीं भाग डुप्लेला दिला. व्यापाराचें सुप्रसिद्ध केन्द्र मच्छलीपट्टण पण डुप्लेच्या हातीं आलें. आपल्या अधिकाऱ्यांपैकीं एक प्रमुख अधिकारी बुसी याला कांहीं फ्रेंच सैन्याबरोबर त्यानें मुजफ्फरजंग याच्याकडे पाठविलें. अशा तऱ्हेनें निजामाच्या दरबारांत देखील फ्रेंचांचा प्रभाव वाढूं लागला. त्यांचा वचक चहूंकडे भासूं लागला.

डुप्लेला मिळालेल्या यशाबद्दल त्याच्या मित्रांइतकें त्याच्या शत्रूला पण आश्चर्य वाटलें. त्रिचनापल्लीला लपून बसलेल्या महंमद अलीशीं जर कांहीं समेट घडवून आणणें त्याला शक्य झालें तर त्याचा हा दिग्विजय चिरस्थायी होणार होता. डुप्लेनें जें सैन्य त्रिचनापल्लीला वेढा देण्यासाठीं पाठविलें होतें त्या सैन्याची शक्ति तंजोर जिंकण्याच्या खटपटींतच खर्चीं पडली. म्हणून डुप्लेनें मुत्सद्देगिरीचा सहारा घेतला. परंतु इंग्रज महंमद अलीच्या मदतीला धांवले आणि त्यांनीं महंमद अलीला डुप्लेच्या जाळ्यांत पडूं दिलें नाहीं.



# नेहरू चरित्र

[२६]



१९४७ च्या उन्हाळ्यांत देशांत विस्फोटक अशा घटना घडल्या. रक्ताचे ओहोळ वाहाले. स्त्रियांचा मानभंग झाला. शिशुहत्या झाल्या, अराजकतेचें तांडवनृत्य देशभर चालू झालें.

मुख्य पक्षांच्या प्रमुखांनीं पाकिस्तान निर्मितीचा सिद्धांत स्वीकारल्यावर जून महिन्याच्या तिसऱ्या तारखेला लॉर्ड मॉउंट बॅटेन यांनीं देशाची विभागणी जाहीर केली. दोन्ही देशांची सीमा निश्चित करण्यासाठीं रेड क्लिफ कमीशनची नेमणूक झाली. १९ ऑगस्ट १९४७ या रोजीं देशभर स्वातंत्र्य-दिन साजरा करण्याचें जाहीर झालें.

भारत व पाकिस्तान आपापले स्वातंत्र्य-दिन साजरे करीत असतां पाकिस्तानांतून लक्षावधी हिंदू व शीख आणि हिंदुस्तानांतून लक्षावधी मुसलमान आपापलीं घरें दारें, जमीन जुमला एकूण सर्वस्वावर पाणी सोडून शरणार्थी म्हणून दोन्ही देशांत आले. भारतांत आलेल्या शरणार्थ्यांची जबाबदारी जवाहरलालजींवर येऊन पडली. देशाच्या स्वातंत्र्याचा आनंद कोणाला मिळाला नाहीं. अनेक तऱ्हेच्या जबाबदाऱ्या शिरावर येऊन पडल्या. पाकिस्तानची स्थापना झाल्यानें धार्मिक प्रश्न सुटण्याऐवजीं जास्त गुंता-गुंतीचा झाला. त्याचबरोबर काश्मीरचा प्रश्न समोर 'आ' वासून उभा राहिला.

स्वातंत्र्य मिळाल्याबरोबर पाकिस्ताननें काश्मीरवर पठाण लोकांच्या टोळ्या पाठवून स्वारी केली. जें काश्मीर पृथ्वीवरचा स्वर्ग समजला जात असे त्याला नरकाचें रूप आलें. या पठाणांजवळ पाकिस्तानानें पुर-

आकर्षण, ५ सेप्टेंबर या रोजीं कलकत्ता कॉंग्रेसच्या अधिवेशनांत एक प्रतिनिधि म्हणून भाग घेतला.

६ डिसेंबर १९२१, सर्वांत प्रथम अटक व कैदेची शिक्षा.

३ मार्च १९२२, तुरुंगांतून सुटका. ११ मे या रोजीं पुन्हां अटक, ऑगस्ट महिन्यांत सुटका व पुन्हां अटक.

१९२६ च्या मार्च महिन्यांत पत्नी व कन्या दोघांसह परदेश गमन. त्याच वेळीं सोव्हिएट रशियाचें पर्यटन.

१९२७ सालीं परत भारतांत आगमन. मद्रास येथें कॉंग्रेसचें अधिवेशन. कॉंग्रेसला पूर्ण स्वातंत्र्याच्या ध्येयाकडे वळविण्याचा यत्न.

१९२९ सालीं डिसेंबर महिन्यांत लाहोर येथें झालेल्या कॉंग्रेस अधिवेशाचें अध्यक्षपद.

१९३० मिठाचा सत्याग्रह व अटक.

१९३१ मोतीलाल नेहरूंचा स्वर्गवास. २६ डिसेंबरला जवाहरलालजींना सुटका.

२८ फेब्रुवारी १९३६ सौ. कमला नेहरू यांचा स्वर्गवास. निवडणुकींत भाग घेण्याचा कॉंग्रेसचा निश्चय. जवाहरलालजींचें कॉंग्रेस तर्फे देशभ्रमण. अधिक प्रांतांत कॉंग्रेसला यश.

१९३८ मध्यें माता स्वरूपराणी यांचा स्वर्गवास.

१९३९ मध्यें जागतिक युद्धास प्रारंभ. मित्रराष्ट्रांना भारताच्या मदतीची गरज असेल तर भारताला स्वातंत्र्य द्यावें अशी मागणी.

१९४८ "भारत छोडो" चळवळ. कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांस अटक.

१९४५ ब्रिटन व भारत देश दोघां-मध्यें बोलणीं व समेट.

१९४७ देशाची फाळणी आणि भारताला स्वातंत्र्यप्राप्ती.





# पाताळ कोट

[ १४ ]

[ विरुपानें गरुडाकरवीं त्या वनमाणसाला खालीं पाडवला. नंतर सर्व होल्यांत बसून गिड्ढा राक्षसाकडे निघाले. तेथें पोंचल्यावर त्याच्याबरोबर जी स्त्री होती ती पुलिंदची बायको नाहीं हें कळलें. राक्षस त्यांना त्या पडक्या देवळांत घेऊन गेला. तेथें त्यानें एका खड्ड्यांत त्यांना साप व मगरी दाखविल्या—पुढें. ]

धूमक कांहीं वेळ खड्ड्यांतल्या मगरी व सांपांकडे लक्षपूर्वक पहात राहिला. त्याला एका गोष्टीची शंका वाटली. पडक्या देवळानजीकच्या झाडांवर बसलेल्या माकडां अस्वलांसारखे ह्या मगरी व अस्वलें देखील कालकलीचे नोकर तर नसतील? एवढेंच नव्हें तर गिड्ढ्या राक्षसानें सांगितल्याप्रमाणें पाताळकोटापर्यंत जाण्यासाठीं ही एकच एक वाट कशी असूं शकेल? तो लबाड आम्हांला फसवीत आहे.

धूमक असा विचार करून व मनाचा कांहीं तरी निश्चय करून गिड्ढ्या राक्षसाकडे वळून म्हणाला—"पाताळ कोटापर्यंत जायला वाट हीच आहे म्हणतोस? म्हणजे या मगरी व सांपांच्या मधून वाट काढून गेलें पाहिजे, होय का नाहीं? तुला वाट नक्की माहीत



आहे व तूं पुष्कळदां त्या वाटेनें आला गेला आहेस या गोष्टीची पण आमची खात्री झाली आहे. म्हणून तूं पुढें चल आणि आम्ही तुझ्या पाठोपाठ येतों." असें सांगून धूमकनें आपल्या भाल्याचें टोंक राक्षसाच्या पाठीवर रोखून ठेवलें आणि सोमकनें त्याच्यावर नेम धरून धनुष्यावर बाण ठेवला.

गिड्डा राक्षस घाबरून जाऊन दोघांकडे पहात म्हणाला—"याचा अर्थ असा कीं तुम्ही दिलेलें वचन मोडीत आहां. माझ्याशीं तुमचें कांहीं वैर नाहीं असें तुम्हीच म्हणालां होतां नाहीं का? आणि आतां भाल्या बाणांनीं मला ठार करण्याचा विचार दिसतो आहे तुमचा दोघांचा?"

"माझ्या धन्याला मारूं नका. याचा जन्म राक्षसजातींत झाला असला तरी याच्या सारखा इमानदार आपल्या मनुष्य-जातींत देखील मिळणें अशक्य." असें म्हणत त्याची रानटी बायको धूमक व सोमक यांचे पाय धरून त्याला सोडून देण्यास विनंती करूं लागली.

तुझ्या नवऱ्याचा चांगुलपणा हाच का? आम्ही त्याला पातळकोटाची वाट विचारली आणि त्यानें आम्हांला या सांपां मगरींच्या मधून जाण्यास सांगितलें. म्हणून आम्ही याला पहिल्यानें खालीं उतरायला सांगून वाट दाखवायला सांगत आहों. लबाडीचें उत्तर लबाडी आहे." धूमकनें भाल्याचें टोंक गिड्ड्याच्या मानेवर ठेवीत उत्तर दिलें.

गिड्डा राक्षस ओरडत म्हणाला—"हा भाला सुईपेक्षां जास्त अणकुचीदार आहे हो. दाबूं नका. तुमच्याच जातींतली एक बाई तुम्हांला सांगत असून तिच्या बोलण्यावर देखील तुमचा विश्वास कसा काय बसत नाहीं? मी दुष्ट व लबाड असतों तर मी देखील त्या महाकली राक्षसाबरोबर राहालों असतों आणि तुमच्या सारख्यांना आनंदानें खात राहालों असतों. तुम्हांला पातळ कोटाची वाटच ना हवी आहे? मी तुम्हांला नव्हतें का सांगितलें कीं तुमच्या पैकीं एक जण देखील जिवंत परत येणें शक्य नाहीं. तरी तुम्ही जाण्याचा हट्ट धरला आहां. आपलें आपलें नशीब. आणखी मी काय सांगूं?" असें म्हणत त्यानें खड्ड्यांत लोंबत असलेला एक वेल धरून वर ओढला.

"महाकली राक्षसाच्या अगदीं विश्वास-पात्र अशा निवडक लोकांनाच ही वाट माहीत आहे. ह्या वेलाच्या सहाय्यानें खड्ड्यांत उतरलें पाहिजे आणि तो जो वर निघालेला दगड दिसतो आहे तेथपर्यंत जा. तो दगड जोरानें दाबलांत कीं तुम्हांला एक फरशीसारखा मोठा दगड दिसेल. त्या दगडावर तुम्ही खुशाल उतरा. ती फरशी संपते तेथून एक भुयार सुरू होतें. त्या भुयारांतून तुम्ही पुढें गेलांत तर तुम्हांला त्या राक्षसाचें दंडकारण्य नांवाचें राज्य दिसेल. तेथें गेल्यावर पाताळकोट मिळणें तितकेंसें कठीण नाहीं. तुमच्यापैकीं कोण उतरणार सर्वांत आधीं?"



धूमकला संशय आला कीं यांत कांहीं तरी लबाडी दिसते आहे. कारण त्याच्या म्हणण्याप्रमाणें आंत गेल्यावर दंडकारण्यच मिळेल हें कशावरून? नंतर वेल धरून उतरत असतां वेल मध्येंच तुटणार नाहीं कशावरून? तसें झालें तर बिचाऱ्या उतरणाऱ्याला खड्ड्यांतल्या मगरी सांपांच्या तोंडीं खास मोक्ष मिळणार.

धूमक राक्षसाच्या हातांतला तो वेल पाहून पुढें कांहीं बोलणार इतक्यांत पुलिंद ओरडला—"धूमक दादा! ह्या राक्षसाचा काय विश्वास करतां? हा एक नंबरचा लुचा










व लबाड दिसतो आहे. त्याच्या त्या बायकोला नीट लक्षपूर्वक पाहिलें तर मला माझ्या दहाव्या बायकोसारखेंच नाकडोळे वाटले. त्यानें कांहीं तरी मंत्रबित्र तर टाकला नसेल?"

धूमकला पुलिंदनें पदोपदीं आपल्या बायकोची गोष्ट काढलेली आवडली नाहीं. कारण त्यांच्या समोर त्या वेळीं जीवन मरणाचा प्रश्न होता आणि पुलिंदाला त्याच्या बायकोशिवाय दुसरें कांहीं सुचत नव्हतें.

धूमक पुलिंदाला समजाऊन सांगण्याच्या स्वरांत म्हणाला—"पुलिंद, तूं आतांपर्यंत आम्हांला जी मदत केली आहेस त्याबद्दल आम्ही तुझे फार फार आभारी आहों. आम्हांला वाटतें कीं तुला आपल्या घरीं परत जायचें असेल तर खुशाल जा. बरोबर आपली होडकी नेलीस तरी चालेल. तुझी बायको महाकली राक्षसाच्या पाताळ कोटांत कैदेंत आहे यांत मला मुळींच शंका नाहीं. राजकन्येबरोबर आम्ही तिला पण सोडवून आणूं. आम्ही तुला वचन देतों."

धूमक एवढें म्हणाल्यावर पुलिंदाला परमानंद झाला. म्हणाला—"धूमक दादा! काय पण बोलतांत! जी गेली ती गेली. आहेत त्या नऊ बायकांच्या संरक्षणाची व्यवस्था करायला हवी. बरें तर मी येतों. माझ्या मदतीची जरूर कधीं भासली तर निरोप पाठवा. पाताळकोटांत पोंचल्यावर माझ्या बायकोची गोष्ट मात्र विसरूं नका." असें सांगून तो नदी तीराकडे निघाला. धूमकला डोक्यावरचें एक मोठें ओझें टळल्यासारखें झाल्यासें वाटलें.

गिड्डा राक्षस वेलाच्या आधारें खड्ड्यांत उतरला आणि बाहेर निघालेल्या शिळेवर त्यानें जोरानें लाथ मारली. त्याबरोबर फरशीसारखी एक मोठी शिळा दिसली. तो तिच्यावर उभा राहला आणि धूमकला म्हणाला—"पाहिलेंत इतक्या उंचावर खड्ड्यांतले सांप व मगरी चढून येऊं शकतील का? खुशाल वेल धरून खालीं उतरून या." तोंपर्यंत धूमकच्या मनांतला संशय दूर झाला होता. सर्व एका मागून एक त्या फरशीवर उतरले. तेथून त्यांना खोल भुयाराची वाट व पायऱ्या दिसल्या.

"या वाटेनें एक तास चालून गेल्यावर तुम्हांला दंडकारण्य दिसेल. डोंगराळ वाटेनें गेला असतां तर पांच महिने देखील पुरले नसते. याशिवाय कित्येक संकटांना तोंड द्यावें लागलें असतें आणि कदाचित वाट चुकून निघालात तेथेंच कदाचित परत आलां असतां." गिड्डा राक्षस म्हणाला.

धूमकनें सोनक व विरूपाकडे वळून पाहिलें. दोघे भुयारांत जायला तयार होते. धूमकनें गिड्ड्या राक्षसाचे आभार मानले. म्हणाले—"राक्षस जातींत पण चांगले लोक असतात ही गोष्ट तुला पाहाल्यानंतर पटली, कुंभीर राक्षस कोण हें आहे का माहीत तुला? तो राजकन्या कांतिसेनेला उचलून घेऊन आहे गेला."

"त्याला ना! छान ओळखतों. एका मांत्रिकानें त्याच्या डोक्याचें शिंग तोडलें





होतें. त्यांची खूप मारामारी झाली. तो मांत्रिक पण दंडकारण्यांतच राहातो. महा-कली व त्याचें हाडवैर आहे. दोघे परस्प-रांना ठार केल्याशिवाय राहणार नाहींत." पिङ्गा राक्षस म्हणाला.

इतक्यांत खड्ड्याच्या वरच्या बाजूला उभी राहून राक्षसाची बायको ओरडून म्हणाली—"तूं देखील त्यांच्याबरोबर आपल्या गांवीं निघालास वाटतें? वर कां नाहीं येत?"

"ही म्हाळसा कधीं न कधीं माझा जीव घेतल्याशिवाय राहणार नाहीं." राक्षस म्हणाला. नंतर धूमकचा हात आपल्या हातांत घेऊन तो म्हणाला—"एक वचन मागतों तुमच्या जवळ. माझ्याविषयीं दंडकारण्यांत चुकूनसुद्धां कोणाजवळ कांहीं बोलूं नका" असें सांगून तो वेल धरून वर चढून निघून गेला.

विरूप व सोमक फरशीवरून भुयाराकडे निघाले तेव्हां धूमकनें त्यांना अडविलें व म्हणाला—"एक तास या काळोखांत आपल्याला चालावें लागणार. उजेडाशिवाय शक्य आहे का? पाताळ कोटांत जाण्याची ही वाट असेल तर राक्षसांनीं खात्रीनें आपल्या मशाली येथेंच कोठेंतरी ठेवल्या असणार. त्या शोधूं या."

सोमक भुयारांत शिरून व चाचपून पाहून बाहेर आला त्याच्या हातांत दोन तीन मशाली होत्या. चकमकीच्या दगडानें त्या पेटवून तो धूमकजवळ आला व नंतर तिघे भुयारांत निघाले. भुयाराचें दार फरशीवरून खालीं उतरल्याबरोबर आपोआप बंद झालें.

दार बंद झाल्यावर तिघे जरा दचकले. पुढें जावें कीं मागें फिरावें हें त्यांना कळेना. परंतु मागें फिरणें हें भ्याडपणाचें ठरेल व आजपावेतों अनेक संकटांतून ज्या परमेश्वरानें वांचविलें तो यांतूनहि कांहीं मार्ग काढील असें मनाशीं ठरवून ते पुढें निघाले.

भुयार मोठें रुंद होतें. त्याला मधून मधून वाटा फुटत होत्या. एका वाटेनें थोडें दूर जाऊन विरूपनें पाहिलें तेव्हां त्याला मनुष्यांचे दोन तीन अस्थिपंजर पडलेले दिसले. त्यांना वाटलें, बिचाऱ्यांनीं राक्षसांच्या हातांतून पळून जाण्याचा यत्न केला असावा व त्या प्रयत्नांत त्यांची ही गत झाली असावी.

कांहीं घटना घडल्याशिवाय धूमक आपल्या साथीदारांबरोबर, भुयाराच्या वाटेनें खोल आंत बराच दूर चालत गेला. एका जागीं वळणावर ते वळले तेव्हां दूर त्यांना कांहीं मशाली दिसल्या. धूमकनें लगेच पाय मागें घेतला. आपल्या हातांतली मशाल त्यानें जमिनीवर आपटून विझवून टाकली. सोमकला व विरूपला पण आपापल्या मशाली विझवून टाकायला सांगितलें. नंतर तिघे एका आड वाटेला जाऊन भुयाराच्या भिंतीला चिकटून लपून उभे राहाले.

हळू हळू त्या मशाली ते उभे होते तेथून जवळून पुढें गेल्या. सुमारें वीस जण



होते ते. सर्वांत पुढें एक राक्षस होता. इतर सर्व उघडे नागडे कित्येक दिवसांपासून अर्ध पोटी राहलेले मनुष्य होते. सर्वांच्या मागें पण एक राक्षस होता. समोरचा राक्षस आपल्याच धुंदींत कांहीतरी गाणें म्हणत चालला होता. सर्व पुढें निघून गेल्या वर पाठीमागचा राक्षस वास घेतल्यासारख्या नाकपुड्या हलवून मोठ्यानें ओरडून म्हणाला—"मशाली विझवल्यासारखा वास येतो आहे."

सर्वांना तें ऐकूं आलें. सर्व जागच्या जागीं थबकलें.

पुढें चालणारा राक्षस म्हणाला—"अरे किती तऱ्हेचा वास येतो आहे? आपल्याच मशालींतून पहा ना, धूप घातल्यासारखा वास येतो आहे."

त्यानंतर मागून येणारा राक्षस कांहीं बोलला नाहीं. सर्व निघून गेले. धूमक व सोमक दोघांना हायसें वाटलें. ते सर्व दृष्टी आड झाल्यावर लपल्या जागेपासून धूमक व त्याचे साथी बाहेर आले व पुन्हां मशाली पेटवून चालूं लागले. त्या संकटांतून मुक्त झाल्याचा त्यांना परमानंद वाटला. ईश्वर पाठी राखा आहे. मग भीती कोणाची असा विचार करून पुन्हां नव्या दमानें ते पुढें निघाले.

पंधरा-वीस मिनिटें झालीं. भुयारांत पहिल्यासारखा काळोख नव्हता. कोठून तरी उजेड येत होता. "मशाली विझवून टाकूं या. भुयाराचें दार आलें." धूमक म्हणाला.

तिघांनीं आपापल्या मशाली विझविल्या आणि भुयाराच्या भोकांत खुपसून ठेवून पुढें निघाले. पुढें जाऊं लागले तसतसा सूर्याचा प्रकाश वाढत गेला, इतका कीं त्यांचे डोळे दिपून गेले. तिथे थांबत पुढें गेले आणि लपून बाहेरचें दृश्य पाहूं लागले. जें दृश्य त्यांच्या दृष्टीस पडलें तें पाहून त्यांचें सर्व अंग थरारलें.

एक मोठा भयंकर राक्षस एक चित्र विचित्र रंगाचा एक लांब अंगरखा घालून व डोक्याला एक मुकुट घालून उभा होता. त्याच्या हातांत एक गदा होती. हत्ती जुंपलेल्या विचित्र रथांतून कोणी तरी जंगलाच्या वाटेनें जात असलेला दिसला. त्याच्या पाठीमागून कित्येक राक्षस शस्त्रास्त्र घेऊन चालत होते.

(पुढील गोष्ट पुढील अंकीं)



# डाव फसला

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला, झाडावरचें प्रेत खांद्यावर काढून घेतलें व स्मशानाच्या दिशेनें मौनपणें चालूं लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! स्वतःच्या कर्तबगारीवर ज्यांचा विश्वास असतो त्यांना त्यांचा कल्पनेबाहेर कधीं कधीं तोंडघशी पडावें लागतें. याचें एक उदाहरण म्हणून मी तुला भोजराजाची गोष्ट सांगतो, ऐक." असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

विजयपूरचा राजा भोजराज याला मंजुळा नांवाची एकुलती एक मुलगी होती. म्हणून राजा तिचे सर्व प्रकारें लाड पुरवी. ती वयांत आली तेव्हां तिच्याशीं लग्न करण्याच्या हेतूनें कित्येक राजकुमार आले. परंतु राज-कन्येला त्यांपैकीं एक देखील पसंत पडला

**वेताळाच्या गोष्टी**



नाहीं. भोजराजापण मुलीला नापसंत असलेल्या राजकुमाराशीं आपल्या मुलीचें लग्न करून द्यायला तयार नव्हता.

एकदां राजकुमारी आपल्या मैत्रिणींबरोबर राजवाड्याच्या उद्यानांत फिरायला गेली असतां तेथें तिला एक तरुण युवक दिसला. घरीं आल्यावर तिनें ती गोष्ट राजाला सांगितली. म्हणाली—"मी त्याच्या शिवाय इतर कोणाशींहि लग्नाला तयार नाहीं."

राजाला हें कळेना कीं तो तरुण कोण? त्या मुलाचें कुळगोत्र आपल्या वंशाला साजेसें आहे कीं नाहीं.

राजानें आपल्या प्रधानाचा सल्ला घेतला. मंत्र्यानें नगर दर्शनार्थ राजानें निघावें, असा सल्ला देऊन त्यासाठीं उत्तम तयारी केली. प्रजेला स्वतःच्या सुखदुःखाची कहाणी राजाला सांगावयाची असल्यास त्याला मुभा आहे असें जाहीर करण्यांत आलें.

दुसऱ्या दिवशीं राजाची स्वारी अंबारींत बसून नगरदर्शनास निघाली तेव्हां राजकन्या पण बरोबर होती. तो तरुण गर्दींत राजकन्येला दिसतांच तिनें आपल्या वडिलांना खूण केली.

राजानें आपल्या कांहीं विश्वासपात्र नोकरांकरवीं त्या तरुणाविषयीं माहिती काढण्याचें ठरवून नोकरांना पाठविलें. राजा परत राजवाड्यांत पोंचेपर्यंत आवश्यक ती सर्व माहिती काढून नोकर आले.

त्या तरुणाचें नांव सर्वदायी असें होतें. त्याला आपल्या आईवडिलांचें नांव गांव माहीत नव्हतें. एक म्हातारी त्याला राजधानींत घेऊन आली होती. तिनेंच त्याला वाढवून लहानाचें मोठें केलें. ती वारल्याला पण पुष्कळ वर्षें झालीं होतीं. मुलगा दिसायला सुंदर होता. गुलाहीं राहून त्यानें





कोणी नांव ठेवणार नाहीं उलट सर्वांना आनंदच होईल."

मंत्र्याचा हा सल्ला राजाला पसंत पडला. म्हणाला—"मुली! आतां तुझें लग्न तुझ्या मनाप्रमाणेंच होणार. परंतु मला एका वर्षाची मुदत पाहिजे आहे. थाटामाटानें दोघांचा विवाह होण्यास इतका अवधी पाहिजेच."

राजकन्येनें त्याला होकार दिला.

प्रधानानें आपले दूत जवळपासच्या राज्यांत पाठविले. ते धर्मशाळेंत, चौकांत किंवा जेथें जेथें दहावीस लोक एकत्र दिसत जाहीर करीत कीं आम्ही काश्मीरचे रहिवाशी आहोंत. आम्ही आपल्या युवराजांच्या शोधार्थ हिंडत आहो. त्यांची एक म्हातारी दाई त्यांना घेऊन विजयपूरच्या राज्यांत येऊन राहूं लागली. युवराजांच्या उजव्या कानाखालीं एक खूण आहे. त्यांचे नाकडोळे असे आहेत वगैरे वगैरे!" अशा तऱ्हेनें अफवा राज्यभर व जवळपासच्या राज्यांत पसरली.

ती अफवा विजयपुरीला पण आली. काश्मीरच्या राजकुमाराविषयीं जें वर्णन सांगण्यांत आलें तें तंतोतंत सर्वदायींत पाहून नागरिक त्याच्याकडे चकित होऊन पाहूं लागले. सर्वदायीच तो युवराज आहे यांत कोणाला शंका उरली नाहीं. नंतर लोक उघड सांगूं लागले कीं स्वतः युवराज एकाद्या पोरक्या मुलासारखे इतके दिवस रहात आले. याला म्हणतात भाग्य!

सर्वदायीचे हितैषी सांगूं लागले कीं त्याचें भाग्य उदयास आलें आहे. नाहीं तर त्याच्या जन्माची गोष्ट अशातऱ्हेनें प्रगट झाली नसती. कोणी राजकन्या त्याच्याशीं लग्नाला तयार होणार नाहीं? नंतर तो आपल्या सासऱ्याच्या मदतीनें आपली स्वतःची गादी मिळविल्याशिवाय राहणार नाहीं.

सर्व त्याला काश्मीरचा युवराज म्हणूं लागल्यावर सर्वदायीला पण वाटूं लागलें कीं तोच काश्मीरचा युवराज आहे. आतां आपलें लग्न एकाद्या राजकन्येशींच झालें पाहिजे याचें तो स्वप्न पाहूं लागला.

इतक्यांत दोन राजांनीं आपल्या मुलींचीं चित्रें त्याच्याकडे पाठविलीं. त्यांनीं आपल्या दूतांकरवीं असें पण सांगून पाठविलें कीं राजकन्येशीं त्याचा विवाह करून देण्यास त्यांची तयारी आहे. सर्वदायीनें कनकपूरच्या राजकन्येचें चित्र पाहिलें व तिच्याशीं लग्नास तयार झाला. कनकपूरची राजकन्या तशीच एक रूपवती पण होती.



भोजराजाला या सर्वांची माहिती नव्हती. आपण रचलेला डाव फलद्रूपास आल्याचीं चिन्हें राजाला व प्रधानाला दिसूं लागलीं. आतां सर्वदायीशीं राजकन्येचें लग्न करून दिल्यास कोणी आपल्याला नांवें ठेवणार नाहीं या गोष्टीची राजाला खात्री वाटली. म्हणून त्यानें एकदां सर्वदायीला आदरपूर्वक आपल्या घरीं बोलाविलें आणि मुलगी दाखविली. म्हणाला—"तुला इतर कोठें विवाहासाठीं चवकशी करण्यास जाण्याची गरजच नाहीं. मी आपल्या मुलीचें तुझ्याशीं लग्न करून द्यायला तयार आहें."

"क्षमा करा! मी यापूर्वींच दुसऱ्या एका राजकन्येला विवाहाचें वचन दिलें आहे." असें सांगून सर्वदायी निघून गेला.

सर्वदायीनें नकार दिल्याचें ऐकून मंजुळा बेशुद्ध होऊन पडली ती पुन्हां उठली नाहीं. त्या धक्क्यानेंच तिची हृदयक्रिया बंद झाली.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा! मंजुळेच्या अशा अकाल मरणाला कारण कोण? तिला नकार देऊन सर्वदायीनें तिचें प्राणहरण केलें, असें नाहीं का वाटत तुला? कीं स्वतः भोजराजा? कारण त्यानेंच तिला एका वर्षाचा एक अवधी मागून घेऊन थांबायला सांगितलें होतें. प्रधान पण जबाबदार होऊं शकेल, नाहीं का? कारण त्यानेंच ती खोटी अफवा पसरवून त्याला काश्मीरचा युवराज केलें होतें. या प्रश्नांचीं उत्तरें माहीत असून तूं दिलीं नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

त्यावर विक्रमार्क म्हणाला—"त्यांत सर्वदायीचा कांहीं एक दोष नाहीं. राजकुमारीवर त्याचें प्रेम नव्हतें. राजकुमारीचें त्याच्यावर होतें व ती त्याच्याशिवाय इतर कोणाशीं लग्नाला तयार नव्हती. अशा राजकुमाराचें दुसऱ्या मुलीवर प्रेम असल्याचें कळल्यावर मंजुळेला मरण येणें अगदीं साहजिक होतें. बापाचा तरी काय दोष? कारण मंत्र्यानें तसा सल्ला दिला नसता तर त्यानें आपल्या मुलीचें लग्न दुसऱ्या तरुणाशीं करून दिलें असतें. खरा दोष प्रधानाचाच आहे. कारण त्यानें जो डाव टाकला होता, त्याची कल्पना त्यानें सर्वदायीला करून द्यायला हवी होती. त्याला तो डाव माहीत असता तर सर्वदायीनें मंजुळेला नकार दिला नसता व इतर कोणत्याहि राजकन्येशीं विवाह संबंधाच्या गोष्टी केल्या नसत्या. मंत्र्याचा डाव फळास आला परंतु त्यानें सावधगिरी न बाळगल्यानें तो फसला आणि मंजुळेला मरण आलें."

अशातऱ्हेनें राजाचें मौनभंग होतांच वेताळ प्रेतावरोबर अदृश्य झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळूं लागला.

(कल्पित)





# सुलतानाचें मांजर

मिसार शहरीं महंमद नांवाचा एक व्यापारी रहात असे. त्यानें पुष्कळसा माल खरेदी केला आणि व नोकरांना बरोबर घेऊन व्यापारासाठीं परदेशांत निघाला. तो प्रत्येक बाजारपेठेच्या गांवीं थांबे. जो माल त्या पेठेंत विकणें शक्य होई तो विके आणि नवीन माल खरेदी करून पुढल्या गांवीं जाई. असा फिरत फिरत तो एका गांवीं आला.

महंमद एका धर्मशाळेंत उतरला. तो खाऊन पिऊन थोडा वेळ आराम करीत बसला असतां दुसरा एक व्यापारी आला व त्याला म्हणाला—"जनाब! तुम्ही फार दुरून आलां आहां असें वाटतें. कदाचित या देशांतली राहणी व पद्धत तुम्हांला माहिती नसेल."

"बोला ना. तुम्ही त्यांची माहिती करून दिलीत तर मी तुमचा फार फार आभारी होईन." महंमद म्हणाला.

"या गांवीं येणाऱ्या प्रत्येक व्यापाऱ्याला गांवच्या सुलतानाला नजराणे द्यावे लागतात. नजराणा स्वीकारून सुलतान व्यापाऱ्याला बुद्धिबळें खेळायला बोलावितो. हा आमच्या देशांतला प्रघात आहे." त्या गांवचा व्यापारी म्हणाला.

महंमदाला सुलतानाच्या भेटीची मुळींच इच्छा नव्हती. तरी त्याला भेटावें लागलें. तो सोन्याच्या तबकांत उत्तमोत्तम उंची वस्त्रें नजराणा म्हणून घेऊन सुलतानाच्या महालांत गेला. सुलतानानें नजराणा स्वीकारून महंमदला त्याच्या देशाचें व त्यानें पाहिलेल्या देशांचें वर्णन करायला सांगितलें. नंतर



सुलतानानें महंमदला रात्रीं बुद्धिबळें खेळण्यासाठीं येण्यास विनंती केली. महंमद त्याप्रमाणें काळोख पडल्यावर सुलतानाच्या महालांत गेला.

"आमच्या खेळाचा एक नियम आहे, तो मी सांगतों. माझ्याकडे एक हुशार भाटी आहे. ती रात्रभर आपल्या शेपटीवर सात मेणबत्त्या ठेवूं शकते. आपला खेळ चालू असेपर्यंत भाटीच्या शेपटीवरचे दिवे तेवत राहाले तर तुझी सर्व संपत्ति माझ्याकडे येईल व तुला तुरुंगवास भोगावा लागेल. एक दिवादेखील खालीं पडला तर तुला वाटेल तशी वागणूक मला द्यायला तुला अधिकार आहे. माझ्या सर्व खजिन्याची मालकी तुझ्याकडे येईल." सुलतान म्हणाला.

बिचारा महंमद काय बोलणार? त्याला पळणें शक्य नव्हतें व बुद्धिबळें खेळणें पण शक्य नव्हतें. सुलतानाच्या म्हणण्याप्रमाणें त्याला खेळावें लागणार होतें व आपलें सर्वस्व घालवून पुन्हां तुरुंगवास भोगणें त्याच्या नशिबीं होतें. कोठून या देशांत पाऊल टाकण्याची दुर्बुद्धी झाली, असा विचार करून तो पश्चाताप करूं लागला.

सुलतानानें बोलावल्याबरोबर ती भाटी आली. तिच्या शेपटीवर सात दिवे लावण्यांत आले. नंतर सुलतान व महंमद खेळायला बसले.

महंमद खेळतांना एका नजरेनें भाटीच्या शेपटीवरच्या दिव्यांकडे पहात होता. पण भाटी जागची मुळींच हलली नाहीं. ती खेळण्यांतल्या भाटी सारखी एका जागीं स्वस्थ बसून होती. तीन दिवस व तीन रात्रीं लागोपाठ बुद्धिबळाचा डाव चालू होता. पण भाटी हलली नाहीं. महंमदला त्याहून जास्त वेळ खेळत बसणें अशक्य वाटलें. म्हणून त्यानें आपला पराभव स्वीकारला.

श्री रा. ब. भट

सुलतानानें धर्मशाळेंतून महंमदकडे होतें नव्हतें तें सर्व नौकरांकरवीं मागवून घेतलें आणि त्याला तुरुंगांत टाकलें.

तिकडे स्वदेशीं महंमदची बायको झारिना नवऱ्याची वाट पहात होती. तो परत आला नाहीं. पण त्याचा एक नोकर पळत आला व त्यानें महंमदवर जो प्रसंग गुदरला तो वर्णन करून आपल्या मालकिणीला सांगितला.

तें कळल्यावर पतीला सोडविण्याचा विचार पक्का करून तिनें पुष्कळसे उंदीर धरून एका पेटींत भरले. नंतर पुष्कळसें सोनें व चांदी बरोबर घेऊन व पुरुष वेष धारण करून ती कांहीं नोकरांबरोबर सुलतानाच्या गांवीं आली.

ती त्याच धर्मशाळेंत उतरली. नोकरांना धर्मशाळेंतच रहायला सांगून एका मोठ्या तबकांत सुलतानाला नजराणा देण्यासाठीं सर्व तयारी केली आणि सुलतानाच्या महालांत गेली. सुलतानाबरोबर बुद्धिबळें खेळायला सुरवात झाली कीं एकेका उंदराला आंत सोडावें अशी ताकीद तिनें आपल्या नोकरांना करून ठेवली होती.

झारिनाला पाहून सुलतानाला ती स्त्री असेल असें मुळींच वाटलें नाहीं. त्यानें नजराणा म्हणून तिनें दिलेली सर्व वस्त्रें स्वीकारलीं व तिला आपल्या खेळाचा नियम कळवून बुद्धिबळें खेळायला बोलाविलें. तें खेळायला बसण्यापूर्वी नियमाप्रमाणें भाटी आली व तिच्या शेपटीवर सात दिवे लावून ठेवण्यांत आले. भाटी अगदीं शांतपणें, जागची हलल्या डुलल्याशिवाय बसून होती.

इतक्यांत झारिनानें सांगून ठेवल्याप्रमाणें तिच्या नोकरांनीं एक उंदीर आंत सोडला. भाटीला उंदीर दिसतांच त्याला धरण्याचा मोह आवरेना.

परंतु सुलतानानें डोळे वटारून तिच्याकडे पाहिलें. म्हणून भाटी जागच्या जागीं बसून राहिली. थोड्या वेळानें नोकरांनीं दोनतीन उंदीर एकदम सोडले. ते बुद्धिबळाच्या खोलींत धुडगूस घालीत हिंडूं लागले. त्यांना पाहून भाटीला स्वस्थ बसून राहणें अशक्य झालें. तिनें उंदराला पकडायला एकदम उडी मारली. त्याबरोबर शेपटीवरचे सातहि दिवे खालीं पडले.

लगेच झारिनाचे नोकर खोलींत शिरले व त्यांनीं सुलतानाला कैद केलें. त्यांनीं सुलतानाला खूप बडविलें. सुलतान ओरडूं लागला. त्याचे नोकर त्याचा आवाज ऐकूं आला तरी आंत आले नाहींत. कारण त्यांना देखील सुलतानाच्या क्रूर स्वभावाचा तिटकारा होता.

झारिनानें सुलतानाला कैदेंत टाकून आपल्या नवऱ्याला सोडविलें आणि सुलतानानें त्यापूर्वीं ज्या ज्या कोणाला अशा तऱ्हेनें तुरुंगांत टाकलें होतें त्या सर्वांना सोडविलें आणि सुलतानाचा सर्व खजिना घेऊन ती पतीबरोबर स्वदेशीं निघून गेली.







# भोळा

**का**वेरी नदीच्या कांठीं एका ब्राह्मणवाडींत गोवर्धन नांवाचा एक गरीब ब्राह्मण रहात असे. त्याला फार दिवसानीं एक मुलगा झाला. आईवडिलांनीं त्याचें नांव श्रीवर्धन असें ठेवलें. लहानपणापासूनच तो थोडा खुळसट भोळा कोठें बसला कीं बसला. हांक मारली तर ओ देई, ये म्हटलें की येई व जा म्हटलें कीं जाई. एवढेंच नव्हें तर 'आतां नीज' असें कोणी म्हटल्याशिवाय तो निजत नसे.

त्याला थोडें लिहायला वाचायला येऊं लागलें कीं त्याचा भोळसटपणा जाईल असें वाटल्यावरून आईवडिलांनीं श्रीवर्धनला एका गुरुकुलांत ठेवलें. बारा वर्षें गुरुगृहीं राहाल्यावर देखील त्याच्या भोळसटपणांत कांहीं फरक पडला नाहीं. तो भोळसट असला तरी आळशी मात्र मुळींच नव्हता.

मुलांत कांहीं फरक न झालेला पाहून बापानें त्याला घरीं आणलें व कामाला लावलें. त्याच्या आईचे डोळे गेले होते म्हणून बापालाच रोजचा सैंपाकदेखील करावा लागे. आपल्या सांगकाम्या मुलाचा त्याला राग येऊं लागला. कदाचित मुलाचें लग्न करून दिलें व बायको शहाणी मिळाली तर मुलांत कांहीं फरक पडेल या विचारानें त्यानें आपल्या मुलाचें एका हुशार मुलीशीं लग्न करून दिलें.

बायको घरीं आल्यावर श्रीवर्धनला घरीं काम करावें लागत नसे, तो एका जागीं स्वस्थ बसून राही. श्रीवर्धनचा बाप सुनेला म्हणाला–"सुन बाई! तूं आपल्या नवऱ्याला

श्री. सा. न. सामंत



त्याच्या शेताचें काम सांगून त्याच्याकडून काम करवून घेत जा." सासऱ्यानें सांगितलें होतें तरी सुनबाई नवऱ्याला कधीं कांहीं काम सांगत नसे, स्वतःच सर्व काम करी.

आपल्या मुलाला ठोंब्या सारखा नेहमीं बसून राहालेला पाहून बाप त्याला म्हणाला–"अरे श्रीवर्धन, बायको काय म्हणते आहे तें ऐक जरा. तुला कांहीं काम आहे म्हणें."

श्रीवर्धननें बायकोला जाऊन विचारलें–"कांहीं काम आहे का? मी करतो."

"थोर माणसांनीं काम सांगावयाचें असतें व लहानांनीं करावयाचें असतें. म्हणून सासूबाईनाच विचारा कीं कांहीं काम आहे का?" बायको म्हणाली.

श्रीवर्धन आईला जाऊन म्हणाला–"आई, कांहीं काम आहे का? सांग मला, मी करीन."

"बाळा! मी आहें आंधळी. मी काय सांगूं काम? आपल्या बाबांना विचार जाऊन." आई म्हणाली.

"बाबा! मला माझी बायको किंवा आई कोणीच कांहीं काम सांगत नाहीं. मी त्यांना विचारून पाहिलें. तुम्हीच सांगा ना कांहीं कामें! श्रीवर्धन आपल्या वडिलांना म्हणाला.

"माझें भाग्य फुटकें, म्हणून तूं माझ्या पोटीं जन्मलास. मी तरी काय सांगूं काम? जा, तपश्चर्या करून देवाला प्रसन्न कर, देवाला दया आली तर तुला कांहीं तरी वर देऊन तुझा उद्धार करील तो." बाप रागाच्या भरांत म्हणाला.

श्रीवर्धन रानांत जाऊन तपश्चर्या करूं लागला. कांहीं वेळानें देवानें प्रसन्न होऊन त्याला विचारलें–"माग, तुला काय हवें तें. तुझ्या तपश्चर्येमुळें माझ्या मनाचें समाधान झालें आहे."

“देवा! काय वर मागावा, हें मी आपल्या घरीं जाऊन विचारून येतों. तोंपर्यंत तूं येथेंच थांब.” असें सांगून श्रीवर्धन घरीं गेला आणि वडिलांना म्हणाला—“बाबा! तुम्ही सांगितल्याप्रमाणें मी तपश्चर्या केली. देवानें प्रसन्न होऊन वर मागायला सांगितलें आहे. काय वर मागूं म्हणतां?”

“म्हणजे तूं वर मागितला नाहींस का गाढवा! माग, पुष्कळ मोठें ऐश्वर्य.” बाप म्हणाला.

मुलानें बापाला देव पावल्याची गोष्ट सांगितली ती आईनें ऐकली होती. म्हणून ती म्हणाली—“तूं देवाजवळ माझ्यासाठीं डोळे माग.”

पण बायकोनें त्याला एका बाजूला नेऊन सांगितलें कीं मुला बाळांचा वर मागावा. सर्वांना ‘बरें’ ‘बरें’ असें उत्तर देऊन तो, देवाला त्यानें उभें केलें होतें तेथें, पळत गेला. पण तेथें देव उभा नव्हता. तो देवाला हुडकत जवळपास हिंडत असतां त्याला एक मुनी तपश्चर्या करीत असलेले दिसले. त्यानें त्यांना विचारलें—“मला वर देतो, असें म्हणाला होता तो देव तुम्हांला दिसला का?”



तें ऐकून मुनीला आश्चर्य वाटलें. त्या मुनीनें सर्व माहिती विचारून घेतली व म्हणाले—“वेड्या! देव प्रसन्न झाल्याबरोबर तूं वर कां नाहीं मागून घेतलास? देवानें वर देण्याचें कबूल केल्यावर घरीं जाण्याऐवजीं तूं जीव कां नाहीं दिलास?” तपश्चर्या करून यश न मिळाल्यानें त्या मुनींना राग आला होता व श्रीवर्धनचा हेवा वाटत होता कीं देवानें त्याच्यासारख्या मूर्खाला दर्शन दिलें.

श्रीवर्धन मुनींच्या सांगण्याप्रमाणें जीव द्यायला निघाला. त्यासाठीं तो सोईची जागा शोधूं लागला. त्याला एक उंच डोंगर दिसला. त्यावर तो चढूं लागला.

अर्ध्या वाटेवर त्याला एक रानटी मनुष्य दिसला. त्यानें श्रीवर्धनला विचारलें—“या डोंगरावर तर कांहीं नाहीं. तूं कशाला वर जातो आहेस?”

“वरून उडी मारून जीव द्यायला.” श्रीवर्धननें त्याला आपली सर्व रडकथा अथपासून इतिपर्यंत सांगितली.

तो रानटी मनुष्य म्हणाला—“तूं तरी वेडाच दिसतोस. देवानें वर मागायला सांगितला पण तूं मागितलाच पाहिजे असें नाहीं. तूं मागितला नसतास तरी तुला काय हवें हें देवाला नसतें का कळलें! जा घरीं तुला काय हवें आहे तें सर्व देव तुला देईल.”

त्या रानटी माणसाच्या सल्ल्याप्रमाणें भोळसट श्रीवर्धन घरीं निघून गेला. त्याचें घर बदलून गेलें होतें. बापानें मागितलेलें ऐश्वर्य आणि आईनें मागितलेले डोळे सर्व मिळाले. श्रीवर्धनवर सर्वांची मर्जी वाढली. वर्ष भरानें त्याच्या बायकोनें इच्छिल्याप्रमाणें एक मुलगा पण झाला.







# जिवंत मशीद

हिंदुस्तानच्या उत्तरेकडील एका जागीं एका सुलतानाचें छोटेखानी राज्य होतें. तेथें एक फकीर रहात असे. तो एक हकीम पण होता. गोरगरिबांना तो औषधें देई. त्याच्या औषधांना गुण पण येई. हिंदू किंवा मुसलमान हा भेदभाव त्याच्या मनांत नव्हता. तो गरिबांकडून पैसे घेत नसे. परंतु श्रीमंतांकडून तो पैसे घेई. श्रीमतांकडून सुद्धां तो स्वतः पैसे मागून घेत नसे. ते स्वतःच इतके पैसे देत कीं त्या फकिराला गोरगरिबांची सेवा करण्यास पैशाची कमतरता भासत नसे, एवढेंच नव्हे तर त्याच्याकडे पुष्कळ पैसे जमा झाले. त्यानें ते पैसे कोणत्या तरी धर्मार्थ कार्या-साठीं लावण्याचें आपल्या मनाशीं ठरविलें आणि सुलतानाकडे जाऊन त्यानें थोडी जमीन मागीतली. सुलतानाला वाटलें कीं गरीब बिचारा घर बांधणार असेल. म्हणून त्यानें फकिराला पाहिजे होती तेवढी जमीन दिली.

फकिरानें त्या जमिनीवर जवळचे सर्व पैसे खर्च करून एक मोठी मशीद बांधली व तो मशीदींतच राहूं लागला. तो तेथूनच गोरगरिबांचें औषध पाणीं करूं लागला. मशीदींत मुसलमान नमाज प्रार्थनेसाठीं येत व फकिराकडून औषधपाणी पण घेत. परंतु फक्त मुसलमानच त्याच्याकडे औषधपाण्या-साठीं येत. कारण फकीर मशीदींत रहात असे व हिंदू मशीदींत जायला तयार नव्हते.

हें कळल्यावर फकिराला फार वाईट वाटलें. मशीद बांधून आपण त्यांत राहूं लागलों, ही आपली चूक झाली, असें त्याला वाटूं लागलें. म्हणून त्यानें एके दिवशीं स्वतः मशीद पाडून टाकली व मशिदीच्या जागीं एक झोंपडें बांधून तींत राहूं लागला. तें पाहून मुसलमानांना राग आला फकिरानें धर्माचा अपमान केला असा प्रचार मुसल-मानांनीं सुरू केला. त्यांनीं फकिराची झोंपडी पाडली व सुलतानाकडे फकिराच्या धर्मद्रोहाविरुद्ध तक्रार केली.

सुलतानानें फकिराला बोलावून जाब विचारला. म्हणाला—"मी तुला जी जमीन दिली होती त्या जमिनीवर तूं एक मशीद बांधलीस व ती नंतर तोडलीस, ही गोष्ट खरी आहे कीं नाहीं?"

"होय, खरी आहे." फकीर उत्तरला.

त्या अपराधाबद्दल सुलतानानें फकिराला मृत्युदंड दिला. ती शिक्षा ऐकून फकीर दोन्ही हात वर करून मोठ्यानें हंसला.

चकित होऊन सुलतानानें त्याला विचारलें—"तुला मी शिरच्छेदाची शिक्षा सांगितली व तूं हंसतो आहेस?"

"सुलतान! माझ्या दोन्ही हाताच्या मध्यें माझें डोकें आहे तें मशिदी इतकें महत्वाचें आहे. मी मशीद पाडली म्हणून तुम्ही मला शिरच्छेदाचा दंड दिला आहे. म्हणजे माझें डोकें एक जिवंत मशिदीसारखें झालें. या जिवंत मशिदीला तोडल्याबद्दल अल्ला आपल्याला काय दंड देईल तें त्या अल्लालाच माहीत. हा विचार करूनच मी हंसत होतों."

तें ऐकून सुलतान घाबरला आणि त्यानें त्या फकिराला सोडून दिलें. नंतर फकिरानें दुसरी झोंपडी बांधून निर्विघ्नपणें गोरगरीब हिंदू व मुसलमान सर्वांना औषध द्यायला सुरवात केली.

श्री. भा. मो. देसाई














# गंड्याचा प्रताप

कायरो शहरीं महमूद नांवाचा एक गरीब तरुण रहात असे. त्याचा बाप चामड्याच्या पिशवींत पाणी भरून तें लोकांच्या व मोठमोठ्या व्यापाऱ्यांच्या घरासमोर शिंपडीत असे. त्याचा मोबदला म्हणून त्याला जी मजुरी मिळे, तेवढ्यावर त्याचा व त्याच्या मुलाचा उदरनिर्वाह चाले. महमूद मोठा झाल्यावर त्याच्या बापानें त्याला पण एक चामड्याची पिशवी विकत घेऊन दिली आणि पाणी शिंपडण्याचें काम करून पोट भरायला सांगितलें. पुढें कांहीं दिवसांनीं त्याचा बाप वारला. वडिलोपार्जित संपत्ति म्हणून महमूदला चामड्याच्या दोन पिशव्या मिळाल्या.

महमूद प्रकृतीनें अशक्त होता. पाणी भरून दूर उचलून नेणें त्याला कठीण वाटूं लागलें. म्हणून त्यानें तो धंदा सोडला व मशिदीसमोर बसून भीक मागूं लागला.

एकदां एका श्रीमंतानें महमूदला पांच दिनार दिले. त्या दिवशीं त्या श्रीमंताचा वाढदिवस होता. म्हणून तो खुल्या हातानें दानधर्म करीत होता. पुष्कळ दिवसानंतर पोटभर खायला मिळणार असा विचार करून महमूद खानावळीच्या बाजूला निघाला. सुदैवानें खानावळींत त्याच दिवशीं पक्वान्नांचें जेवण होतें. महमूद पोटभर जेवला. नंतर डोंबाऱ्याचा खेळ पहात कांहीं वेळ उभा राहाला. डोंबाऱ्याचें माकड गमतीदार खेळ करीत होतें. महमूदला तें माकड इतकें आवडलें कीं त्यानें जवळचे उरलेले पैसे देऊन डोंबाऱ्याकडून तें माकड विकत घेतलें. परंतु माकड घेऊन मशीदींत

श्री. वा. म. मोरे



राहणें अशक्य होतें. म्हणून त्यानें एका जुन्या पडक्या घरांत जाऊन रहायचें ठरविलें. परंतु पोट भरण्याचा प्रश्न पुन्हां उभा राहलाच. आणि आतां तर स्वतःच्या पोटाबरोबर एका माकडाचें पण पोट भरावयाचें होतें.

परंतु ते दोन्ही प्रश्न एकाएकीं विचित्र तऱ्हेनें सुटले. त्या पडक्या घरांत पाऊल टाकल्याबरोबर त्या माकडाचा एकाएकीं एक सुंदर तरुण युवक झाला. महमूदला आश्चर्यच वाटलें. तो तरुण म्हणाला—"महमूद! तुझ्याकडे होते नव्हते ते सर्व पैसे खर्च करून तूं मला विकत घेतलें आहेस. आतां पोटापाण्याला सुद्धां पैसे उरले नाहींत ना? कोठून आणणार पैसे? पण भिऊं नकोस. हे घे पैसे आणि जाऊन दोघांना पुरेल असें कांहीं तरी खायला घेऊन ये." असें सांगून त्या तरुणानें महमूदला कांहीं दीनार दिले.

महमूदनें त्याला विचारलें—"पण आधीं हें सांग, तूं कोण, माकडाचा मनुष्य कसा काय झालास? कोठला राहणारा तूं?"

"हें सर्व मी मागाहून सांगेन. प्रथम जाऊन कांहींतरी खायला घेऊन ये. आणि हें पहा, माझ्या रूपें तुझें नशीब उदयाला आलें आहे. तुला धन, कीर्ति, मोठा हुद्दा सर्व मी देईन."

महमूद धांवत दुकानांत जाऊन खायला मिठाई व त्याला आवडणारे पदार्थ घेऊन आला. दोघांनीं पोटभर खाऊन घेतलें आणि दोघे रात्रीं झोंपले.

उजाडल्यावर तो तरुण महमूदला म्हणाला—"या पडक्यां घरांत काय झोंपायचें? एक चांगलासा वाडा पहा रहायला." असें सांगून एक पिशवी भरून दीनार त्या तरुणानें महमूदला दिले.

महमूदनें एक मोठा वाडा राहण्यासाठीं ठरविला. नंतर उत्तमोत्तम कपडे स्वत:साठीं व त्या तरुणासाठीं घेऊन आला. आंघोळ वगैरे करून महमूदनें ते नवीन कपडे घातले तेव्हां तो एखाद्या राजाच्या मुला-सारखा दिसूं लागला.

तो तरुण त्याला म्हणाला—"आतां मी तुझें लग्न एका राजकन्येशीं करून देण्याचें ठरविलें आहे. मी देतों तें गाठोडें घेऊन राजवाड्यांत जा आणि सुलतानाला नजराणा म्हणून दे. सुलतान येण्याचें कारण विचारील तेव्हां सांग कीं राजकन्येशीं विवाह करून द्यावा. ती मुलगीच तुझ्या भाग्यांत पण आहे. म्हणून सुलतान आपल्या मुलीशीं तुझें नक्की लग्न करून देईल."

महमूदला तें सर्व विचित्र वाटलें. त्याला राजवाड्यांत जायला भीति पण वाटूं लागली व तो मागें पुढें करूं लागला. त्या तरुणानें महमूदच्या मनांतले विचार ओळखले व त्याला धीर दिला. तेव्हां कोठें महमूद जायला तयार झाला. तो तें गाठोडें घेऊन राजवाड्याकडे निघाला. पाहारेकऱ्यांनीं विचार केला कीं कोणी मोठा राजबंडा तरुण दिसतो आहे. त्यांनीं त्याला आदरपूर्वक सलाम



करून आंत बोलावून नेलें. महमूदनें सलाम करून बरोबर आणलेलें गाठोडें सुलताना-समोर ठेवलें व म्हणाला—"या गरिबाची भेट आहे सुलतानांना. स्वीकार करावी."

सुलतानानें तो नजराणा स्वीकारून वजिराला उघडून पहायला सांगितलें. उघडून पाहालें तर राजपुरुषांलायक उत्तमोत्तम वस्त्रांभूषणें. सुलतानाचे तर डोळेच दिपले. इतके सुंदर होते ते कपडे. सुलतानानें महमूदला विचारलें—"आपला नजराणा मी स्वीकारला. आतां आपली काय अपेक्षा आहे हें सांगा."

महमूद म्हणाला—"मला परत भेट म्हणून दुसरें कांहीं नको. सुलतानांनीं आपल्या मुलीशीं माझें लग्न करून द्यावें. एवढीच विनंति आहे."

तें उत्तर ऐकून सुलतान महमूदाकडे बराच वेळ पहात उभा राहला व नंतर वजिरांकडे पाहून विचारलें—"तुमचा काय सल्ला आहे, वजीर?"

वजिरानें पण महमूदकडे कांहीं वेळ पाहिलें व म्हणाला—"राजकन्येला अगदीं योग्य वर दिसतो आहे. परंतु एक परीक्षा घेऊन पहावी."

"कशी काय परीक्षा?" सुलतानानें विचारलें.

"आपल्याजवळ जो एक मोठा हिरा आहे तो यांना भेट म्हणून द्यावा आणि याच्या जोडीचा दुसरा हिरा घेऊन यायला सांगावें." वजीर म्हणाला.

महमूद वजिरानें दिलेला हिरा पाहून हताश झाला. तरी धीर करून म्हणाला—"उद्यां आणीन जोडीचा हिरा." असें सांगून तो घरीं परत आला.

घरीं पोंचतांच त्या तरुणानें विचारलें—"झालें का काम?"

महमूदनें, जें कांहीं घडलें तें सांगितलें. त्या तरुणानें त्या हिऱ्याच्या जोडीचे दहा हिरे महमूदला दिले. महमूद दुसऱ्या दिवशीं ते दहा हिरे घेऊन सुलतानाकडे गेला व म्हणाला—"हे घ्या. एक नाहीं दहा हिरे होते माझ्याकडे, सगळे घेऊन आलों आहें."

सुलतानानें वजिराकडे त्याचा सल्ला विचारण्याच्या हेतूनें पाहालें. वजिरानें लग्नाला होकार देण्यास हरकत नाहीं असें मान हलवून उत्तर दिलें. सुलतानानें काजीला बोलावून आणलें आणि लग्न ठरल्या

संबंधीं कागद लिहून काढविला. काजीनें दोघांचें लग्न झालें असल्याचा कागद लिहून तयार केला. तो कागद घेऊन महमूद आपल्या घरीं गेला आणि त्या तरुणाला त्यानें तो कागद दाखविला.

"मी सांगितलें होतें नाहीं का तुला कीं माझ्या मदतीमुळें तुझें सुलतानाच्या मुलीशीं लग्न होईल. त्याप्रमाणें झालें. आतां तूं एक उपकार कर माझ्यावर." तो तरुण महमूदला म्हणाला.

"तुझ्या या उपकाराबद्दल तूं काळीज काढून दे आपलें, असें म्हणालास तरी मी त्याला तयार आहें." महमूद म्हणाला.

"तुझ्या बायकोच्या उजव्या दंडाला एक गंडा बांधलेला आहे. आज रात्रीं तुम्ही भेटाल त्यावेळीं तूं तो तिच्याकडून मागून घेऊन ये. मला तो आणून दे. नंतर दोघें नवरा-बायको आनंदानें संसार करा. एवढी एकच माझी विनंती आहे." तो तरुण म्हणाला.

"मी तो गंडा मागितला तर माझी बायको नकार देईल, असें नाहीं मला वाटत. तो गंडा मागून आणून देईपर्यंत मी तिला स्वतःची बायको मानणारच नाहीं." महमूदनें वचन दिलें.



रात्रीं सुलतानाच्या मुलीशीं भेट होतांच महमूदनें तिच्या डाव्या हातांतला गंडा तिच्याजवळ मागितला.

ती म्हणाली—"हा गंडाच काय मी जीव ओवाळून टाकीन तुमच्या एका शब्दावर. तसा तो महत्वाचा पण नाहीं. लहानपणीं माझ्या दाईनें हा गंडा माझ्या दंडाला बांधला होता म्हणें, तो अजून तसाच आहे." असें सांगून तिनें तो गंडा काढून दिला.

"बरें तर मी येतोच." असें सांगून महमूद गंडा घेऊन घाईघाईनें आपल्या





घरीं गेला. तो गंडा त्या तरुणाला देऊन तो राजवाड्यांत परतला. तो खोलींत पाय टाकणार तेवढ्यांत त्याला घेरी आल्यासारखें झालें. डोळ्यासमोर त्याला कांहीं दिसेना. तो डोळे मिटून उभा राहाला. त्यानें डोळे उघडून पाहालें तेव्हां त्याच्या अंगावर त्याचे जुने फाटके कपडे होते व तो आपल्या जुन्या घरांत फर्शीवर पडून असल्याचें त्याला आढळून आलें. सुलतान, सुलतानाची मुलगी व राजवाडा सर्व एकाद्या स्वप्नासारखें त्याला आठवूं लागलें.

महमूद वेड्यासारखा कायरो शहरांतल्या रस्त्यावर फिरूं लागला. एका जागीं भविष्य सांगणारा काजी बसलेला त्याला दिसला. त्याच्यासमोर आडव्या उभ्या रेघा काढलेले कांहीं कागद, कांहीं गंडे व ताईत पडलेले होते. तो काजी दृष्टीस पडतांच महमूदला जिवांत जीव आल्यासारखें वाटलें. तो त्याच्यासमोर बसला आणि त्याला आपलें भविष्य सांगायला सांगितलें.

ज्योतिषी महमूदच्या तोंडाकडे कांहीं वेळ लक्षपूर्वक पाहून त्याला म्हणाला—"अरे वेड्या! जें माकड तूं विकत घेतलें होतेंस तो एक तरुण नसून एक दुष्ट भूत होतें. त्यानें स्वतःच्या स्वार्थासाठीं तुझा उपयोग करून घेतला. त्या दुष्टाची नजर सुलतानाच्या पोरीवर फार दिवसांपासून होती. पण तिच्या दंडाला तो गंडा होताना, म्हणून त्या दुष्टाची तिच्या जवळपास जाण्याची छाती झाली नाहीं. तो गंडा पळविण्यासाठीं त्यानें तुझा उपयोग करून घेतला. आतां त्यानें तिला पळवून नेलें आहे. परंतु त्या दुष्टाचा नाश करून राजकन्येला सोडवून आणणें अशक्य नाहीं, असें मला वाटतें." असें सांगून त्यानें एका










कागदावर उभ्या आडव्या रेघा काढल्या आणि तो कागद महमूदच्या हातांत देऊन म्हणाला—"हा कागद घेऊन मी सांगेन तेथें जा. तेथें तुला गर्दी दिसेल. गर्दीत शिरून त्या गर्दीतला पुढारी कोण हें ओळख व त्याला हा कागद दे."

ज्योतिष्यानें सांगितलेल्या जागीं महमूद रात्रीं गेला. तेथें त्याला उंच गवत उगवलेलें दिसलें. तो एका जागीं बसून राहाला. जिकडे पहावें तिकडे पक्षीच उडत असल्या-सारखें त्याला वाटलें.

इतक्यांत त्याला कांहीं मशाली दिसल्या. परंतु मशाली पकडून येणारा कोणी त्याला दिसला नाहीं. अधांत्रीं मशाली जळत असलेल्या त्याला दिसल्या. जवळ आल्यावर त्याला त्यांच्या मधोमध सिंहासनावर बसलेला एक इसम दिसला. तो इसम आपल्याकडेच पहात आहे हें पाहून व मनांत भीति वाटत होती तरी मनाचा धीर करून, त्यानें तो कागद त्याच्या हातांत दिला.

त्यानें, कागदावर जें लिहिलें होतें तें वाचून मशाली थांबविल्या व एका अदृश्य इसमाला बोलावून म्हणाला—"तूं कायरोला जाऊन त्या दुष्ट भुताला साखळदंडांनीं बांधून घेऊन ये."

एका तासाभरांत त्या तरुणाला साखळ-दंडांनीं बांधून त्या जागीं आणण्यांत आलें. अदृश्य लोकांच्या सरदारानें त्याला विचारलें—"तूं त्याच्या तोंडचा घास ओढून खाण्याच्या विचारांत आहेस नाहीं का?"

"नाहीं, ती माझीच शिकार होती. इतक्या प्रयत्नानंतर माझ्या हातीं आली." तो तरुण म्हणाला.

"तो गंडा परत कर." सरदार दरडावून म्हणाला.

"तो कोणाला मिळणार नाहीं." असें सांगून त्या दुष्टानें तो गंडा गिळून टाकला.

लगेच त्या सरदारानें त्याचें टोकें दोन्ही हातांनीं धरून दाबलें. तो तरुण कांहीं वेळ मान खालीं करून उभा राहाला. नंतर फळाचे दोन तुकडे व्हावे तसे त्याचे दोन तुकडे झाले. नंतर सरदाराच्या आज्ञेनें एका अदृश्य इसमानें त्याच्या पोटांतला गंडा काढून महमूदच्या हातीं दिला.

महमूदच्या हातीं गंडा आल्याबरोबर सर्व दृश्य पालटलें. बेशुद्ध होण्यापूर्वी तो सुलतानाच्या राजवाड्यांत पोंचला होता तसा पोंचला. सुलतानाची मुलगी बेशुद्ध स्थितींत अंथरुणावर पडून होती. त्यानें तिच्या दंडाला गंडा बांधल्याबरोबर ती उठून बसली.

सुलतानाची मुलगी स्वप्नांतून जागी झाल्यासारखी उठून बसली. तिनें महमूदला, तो दोन दिवस कोठें गेला होता हें देखील विचारलें नाहीं.

महमूदचें पुढील आयुष्य सुखानें गेलें. सुलतानाला मुलगा नव्हता म्हणून महमूदच सुलतान वारल्यावर गादीवर बसला.







# काळयाची तपश्चर्या

काळ नामक एका ब्राह्मणानें पुष्कर येथें दोनशें वर्षें खडतर तपश्चर्या केली. तेव्हां त्याच्या मुखावर कोटी सूर्यांचें तेज झळकूं लागलें. तेव्हां ब्रह्मदेव, इंद्र इत्यादी देवांनीं येऊन त्याला विचारलें–"हे ब्राह्मण! तूं आपल्या तपश्चर्येनें सर्व जगाला असें जाळून भस्म कां करीत आहेस? तुला काय वर हवा आहे तो मागून घे."

"माझें चित्त तपश्चर्येशिवाय आणखी कोठें लागूं नये असा वर द्यावा. काळ म्हणाला.

"हा नाहीं. हा सोडून दुसरा पाहिजे तो वर माग." देवांनीं वारंवार विनंती केली तेव्हां काळ पुष्कर क्षेत्र सोडून हिमालय पर्वतावर जाऊन तेथें तपश्चर्या करूं लागला. तेव्हां देवांनीं यमाला काळ याच्याकडे पाठविलें. यम म्हणाला–"हे ब्राह्मणा! मनुष्य इतके दिवस जिवंत रहात नाहीं. लोक मर्यादेला अनुसरून तूं प्राण त्याग करावा."

"मी स्वतः प्राणत्याग करून आत्महत्या करूं म्हणतोस?" त्यानें विचारलें. त्याचा तपःपूत प्राण हरण करण्याची शक्ति यमाच्या अंगांत नव्हती. म्हणून रिकामा यमपाश खांद्यावर टाकून तो निघून गेला.

इंद्राला दुसरें कांहीं सुचलें नाहीं तेव्हां तो त्याला उचलून स्वर्गांत घेऊन गेला. इंद्राला वाटलें कीं स्वर्गसुख थोडें उपभोगल्यावर ब्राह्मणाच्या मनांत पालट होईल. परंतु ब्राह्मण तेथेंदेखील तपश्चर्या करूं लागला. त्यावेळीं ईक्ष्वाकू तेथें आला. सर्व कांहीं कळल्यावर तो म्हणाला–"तूं देवांजवळ वर मागणार नसशील तर माझ्याजवळ माग. मी देतों."

"देवांनीं दिलेला वर ज्यानें अव्हेरला त्याला वर देण्याची शक्ति तुझ्या अंगांत आहे का?" काळनें ईक्ष्वाकूला विचारलें.

"बरोबर आहे तुझें म्हणणें, इतकें सामर्थ्य माझ्या अंगीं नाहीं. तरमग तूंच मला वर दे." ईक्ष्वाकु म्हणाला.

"तरमग माग वर! काळ म्हणाला. ईक्ष्वाकु विचारांत पडला. कारण क्षत्रियानें ब्राह्मणाला दान द्यावयाचें असतें. ब्राह्मणाजवळ मागायचें नसतें.

त्याच वेळीं दोन ब्राह्मण कोणत्यातरी विषयावर वादविवाद करीत आले आणि त्यांनीं राजाजवळ न्याय निवाडा करायला विनंती केली.

पहिला ब्राह्मण राजाला म्हणाला–"महाराज! मी या ब्राह्मणाकडून दक्षिणेबरोबर ही गाय दान म्हणून घेतली. मी हीच गाय दान म्हणून त्याला देऊं लागलों तर हा घ्यायला तयार नाहीं."

"महाराज! मी कधीं दानच घेतलें नाहीं. आणि मला गाईची जरूरदेखील नाहीं. तेव्हां ही बळजबरी मजवर कां?" दुसऱ्या ब्राह्मणानें प्रश्न केला.

ईक्ष्वाकूनें निवाडा दुसऱ्या ब्राह्मणाच्या बाजूनें दिला. लगेच इंद्र ईक्ष्वाकूला म्हणाला–"तूं या ब्राह्मणाजवळ (काळजवळ) वर मागितला आहेस व तो द्यायला तयार पण आहे. पण तूं घ्यायला तयार नाहींस?

ईक्ष्वाकू निरुत्तर झाला. तो काळ याला अगदीं निरुपाय होऊन म्हणाला–"तुम्ही आपल्या तपश्चर्येचें अर्धें यश मला द्यावें." काळ त्याला कबूल झाला. अशातऱ्हेनें त्याला जें तपश्चर्येचें फळ लाभलें त्या योगें तो त्रिलोकांत संचार करूं लागला.

सौ. शरयूताई वाघमारे





# देवाची परीक्षा

एका गांवीं एक मोठा भक्त रहात असे. तो देवाची थोरवी गात गांवोगांव फिरत असे. हरिभक्तीचा महिमा तो लोकांना समजावून सांगे. एकदां तो रामपूर नांवाच्या गांवीं गेला असतां तेथें चार चौघे लोक जमा झाले. तो त्यांना म्हणाला–"देव कोणत्याहि प्राण्याला जन्म देतो तेव्हां त्याच्या पोटापाण्याची तजवीज करून ठेवतो. मूल जन्मतांच त्याच्या मातेची छाती दुधानें भरलेली असते. कोणी अन्न ग्रहण करणार नाहीं असें म्हटलें तर तो त्याला बळजबरीनें खाऊं घालतो."

त्याचें हें प्रवचन गांवकरी लक्षपूर्वक ऐकत होते. त्यांत सुखदास नांवाचा गांवकरी होता. त्याला हें सर्व मुळींच पटत नव्हतें. त्यानें उठून त्या हरिभक्ताला स्पष्टच विचारलें–"तुम्ही तरी काय विचित्रच बोलतां. म्हणे, जो स्वत: खात नाहीं त्याला देव खायला घालतो. हें कसें काय हो?"

"देवाला हें कांहीं कठीण आहे का?" भक्तानें विचारलें.

पण सुखदासाचें तेवढ्यावर समाधान कसें काय होणार? त्यानें देवाची परीक्षाच घ्यायचें ठरविलें. त्यानें त्या दिवसापासून अन्न त्याग केला. घरीं गेल्यावर बायकोनें पान मांडून जेवायला बोलाविलें तेव्हां सुखदास तिला म्हणाला–"मला भूक नाहीं. मला नाहीं जेवायचें."

"अहो, मी आज तुमच्या आवडीचा रस्सा केला आहे." बायको म्हणाली.

"मला नाहीं खायचें." सुखदास बायकोवर थोडासा रागावूनच म्हणाला.

श्री. भा. गो. पाटील

मुलें खायला बसलीं तेव्हां बाबा बरोबर जेवायला बसले नाहींत, म्हणून बालस्वभावाप्रमाणें तीं बापाच्या तोंडांत घास घालूं लागलीं. तेव्हां सुखदास घराबाहेर निघून गेला. कारण त्यानें विचार केला कीं आपण घरीं राहालों तर आपलें व्रत मोडणार. मुलें व त्यांची आई आपल्याला उपाशीं राहूं देणार नाहींत. तो एका कुरणांत एका वडाच्या झाडाखालीं बसून राहाला.

त्याच गांवांत कोणाच्या तरी सुनेला भूतबाधा झाली होती. मांत्रिकानें येऊन मंत्र म्हटला, दृष्ट काढण्यांत आली व अन्नवस्त्र ओवाळून तें सर्व त्याच वडाच्या झाडाखालीं ठेवून येण्यास मांत्रिकानें सांगितलें. नोकरांनीं सर्व पकान्नें सुखदास बसला होता त्या झाडाखालीं आणून ठेवून दिलीं.

सुखदासाला खूप भूक लागली होती व पकान्नांचा गोड वास येत होता. त्याच्या तोंडाला पाणी सुटलें. तरी देवाची परीक्षाच करण्याचें ठरविलें असल्या कारणानें तो स्वत:चें मन घट्ट करून स्वस्थ बसून राहिला.

मध्यरात्र उलटून गेली होती. कांहीं चोर गांवांत चोरी करून चोरीचा माल आपसांत वांटून घेण्यासाठीं त्याच झाडाखालीं














येऊन बसले. त्यांना देखील पक्वान्नांचा वास आला.

"अरे, पक्वान्नांचा काय छान वास येतो आहे हो! पण इकडे रानांत कोणी आणून ठेवली असतील बरें हीं पक्वान्नें." एक जण म्हणाला.

"अरे आली असतील कोठून तरी, त्याचें आपल्याला काय? आपण पोटभर खाऊन तर घेऊं." दुसरा म्हणाला.

"समजा, यांत विष असेल तर? आपल्याला तें खायला घालून आपला जीव घेण्याचा घाट कोणी घातला नसेल कशावरून! तो घाट घालणारा जवळच कोठेंतरी लपून बसला असेल. हुडकून काढूं या त्याला!" दुसरे चोर म्हणाले.

त्यांना सुखदास एका जागीं गुपचुप बसलेला दिसला.

चोरांनीं सुखदासला धरलें व म्हणाले— "लबाड! येथें बसला आहे, पहा बगळा! आम्हांला विष खायला घालून आमचा माल उडविण्याचा घाट दिसतो आहे याचा. कोण रे तूं? हीं पक्वान्नें तूंच खा आधीं."

"मला हें सर्व कांहीं माहीत नाहीं हो. मी नाहीं खात." सुखदास म्हणाला.

सुखदास खात नाहीं म्हणाला तेव्हां चोरांचा संशय जास्तच बाढला. त्यांनीं त्याला खूप बडविलें आणि त्याच्या तोंडांत पक्वान्न कोंबलें. सुखदासला तें खावेंच लागलें. सुखदास मेला नाहीं हें पाहून त्यांनीं सर्वांनीं मिळून सर्व पक्वान्नें खाऊन फस्त केलीं आणि पळून गेले.

देवाचाच शेवटीं जय झाला हें पाहून व हताश होऊन सुखदास घरीं निघून गेला.





# नारळ चोर

एका गांवीं शितू पवार नांवाच्या एका श्रीमंत गृहस्थानें नारू नांवाच्या नोकराला चार रुपये पगारावर माळी म्हणून नेमलें. नारूनें केळ्याचीं, नारळाचीं व आंब्याचीं झाडें लावलीं.

झाडें वाढलीं—नारळ, आंबे खूप येऊं लागले. नारूनें मालकाजवळ पगार वाढवायला विनंती केली.

पवार म्हणाले—"एवढ्यांत? जरा सबूर कर. झालेला खर्च पदरीं पडूं दे. पुढें पाहूं!"

नारू म्हणाला—"धनी, रोज पन्नास नारळ काढतों आहे कीं. मी जास्त नाहीं, दोनच रुपये वाढवायला सांगतों आहें."

"नारू! तूं तरी असा भांडायला निघालास, हें बरोबर नाहीं हं! असे काय काम तरी पडतें आहे रे तुला? एक पै देखील नाहीं वाढवीत. रहायचें तर रहा, नाहीं तर चालूं लाग."

नारू तें उत्तर ऐकून थक्कच झाला. कारण त्याच्या मेहनतीनें तो मळा एवढा मोठा झाला होता. आतां मालकाला आपली काय गरज? बरं तर पाहून घेऊं. तूप सरळ बोटानें निघालें नाहीं, म्हणजे बोट वांकडें करावें लागतंच.

त्या दिवसापासून तो रोज दोन नारळ चोरून नेऊं लागला. आठ दहा दिवसांनीं पवारांना नारळ चोरीला जात असल्याचें कळलें. त्यांनीं नारूला विचारलें तेव्हां तो म्हणाला—"मला नाहीं बुवा माहीत."

"बरें तर तूं रात्रीं पाहारा दे आणि चोराला पकड." पवार म्हणाले.

"दोन रुपये वाढवा. मी पाहारा देईन व चोराला पकडीन." नारू म्हणाला.

सौ. काशीताई बेरड

"नाहीं, तें नाहीं चालायचें. मीच स्वतः आज पासून पाहारा देतों." पवार म्हणाले आणि ते देवीच्या देवळांत गेले. त्यांनीं देवीसमोर नवस केला—"देवी! आज तूं चोराला पकडून दिलेंस तर मी उद्यां एक बकरा बळी देईन."

नारूदेखील देवीच्या पायां पडायला त्या दिवशीं आला होता. त्यानें पवारांनीं देवीसमोर नवस केला तें ऐकलें. मालक निघून गेल्यावर त्यानें हात जोडून देवीजवळ प्रार्थना केली—"देवी! आज रात्रीं मी मालकाच्या हातून वांचलों तर एक कोंबडा देईन. त्याहून जास्त शक्ति नाहीं." असें सांगून त्यानें हात जोडून डोकें टेकून देवीला नमस्कार केला.

रात्रीं नारू बागेंत गेला. विहिरीजवळच्या नारळाच्या झाडावर तो चढला. त्यानें एक नारळ तोडून दूर फेंकला. मालक बागेंतच पाहारा देत असेल तर चोराला धरायला नारळ पडेल तिकडे तो धांवेल. असा विचार करून त्यानें तसें केलें होतें.

परंतु पवारांनीं त्या पूर्वींच आणखी कोणाला तरी झाडावर चढतांना पाहिलें होतें. ते काठी व दोरी घेऊन झाडाखालीं येऊन उभे राहाले होते. "कोण तो झाडावर! चोर कुठला! माझ्या डोळ्यांत तूं धूळ फेंकणार! खालीं उतर तर तुला झाडाला बांधून तुझें चामडें लोळविलें नाहीं तर मी नांवाचा पवार नाहीं." त्यांनीं धमकी दिली.



नारूनें तें ऐकलें आणि झाडाला तसाच चिकटून बसून राहाला. इतक्यांत पवारांनीं त्याच झाडावरून विहिरींत उडी मारतांना कोणाला तरी पाहालें. लगेच त्यांनीं पण विहिरींत चोराला धरण्यासाठीं उडी मारली. कोणाचें तरी डोकें त्यांच्या हाताला लागलें. पण ते चोराला पकडूं शकले नाहींत. उलट त्या चोरानें त्यांनाच जोरानें लाथ मारली व ते तोल संभाळून वर यायच्या आंत चोर झपझप पायऱ्या चढून पसार झाला. चोराचें चातुर्य पाहून पवारांना आश्चर्य वाटलें.

दुसऱ्या दिवशीं पवार पुन्हां देवीच्या देवळांत गेले. म्हणाले—"देवी! तूं मला फसविलें आहेस. चोर माझ्या हातावर तुरी देऊन पळून गेला आहे, पहा मी तुला कांहीं एक देणार नाहीं."

"तुला मी चोर कोण हें दाखविलें होतें. तूं तेवढाच नवस मागितला होतास. पण काय रे, तूं आपल्या नोकराला दोन रुपये वाढवीत कां नाहींस? तुझा मळा ज्याच्या जिवावर वाढला, त्यालाच दोन रुपये द्यायला तूं मागें पुढें करतो आहेस आणि तूं मला बकरा काय रे देणार? तूं नारूला दोन रुपये जास्त दिले असतेस म्हणजे ही चोरी झालीच नसती." पुजारी बडबडत होता. त्याच्या अंगांत देवी आली होती.

पवारांचे डोळे उघडले. त्यांनीं नारूला दोन रुपये पगार वाढ दिली. त्या दिवसापासून त्यांच्या बागेंत कधीं चोरी झाली नाहीं.





# कृष्णावतार

**त्या** दिवशीं रात्रीं अक्रूर कृष्ण-बलरामां-बरोबर मनसोक्त जेवला. तिघे एकाच जागीं गप्पा मारीत झोंपायला म्हणून पडून होते. तेव्हां अक्रूर म्हणाला—"कृष्णा! तूं जन्मल्यापासून नाना प्रकारचे कष्ट सहन केले आहेस. तुझ्या वडिलांनीं व आईनें पण किती कष्ट सहन केले हें मी निराळें सांगण्याची गरज नाहीं. आतांपर्यंत हें कष्टाचें आयुष्य गेलें तें पुरें आहे. आतां आपल्या वंशाचें नांव उजागर होईल अशा कामाची जबाबदारी तुला आपल्या शिरावर घेतली पाहिजे. तुझे वडील वसुदेव हे इतके थोर असून त्यांना देखील कंसापासून भिऊन रहावें लागतें. तुम्ही दोघे शूर मुलगे असून त्यांना पदोपदीं अपमान सहन करावा लागत आहे. त्यांचा मान राखणें हें तुझें कर्तव्य आहे. तुझ्या आईच्या दुःखाचें वर्णन आतां मी काय करूं? तिच्या पोटीं जन्मलेल्या सात पुत्रांना त्या दुष्टानें निर्दयपणें ठार केलें. एका हि मुलाला दूध पाजणें त्या मातेच्या भाग्यांत नव्हतें. तूं इतका सुंदर आहेस. पण तुझ्या मातेनें तुझें हें सौंदर्य कोठें पाहिलें आहे? तिचें मातृत्व यशस्वी करण्याची जबाबदारी तुझ्यावर आहे. तिला जीव नकोसा वाटूं लागला आहे व मरण बरें वाटूं लागलें आहे."



कृष्णाला त्याच्या बोलण्याचा बोध झाला. मथुरेला जाऊन कंसाचा वध करून आपल्या आईवडिलांना सुखी केलें पाहिजे हें त्याला पण बरोबर वाटलें.

उजाडल्यावर स्नानादि आटोपून अक्रूर रथ घेऊन आला. कृष्ण बलराम तयार होतेच. ते रथांत बसल्यावर अक्रूर रथ घेऊन मथुरेला निघाला. गोपींना कृष्णाचा तो विरह असह्य वाटूं लागला. त्या रथामागें जावलें तितक्या धांवत गेल्या. त्यांनीं अक्रुराची मनसोक्त निंदा केली. म्हणाल्या—"आतांपर्यंत कृष्ण आमच्या रक्षणाला हजर होता. आतां कोणी राक्षस आला तर कोण येणार आमच्या रक्षणाला?" पुरुष मंडळींना उद्देशून त्या म्हणाल्या—"अहो! तुम्ही पुरुष मंडळी अशी गप्प कां? अडवा त्या अक्रूराला." तें ऐकून लहानथोर गवळी रथा मागें धांवले. पण तोंपर्यंत रथ पुष्कळ दूर निघून गेला होता.

दुपारच्या सुमारास अक्रूरानें यमुने काठीं रथ थांबविला. अक्रूर म्हणाला—मी नदीवर आंघोळ स्नानादि आटोपून येतो. घोडे पण कांहीं वेळ चरतील." असें सांगून तो नदीवर आंघोळीला गेला व नदींत बुडी मारली.

तेव्हां अक्रूराला पाण्यांत पाताळ लोक दृष्टीस पडला. तेथें त्याला वासुकी, कर्कोटक इत्यादि नाग दिसले. एका सोनेरी सिंहास-नावर सहस्रमुख असलेला शेषनाग दिसला. त्याचें शरीर स्वच्छ व निर्मळ होतें. त्याच्या जिभा लकाकत होत्या. त्याच्या चारी बाजूला उखळ, नांगर, ताडाचीं झाडें यांचें चिन्ह असलेले झेंडे फडफडत होते. आणि अशा शेषशय्येवर कमळासारखे डोळे असलेला प्रसन्न वदन कृष्ण पीत वस्त्र धारण करून बसलेला होता.

१०. कृष्ण-बलराम यांचे मथुरेस प्रयाण












कृष्णाचें तें दिव्यरूप पाहून अक्रूरानें मनोभावें मनांतल्या मनांत त्याचें स्तवन केलें आणि मानसपूजा केली. स्नानादि आटोपून तो रथाजवळ आला तेव्हां त्यानें मनानें वाहिलेलीं फुलें व वस्त्रें त्याला कृष्ण बल-रामाच्या अंगावर दिसलीं. तें पाहून अक्रूराला जास्तच आश्चर्य वाटलें. नंतर त्यानें पुन्हां पाण्यांत बुडी मारली. पुन्हां त्याला कृष्ण त्याच स्वरूपांत शेषशय्येवर बसलेला दिसला.

अक्रूर पुन्हां रथाजवळ आला तेव्हां कृष्ण त्याला म्हणाला—"अक्रूरा! तुझें हें संध्यास्नान फार लांबलचक दिसतें आहे कीं रे? पाताळ लोकांत तुला कांहीं कौतुक पहायला मिळालें कीं काय?"

"देवाधिदेवा! तूं जवळ असल्यावर चकित करून सोडणारें कौतुक दिसलें नाहीं किंवा घडलें नाहीं तरच आश्चर्य. तुम्ही दोघे येथें आहांत तसेच मला पाण्यांत बुडी मारल्यावर दिसलांत. तुमच्या खऱ्या स्वरूपाचें वर्णन ब्रह्मदेवाला देखील शक्य नाहीं, मग त्याच्यासमोर मी काय! माझ्या-वर तुम्ही दोघे अनुग्रह करा. बरें तर चला जाऊं या पुढें. सूर्यास्तापूर्वी पोंचावयाचें आहे." अक्रूर म्हणाला.

सायंकाळच्या सुमारास रथ मथुरेला पोंचला. कृष्ण स्मित करून अक्रूराला म्हणाला—"आम्ही मथुरा नगरी पाहिलेली नाहीं. कंसाची भेट होईपर्यंत आम्हीं धीर धरायला तयार नाहीं. म्हणून चल, जरा हिंडून फिरून येऊं."

अक्रूर त्यांना रथांतून उतरवून म्हणाला—"कदाचित तुम्हांला वसुदेवाच्या घरी जावेंसें वाटेल. परंतु तसें करूं नका. कारण तुम्ही कंसाला भेटल्याशिवाय वसुदेव देवकीला भेटलांत तर कंसाला फार राग

येईल." असें सांगून तो कृष्ण बलरामांना घेऊन आल्याची बातमी कंसाला सांगायला धांवला.

इकडे बलराम व कृष्ण मथुरेचीं प्रेक्षणीय स्थळें पहात हिंडूं लागले. त्यांच्याकडे नागरिक चकित होऊन पहूं लागले आणि त्यांचें रूप लावण्य पाहून कौतुक करूं लागले. कांहीं अंतर चालून गेल्यावर कृष्णाला रंगू धोबी दिसला. तो कपडे घड्या घालून व त्यांचें एक गाठोडें बांधून घेऊन जात होता. कृष्ण त्याला म्हणाला—"धोबीदादा! आम्ही दोघे कंसाला भेटायला जात आहों. आमच्या बेताचे चांगले धुतलेले कपडे देतोस का? राजाला भेटायला जायचें म्हणजे चांगले कपडे हवेत."

तें ऐकून धोब्याला राग आला. म्हणाला—"गवळ्याच्या पोरांना महाराज कंसाचे कपडे घालण्याची महत्वाकांक्षा कशाला? हे कपडे कोणाचे आहेत असें वाटलें तुम्हांला? महाराजांच्या दर्शनाला दूरदूरचे राजे महाराजे आले आहेत. त्यांनीं नजराणा म्हणून आणलेलीं हीं वस्त्रें आहेत. तुम्ही विकत घ्यायचे म्हटलें तरी तुम्हांला ते लाभणार नाहींत."



कृष्णाला धोब्याच्या उर्मटपणाचा राग आला. त्यानें लगेच धोब्याचा शिरच्छेद केला. धोब्याच्या बायका रडत ओरडत राजधानीभर आपलें गाऱ्हाणें सांगत हिंडूं लागल्या.

कृष्णानें कपड्यांचें गाठोडें सोडलें आणि आपल्या बेताचीं पीत वस्त्रें व बलरामासाठीं निळीं वस्त्रें काढून घेतलीं. नंतर कांहीं कपडे गंमत पहायला आलेल्या लोकांना वांटून दिले व म्हणाला—"मुळींच भिऊं नका. घालून खुशाल हिंडा फिरा." नंतर त्यानें धोब्याच्या घराला व उरलेल्या कपड्यांना आग लावली आणि बलरामाबरोबर पुढें निघाला.

एका जागीं गणक नांवाचा माळी दिसला. कृष्णानें त्याच्याकडे सुंदर व सुवासिक फुलें मागितलीं. बलराम व कृष्ण त्या माळ्याला सिद्ध योग्यासारखे वाटले. त्यानें त्यांना नमस्कार केला आणि म्हणाला—"महाराज! हीं सर्व फुलें आपलींच आहेत हवीं तीं आणि वाटेल तितकीं उचलून घ्या." नंतर त्यानें उत्तमोत्तम फुलें वेंचून त्यांना दिलीं व दोन सुंदर हार तयार करून त्यांच्या गळ्यांत घातले. ते हार गळ्यांत घातल्यावर तो माळी व जमलेले लोक चकित होऊन त्यांचें रूप पाहूं लागले.

ते राजमार्गाला लागले तेव्हां त्यांना समोर एक कुबडी दिसली. तिच्या हातांत एक पात्र होतें त्याच्यांतून सुंदर वास येत होता. तिच्या तोंडावरचा पदर बाजूला सारून त्यानें तिला विचारलें—"होय ग कुबडे! हें चंदन कोणासाठीं घेऊन चालली आहेस?"

"महाराज कंस स्नान करून या चंदनासाठीं वाट पहात बसले असतील! आणखी कोणी हें चंदन तयार केलेलें त्यांना नाहीं आवडत. मलाच हें उगाळून तयार करून न्यावें लागतें. मी उगाळून दिलेलें चंदनच ते अंगाला लावतात. तुला पाहिल्यावर हें सर्व सांगावेंसें मला कां वाटलें, नाहीं मला कळत. नाहीतर मी कोणाशीं बोलायला एक मिनिटभर देखील उभी रहात नाहीं. महाराजांच्या स्नानाची ही वेळ आहे."

"आम्ही परदेशांतले मल्ल आहोंत. आम्ही तुझ्या राजाच्या दर्शनाला व त्यांच्या राज्यांतल्या धनुष्य उत्सवांत भाग घ्यायला

आलों आहों. तूं स्वतःचें एवढें वर्णन केलेंस खरें. पण फक्त तुझ्या तोंडचें तें वर्णन ऐकून व नुसतें डोळ्यांनीं पाहून तुझ्या चंदनाचें कौतुक आम्हांला कसें काय करतां येईल? तूं आम्हांला हें चंदन लावायला दिलेंस तर आम्ही तें लावून ऐटींत दरबारांत बसूं व तुझ्या चंदनाचें वर्णन दरबारांतल्या लोकांसमोर करूं."

तें ऐकून ती स्मित करून म्हणाली– "घ्या ना हवें तेवढें. मी नको का म्हटलें आहे?" असें सांगून तिनें चंदन पात्रच त्यांच्या समोर ठेवलें आणि उरलेलें तेथें जमलेल्या मुलांना वांटून टाकलें. नंतर कृष्णानें त्या कुबडीचें कुबड सारखें करून तिला एक सुंदर स्त्री करायचें ठरवून तिच्या पायाच्या अंगठा आपल्या पायाच्या अंगठ्यानें दाबला आणि आपल्या हाताच्या एका बोटानें तिचें डोकें वर करून एकदां तिच्याकडे पाहालें. तत्काळ तिचें रूप पालटलें व ती एक रूपलावण्यवती तरुण स्त्री झाली. तिला स्वतःच्या रूप लावण्यावर आश्चर्य वाटूं लागलें. ती म्हणाली–"तूं कोणी तरी देवपुरुष दिसतो आहेस. माझ्यावर तूं हे जे उपकार केलेस त्याबद्दल मी आपलें



रूप तुझ्या रूपावर ओंवाळून टाकीन. तूं आज माझें आतिथ्य स्वीकारलें पाहिजेस. तूं माझें ऐकलें नाहींस तर मी तुझ्या पायांवर आपलें डोकें फोडून जीव देईन." असें म्हणत तिनें कृष्णाचे दोन्ही हात धरले.

"होय मी पुन्हां केव्हांतरी येईन. पण मला आत्तां फार जरूरीचें काम आहे. गेलें पाहिजेस. तूं माझी झालीस असा विचार करून मला आतां जाऊं दे." असें सांगून कृष्णानें आपले हात सोडवून घेतले आणि बलरामाबरोबर निघून गेला.



दोघे गवळ्याच्या पोरांसारखे पायींच चालत चालत कंसाच्या महालासमोर गेले. तेथें कंस महाराजांच्या अभिनंदनासाठीं आलेल्या राजा महाराजांची ये जा चालू होती. नजराणे म्हणून आणलेले घोडे, हत्ती, रथ व इतर सहस्रावधी सुंदर वस्तू पोंचल्या झाल्या होत्या.

आंत शस्त्रागार सजविण्यांत आलें होतें. तें पाहाण्यासाठीं मांडलिक राजे जमा झाले होते. असंख्य सैनिक शस्त्रागाराच्या संरक्षणार्थ उभे होते.

"कंस महाराजांचें धनुष्य येथेंच ठेवलें आहे का? तें पाहण्यासाठीं आलों आहों. कोठें आहे तें? आम्हांला पहावयाचें आहे." कृष्णबलरामांनीं सामान्य खेडवळ मुलांसारखें विचारलें. सैनिक त्यांना तें धनुष्य दाखवायला घेऊन गेले. तें तक्षकाच्या शरिरासारखें एक प्रचंड मोठें धनुष्य होतें.

तें पाहून कृष्ण म्हणाला–"असें सांगतात कीं यावर बाण चढविणें देव किंवा दानव यांपैकीं कोणालाच शक्य झालें नाहीं. खरें का खोटें पाहूं या तर!" असें म्हणत त्यानें धनुष्य घेऊन त्याची प्रत्यंचा म्हणजे दोरी धरून टंकार केला. त्या आवाजानें आसमंत हादरून गेलें. सर्व उभे राहून चकित होऊन पहात होते आणि सर्वांसमक्ष कृष्णानें त्याचे दोन तुकडे करून टाकले. ज्या धनुष्याच्या गौरवार्थ एवढ्या मोठ्या उत्सवाची तयारी करण्यांत आली होती तेंच धनुष्य तुटलें. कृष्ण लोकांच्या गर्दींत अदृश्य झाला, जणुं कांहीं काय झालें हें त्याच्या गांवी हि नव्हतें. शस्त्रागाराचे पाहारेकरी कंसाकडे धांवले व भीत भीत झालेला प्रकार त्यांनीं कंसासमोर निवेदन केला.














# अरण्यपुराण

[ १२ ]

बलदेव व कोळसेवाले एकामागून एक रांगेनें चालू लागले.

"मला वेळ घालवल्याशिवाय मनुष्यांच्या कळपांत शिरलें पाहिजे." मौवली म्हणाला.

"मग यांना कशीकाय वाट दाख-वायची ?" मोठ्या 'भावानें' भुकेल्या नजरेनें त्या लोकांच्याकडे पाहून विचारलें.

"काळोख पडण्यापूर्वी यांना गांवांत पोंचतां येऊं नये." मौवलीनें म्हणाला.

"म्हणशील तर घाण्याच्या बैलासारखा फिरवीत राहातों !" मोठा भाऊ म्हणाला.

"एवढें आवश्यक नाहीं. मधून मधून 'आलाप' काढून यांना गुंतवून ठेवलेंस कीं पुरे. काळ बाघ व तूं त्यांच्या बरोबर रहाल ना ? काळोख पडल्यानंतर गांवाबाहेर येऊन भेटा. भेटण्याची जागा मोठ्या भावाला माहीत आहेच." मौवली म्हणाला.

रानांतून मौवली गांवाच्या दिशेनें पळत निघाला. त्यानें दुरून पुढें पुढें खांद्यावर बंदूक टाकून घाबऱ्या डोळ्यांनीं चहूंकडे पहात जाणाऱ्या बलदेवला पाहिलें. त्याच्या पाठी मागून येणाऱ्या मौवलीच्या 'मित्र-मंडळींनीं' गायन सुरू केलें.

कोळसेवाले व बलदेव घाबरले. ते जवळच्या झाडावर चढून बसले. बलदेव तर मंत्राचा जपच करूं लागला.

मौवली झपझप रान तुडवीत जात होता. मेस्सुवा व तिचा नवरा, दोघांना सोडविण्याव्यतिरिक्त त्याच्या मनांत दुसरा विचार नव्हता. संध्याकाळच्या अंधुक प्रका-



शांत तो कुरणाजवळ येऊन पोंचला. गांव-करी शेतांतली कामें टाकून झाडाखालीं बसून गप्पा मारीत होते.

"या मनुष्यांना शिकारीचा नाद इतका आहे कीं यांना दुसरें कांहीं सुचतच नाहीं. काल यांनीं माझी शिकार करण्याचा विचार केला आणि आज मेस्सुवा व तिचा नवरा दोघांना पिंजऱ्यांत बंद करून ठेवलें आहे. मौवलीचे विचार चालू होते.

तो भिंतीच्या बाजूनें रांगत रांगत मेस्सूवाच्या झोंपडीपर्यंत आला. खिडकींतून त्यानें डोकावून पाहिलें. मेस्सुवा जमिनीवर पडलेली होती. तिचे हातपाय बांधलेले होते आणि तिच्या तोंडांत बोळे कोंबून ठेवले होते. ती कण्हत होती. तिच्या नवऱ्याला खाटेला बांधून ठेवलें होतें. घराचीं दारें बंद होतीं. बाहेर तिथे चौघेजण पाहारा देत होते.

गांवकऱ्यांच्या संबंधीची कल्पना मौव-लीला चांगली होती. खाणें नाहीं तर गप्पाष्टक. याशिवाय त्यांना आणखी कांहीं एक येत नव्हतें. मात्र खाणेंपिणें झाल्यावर त्यांच्या अंगांत येतें. इतकें कीं त्यांना मागचें पुढचें कांहीं दिसत नाहीं.

मौवली खिडकींतून आंत शिरला आणि मेस्सुवा व तिचा नवरा दोघांना सोडविलें. त्यानें मेस्सुवाचें तोंड बंद केलें नसतें तर ती ओरडणार होती. तिचें सर्व अंग ठणकत असावें. त्यामुळें तिला वेड लागल्यासारखें झालें होतें. त्याविषयीं गांवकऱ्यांनीं तिला काठीनें झोडपलें होतें.

मेस्सुवाचा नवरा थोडा रागावलेला परंतु असहाय स्थितींत दिसला. मेस्सुवानें मौवलीला पोटाशीं धरलें व म्हणाली—"तूं येशील हें मला माहीत होतें. होय, माझें बाळ...." असें म्हणत तिनें प्रेमानें मौवलीच्या डोक्यावर

हात फिरवला. मौवली तें सर्व स्वस्थपणें पहात होता. कदाचित त्याला बरें पण वाटत होतें. त्याचें त्यालाच आश्चर्य वाटलें.

मेस्सुवा कांहीं बोलली नाहीं. तिच्या सर्व अंगावरच्या जखमा मौवलीला दिसत होत्या, रक्ताचे डाग पाहून तो दांत ओठ चावून पाहूं लागला. मेस्सुवा व तिचा-नवरा दोघांच्या तें लक्षांत आलें.

"कोणाचें काम हें? याचा सूड घेतलाच पाहिजे." मौवली म्हणाला.

"सर्व गांवाचें काम आहे. सर्वांनीं मिळून केलें आहे. माझ्याकडे पुष्कळ गुरें आहेत. म्हणून आम्ही तुला आसरा दिल्याबद्दल आम्ही वाईट झालों." मेस्सुवाचा नवरा म्हणाला.

"मला नाहीं कळत तूं काय म्हणतोस तें. मेस्सुवाला बोलूं दे. ती सांगेल काय झालें तें." मौवली म्हणाला.

"मी तुला दूध पाजलें होतें. आठवतें? तें माझें बाळ, वाघोबा उचलून घेऊन गेला होता. तूंच! मी तुझ्यावर आपला जीव ओंवाळून टाकीन. म्हणून मी भुताची आई झालें. भुताच्या आईला ठार केलेंच पाहिजे." मेस्सुवानें थोडक्यांत सार सांगितलें.



"मरण कसें असतें हें मला माहीत आहे. पण भूत म्हणजे काय?" मौवलीनें विचारलें.

मेस्सुवा स्मित करून नवऱ्याला म्हणाली—"पहा, मी ओळखलें, हा माझाच मुलगा आहे."

"मुलगा असेल, नाहीं तर आणखी कोणी. आपली गणना आतां प्रेतांत, प्राण्यांत नाहीं." मेस्सुवाचा नवरा म्हणाला.

मौवलीनें खिडकींतून रानाकडे बोट दाखविलें व म्हणाला—"ही आहे जंगलाची वाट. तुमचे हातपाय मोकळे झाले आहेत."

"अरे! तुला जंगलाची माहिती आहे, तशी आम्हांला नाहीं. मला जास्त दूर चालवणार देखील नाहीं." मेस्सुवा म्हणाली.

"एवढ्यावरच का भागणार आहे गांवां-तले पुरुष आणि बायका तुटून पडतील आमच्या अंगावर आणि फरपटत ओढून परत घेऊन येतील." तिचा नवरा म्हणाला.

मौवली आपला सुरा काढला व त्यानें कांहीं तरी उभ्या आडव्या रेघा काढून म्हणाला—"कोणाच्या केसालाहि धक्का लावण्याची माझी इच्छा नाहीं. परंतु मी पाहतों कोण तुला अडविण्याची हिंमत करतो तें. एवढेंच नव्हे, माझ्यावर लवकरच कामाची आणखी मोठी जवाबदारी येऊन पडणार आहे." असें सांगून त्यानें डोकें वर केलें तर त्याला बाहेर ओरडा ऐकूं आला. तो ऐकून मौवली म्हणाला—"म्हणजे माझ्या मित्रमंडळींनीं बलदेवाला सोडला म्हणावयाचा."

"तुला ठार करायला सकाळीं गांव-कऱ्यांनीं त्याला पाठविलें होतें. तो तुला दिसला का?" मेस्सुवानें घाबऱ्या आवाजांत विचारलें.

"होय, दिसला होता. एकादी नवीन कपोलकल्पित गोष्ट घेऊन आली असेल स्वारी. त्याची ती गोष्ट संपण्यापूर्वीं आपण पुष्कळ काम करावयाचें आहे. मी जाऊन पाहून येतों कीं लोक काय करणार आहेत. तों पर्यंत तुम्ही कोठें जायचें हें ठरवा." असें सांगून मौवली खिडकींतून बाहेर पडला आणि गांवच्या वेशीलगतच्या भिंतीच्या बाजूनें झाडाजवळ जाऊन लोक काय बोलत आहेत हें ऐकत बसला.



त्यांनीं त्याच्याशीं आपले मैत्रीचे संबंध वाढविले होते. हा राजवल्लभ अलीवर्दी-खानाची मोठी मुलगी घुसती बेगम हिच्या पदरीं दिवाण होता.

सिराजउद्दौलानें गादीवर येतांच हुकूम काढला कीं इंग्रजांनीं किल्ल्याची तटबंदी वगैरे कामें बंद करावीं. त्यानें कसिम बाजार येथील इंग्रजांच्या वखारीचा अधिकारी वॉटस याला कळविलें कीं तुम्ही व्यापारी आहां व फक्त व्यापाराची म्हणून जितकी कामें आहेत तीं करीत राहलांत तर तुमच्या विरुद्ध तक्रार करण्याची जरूर पडणार नाहीं.

त्यानें इंग्रज गव्हर्नर ड्रेक याच्याकडे खलिता पाठविला कीं राजवल्लभच्या कुटुंबाला नबाबाच्या हातीं सुपुर्द करण्यांत यावें. राजवल्लभ याच्या कुटुंबांतील लोक त्यावेळीं इंग्रजांच्या आश्रयाला रहात होते. पण इंग्रजांनीं नबाबाची ही मागणी धुडकावून लावली.

सिराजउद्दौलानें ४ जून रोजीं कासिम-बाजार येथील इंग्रजांची वखार कार्बीज केली व नंतर तो १६ तारखेला सरळ कलकत्त्यावर चालून गेला. गव्हर्नर ड्रेक, त्यांचा सेनापति आणि त्यांचे इतर अधिकारी किल्ला सोडून आपल्या गलबतांत जाऊन लपून बसले. २० तारखेला फोर्ट विलियमचा किल्ला सिराजउद्दौलाच्या स्वाधीन झाला.

(सिराजउद्दौलानें शेवटपर्यंत हीच तत्परता शेवटपर्यंत राखली असती तर भारताच्या इतिहासाला निराळेंच वळण लागलें असतें. परंतु त्यानंतर जणुंकांहीं तो शापदग्ध झाल्यासारखा चुकामागून चुका करीत गेला आणि त्याच्या त्या चुकांचा इंग्रजांना खूप फायदा झाला.)





# थोडें खोटें

वल्लभीनगरीं कुमारदत्त नांवाचा एक श्रीमंत व्यापारी रहात असे. त्यानें धनदत्त नांवाचा व्यापाराची मुलगी श्रीमतीशीं विवाह केला. तिला मूल झालें नाहीं तेव्हां त्यानें एका गरिबाच्या मुलीला विकत घेऊन तिच्याशीं पण विवाह करून घेतला. तिचें नांव पुष्पा होतें.

वडिलांच्या मरणानंतर कुमारदत्त स्वतः व्यापार करूं लागला. परंतु कां कोणास ठाऊक, त्याला व्यापारांत फायदा झाला नाहीं. व्यापारांत जें भांडवल लावलें होतें तें तर तो गमावून बसलाच आणखी वर कर्जाचें ओझें डोक्यावर वाढलें. कर्ज फेडण्यासाठीं त्याला आपली बरीचशीं जमीन पण विकावी लागली. जे थोडे पैसे बाकी उरले तेवढ्यांत कुमारदत्तनें एका जागीं एक लहानसें घर विकत घेतलें. मोठ्या कष्टानें संसाराचा गाडा चालू होता.

धनदत्ताच्या घरीं म्हणजे कुमारदत्ताच्या सासुरवाडी कोणतें तरी शुभ कार्य आलें. म्हणून कुमारदत्त व श्रीमतीला जावें लागलें व पुष्पाला नव्या घरीं एकटीलाच रहावें लागलें.

धनदत्तानें जांवयाच्या गरीबीची माहिती गप्पा गोष्टी करीत असतां काढून घेतली. तो जांवयाला म्हणाला—"नुसतें बसून राहण्यांत काय होईल? मी तुम्हांला एक सहस्र मोहरा देतों. त्या घेऊन व्यापार सुरू कां नाहीं करीत? व्यापार चालूं लागला तर थोडें आणखी भांडवल पुरवीन.

कुमारदत्ताला तें ऐकून आनंद झाला. त्यानें श्रीमतीला तिच्या माहेरीच कांहीं



दिवस रहायला सांगितलें आणि सासऱ्यानें दिलेल्या हजार मोहरा घेऊन आपल्या एका मित्राच्या घरीं गेला.

जेवण झाल्यावर कुमारदत्त आपल्या घरीं पोंचला. पुष्पानें बराच वेळ दार वाजल्यावर दार उघडलें. कुमारदत्तानें मोहराची पिशवी खाटेवर ठेवली व विचारलें—"ही झोंप तरी झोंप का?"

पुष्पानें तिकडे दुर्लक्ष करून विचारलें—"पण हें सांगा, इतके पैसे आले कोठून?"

"तुला एका मित्राच्या घरीं गहाण ठेवून मी हे पैसे आणले आहेत. तो मित्र उद्यां येऊन तुला घेऊन जाईल." कुमारदत्तानें ही थाप मारली.

"म्हणजे मी आतां या घरांत रहायचें नाहीं का?" पुष्पानें घाबरून विचारलें.

"माझ्या हातांत तुला सोडवून आणण्या पुरेसे पैसे आले म्हणजे मी सोडवून घेऊन येईन. पण पुरेसे पैसे मिळाले नाहींत तर तूं त्याचीच होऊन जाशील." असें सांगून कुमारदत्त झोंपी गेला.

पुष्पा खेडेगांवांत राहणारी भोळी मुलगी होती. तिला भीति वाटूं लागली. आपलें घर सोडून परगृहीं जाणें तिला कसेंसेंच वाटूं लागलें. तिला कांहीं सुचेना.

आईबाबा सांगतील तें मी करीन, असा विचार करून पुष्पानें बाहेर येऊन दार बंद केलें.

मध्यरात्रीची वेळ. सर्व गांव झोंपलें होतें. गल्लींत थोडें अंतर चालत गेल्यावर तिला भीति वाटूं लागली. उजाडण्यापूर्वी वडिलांच्या गांवची वाट मिळणें शक्य नाहीं. म्हणून ती एका ओळखीच्या माणसाच्या घरीं निघून गेली. त्याच्या दाराची कडी वाजवून पाहिलें. सुदैवानें तो मनुष्य दार उघडून बाहेर आला व अवेळीं पुष्पाला आलेली पाहून त्यानें चकित होऊन येण्याचें कारण विचारलें.

म्हणाली—"काय करूं? माझ्या पतीनें मला कारणाशिवाय परक्याच्या घरीं गहाण ठेवलें आहे. मी आपल्या बाबांना जाऊन विचारणार आहे कीं त्यांचा काय सल्ला आहे? मी घरांत त्यांना कळविल्याशिवाय निघून आलें आहे. उजाडल्यावर तुम्ही जाऊन त्यांना कळवा कीं मोहरी निघून गेलें आहें. उद्यां सकाळपर्यंत मी येथेंच कोंपऱ्यांत पडून राहणार आहें."

उजाडेपर्यंत ती त्या ओळखीच्या गृहस्थाच्या घरीं झोंपून राहली. सारखी झोंप मोडत होती तिची. सकाळीं झोंप मोडल्यावर उठून ती आपल्या माहेरी निघून गेली. सूर्य चांगला वर आला तोंपर्यंत ती सुमारें एक मैल चालत गेली होती. परंतु ती इतकी दमून गेली कीं वाटेंतच घेरी येऊन पडली.

कांहीं वेळानें एक तरुण मनुष्य त्या वाटेनें आला. आदल्या दिवशींच तो आला होता आणि बरोबर आणलेला माल विकून तो आपल्या गांवीं परत



चालला होता. त्याचें गांवदेखील पुष्पाच्या आईवडिलांच्या गांवानजीकच होतें. म्हणून पुष्पा शुद्धीवर आल्यावर दोघें तिकडे निघालीं.

पुष्पा आपल्या घराचें दार उघडून आलेली व दार बाहेरूनच बंद करून दुसऱ्या एका घरांत गेलेली एका चोराला दिसली होती. तो कांहीं वेळ ती परत आली नाहीं हें पाहून कुमारदत्ताच्या घरांत शिरला. आंत दिवा मिणमिण जळत होता. कुमारदत्त घोरत पडला होता आणि खाटेवर मोहरांची पिशवी होती.












चोराच्या मनांत ती पिशवी उचलून नेण्याचा विचार आला. परंतु तितक्यांत कुमारदत्ताची झोप मोडली. "कोण तूं?" त्यानें चोराचा हात धरला. चोरानें हात सोडवून घेतला आणि तो एका खोलींत शिरण्याच्या प्रयत्नांत होता. कुमारदत्तानें त्याला खोलींत शिरून शेवटीं पकडलाच. चोराला खोलींत एक सुरा दिसला. त्यानें कुमारदत्तावर सुऱ्यानें वार केला आणि तो पळून गेला. कुमारदत्त जागच्या जागीं गतप्राण झाला.

सकाळीं उजाडल्यावर, पुष्पा ज्या घरीं रात्रीं राहली होती त्या घरचे लोक तिचा निरोप कळवायला आले तेव्हां त्यांना कुमारदत्तचें प्रेत दिसलें. पोलीस चवकशी झाली. त्यांत मोहरांची पिशवी घेऊन कोणी पळून गेल्याचें त्यांना कळलें. पुष्पावरच त्यांचा संशय होता. पुष्पा ज्या वाटेनें गेली होती त्या वाटेनें पोलीस शिपायांनीं पाठलाग केला. त्यांनीं पुष्पाला व तिच्याबरोबर जाणाऱ्या त्या तरुणाला अटक केली. त्याच्याजवळ पण एक हजार मोहरा होत्या. पोलिसांना व न्यायाधिशाला देखील पुष्पा व तिच्याबरोबरचा तो तरुण दोघे अपराधी असल्याची खात्री पटली. कुमारदत्ताचा खून केल्याच्या अपराधावरून त्याला फांशीची व तिला जन्मठेप तुरुंगवासाची शिक्षा झाली.

त्या तरुणाला फांशी देण्याची वेळ झाली त्यावेळीं तो खरा चोर आला. त्यानें आत्मरक्षणार्थ कुमारदत्ताचा खून केल्याचें कबूल केलें. पुष्पाची जबानी व चोराची जबानी एक होती. दोघांचा जीव वांचविल्याबद्दल न्यायाधिशानें चोराला पण माफ केलें.





# पाताळ कोट

[१५]

[गिद्धया राक्षसाच्या मदतीनें धूमक व त्याचे साथी खंदकांतून भुयारांत येऊन पोंचले. वाटेंत त्यांना राक्षसाचे कांहीं नोकर दिसले. त्यांची नजर चुकवून व स्वतःचा बचाव करून ते भुयाराच्या टोंकाशीं येऊन पोंचले तेव्हां त्यांना हत्तींच्या रथांत बसून जाणारा एक मोठा राक्षस दिसला.—पुढें]

तो हत्तीचा रथ निघून गेल्यावर धूमकनें आपल्या साथी मित्रांकडे वळून एकदां पाहिलें. ते घाबरले किंवा भ्याले तर नाहींत, या गोष्टीची खात्री करून घ्यायची होती त्याला. आतां ते सर्व संकटें पार करून कालकली राक्षसाच्या दंडकारण्यांत येऊन पोंचले होते. त्यांचीं खरीं संकटें यापुढेंच त्यांच्यावर कोसळणार होतीं.

सोमकनें धनुष्यबाण सावरून धरले. ज्या बाजूनें तो राक्षस गेला होता त्याच बाजूला धूमक पहात होता. विरूप आपला भाला फरशीवर पाजळवीत होता. त्यांच्या मनांत भय नांवाची वस्तु नजरेस मुळींच येत नव्हती. दोघे दांत ओठ चावून उभे होते व दोघांचा श्वासोच्छ्वास ऐकूं येईल इतक्या मोठ्यानें चालू होता.



"त्या रथांत बसून गेला तो पाताळ लोकाचा राजा कालकली राक्षसच असला पाहिजे यांत मला तरी शंका नाहीं." धूमक म्हणाला.

"मला देखील तेंच वाटतें. फक्त तूं इंगित केलें असतेंस तरी पुरलें असतें, मी एका बाणानें त्याचा मुडदा पाडला असता." सोमक म्हणाला.

"म्हणजे स्वतःच धोक्यांत उडी टाकण्यासारखें झालें असतें. तो मेला असता, पण त्याच्या पाठीमागून येणारे राक्षस आपल्यावर तुटून पडले नसते का? त्या दुष्ट राक्षसाचा वध करण्याचा सोपा उपाय धूमक भाऊंनीं विचार करून सुचवावा." विरूप म्हणाला.

विरूपचा तो दूरदर्शीपणा पाहून धूमकला आनंद झाला. त्यावेळीं पुलिंद बरोबर नव्हता, हें एक बरेंच झालें. तो बरोबर असता तर त्यानें सरळ कालिकलीलाच विचारलें असतें—"कायरे तूंच माझ्या बायकोला धरून आणलें आहेस नाहीं का?" आणि भाला घेऊन तो कालिकलीवर तुटून पडला असता.

"या भुयाराच्या वाटेनें आपण शत्रूच्या हातून निसटून आलों आहों तर या जंगलाच्या वाटेंत आपल्याला कोणी अडवूं शकेलसें मला वाटत नाहीं. भुयाराच्या तोंडाशीं बाहेर कोणीतरी पाहारा देत आहे. त्यांच्या पावलांचा आवाज नाहीं का ऐकूं येत तुम्हांला?" धूमकनें विचारलें.

विरूप व सोमक कांहीं वेळ लक्ष देऊन ऐकून म्हणाले—"एकाहून जास्त आहेत ते. त्यांच्या बोलण्याचा आवाजपण पुसट ऐकूं येत आहे."

"प्रथम या पाहरेकऱ्यांविषयीं थोडी माहिती काढली पाहिजे. आपण येऊनच कांहीं केलें तर आणखी राक्षस भुयारांत शिरतील. नाहींतर इकडून गेलेले राक्षस परत येतील." म्हणत धूमक दगडांखडकांआडून रांगत गेला आणि भुयाराच्या दारापलीकडे डोकावून पाहूं लागला. दाराच्या एका बाजूला झाडाखालीं एक राक्षस व चार मनुष्य बसले होते. त्यांचा आपसांत कोणत्यातरी प्रश्नावर वादविवाद चालू होता. त्यांच्यापैकीं एक जण मधून मधून उठून दूर जाऊन तलवार फिरवीत होता.

धूमक त्यांना पाहून थोडा घाबरला. शत्रूच्या डोळ्यांत धूळ फेंकून भुयारांतून बाहेर जंगलांत पळ काढणें त्याला अशक्य वाटूं लागलें. आतां काय करावें? असा विचार करीत धूमक आपल्या साथी मित्रांकडे परतणार एवढ्यांत दूर कोठेंतरी शंख फुंकल्याच्या आवाज त्याला ऐकूं आला. तो ऐकतांच चार पाहारेकरी झाडाखालून निघून गेले व तो तलवार फिरवणारा हातांतली तलवार खालीं टाकून भुयाराच्या दाराकडे येऊं लागला.

धूमक चटदिशीं आपल्या साथी मित्रांजवळ आला. त्यानें जें कांहीं पाहिलें होतें तें थोडक्यांत सांगून म्हणाला—"हे दुष्ट



दुपारच्या जेवणासाठीं निघाले असावेत. हा शंख त्यासाठींच वाजत असेल. त्यांच्यापैकीं एकजण आपल्याकडे येत आहे."

इतक्यांत तो राक्षस नोकर भुयाराच्या दारावर येऊन पोंचला. त्यानें आंत संदिग्ध दृष्टीनें डोकावून पाहालें. त्याला पुटपुटण्याचा आवाज ऐकूं आला. ओरडून त्यानें विचारलें—"कोण तें बोलतें आहे? राक्षस कीं मनुष्य?"

"धूमकनें आपल्या साथी मित्रांना खूण करून सांगितलें कीं तो आंत शिरल्याबरोबर त्याला पकडायचें, आणि तो स्वतः एका



खडकाआडून जरा खाकरला. खाकरण्याचा आवाज ऐकून तो राक्षस म्हणाला—"कोण रे तो? माझ्याशीं थट्टा चालविली आहेस होय?" त्यानें आपली तलवार काढली व ती फिरवीत तो आंत शिरला. लगेच तिघे उभे राहाले व त्याच्या चारी बाजूला उभे राहून म्हणाले—"तलवार टाक खालीं. तुझ्या जिवाला धोका नाहीं."

"कोण तुम्हीं? तुम्हां क्षुद्र किड्यांना भिऊन मी शस्त्र खालीं ठेवूं म्हणतां? तुम्ही येथें आलांत कसे? प्रथम तुम्हींच आपापलीं शस्त्रें खालीं ठेवून हात जोडून समोर उभे रहा. मी कोण हे तुम्ही ओळखलें नाहीं असें दिसतें. या दंडकारण्यांत तलवार चालविण्यांत माझी बरोबरी करूं शकेल असा एक जण देखील नाहीं, लक्षांत ठेवा." तो म्हणाला.

त्याच्या वल्गना चालूच होत्या, इतक्यांत धूमकनें आपल्या तलवारीच्या मुठीनें त्याच्या डोक्यांत प्रहार केला. त्याबरोबर कळवळून तो ओरडला आणि जमिनीवर धाड्‌दिशी पडला. धूमकनें आपल्या साथीदारांना त्याला बेशुद्ध स्थितींत रानांत उचलून नेणें बरोबर होईल अशी सूचना केली व म्हणाला—"म्हणजे त्याच्याकडून कालिकली राक्षसाच्या पाताळ दुर्गांतली खडान् खडा माहिती मिळूं शकेल."

सोमक व विरूप दोघांनीं त्या राक्षसाला खांद्यावर उचलून घेतलें व चालूं लागले. धूमक सर्वांत आधीं भुयाराच्या दाराबाहेर आला. तेथें कोणी शत्रू नव्हता. परंतु झाडींत शिरण्यापूर्वीं सुमारें पांच सहाशें पावलें चालून जायचें होतें.

"झपझप पावलें उचला, आपण झाडींत शिरून जाईपर्यंत संकटांतून व धोक्यांतून आपल्याला सुटका नाहीं, लक्षांत असूं द्या."



धूमकनें या शब्दांत आपल्या साथीदारांना सावध केलें. ते पळूं लागले तेव्हां राक्षसाला हळूहळू शुद्ध येऊं लागली. तो ओरडूं लागला. "शत्रू, शत्रू! पकडा, पकडा!"

"वेळ घालवण्यांत अर्थ नाहीं. याला भुयारांत द्या फेंकून आणि या माझ्या पाठोपाठ पळत." धूमक म्हणाला. लगेच दोघांनीं त्याला भुयाराच्या फरशीवर "जा, मर!" म्हणून फेंकून दिलें आणि धूमकबरोबर पळूं लागले.

ते तिघे मैदान पार करून झाडींत शिरले. त्यांना कोणी राक्षस पाहारेकऱ्यानें पाहिलें नसावें. सारें जंगल शांत होतें. सूर्य पश्चिमेकडे पुष्कळ उतरून गेला होता. झाडींत लपून बसून राहल्यास कालिकली राक्षसाच्या दंडकारण्याविषयीं माहिती मिळणें शक्य नव्हतें. ही गोष्ट धूमकला कळत होती.

आपण कोठें जात आहों, या गोष्टीचा विचार केल्याशिवाय धूमक खोल झाडींत पुढें पुढें चालला होता. पाठीमागून येणाऱ्या आपल्या साथीदारांत तो म्हणाला—"आज रात्रीं रानांत जीं फळेंमुळें मिळतील त्यांवर भागवून घेऊं. समोरच्या डोंगरांत एखादी राहण्या जोगी गुहा पाहून उद्यांपासून तींत राहूं."



सोमकनें होकारार्थी मुंडी हलविली. विरूपनें चारी बाजूला सशंक दृष्टीनें एकदां पाहिलें व म्हणाला—"इतकें भयंकर जंगल मी या आयुष्यांत कोठें पाहिलें नाहीं. मी तुम्हांला पूर्वींच सांगितलें होतें, आठवत असेल तुम्हांला, कीं या जंगलांत कोठें तरी कालशंबर नांवाचा मांत्रिक राहतो. त्याची माझी भेट होऊं शकली तर....!"

विरूप बोलतच होता व त्याचें बोलणें अद्याप पुरें झालें नव्हतें, एवढ्यांत धूमकच्या जवळचा मंत्रदंड 'किच किच' करून हालूं लागला आणि समोरच्या डोंगराकडे त्याला



ओढूं लागला. धूमक आनंदातिरेकानें म्हणाला- "इतके दिवस आपण जवळ जवळ विसरलोच होतो, याला. मांत्रिक कालिकली राक्षसाच्या हातीं सांपडला नसून इकडेच कोठेंतरी लपून बसला आहे. बहुतेक तो समोरच्या डोंगरांतच कोठें तरी असेल. नंतर कांहीं वेळ लक्षपूर्वक त्या डोंगराकडे पाहून तो म्हणाला—"काळोख पडण्यापूर्वी आपण त्या डोंगरावर पोंचलें पाहिजे. तुम्ही झाडावर चढून पहा तर कोणी राक्षस जवळपास आहे का?"

सोमक व विरूप उंच झाडावर चढले. पांच सहा मिनिटें ते चारी बाजूला पहात राहले. नंतर घाईघाईनें खालीं उतरून आले. विरूप धूमकजवळ जाऊन म्हणाला— "धूमूभाऊ, स्वतःच्या डोळ्यावर माझा विश्वास बसत नाहीं हो. खरें, अगदीं खरें! राक्षस व त्याचे नोकर जागों जागीं जंगल कापून शेती करूं लागले आहेत. शेतें नांगरायला व गाडी ओढायला ते कोणत्या जनावरांचा उपयोग करीत आहेत माहीत आहे का? हत्ती, वाघ इत्यादींचा!"

"मनुष्यांना व रानटी श्वापदांना शिकार करून खाणारे राक्षस शेती करूं लागले आहेत. आश्चर्याची गोष्ट आहे. बरें, पाहारेकरी कोठें आहेत? शत्रूची दृष्टी पडल्याशिवाय आपल्याला डोंगरापर्यंत पोंचतां येईल का?" धूमकनें विचारलें.

"ते सर्व दुष्ट आपापल्या कामांत गर्क आहेत. शेतकीच्या कामाला लागणारीं हत्यारें कायतीं त्यांच्याकडे आहेत. मी त्यांच्यावर बाणांचा वर्षाव करूं का?" सोमकनें विचारलें.

"घाईंत असलें कांहीं करूं नकोस. असें कांहीं केलेंत तर आपण येथें लपून बसलों आहों ही बातमी स्वतःच देण्यासारखें









होईल. जरा सावधगिरीनें डोंगराकडे जाऊं या." असें सांगून धूमक निघाला.

इतक्यांत सुयाराच्या वाटेच्या दारावर कांहीं तरी ओरडा ऐकूं आला. लगेच तिघे झाडावर चढले आणि सुयाराकडे पाहूं लागले. तेव्हां त्यांना तो तलवार फिर-विण्यांत पटाईत राक्षस व त्याच्या बरोबरचे इतर पाहरेकरी मोठमोठ्यानें कांहीं तरी बोलत असलेले दिसले. तो राक्षस त्यांना हातवारे करून कांहीं तरी दाखवीत होता.

"सोम्, विरूपा! तो आपल्याविषयींच कांहीं तरी त्यांना सांगत आहे. थोड्याच वेळानें राक्षस आपला पाठलाग करणार. चला लवकर डोंगराच्या दिशेनें पळून जाऊं या." असें सांगून धूमक झाडावरून खालीं उतरून पळूं लागला व त्याच्या पाठीमागून दोघे पळूं लागले.

सुमारें अर्धा तासपर्यंत ते सारखे पळत होते. त्यांनीं मागें वळून सुद्धां पाहिलें नाहीं. ते डोंगराच्या पायथ्याशीं पोंचले. त्या डोंगरावर व पायथ्याशीं दाट झाडी होती. समोर त्यांना एक धबधबा लागला. तो पाहून सोमक म्हणाला—"मला तहान लागली आहे. देवाचा भरंवसा आहे आपल्याला." तो पाण्यांत उतरून पाणी पिऊं लागला. लगेच धबधबा थांबला. पाणी जागच्या जागीं थांबलें. धबधब्याच्या जागीं त्याला दारासारखें कांहीं तरी दिसलें. घाबरून जाऊन ते समोर पहात पुढें जात होते. तेथें त्यांना काळशंबर मांत्रिकाची सांवली दिसली. ते जवळ पोंचतांच दार उघडलें. ती सुद्धां एक गुहाच होती. आंत विस्तव जळत होता.

[ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]



# विवेकी

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतलें व स्मशानाच्या दिशेनें मौनपणें चालूं लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तुझ्यासारख्यानें भोगविलास करायचें सोडून अशा तऱ्हेनें कष्ट सोसावयाचे नसतात. मागें नागेंद्र नांवाच्या एका कोट्याधीशाला संकटसमयीं आपल्या नोकराच्या आश्रयाला धांवावें लागलें होतें. तुला कंटाळा येऊं नये म्हणून मी त्याची गोष्ट सांगतों, लक्ष देऊन ऐक." असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

नागेंद्र पश्चिमी किनाऱ्यावर रहात असे. तो व्यापार करून कोट्याधीश झाला. त्याला सचिव नांवाचा मुलगा व सुलोचना नांवाची



मुलगी अशीं दोन अपत्यें होतीं. नागेंद्र फक्त श्रीमंत कोट्याधीशच नव्हता तर फार मोठा उदार, दानी व न्यायप्रिय पण होता.

नागेंद्राच्या घरीं समीर नांवाचा एक तरुण मुलगा नोकरीला होता.

एकदां नागेंद्राला त्याच्या मेहुण्यानें आपल्या मुलीच्या लग्नाला सकुटुंब येण्यास फार आग्रहानें बोलाविलें. नागेंद्र आपल्या मुलांना व बायकोला बरोबर घेऊन आपल्याच एका गलबतांत बसून मेहुण्याच्या गांवीं निघाला. बरोबर त्याचा नोकर समीरपण होताच. लग्नसमारंभ निर्विघ्न पार पडला आणि नागेंद्र सकुटुंब घरीं निघाला. वाटेंत एक मोठें वादळ आलें आणि त्याचें गलबत एका निर्जन बेटाच्या खडकावर आदळून फुटलें.

त्या निर्जन बेटावर कसें रहावयाचें व आपला उदरनिर्वाह कसा करावयाचा हें नागेंद्राला कळेना. तेथें रहायला घर नव्हतें व अन्नवस्त्र कसें व कोठून मिळवायचें हें कळायला मार्ग नव्हता. अशा संकटसमयीं समीरनें त्यांना मदत केली.

तो फुटून गेलेल्या गलबतांतून आवश्यक सर्व साहित्य घेऊन आला. त्यानें एक छोटेंसें घर तयार केलें. शिकार करून व कंदमुळें आणून त्यानें सर्वांच्या उदरनिर्वाहाची व्यवस्था केली.

अशाप्रकारें समीर नागेंद्राच्या कुटुंबाचा प्रमुख कर्ता पुरुष झाला. तो सांगेल त्यांतच सर्वांचें हित व कल्याण आहे असें समजून प्रत्येक त्याच्या सांगण्याप्रमाणें वागे.

अशा तऱ्हेनें कांहीं वर्षें लोटलीं. समीर दररोज सकाळीं उजाडल्यापासून तो सूर्य-मावळेपर्यंत डोंगराच्या शिखरावर चढून दूरवर कोठें जहाज किंवा गलबत दिसतें का पाहात राही. परंतु कित्येक दिवस असा





प्रयत्न करून हि त्याला यश आलें नाहीं. गलबत किंवा जहाज तर दूरच, लहान होडकें सुद्धां त्याच्या नजरेसमोर आलें नाहीं.

नागेंद्राच्या कुटुंबांतील लोक आपल्या जुन्या आवडी निवडी व संवयी जवळ जवळ विसरूनच गेले. त्यांना नवीन जीवनाची हळू हळू संवय झाली. नागेंद्राची मुलगी सुलोचना लहानाची मोठी झाली. नागेंद्रानें समीरशीं आपल्या मुलीचें लग्न करून देण्याचें ठरविलें. सर्वांनाच त्यांत वावगें असें कांहींच वाटलें नाहीं.

तो निश्चय झाल्यानंतर दोनच दिवसांनीं त्यांच्या बेटाजवळून एक नाव जाऊं लागली. ती नाव जात असतां समीर स्वतःच डोंगराच्या शिखरावरून ती पहात होता. त्यानें काटक्या गोळा करून मोठा जाळ केला आणि ओल्या काटक्या घालून पुष्कळ धूर केला. तो धूर नावेंतल्या लोकांना दिसला आणि त्यांनीं बेटावर ती नाव आणली. ती नाव आणखी एका व्यापाऱ्याची होती. नागेंद्राचें गलबत त्याच बाजूला कोठेंतरी फुटलें असल्याचें त्या व्यापाऱ्याला कळलें होतें. सर्व सुखरूप भेटल्याबद्दल त्याला फार आनंद झाला व त्यानें नागेंद्राच्या कुटुंबांतील सर्व लोकांचें अभिनंदन केलें. आपल्या नावेंत त्यांना बसवून घेऊन त्यानें त्यांना स्वदेशीं पोंचतें केलें.

स्वदेशीं पोंचल्यावर दुसऱ्या दिवशीं समीर नागेंद्राला जाऊन म्हणाला—"मला आतां निरोप द्या!" नागेंद्रानें प्रथम परवानगी द्यायला कबूल झाला नाहीं. परंतु त्यानें निरोप मिळावा असा हट्टच धरला तेव्हां त्याला प्रेमानें पुष्कळसें धन देऊन नागेंद्रानें निरोप दिला.

येथवर गोष्ट सांगून वेतालानें विचारलें—"राजा! मला एक शंका वाटते. समीर-

       

सारख्या स्वामिभक्त सेवकानें आपल्या धन्याची संकटसमयीं मनोभावें सेवा करून, धनी त्या संकटांतून मुक्त झाल्याबरोबर असें एकाएकीं सोडून कां जावें? त्याचें लग्न सुलोचनाशीं ठरलें होतें आणि नागेंद्र वचन दिल्याप्रमाणें वागणारा होता. त्यानें मुलीचें लग्न खात्रीनेंच समीरशीं करून दिलें असतें. तो फायदा त्यानें कां पदरांत पाडून घेतला नाहीं? या प्रश्नांचीं उत्तरें माहीत असून तूं दिलीं नाहींस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

विक्रमार्क म्हणाला—"निर्जन बेटावर पोंचल्यानंतर सर्वांचे विचार, भावना व जीवन सर्वांत बदल झाला होता. तेथील जीवनांत नागेंद्र मालक नव्हता व समीरपण नोकर नव्हता. त्या बदललेल्या परिस्थितींत नागेंद्रानें आपल्या मुलीचें लग्न समीरशीं करून देण्याचें ठरविलें होतें. परंतु पुन्हां वाईट दिवस जाऊन चांगले दिवस पालटले होते. मधल्या संकट काळीं जमून आलेलीं नातीं कायम मानणें कितपत बरोबर होईल हा विचार समीरनें केला. याशिवाय समीर त्यापुढें नोकर म्हणून व नागेंद्र धनी म्हणून राहणें पण शक्य झालें नसतें. नागेंद्र धर्मभीरु होता, म्हणून त्यानें वचन दिल्याप्रमाणें आपल्या मुलीचें लग्न समीरशीं करूनहि दिलें असतें परंतु त्या विवाहानें सुलोचनाहि सुखी झाली नसती व समीरदेखील सुखी झाला नसता. या गोष्टींचा विचार करून समीर निघून गेला."

अशा तऱ्हेनें राजाचें मौनभंग होतांच वेताळ प्रेताबरोबर नाहींसा झाला आणि झाडाच्या फांदीला जाऊन लोंबकळूं लागला.





# धर्मभीरु खलीफा

खलीफा उमर हे एक आदर्श पुरुष होऊन गेले. त्यांच्या पदरीं कोणी नोकरी धरली तर त्याला चार गोष्टी शपथ घेऊन कबूल कराव्या लागत. सवारीच्या घोड्यां-वरून ओझीं वाहण्याचें काम घेणार नाहीं. शत्रूच्या राज्यांत लूटमार करणार नाहीं. किंमती वस्त्रें अंगांत घालणार नाहीं. आणि नमाज प्रार्थनेला उशिरां जाणार नाहीं.

"बुद्धि हेंच धन, बुद्धीची जागरूकता हें रक्षणाचें साधन आणि अध्ययन हीच खरी कीर्ति" असें ते सांगत.

उमर खलीफा असतांना मुऐकब नांवाचा एक वृद्ध मनुष्य त्यांच्या पदरीं खजिनदार म्हणून काम करींत असे. एकदां खलीफांचा मुलगा आपल्या आजीबरोबर खजिनदारा-च्या घरीं गेला असतां खजिनदारानें एक चांदीचें नाणें त्याला दिलें. ही गोष्ट खलिफाला कळल्याशिवाय कशी राहणार?

खलीफानें खजिनदाराला बोलावून विचारलें—"तसें करणें बरोबर झालें का?" मुऐकबनें विचारलें—"काय चुकलें मालक!"

"माझ्या मुलाला चांदीचें एक नाणें देणें म्हणजे सर्व मुसलमानांच्या जातीला लुटण्यासारखें आहे." खलीफा म्हणाले.

"इतकी न्यायबुद्धि असलेला दुसरा कोण आहे या जगांत?" मुऐकब आयुष्यभर तेंच आठवून म्हणे.

एकदां खलीफा रात्रीं असलम अबू जैद याच्याबरोबर कोठें तरी जात असतां त्यांना दूर कोठें तरी विस्तव दिसला. जवळ जाऊन पाहिलें तर एक म्हातारी एका हांडींत

श्री. मुजावर अहमद मुकादम

कांहीं तरी शिजवीत होती. तिच्याजवळ दोन मुलें रडत बसली होतीं.

खलीफांनीं विचारलें—"काय करतां आहां आजी?"

"माझीं नातवंडें थंडीनें काकडून गेलीं आहेत व भुकेनें त्यांचा जीव कासावीस झाला आहे. मी त्यांच्यासाठीं पाणी तापवतें [illegible] आहें. [illegible]

दोघांपैकीं कोणाला, केव्हां दिसेल कोणास ठेव पाहूं."

ठाऊक?" म्हातारी म्हणाली.

"खलीफा तुझी गरीबी पाहून स्वस्थ बसतील का?" खलीफा उमर म्हणाले.

"आपल्या प्रजेच्या सुखदुःखाची ज्याला माहिती नाहीं त्यानें खलीफा व्हावेंच कशाला?" म्हातारी म्हणाली.

असलम अबू जैद याच्याबरोबर खलीफा जेव्हां आपल्या राजवाड्यांत परत गेले तेव्हां एका पोत्यांत पीठ व एका मोठ्या भांड्यांत बकरीची चरबी घालून ते खलीफा अबू जैदला म्हणाले—"हें माझ्या पा[illegible]

"मी घेऊन जातो." अबू जैद म्हणाले.

"अल्लाच्या दरबारांत ज्या दिवशीं न्याय निवाडा होईल त्या दिवशीं माझ्या पापाचें ओझें तूं उचलून घेऊन जाणार आहेस का?" खलीफांनीं विचारलें.

खलीफांनीं स्वतः तें पीठ व चरबी म्हातारीच्या घरीं पोंचती केली आणि स्वतः चूल पेटवून सैंपाकाला लागले, तेव्हां धूर व राख त्यांच्या दाढीला लागली. सैंपाक झाल्यावर खलीफांनीं म्हातारीला व तिच्या नातवंडांना तें पुरे म्हणे पर्यंत जेवायला वाढलें. प्रत्येक घास बेताचा ऊन आहे हें पाहून मुलांना भरविला. उरलेलें म्हातारीकडेच ठेवून दिलें.

"अग्नि दिसला व ज्ञानोदय झाला." खलीफा अबू जैदला म्हणाले.



एकदां खलीफा उमर कोठें तरी निघाले. त्यांना एक गुलाम मालकीचीं मेंढरें चरायला घेऊन आलेला रानांत दिसला. खलीफा उमर थांबले. गुलाम धनगराला एक मेंढी विकत देतोस का म्हणून विचारलें. तो म्हणाला—"मेंढरें माझीं नाहींत."

"तूं गुणी दिसतोस. मी तुला तुझ्या मालकाकडून विकत घेऊन मुक्त करतों. तुझ्यासारखे इमानदार फार थोडे आहेत." उमर खलीफा म्हणाले.

एकदां खलीफांकडे त्यांच्या नात्यांतली हप्सा नांवाची एक बाई आली व



       



म्हणाली—"मागच्या युद्धांत तुला पुष्कळ धन मिळालें असें ऐकतें. एक नातेवाईक म्हणून त्यांतलें थोडें धन मागायला आलें आहें मी."

"हफ्सा, अल्लानें मला मुसलमानांच्या संपत्तीचा रक्षक म्हणून नेमलें आहे. हें धन त्यांचें आहे. तुझें नातें माझ्या वडिलांच्या-कडून आहे. तुला खूष करण्यासाठीं मी कांहीं करूं शकत नाहीं. या धनाचा उपयोग स्वतःच्या सुखसोईसाठीं सुद्धां मला करतां येणार नाहीं." खलीफा म्हणाले.

एकदां खलिफा कांहीं आसन घातल्या-शिवाय जमिनीवर बसून उपदेश करीत होते. तेव्हां मसलम नांवाचा व्यक्ति त्यांना म्हणाला—"तुमच्या सारख्या थोर पुरुषांनीं असें जमिनीवर बसणें शोभत नाहीं. निदान गादी घालून घ्यायची होती."

खलीफा स्मित करून म्हणाले—"तुमच्या म्हणण्याप्रमाणें मी कबरेंतून उठेन तेव्हां एक गादीपण माझ्याबरोबर उठली पाहिजे. होय ना?"

त्या काळांत सामान्य माणसांत देखील केवढी सदसद् विवेकबुद्धि होती. खलीफा उमर यांच्या कारकीर्दींत घडलेली एक गोष्ट आहे.

एकदां एक मनुष्य आपलीं मेंढरें चरायला घेऊन गेला होता. त्याच्या तरुण मित्रानें मेंढराच्या कळपांत दोन कुत्रीं पाहून त्याला विचारलें—"कळपांत या मेंढरांबरोबर कुत्रीं कशासाठीं ठेवली आहेस बाबा?"

"तीं कुत्रीं नसून पाळलेले लांडगे आहेत. मी या कळपाचा मालक आहें. म्हणून ते माझें कांहीं नुकसान करणार नाहींत. मनांत कांहीं कलुष नसेल तर शरीरपण निरोगी राहातें." मेंढरें पाळणारा मनुष्य म्हणाला.





# पितृप्रेम

एका गांवीं रामू नांवाचा मनुष्य रहात असे त्याच्या बायकोचें नांव होतें सीता. गांवाला लागूनच त्यांची थोडी शेतजमीन होती. शेताजवळच एक झोपडें बांधून दोघं रहात असत. त्यांना आवश्यक तें सर्व धान्य त्यांच्या शेतांत पिके. इतर सामान ते आठवड्याच्या बाजारांतून विकत घेऊन येत.

त्यांना फक्त एकाच गोष्टीची उणीव भासे. त्यांना अपत्य नव्हतें. सीतानें किती नवस केले, व्रतें अनुष्ठानें केली तीर्थयात्रा केली. शेवटीं ईश्वर कृपेनें फार उशिरां त्यांना एक मुलगा झाला. मुलाचें तोंड पाहून आईबापांना आनंद झाला. त्यांनीं मुलाचें नांव शिवू ठेवले व दोघं त्याचे सर्व लाड पुरवूं लागलीं.

शिवू मोठा झाल्यावर दोघांनीं त्यांचें लग्न करून दिलें. घरांत सून आल्यावर त्यांना मुलीची उणीव पण भासतनाशी झाली. लवकरच शिवूला एक मुलगा झाला. मग दोघां म्हाताऱ्या म्हातारीच्या आनंदाला पारावारच उरला नाहीं.

शिवू एक मुलाचा बाप झाला होता तरी त्याच्या आईबापांनीं मुलाला शेतीच्या कामाला लावलें नाहीं. दोघं स्वतःच सर्व कामें पहात. आपल्या म्हाताऱ्या बापाला मदत करतां आली नाहीं म्हणून शिवूला वाईट वाटूं लागलें. कधीं काम करण्याची संवय नसल्यानें त्याला काम करतां येत नव्हतें.

एकदां शेत नांगरायला रामू बैलं व नांगर घेऊन निघाला. कडक ऊन पडलें होतें. त्या कडक उन्हांत बापाला काम

सौ. शांताबाई मोडोळ

करीत असलेला पाहून मुलाच्या मनाला फार वाईट वाटलें. तो जवळ गेला व बापाच्या हातांतला नांगर घेऊन म्हणाला—"बाबा! आईनें घरीं जेवायला बोलाविलें आहे. तुम्ही येईपर्यंत मी थोडा वेळ नांगरतों शेत."

रामू घरीं गेला. आंघोळ करून जेवला आणि विश्रांती घेतल्याशिवाय घराबाहेर आला. कडक उन्हांत मुलाला शेतांत नांगर हातीं धरून काम करीत असलेला पाहून त्याला रहावेना. लगेच काचा मारून मुलाजवळ गेला. म्हणाला—"पहा, केवढें ऊन पडलें आहे तें. तूं प्रथम घरीं जा, पाहूं." असें सांगून तो नांगर आपल्या हातांत घेऊं लागला.

शिवूला बापाचें तें बोलणें ऐकून हंसूं आलें. त्यानें नांगर सोडला नाहीं. तो आणखी जोरजोरानें काम करूं लागला. रामूनें कितीदां "मी नांगरतों रे" असें म्हटलें. परंतु शिवूनें तिकडे दुर्लक्ष केलें. रामूनें बराच वेळ विचार केला व घरीं जाऊन शिवूच्या मुलाला बाहेर घेऊन आला आणि त्याला शेताच्या कडेला उन्हांत निजवलें.

मुलाला पाहून शिवूनें नांगर सोडला. धांवत मुलाजवळ गेला व डोक्याला बांधलेलें उपरणें सोडून मुलाच्या अंगावर टाकीत म्हणाला—"बाबा, हें हो काय? एवढ्याशा मुलाला या उन्हांत आणून ठेवलेंत?"

रामू स्मित करून म्हणाला—"तुझें तुझ्या मुलावर जेवढें प्रेम आहे तेवढेंच माझें माझ्या मुलावर आहे! पितृप्रेम हें कसें असतें, हें कळलें का?"






# भाग्य चक्र

एका गांवीं लक्ष्मणराव नांवाचे एक गृहस्थ रहात असत. त्यांना दोन मुलें होती. त्यांना आपल्या घरांत सर्व सुख होतें. एकदां एक ज्योतिषी त्यांच्या घरीं आला. त्यानें लक्ष्मणरावांचा हात पाहिला आणि म्हणाला—"तूं जोंपर्यंत हें स्थान सोडीत नाहींस तोंपर्यंत तुझें नशीब उदयास येणार नाहीं. वर्षभर तुला नाना प्रकारचे कष्ट सहन करावे लागतील. त्यानंतर राजयोग सुरू होईल व तुला कीर्ति व प्रतिष्ठा दोन्हींचा लाभ होईल."

लक्ष्मणरावांच्या मनांत राजयोग प्राप्त करण्याची व कीर्ति आणि प्रतिष्ठा मिळविण्याची अनावर इच्छा उत्पन्न झाली. त्यांनीं त्यांच्याकडे जें कांहीं होतें तें सर्व ज्योतिष्याला देऊन टाकलें आणि बायका मुलांना घेऊन प्रवासाला निघाले.

दोन दिवसांनीं लक्ष्मणराव सकुटुंब एका गांवीं येऊन पोंचले. एका खानावळवाल्याकडे जाऊन म्हणाले—"मी व माझ्या कुटुंबांतली सर्व मंडळी सर्व काम धंद्याच्या शोधार्थ निघालों आहों. तुम्ही रहायला जागा व खायला अन्न दिलेंत तर तुम्ही सांगाल तें काम करायला आम्हीं तयार आहों."

खानावळीच्या मालकिणीनें लक्ष्मणरावांना रानांत जाऊन रोज लाकडें फोडून आणायला सांगितलें. तिनें लक्ष्मणरावाच्या बायकोला सैंपाकाला लावलें आणि इतर सर्व काम दोघां मुलांना करायला सांगितलें.

एके दिवशीं त्या खानावळींत एक व्यापारी जेवायला आला. जेवतांना त्यानें लक्ष्मणरावाची बायको चंपावती हिला पाहिलें व तिच्या रूपावर तो मोहित झाला. त्यानें

सौ. सरलाबाई पाटील



खानावळीच्या मालकिणीकडे चवकशी पण केली. ती तोंडावर हात ठेवून म्हणाली—"अगो बाई! अहो, तिचा नवरा व दोघी मुलें पण येथेंच आहेत."

व्यापारी खानावळीच्या मालकिणीच्या हातांत रुपयाची एक मोठी थैली ठेवून म्हणाला—"तुला कांहीं करण्याची गरज नाहीं. तूं चंपावतीला कांहींतरी कारण सांगून घाटावर घेऊन ये. तेथें माझी नाव तयार असेल."

खानावळवालीला पैशाच्या लोभ आवरला नाहीं. संध्याकाळीं ती चंपावतीला म्हणाली—"आज घाटावर जाऊं. तेथें नावेंत सैंपाकाला लागणारें सर्व सामान आलें आहे. घेऊन येऊं."

संध्याकाळीं मालकिणीबरोबर चंपावती घाटावर गेली. किनाऱ्यावरून नावेंत जायला एक फळी लावली होती. ती दाखवून खानावळवाली म्हणाली—"मला भीति वाटते बाई! पाय घसरेल. तूं जातेस का? पहा, आपल्याला लागणारें काय काय सामान आंत आहे तें." असें सांगून ती नदी काठावरच्या वाळूंत बसली.

व्यापाऱ्यानें नावेंतल्या नोकरांना काय करायचें तें सांगून ठेवलें होतें. त्याप्रमाणें चंपावतीनें नावेंत पाय ठेवल्याबरोबर नाव हलली व फळी पाण्यांत पडली. नंतर नाव नदीच्या प्रवाहांत जोरानें वाहूं लागली. चंपावतीला काय करावें हेंच सुचेना. तिनें नावेंत बसलेल्या व्यापाऱ्याला ओळखलें आणि म्हणाली—"पाहूं तर या काय सामान आहे तें विकत घेण्यासारखें!"

"ही सर्व नावच तुझी आहे असें समज. मीदेखील तुझा दासानुदास आहें. आपल्या गांवीं तुला घेऊन जाऊन मी तुला राणीसारखी ठेवीन."

तेव्हां चंपावतीला कळलें कीं ती फंसली. नाव जोरानें चालत होती. ती ओरडली—"अहो माझीं मुलें आणि त्यांचे वडील!" असें म्हणत तिनें नदींत उडी टाकली. तिला वांचवण्यासाठीं व्यापाऱ्यानें पण नदींत उडी टाकली. नावेंतल्या नोकरांनीं पण उड्या टाकल्या. नोकरांनीं कसें बसें चंपावतीला वांचविलें. व्यापारी बुडून मेला. नोकरांनीं व्यापाऱ्याचें प्रेत व चंपावतीला व्यापाऱ्याच्या घरीं आणून पोंचतें केलें. व्यापाऱ्यानें कोणत्या हेतूनें चंपावतीला नावेंत आणवलें होतें तें सर्व नोकरांनीं जसेंच्या तसें व्यापाऱ्याच्या मुलाला सांगितलें.

चंपावतीला सोडून दिलें तर वडिलांचें बिंग फुटेल या भीतीनें व्यापाऱ्याचा मुलगा तिला म्हणाला—"या गांवचे कोतवाल माझ्या वडिलांचे चांगले स्नेही आहेत. मी त्यांना जाऊन सांगितलें कीं माझ्या वडिलांच्या मरणाला कारण तूं आहेस तर ते तुला अटक करतील व कायद्याप्रमाणें तुला फांशीची शिक्षा मिळेल. परंतु तूं जर आमच्या घरांत कामाला रहायला तयार असशील तर मी तुला कामाला ठेवून घेईन



व बाहेर सांगेन कीं वडील अपघातानें नदींत बुडून मरण पावले."

त्याचें तें कावेबाजपणाचें बोलणें ऐकून चंपावती मुळींच घाबरली नाहीं. मेलेल्या माणसाच्या कुटुंबावर सूड उगवण्याची इच्छा पण तिच्या मनांत नव्हती. कोठें तरी काम करून पोट भरणें भाग होतें. म्हणून ती कामाला रहावयास तयार झाली.

तिकडे लक्ष्मणराव लाकडाची मोळी घेऊन घरीं परत आला तेव्हां त्याचीं दोन्ही मुलें रडत होतीं. "आई कोठें तरी निघून गेली!" त्यानें मालकिणीला विचारलें तेव्हां



ती व्यंग करून म्हणाली—"मला काय माहीत ती कोठें मरायला गेली आहे ती. नाइलाजानें मीच बसलें आहे चूल फुंकीत. माझ्या अन्नावर तुम्ही चौघे जगतां आहां. पण विसरां सगळें तें. कोणाला सांगूं आपलें हें रडगाणें. तुम्ही घराबाहेर व्हा, म्हणजे पुरे." मालकिणीनें फणकारा दाखविला.

लक्ष्मणराव रात्रभर तेथेंच राहाला. दुसऱ्या दिवशीं मुलांना घेऊन खानावळी-बाहेर पडला. संध्याकाळीं ते नदीकाठीं आले. नदीपलीकडे जाण्यासाठीं नावेची चवकशी केली. पण एकहि नाव नव्हती. नावाड्याला द्यायला त्याच्याकडे पैसे सुद्धां नव्हते. त्याला पोहतां येत होतें. पण दोघां मुलांना घेऊन कसें जायचें ?

म्हणून त्यानें एका मुलाला किनाऱ्यावरच बसून रहायला सांगितलें आणि दुसऱ्याला पाठीवर बसवून घेऊन पोहोत नदी पार केली. त्याला पलीकडे बसवून दुसऱ्या मुलाला घेऊन जात असतां वाटेंत तो एका भोंवऱ्यांत सांपडला. तो आंत खोल जाऊं लागला. त्याला भोंवळ पण आली.

तो शुद्धीवर आला तेव्हां त्याच्या चारी बाजूला लोकांची गर्दी होती. सर्व त्याला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न करीत होते. त्याला थोडी शुद्धी आली तेव्हां त्याला वाटूं लागलें कीं राजयोग येऊं लागला आहे.

खरोखरच राजयोग होता तो. तो नदीच्या काठीं ज्या जागीं बेशुद्ध स्थितींत आला त्या गांवचा राजा एकाएकीं वारला होता. त्याला कोणी वारस नव्हता. तो मेला त्याच्या दुसऱ्या दिवशीं प्रधानाला दृष्टांत झाला. नगरदेवीनें स्वप्नांत येऊन त्याला सांगितलें कीं त्या देशाचा होणारा राजा





नदींतून वहात येत आहे. त्याची प्रतिक्षा करावी." प्रधानानें ती गोष्ट सर्वांना सांगितली होती. त्यानें नदीकाठीं रात्रं-दिवस पहारा ठेवला होता. प्रधानानें नेमलेल्या पाहारेकऱ्यांनींच लक्ष्मणरावांना बेशुद्ध स्थितींत बाहेर काढलें होतें.

लक्ष्मणरावाचा त्या देशाच्या रीतीप्रमाणें राज्याभिषेक झाला. परंतु त्यांना आपल्या बायकोची व मुलांची राहून राहून आठवण येत होती.

बापाला पाण्यांत वहात जात असतांना दोघां मुलांनीं पाहिलें होतें. मुलें मोठ्यानें रडत होतीं. एका धोब्यानें दोघां मुलांना आपल्या घरीं आणलें. दोघे त्याच्या घरींच लहानाचे मोठे झाले. त्याला मूलबाळ नव्हतें.

मुलांचीं नांवें रघू व भीमू अशीं होतीं. त्यांनीं एका व्यापाऱ्याच्या घरीं नोकरी धरली. कांहीं दिवसांनीं त्या व्यापाऱ्याच्या घरीं चोरी झाली. दोघांनीं चोराला धरून कोतवालाकडे पोंचतें केलें. कोतवालानें त्यांना चांगलें बक्षिस दिलें. तें पाहून व्यापाऱ्याच्या मनांत मोह उत्पन्न झाला. म्हणाला—"मी तुम्हांला पगार देऊन नोकर ठेवलें चोरांना पकडण्यासाठीं. तुम्ही चोराला माझ्या घरींच पकडलें होतें. म्हणून तुम्हांला मिळालेलें बक्षिस निमूटपणें मला द्या." रघू व भीमू त्याला कबूल झाले नाहींत. त्यांनीं त्यांना मिळालेलें बक्षिस धोबी व त्याची बायको दोघांना दिलें होतें. व्यापारी मनांतल्या मनांत जळफळला, पण तो कांहीं करूं शकला नाहीं.

त्याच व्यापाऱ्याच्या घरीं चंपावती काम करीत होती. चोराला दोघां तरुण नोकरांनीं धरल्याचें तिनें ऐकलें तेव्हां तिच्या मनांत सहज आलें कीं तिचीं दोघे मुलें आतां

त्याच वयाचीं झाली असतील. त्यांना भेटण्याची अनावर इच्छा तिच्या मनांत उत्पन्न झाली. सर्व काम आटोपून ती त्या दोघांना जाऊन भेटली व त्यांचें नांव विचारलें. त्यांनीं रघू व भीमू अशीं नांवें सांगितल्यावर तिनें उत्सुकतेनें त्यांना विचारलें—"होय रे, माझ्या दोघां मुलांचीं पण तींच नांवें होतीं. तुमचे आई वडील कोण व कोठें आहेत?"

त्यांनीं आपल्या लहानपणीं घडलेल्या सर्व गोष्टी त्यांना आठवल्या तशा सांगितल्या.

व्यापारी तें सर्व आड उभा राहून ऐकत होता. त्यानें घरांतल्या कांहीं मूल्यवान वस्तू आणून चंपावती व दोघे पाहारेकरी बोलत होते तेथें आणून टाकल्या व म्हणाला—"काय रे बोलतां आहां आमच्या मोलकरणीजवळ? घरांतलें सामान पळवून न्यायचा विचार आहे वाटतें तुमच्या मनांत? थांबा, तुमच्या समाचाराला कोतवालाला बोलावून आणतो." असें सांगून त्यानें आपल्या एका नोकराला कोतवालाला बोलावून आणण्यासाठीं पाठविलें. कोतवाल आल्यावर त्यानें त्याच्याकडे तक्रार नोंदविली कीं दोघे पाहरेकरी मोलकरणीशीं मैत्री करून घरांतलें सामान चोरी करण्याच्या विचारांत होते. मुद्देमालासकट चोरांना पकडलें आहे.

परंतु कोतवालाचा त्या गोष्टीवर विश्वास बसेना. त्यानें विचार केला कीं स्वतः राजानेंच खरें खोटें पाहून न्याय निवाडा द्यावा.

अशा तऱ्हेनें लक्ष्मणरावांची आपल्या बायको व मुलांशीं भेट झाली. त्यानें धोब्याला पुष्कळ बक्षिस दिलें. त्यानंतर लक्ष्मणरावांचा संसार सुखाचा झाला.





# दोन भाऊ दोन पानें

दूर एका देशांत दोन भाऊ रहात होते. एका जुन्या झोंपडींत ते रहात. एक लहानसें शेत होतें त्यांच्या मालकीचें. त्यांत दोघे भाजीपाला लावीत व पावसाळ्यांत भाताचें पीक काढीत. ते एकाच झोंपडींत रहात व पिढ्यान् पिढ्या चालू आलेला चांभाराचा पण धंदा करीत.

परंतु हळूहळू धंदा चालेनासा झाला. कारण परगांवच्या एका चांभारानें येऊन त्यांच्याच गांवांत ठाणें दिलें आणि त्याच्या हातांत कसब होतें म्हणून लोक त्याच्याच कडे वहाणा शिवायला टाकूं लागले. म्हणून दोघां भावांचा धंदा बिलकुल बंदच पडला.

एके दिवशीं खूप थंडी पडली. सर्व गांवकरी शेकोटी पेटवून शेकायला बसले.

"गांवच्या जमीनदारानें सर्व जंगल कांपून टाकलें. अजून झाडाचीं मुळेंवर गेलेली आढळतात. तींच उपटून आणूं या." धाकटा भाऊ म्हणाला.

दोघे एक दिवा व कुऱ्हाड वगैरे घेऊन मैदानांत गेले व कांहीं मुळें तोडून घेऊन आले. मुळें पेटवल्याबरोबर पेटली व झोंपडींतली थंडी पार उडून गेली.

परंतु एका जाडजूड खोडांतून कोकिळेचें 'कूऊ' 'कूऊ' असें ओरडणें ऐकून दोघे परस्परांकडे पाहूं लागले. पाहतां पाहतां त्या मुळाच्या पोकळींतून एक कोकिळा बाहेर आली. ते चकित होऊन तिच्याकडे पहात होते आणि ती कोकिळा विचारूं लागली—"अहो दादा! हा कोणता महिना आहे व कोणता ऋतु आहे?"

श्री. शामकांत पाटील



"हा मार्गशीर्ष महिना आहे आणि हेमंत ऋतु आहे" दोघे भाऊ म्हणाले.

"मी झाडाच्या पोकळींत झोंपलें होतें. एकाएकीं उष्णता लागली म्हणून वाटलें कीं वसंत आला कीं काय? संक्रांत येईं-पर्यंत मला कोठें तरी स्वस्थ झोंपू द्या. माझ्यावर तुमचे फार उपकार होतील." कोकिळा म्हणाली.

"तुला वाटेल तितके दिवस आमच्या घरीं रहा." दोघे भाऊ म्हणाले.

त्यांनीं तिच्यासाठीं घरटें करून दिलें. कोकिळा आंत जाऊन झोंपली. वसंत ऋतु सुरू होतांच 'कूऊ' करीत घरट्याच्या बाहेर आली व दोघांना म्हणाली—"मी आतां जगभराला सांगत फिरणार आहे कीं वसंत ऋतु आला. परत येतांना तुमच्यासाठीं काय घेऊन येऊं? सांगा."

"आमच्या सर्व कष्टाचें कारण गरिबी आहे. तूं कोठून तरी हिरे मोती कांहीं घेऊन आलीस तर बरें होईल."

"जेथें हिरे मोती व रत्नें असतात मी त्या बाजूला जात नाहीं. मी ज्या रानांत फिरते त्या रानांत दोन विचित्र झाडें आहेत. एका झाडाचीं पानें गळल्याबरोबर सोन्याचीं होऊन जातात. आणखी एक झाड आहे तें नेहमीं हिरवेंगार असतें. त्याचीं पानें तोडलीं तरी तीं हिरवींच राहतात. त्यांचा रंग पालटत नाहीं. हीं पानें ज्यांच्याजवळ असतात त्यांना कधीं कोणत्याहि गोष्टीची काळजी होत नाहीं. आतां तुम्हांला यांतलीं हवीं तीं पानें मी घेऊन येईन." कोकिळा म्हणाली.

"तर मग माझ्यासाठीं सोन्याचीं पानेंच घेऊन ये." मोठा भाऊ म्हणाला.

"कधीं न वाळणारें पान मला घेऊन ये." धाकटा भाऊ म्हणाला.



लगेच कोकिळा उडून गेली. पावसाळा सुरू होण्याच्या सुमारास ती परत आली. तिच्या तोंडांत दोन पानें होतीं, एक सोन्याचें पान होतें व दुसरें साधें हिरवें पान. सोन्याचें पान मोठ्या भावानें घेतलें व हिरवें पान धाकट्या भावानें.

"पुढल्या वर्षीं मी तुम्हांला अशींच पानें पुन्हां आणून देईन." असें सांगून कोकिळा उडून गेली.

सोन्याचें पान हातीं आल्याबरोबर मोठा भाऊ धाकट्या भावाला हीन लेखूं लागला. "याला शनिबाधा आहे, म्हणून यानें वेड्यासारखें हें हिरवें पान मागून घेतलें. याला शनिबाधा होती म्हणूनच माझी ही अशी स्थिति इतके दिवस झाली." मोठा भाऊ म्हणाला आणि त्यानें धाकट्या भावाला सांगून आपला वांटा मागून घेतला. तो वहाणा शिवायचा धंदा एकटा निराळा करूं लागला. त्याच्याकडे सोन्याचें पान आलें आहे हें कळतांच जी मुलगी त्याच्याशीं लग्नाला तयार नव्हती ती तयार झाली. परगांवच्या चांभारानें मोठ्या भावाला आपल्या धंद्यांत भागी दिली.



मोठ्या भावाचें भाग्य उदयास येत होतें व धाकट्या भावाची गरिबी वाढत चालली होती. त्याच्याजवळ अर्धें घर व थोडीशी जमीन उरली होती. घरा सभोंवतालच्या जमिनींत भाजी पाला लावण्याचें काम त्यानें चालू ठेवलें. नदी काठचीं कंदमुळें आणून तेवढ्यावर तो आपला उदर निर्वाह करूं लागला. गांवच्या लोकांसमोर नेहमीं त्याची मान खालीं होई. त्याच्या भावाची स्थिति चांगली होती व त्याची स्वतःची गरीबी दिवसे दिवस वाढत चालली होती. परंतु त्याला कधीं त्याचें

चांदोबा



दुःख वाटलें नाहीं कीं कधीं कमली उणीव भासली नाहीं.

त्या गांवच्या जमीनदाराची राजदरबारची नोकरी सुटली होती व तो जंगलाच्या टोंकाला त्याचा एक जुना वाडा होता त्यांत येऊन राहूं लागला होता. राजधानींतल्या त्याच्या वैऱ्यांनीं त्याचा पदोपदीं इतका अपमान केला कीं त्याला राजधानींत राहणें अशक्य झालें होतें. म्हणून तो आपल्या गांवीं जाऊन राहूं लागला होता.

एकदां जमीनदार नदी काठीं हिंडत असतां त्याला धाकटा भाऊ भेटला. दोघे बराच वेळ आपल्या सुखदुःखाच्या गोष्टी बोलत बसले होते. म्हणून जमीनदाराला-पण थोडें हलकें वाटलें. तो घरीं परत आला तेव्हां तो इतका खूष होता कीं त्याच्या नोकरांचाकरांना सुद्धां आश्चर्य वाटलें. तो त्यांच्याशीं आनंदानें गप्पा मारण्यांत गर्क होऊन गेला. त्यानें कोठें तरी शिकारीला जाण्याची तयारी करायला सांगितलें. आपल्या कुळांना बोलवून त्यांना तो जेवणें देऊं लागला.

जमीनदाराच्या मनांत एवढा बदल होण्याचें कारण तो धाकट्या भावाजवळ कांहीं वेळ बोलत बसला होता असें गांवच्या लोकांना कळलें तेव्हां सर्व लहान थोर गरीब श्रीमंत धाकट्या भावाच्या झोंपडी-जवळ येऊन बसूं लागले व त्याच्याशीं तासन् तास गप्पा मारूं लागले. त्याच्याशीं ते बोलत तेव्हां त्यांना स्वतःच्या सुख-दुःखाचा विसर पडे. धाकट्या भावाची ख्याती राजाच्या कानापर्यंत जाऊन पोंचली. त्यानें आपल्या एका नोकराला पाठवून धाकट्या भावाला भेटायला बोलाविलें नोक-रानें राजानें पाठविलेलीं वस्त्राभूषणें धाकट्या भावासमोर ठेवलीं.



तोंपर्यंत कोकिळेनें त्याला चार पानें आणून दिलीं होतीं. धाकटा भाऊ तीं पानें एका घोंगडीच्या घडींत नीट ठेवून राजाच्या भेटीस गेला.

राजानें त्याला भेटीस बोलाविलें. त्याला देखील एक कारण होतें. प्रजा इतकी लोभी झाली होती कीं खोटें बोलणें, लांच देणें व लोकांना फसवून लुबाडणें यांतच प्रत्येकाला भूषण वाटे. राजाच्या कानावर रोज गाऱ्हाणीं येत. फिर्याद करणारे मोठे लोकच होते व त्यांची फिर्याद पण थोरां-मोठ्यांच्या विरुद्ध असे. राजाच्या स्वतःच्या अंतःपुरांत पण शांति नव्हती. राजवाड्यांतले नोकर लबाड व चोर होते. त्यांची बाजू घेऊन बोलणारे राजाच्या कुटुंबांत पुष्कळ होते. नोकरांवरून त्यांचीं आपसात भांडणें पण होत होतीं.

अशा कठीण परिस्थितींत राजानें धाकट्या भावाला बोलाविलें होतें. त्यानें दरबारांत पाऊल टाकतांच दरबारांतलीं भांडणें बंद झालीं. एवढेंच नव्हे तर प्रत्येक दुसऱ्याची परिस्थिति ओळखून बोलूं सवरूं लागला. राजाच्या कानावर कोणी गाऱ्हाणें न्यायचें बंद केलें. धाकट्या भावासंबंधीं





राजानें जें कांहीं ऐकलें होतें त्याचा प्रत्यय राजाला थोड्याच दिवसांत आला. म्हणून राजानें धाकट्या भावाला दरबारांत आदराचें स्थान देऊन त्याचा सत्कार केला. प्रधान सचिव, मंत्री व इतर दरबारी दरबारांत येत. पण कोणाला धाकट्या भावाचा हेवा वाटला नाहीं. उलट सर्व त्याच्याशीं घडीभर बोलायला मिळावें म्हणून प्रयत्न करीत.

धाकट्या भावांत चांभाराचीं लक्षणें उरलीं नाहींत. त्याची बोलण्याची पद्धत व वागणूक प्रधानाला लाजवील इतकी उच्च दर्जाची होऊन गेली. कोणी किती सांगितलें तरी तो आपल्या खांद्यावरचें काळें घोंगडें काढून कधीं बाजूला ठेवीत नसे. तो त्यांना म्हणे—"ही घोंगडी राहाली म्हणजे मला माझ्या खऱ्या परिस्थितीचा विसर पडणार नाहीं. मी राजदरबारीं असलों म्हणून मी एक गरीब चांभार आहें हें विसरून कसें चालेल?" त्याचें असें उत्तर ऐकून लोकांच्या मनांत त्याच्या विषयीं आदर जास्तच वाढे.

धाकट्या भावाचा दरबारीं वाढत चाललेला आदर पाहून मोठ्या भावाला हेवा वाटूं लागला. "दोन तीन हिरव्या पानांनीं दरबारीं एवढा आदर मिळत आहे तर माझ्याकडे सोन्याचीं पानें आहेत त्यांच्यामुळें मला जास्तच आदर मिळायला हवा. मी देखील राजदरबारीं जातों आणि पाहतों कीं मला किती आदर मिळतो तो." असें बायकोला सांगून व तिला बरोबर घेऊन तो राजधानीकडे निघाला.

चार दिवस पायीं चालल्यावर राजधानीजवळच्या एका जंगलांत ते पोंचले. तेथें थोडी विश्रांति घेण्याचें त्यांनीं ठरविलें. त्यांनीं बरोबर खायला जें कांहीं करून आणलें होतें तें संपत आलें होतें. भांड्याच्या तळाला थोडी खरपुडी राहून गेली होती. त्यावरच भूक भागवावी म्हणून दोघं खायला बसले. तेवढ्यांत एक म्हातारी आली. तिच्या डोक्यावर एक टोपली होती. "जवळपास कोठें विहीर आहे का? फार तहान लागली आहे मला." असें म्हणत म्हातारीनें डोक्यावरची टोपली खालीं जमिनीवर ठेवली.

टोपलींत पंचपक्वान्नांचा वास येत होता. टोपलीकडे पाहून मोठ्या भावाच्या व त्याच्या बायकोच्या तोंडाला पाणी सुटलें.

"तुम्ही श्रीमंत घरचीं मंडळीं दिसतां. माझ्याजवळचें खायला तुम्हांला कांहीं हरकत तर नाहीं ना? खायला पुष्कळ आहे माझ्याजवळ." म्हातारी म्हणाली.

"तूं एवढ्या प्रेमानें विचारते आहेस तर आम्हांला नाहीं कसें म्हणतां येईल. देणाऱ्याचें कुळगोत्र पहावयाचें नसतें. त्याच्या मनाचा थोरपणा पहावयाचा असतो." मोठा भाऊ म्हणाला.

त्या म्हातारीनें त्यांना खायला उत्तमोत्तम पक्वान्नें दिलीं. तिच्याजवळ खीर पण होती. ती सुद्धां तिनें त्यांना खायला दिली. त्या खिरींत भूल येणारें औषध घातलेलें होतें. ती खीर खाल्ल्याबरोबर दोघे बेशुद्ध झाले.



त्यानतर होतें नव्हतें तें सर्व त्या म्हातारीनें त्यांच्या अंगाखांद्यावर काढून घेतलें. फक्त कपडे काय ते उरले. इतक्यांत तिचा दहा वर्षांचा मुलगा आला. त्याच्या खांद्यावर एक घोंगडें होतें. तिनें त्याला विचारलें—"राजधानींत काय मिळालें?"

कांहीं मिळालें नाहीं. मी मध्यरात्रीच्या सुमारास राजवाड्याजवळून जात होतों. राजवाड्याच्या खिडकींतून हें कांबळें खालीं पडलें. तेंच उचलून घेऊन आलों."

"हें घोंगडें आपल्या काय कामाचें? या दोघांच्या कडून आपल्याला पुष्कळ



मिळालें. हें घोंगडेंच त्यांना देऊन जाऊं या.'' असें सांगून तिनें तें घोंगडें त्या दोघांच्या अंगावर पांघरुणासारखें घातलें आणि मुलाला बरोबर घेऊन ती निघून गेली.

तें घोंगडें धाकट्या भावाचेंच होतें. राजानें धाकट्या भावाच्या सेवेला एक नोकर ठेवला होता. त्याला गांवंढळ लोकांची नोकरी करणें मुळींच पसंत नव्हतें. म्हणून धाकटा भाऊ झोंपी गेला असतां नोकरानें तें घोंगडें खिडकींतून खालीं फेंकून दिलें.

तिकडे रानांत मोठ्या भावाला मध्यरात्रीच्या सुमारास शुद्धी आली. त्याला थंडी वाजत होती. म्हणून त्यानें तें घोंगडें छान पांघरून घेतलें. त्यानें आपल्या बायकोला उठविलें. तेव्हां त्यांना कळलें कीं ती म्हातारी त्यांना मूल देऊन त्यांच्या जवळ होतें नव्हतें तें सर्व लुबाडून घेऊन गेली. मोठा भाऊ म्हणाला—"झाली चोरी तर होऊं दे. राजधानीकडे जायची आपल्याला गरजच काय? या रानांत काय कमी आहे आपल्याला? आपण येथेंच एक झोंपडें बांधून राहूं या." बायकोला म्हणाला.

बायकोला पण नवऱ्याचें म्हणणें पटलें. तिनें होकार दिला.

दुसऱ्या दिवशीं राजानें आपल्या सर्व अधिकाऱ्यांची एक सभा भरविली. धाकट्या भावाला पण सर्वांबरोबर बोलावणें गेलें होतें. आपलें घोंगडें हरवल्याचें धाकट्या भावाच्या लक्षांत आलें होतें. त्यानें तें शोधून आणण्यासाठीं आपल्या नोकराला सांगितलें. तो राजदरबारीं गेला. पण त्या दिवशीं त्याच्या वागण्यांत एकदम बदल झालेला राजाच्या दृष्टीस आला. पूर्वी तो तसा कधीं बोलला अगर वागला नव्हता. म्हणाला—"मला कोणी कशाला बोलावलें आहे? मी काय अपराध केला?"

राजा चकित होऊन त्याच्याकडे पाहूं लागला. धाकट्या भावाच्या वागण्यांतला भारदस्तपणा पार लयास गेला होता. "आपण या चांभाराला इतके दिवस राजवाड्यांत ठेवलें हा आपला मूर्खपणाच होता." त्यानें दरबाऱ्यांना विचारलें कीं हा मूर्खपणा कसा झाला? सर्व दरबारी परस्परांचीं तोंडें पाहूं लागले. नंतर बोलाचाली सुरू झाली व शेवटीं मारामारी सुरू झाली. तो सर्व प्रकार पाहून धाकटा भाऊ गोंधळून गेला. राजा मोठ्यानें ओरडून म्हणाला—"चालता हो बाहेर!"

धाकटा भाऊ कांहीं एक न बोलतां बाहेर पडला. त्याला आपली झोंपडी आठवली. तो तिकडे निघाला. वाटेंत रात्र पडली. सुदैवानें तो आपल्या मोठ्या भावाच्या नव्या झोंपडीजवळच येऊन पोंचला. धाकट्या भावाला खूप भूक लागली होती व झोंपडींत कोणीतरी सैंपाक करीत होतें. त्याला कदाचित ते लोक जेवायला वाढतील या विचारानें धाकट्या भावानें झोंपडींत पाऊल ठेवलें. तेव्हां त्याला तेथें त्याचा मोठा भाऊ झोपलेला दिसला. त्याच्या शेजारीं त्याला त्याचें घोंगडें दिसलें.












सैंपाक करणारी त्याच्या मोठ्या भावाची बायको होती. तिनें धाकट्या भावाला ओळखलें नाहीं. त्याचा पेहराव राजाच्या अधिकाऱ्यांसारखा होता. ती पुढें येऊन म्हणाली—"दिवसभर ते झोंपडें बांधण्यांत गुंतले होते. आतांच झोंपले आहेत. त्यांना उठवूं नका, स्वतःच उठतील थोड्या वेळानें."

धाकट्या भावानें आपलें घोंगडें उचलून आपल्या खांद्यावर ठेवलें. लगेच त्याची सर्व काळजी व भीति पार उडून गेली.

सैंपाक तयार झाला. मोठा भाऊ पण उठला. धाकट्या भावाला तेथें पाहून व ओळखून तो म्हणाला—"तूं राजदरबारीं आहेस व तुझा मानमरातब फार वाढला आहे असें मी ऐकलें होतें. इकडे शिकारीला आला होतास वाटतें?"

"नाहीं दादा! राजा व राजदरबार यांच्याशीं आपलें काय काम? मी आपल्या झोंपडींत परत निघालों होतों. तूं कसा काय इकडे? चल घरीं. आपण आपला जुना धंदा करूं व सुखासमाधानानें राहूं." धाकटा भाऊ म्हणाला.

"बरोबर आहे तुझें म्हणणें! उजाडल्यावर जाऊं आपण परत आपल्या गांवीं." मोठा भाऊ म्हणाला.

पुष्कळ दिवसांनीं दोघे भाऊ शेजारीं बसून जेवले. त्याच झोंपडींत दोघे झोंपले. दुसऱ्या दिवशीं ते आपल्या गांवीं निघाले. घरीं येऊन दोघांनीं मिळून आपला जुना धंदा सुरू केला. धाकटा भाऊ बरेच दिवस राजदरबारीं राहून आला असूनहि आपल्या मित्रमंडळींना व गांवकऱ्यांना विसरला नाहीं हें पाहून गांवकरी त्याचा जास्त आदर करूं लागले.





# खोटी बहीण

मणिपूरचा राजकुमार महेंद्र व मंत्र्याचा मुलगा विजय दोघे एकदां रानांत शिकारीला गेले. वाट चुकून रानांत भटकत दोघे दमून गेले. खूप तहान लागली होती त्यांना. त्याच वेळीं त्यांना एक जुनें देऊळ दिसलें. आंत कोणाचा तरी आवाज ऐकून त्यांनीं दार ठोठावलें. दाराला आंतून कडी होती. आंतून किरट्या आवाजांत कोणी तरी विचारलें—"कोण आहे?"

"तहान लागली आहे. प्यायला थोडें पाणी मिळेल का?" राजकुमारानें विचारलें.

दार उघडलें. आंत दोन तरुण मुली होत्या. त्यांचे कपडे मळके होते. त्यांनीं पाणी आणून राजकुमाराला दिलें.

"मी या देशाचा राजकुमार आहें. माझें नांव महेंद्र. माझा हा मित्र विजय मंत्र्यांचा मुलगा आहे. येथें तुम्हांला पा आम्हांला आश्चर्य वाटतें." राजकु म्हणाला.

मोठी मुलगी म्हणाली—"आम्हीदेख राजकन्या आहोंत. एका राक्षसिण आमच्या वडिलांना भीति दाखवून आम्हा आणलें. तिला फसवून आम्ही दोघी येऊन लपलों आहों." बोलतां बोलतां ति डोळे ओले झाले.

"कोणत्या देशाच्या राजकन्या तु दोघी? तुमच्या वडिलांचें नांव काय राजकुमारानें मोठीला विचारलें.

"तेवढेंच विचारूं नका. आमच्या व लांचा अपमान होईल." मोठी बहीण म्हणा

तिचें नांव कुसुमावती होतें व ति बहिणीचें नांव कमलाक्षी होतें. म



कुसुमावतीचें सौंदर्य पाहून व विजय कमलाक्षीचें पाहून चकित झाले. महेंद्र दोघां बहिणींना म्हणाला—"आम्ही दोघे तुम्हां दोघींशीं लग्न करायला तयार आहों. तुम्ही दोघी आमच्या बरोबर यायला तयार आहां का?"

"आमच्या रक्षणार्थ देवानेंच तुम्हां दोघांना पाठविलें असावें." कुसुमावती म्हणाली.

कमलाक्षी आपल्या बहिणीला जरा बाजूला घेऊन जाऊन म्हणाली—"कां असें खोटें बोलून त्यांना फंसवतेस?"

"गप्प रहा. आपलें नशीब उदयास आलें आहे. त्याला पाठ दाखविणें शहाणपणाचें नाहीं." कुसुमावती म्हणाली.

"आपण दोघी या दोघांच्या बरोबर निघून गेलों तर आपल्या आईचें कसें होणार?" कमलाक्षीनें विचारलें.

"तिला तर उलट आनंदच होईल. आपलें ओझें तिला किती जड वाटूं लागलें आहे, हें तुला माहीतच आहे. आपला संसार सुखाचा झालेला पाहून तिला आनंदच होईल." कुसुमावती म्हणाली.

दोघी बहिणी राजकुमार महेंद्र व त्याचा मित्र विजय यांच्याबरोबर निघून गेल्या.

दोघी बहिणी एका सामान्य गरीब घराण्यांतल्या मुली होत्या. त्यांच्या वडिलांनीं एका सावकाराकडून कर्ज घेतलें होतें. सावकार दोघां मुलींशीं लग्न करून दे म्हणून बापावर दडपण आणूं लागला. त्याच काळजींत बाप वारला. मुलींच्या आईला त्या सावकाराची जास्तच धास्ती बसली. घर सोडून ती दोघां मुलींना घेऊन त्या रानांत येऊन राहूं लागली. आसऱ्याला त्यांना सुदैवानें तें पडकें देऊळ मिळालें.

राजकुमार व विजय आले तेव्हां आई शेजारच्या गांवांत भीक मागायला गेली होती. परत आल्यावर मुलींना न पाहून ती काळजींत पडेल असें समजून कमलाक्षीनें आपल्या एका पाताळाच्या बारीक चिंध्या करून थोड्या खोलींत टाकल्या.

राजकुमार मोठ्या बहिणीला व मंत्र्याचा मुलगा धाकट्या बहिणीला आपापल्या घोड्यावर मागें बसवून घेऊन राजधानीकडे निघाले. कमलाक्षी आपल्या साडीचे तुकडे वाटेवरच्या झाडांच्या फांद्यावर टाकीत गेली.

राजा व मंत्री दोघे राज्याच्या कामानें कोठें तरी दूर निघून गेले होते. कुसमावतीच्या राहण्याची व्यवस्था राजाच्या अंतःपुरांत करण्यांत आली व तिच्या बहिणीची मंत्र्याच्या वाड्यांत.

मुली निघून गेल्यावर कांहीं वेळानें त्यांची आई परत आली. तिनें ओळखलें कीं खुणेसाठीं मुलींनीं साडीच्या चिंध्या तेथें टाकल्या आहेत व ती वाट शोधीत निघाली. वाटेंत झाडाला साडीच्या चिंध्या होत्या. ती त्यांच्या अनुरोधानें राजधानींत आली व सरळ राजवाड्यांत गेली.



कुसुमावतीनें आपल्या आईला येतांना पाहिलें व ती घाबरून गेली. हीच त्यांची आई आहे हें कळलें तर राजकुमार आपल्याशीं लग्नाला तयार होणार नाहीं असा विचार करून तिनें एका दासीला बोलाविलें आणि म्हणाली—"ती भिकारीण येते आहे ना! तिला आंत येऊं देऊं नका म्हणून सांग." दासीनें तसेंच केलें.

शेजारींच मंत्र्याचा वाडा होता. धाकटी बहीण आपल्या आईची वाट पहात बसली होती. आईला येत असलेली पाहून ती आपल्या दासीला हाक मारून म्हणाली—



"ती बाई तेथें उभी आहे ना, तिला आदरपूर्वक बोलावून आंत घेऊन ये."

आई आल्यावर कमलाक्षीनें तिला अंगांत घालायला चांगले कपडे दिले आणि जेवायला घालून जें घडलें तें सर्व थोडक्यांत सांगितलें. नंतर तिनें तिला आपल्याच खोलींत झोंपायला सांगितलें.

कांहीं वेळानें विजय तिच्या खोलींत आला व म्हणाला—"महाराज व बाबा परत येत आहेत आणि आपलें लग्न लवकरच होणार आहे." असें सांगून तो निघून गेला.

आई उठल्यावर कमलाक्षी तिला म्हणाली—"आई, अक्कानें खोटें बोलून केवढें मोठें संकट आपल्यावर ओढवून घेतलें आहे पहा. मी मंत्र्याच्या मुलाला खरें तें सांगून टाकून मोकळी होणार आहें. नंतर आपण दोघी परत जाऊं."

"छे छे! असें नको करूंस. तुझ्या अक्कानें सर्वांच्या हिताचें तेंच केलें आहे. माझी काळजी सोड तूं. तुमचें कसें होईल ही काळजीच मला आहे. ती दूर झाल्यावर मला दुसरी कसलीच काळजी उरणार नाहीं." आई म्हणाली.

राजा व मंत्री राजधानींत परत आले. त्यांच्या मुलांनीं त्यांना सांगितलें कीं त्यांनीं त्यांच्या त्यांच्या पसंतीनें मुलगी निवडून आणली आहे. राजा व मंत्री दोघांनीं लग्नाला परवानगी दिली. परंतु राजाला जेव्हां हें कळलें कीं त्या दोघी राजकन्या आहेत तेव्हां तो म्हणाला—"मुलींच्या आईवडिलांना ही गोष्ट कळविल्याशिवाय लग्न उरकून घेणें रास्त होणार नाहीं. लग्नें त्यांच्याच हस्तें झालेलीं बरीं. राजाचें नांव गांव सांगितलें तरी त्यांत अपमान मानण्याचें कारण नाहीं. कुसुमावतीला तिच्या आईवडिलांचीं नांवें विचारावीं."





कुसुमावती तें कळल्यावर घाबरली. परंतु स्वतःला सावरून म्हणाली—"मरकत देशाचे महाराज श्रीपाद आमचे वडील होत." जिभेवर आलें तें बोलली. दुसऱ्या दिवशींच राजानें कुसुमावती व कमलाक्षीला मरकत देशांत पाठविण्याची व्यवस्था केली.

कमलाक्षी आपल्या बहिणीकडे धांवत आली व म्हणाली—"हें काय आणली नवें संकट? आतां कसें होणार आपलें?"

"विष घेऊन जीव देण्या व्यतिरिक्त दुसरा मार्ग उरला नाहीं आपल्याला" कुसुमावती दुःखी होऊन म्हणाली.

"छान बोललीस! विष खाऊन आपली दोघींची सुटका होईल. पण आईचा जीव धोक्यांत पडेल त्याची काय वाट?" म्हणत कमलाक्षी आपल्या खोलींत निघून गेली.

त्या दिवशीं संध्याकाळीं विजय तिच्या खोलींत आला व म्हणाला—"मरकत देशांत जायची सर्व तयारी झाली आहे. निघायला तूं तयार आहेस ना?"

"मरकत देश व तेथले राजा राणी, त्यांच्यापाशीं आम्हांला कांहीं कर्तव्य नाहीं. आम्ही आपल्या त्या पडक्या देवळांत जाऊन राहातों. आतांपर्यंत जें घडलें तें सर्व विसरा." कमलाक्षी म्हणाली. तिनें विजयला सर्व खरें तें सांगून टाकलें व बहिणीनें जें सांगितलें तें सर्व खोटें होतें हें देखील सांगून मोकळी झाली.

विजय म्हणाला—"तें सर्व मला कळलें होतें. कारण तुझी बहीण बोलत असतां मी तुझ्या चेहऱ्याकडे पहात होतो. त्यावरून तुझी बहीण कांहीं तरी खोटें बोलत असावी, हा अंदाज मी लावला होता. नंतर तुला हा सर्व खोटेपणा आवडला नाहीं हें मला कळलें. तुझी आई तुझ्या खोलींत आलेली मी पाहिली. तिच्या तोंडावळ्यावरून मी










ओळखलें. तूं खोटें बोलणें शक्य नाहीं. तुझ्या बहिणीला छान खोटें बोलतां येतें. पण तिच्या बोलण्यावर कोणी विश्वास करणें पण शक्य नाहीं. कारण हजार दोन हजार मैल दूरच्या प्रदेशांत देखील मरकत नांवाचा देश नाहीं व श्रीपाद नांवाचा कोणी राजा पण नाहीं. राजकुमार भोळा आहे. तुझ्या बहिणीचें बोलणें त्याला खरें वाटलें. मी सर्व त्याला सांगितलें तेव्हां त्याला पण माझें बोलणें खरें वाटेना."

कमलाक्षीला जिवांत जीव आल्यासारखें वाटलें. म्हणाली—"आतां माझ्या मनाला थोडी स्वस्थता आली. तर मग कृपा करून आम्हां दोघी मायलेकींना त्या पडक्या देवळांत पोंचती करा. पायीं जायला पण आमची तयारी आहे. परंतु वाट चुकून कोठें तरी जाऊं कीं काय अशी भीति वाटते."

"मी तुला पाहिलें तेव्हांच तुझ्याशिवाय दुसरीशीं लग्न करावयाचें नाहीं हें मनाशीं ठरविलें आणि करणार पण आहे. तुम्ही दोघी राजकन्या नाहीं व त्यामुळें लग्न होणें शक्य नाहीं हें कळल्यापासून राजकुमार आजारी पडला आहे. परंतु महाराज मुलाच्या सुखासाठीं असा हट्ट करणार नाहींत. असो, थोडक्यांत आतां सांगतों, लग्नाचा मुहूर्त ठरला आहे. आम्ही तुझ्या आईला हें सर्व कळविलें आहे." विजय म्हणाला.

विजयनें सांगितल्याप्रमाणें सुमुहूर्तावर राजकुमाराचें कुसुमावतीशीं व विजयचें कमलाक्षीशीं लग्न झालें. लग्नानंतर त्यांची आई कमलाक्षीबरोबरच राहाली. कुसुमावती खोटें बोलली होती, ही गोष्ट जास्त मनाला लावून न घेतां राजानें स्वतःच्या देखरेखी-खालीं लग्न समारंभाची तयारी केली.





# कृष्णावतार

आयुधागाराच्या अधिकाऱ्यांनीं कंसाला त्याचें धनुष्य तुटल्याचें येऊन सांगितल्यावर त्याला त्याचें कंबरडेंच मोड-ल्यासारखें वाटलें. त्याला फार वाईट वाटलें. तरी तो त्या मनःस्थितींत उत्सवासाठीं केलेली म्हणून जी व्यवस्था होती ती पाहण्यासाठीं गेला.

एका सुंदर रंगशाळेसारखी सजावट करण्यांत आली होती. राजा, मंत्री, मांडलिक राजे आणि नागरिक या सर्वांसाठीं त्यांच्या हुद्याच्या मानानें निरनिराळीं उंच आसनें बनविलीं गेली होतीं. उदबत्ती, धूप व चंदन यांचा वास दरवळत होता. तें सर्व पाहून कंस आपल्या खास महालांत निघून गेला.

चाणूर व मुष्टिक नांवाच्या आपल्या सुप्रसिद्ध मल्लांना बोलावून तो म्हणाला—"जगांत तुमची बरोबरी करूं शकणारे मल्ल नाहींत. बलराम व कृष्ण पोरें आहेत, त्यांच्यांत धैर्य, साहस किंवा शौर्य मुळींच नाहीं. पहिल्याच सलामींत त्यांचा शेवट केलास तरच बरें."

राजाची ती आज्ञा ऐकून मल्लांना आनंदच वाटला. ते म्हणाले—"महाराज! हें सांगण्याची गरजच नाहीं. तीं गवळ्याचीं पोरें समोर आलीं कीं त्यांची मुंडी पिळवटून



त्यांना दूर फेंकून देऊं." अशा वल्गना करीत दोघे आपल्या निवासस्थानीं निघून गेले.

नंतर कंसानें महामात्र नांवाच्या माहूताला बोलाविलें व म्हणाला—"तूं माझा एक स्वामिभक्त नोकर आहेस. आज तूं मी सांगतों तें काम उत्तम प्रकारें बजावलें पाहिजेस. वसुदेवाचे मुलगे खेडे गांवांत वाढले आहेत. ते आले आहेत मथुरेला. तूं ते येण्यापूर्वीच कुवलय पीडला राजवाड्याच्या सिंहद्वारावर नेऊन उभा कर. ते समोर आल्या बरोबर हत्तीला त्यांच्यावर सोड."

दुसऱ्या दिवशीं सकाळीं राजाज्ञेप्रमाणें रंगशाळेंत सर्व आपापल्या जागीं येऊन आसनस्थ झाले आणि बलरामाची आणि कृष्णाची वाट पाहूं लागले. कंस सिंहासनावर येऊन बसला. त्यानें शुभ्र वस्त्रें परिधान केलीं होतीं आणि गळ्यांत मोत्यांचा हार घातला होता. शुभ्र छत्राखालीं तो चंद्रासारखा शोभत होता.

चाणूर व मुष्टिक मत्त हत्तीसारखे रंगशाळेंत कंसासमोर उभे होते. महामात्र माहूत कुवलयपीड हत्तीवर बसून सिंहद्वारावर कृष्ण व बलराम दोघांची वाट पहात बसला होता.

थोड्या वेळानें बलराम व कृष्ण येत असलेले त्याला दिसले. सर्व त्यांचें सौंदर्य पाहून कौतुक करीत होते. सिंहद्वारांत पाऊल टाकतांच वाद्यें वाजूं लागलीं व प्रेक्षकांनीं टाळ्या वाजवून त्यांचें स्वागत केलें. त्याच गडबडींत माहूतानें कुवलयपीडला त्यांच्यावर सोडलें.

तें पाहून व क्षणार्धांत सर्व प्रसंग ओळखून कृष्ण बलरामाला म्हणाला—"दादा! आपल्याला ठार करण्यासाठीं कंसानें या हत्तीला तयार करून ठेवला



आहे. त्याला स्वतःचा मृत्यु जवळ आहे हे देखील खात्रीनें कळलें असणार." असें म्हणत तो पुढें गेला. तिकडून तो मदोन्मत्त हत्ती आपली सोंडवर उचलून व विकाळ रूप धारण करून पुढें आला. त्याच्या चालण्यानें जमीन हादरली.

कृष्णानें हत्तीच्या बळाची परीक्षा पाहण्याचें व प्रेक्षकांचें मनोरंजन करण्याचें ठरविलें. त्यानें हत्तीला सोंड पुढें करून आवळण्याला जणुं कांहीं प्रोत्साहन दिलें व हत्तीनें सोंडेंत धरल्याबरोबर चपळपणानें तो सोंडेवरून वर चढला आणि हत्तीच्या दोन्ही सुळ्यांवर उभा राहून हत्तीच्या कुंभस्थळावर धमधम अशा लाथा मारायला सुरवात केली. नंतर तो त्यांच्या पाठीवर चढला आणि सोंड धरून खालीं उतरला. दोन्ही हातांनीं हत्तीच्या पोटावर कृष्णानें बुक्क्यांचा मारा इतक्या जोरानें सुरू केला कीं हत्ती कळवळून ओरडला. हत्तीनें वळून कृष्णाला धरण्याचा प्रयत्न केला. परंतु कृष्ण त्याच्या पायांखालून निसटून त्याच्या शेपटीच्या बाजूला गेला. त्यानें हत्तीची शेपटी धरली. त्याला धरण्यासाठीं हत्ती गरगर फिरत असतां कृष्ण खालीं पडला व संधी साधून हत्तीनें आपली



सोंड कृष्णावर कोरड्यासारखी मारली. कृष्ण स्वतःला सावरून उभा राहणार इतक्यांत हत्तीनें एक दोन जागीं आपले सुळे मारून कृष्णाला जखमी केलें. आतां हत्तीला यमसदनाला पाठविण्यांत वेळ घालवणें बरें नाहीं असें ठरवून कृष्णानें त्याच्या सुळ्यांवर जोरानें लाथ मारली. त्या बरोबर त्याचा दांत तुटला. तो दांत घेऊन कृष्णानें हत्तीचें गंडस्थळच फोडलें. असह्य वेदनेमुळें हत्ती जमिनीवर गडगडा लोळूं लागला. कृष्णानें हत्तीच्या दातानें माहुताचें पण डोकें फोडून त्याला ठार केलें.



हत्तीनें सुळे मारल्यामुळें कृष्णाच्या अंगांतून एक दोन जागीं रक्तप्रवाह सुरू झाला होता. त्याच्या हातांत हत्तीचा सुळा होता. अशा तऱ्हेनें त्याचें तें रूप भयंकर दिसूं लागलें होतें. त्याला पाहून कंसानें चाणूर व मुष्टिक या दोघांना खुणेनें कृष्ण-बलरामांचा शेवट करण्यास सांगितलें. कृष्णाचें चाणूराशीं व बलरामाचें मुष्टिकाशीं मल्लयुद्ध सुरू झालें.

चाणूर व मुष्टिक दोघांना या गोष्टीचा गर्व होता कीं त्यांच्याहून जास्त बलिष्ठ बलवान जगांत दुसरा कोणी नाहीं. चाणूर कृष्णाजवळ जाऊन म्हणाला—"गुराख्यांच्या पोरांना जिंकून तूं पुष्कळ कीर्ति मिळविली आहेस, नाहीं का? आज मी आलों आहें तुझ्या समाचारास. पाहतों माझ्या पंज्यांतून तूं कसा सुटतोस तो."

तें ऐकून कृष्ण हंसत चाणूराला म्हणाला—"कंसाचा भरंवसा बराच दिसतो आहे तुझ्यावर. तरमग तूं येच माझ्याशीं पंजा भिडवायला. फुकट बडबड बंद कर."

चाणूर व कृष्ण दोघांचें मल्ल युद्ध सुरू झालें. सभेंत जमलेले यादव कृष्णाचें पोरवय व चाणूरचा कमावलेला देह पाहून घाबरले. डोंगरासारखा हा राक्षस आणि पोरवय कृष्णाशीं त्याचें मल्लयुद्ध, हा न्याय नव्हे....! येथें कोणालाच कशी काय ही गोष्ट सुचत नाहीं. मल्लयुद्ध बरोबरीच्या पहेलवानांमध्यें विनोदार्थ होतें. राजानें हें युद्ध बंद केलें पाहिजे व दोघांचा सत्कार केला पाहिजे."

तें ऐकून कृष्ण म्हणाला—"मला याच्याशीं मल्लयुद्धाची अनायासें संधी मिळाली आहे. जरा या मूर्खांना कळूं तर दे कीं यांच्या वल्गना बंद करणारा व यांचें तोंड फोडणारा दुसरा कोणी या जगतांत आहे. मी याची पाठ मऊ करून याची घमेंड जिरवित. तुम्ही नुसती गंमत पहा. हा चाणूर कुरूष देशाचा राहणारा आहे. कित्येक मल्लांना यानें लोळविलें आहे. आज मी याला लोळवणार आहें." असें सांगून तो चाणूरला जाऊन भिडला.

कृष्णाचा चपळपणा व बळ पाहून चाणूरचे डोळे फिरले. त्याला वाटलें होतें तितकें कृष्णाला पाडणें व ठार करणें सोपें नाहीं हें त्याला छान कळून चुकलें होतें. स्वतःचा बचाव करीत ओढीत, ढकलत, उड्या मारीत, पुढें मागें परस्परांना रेटीत त्यांनीं परस्परांना पाडण्याची शिकस्त केली. कधीं परस्परांच्या डोक्याला त्यांचें डोकें आपटे तेव्हां टाळ्यांचा कडकडाट होई. त्यांनीं परस्परांना बुक्के मारून, नखांनीं ओरबाडून, केस ओढून व कधीं कधीं लत्ताप्रहार करून परास्त करण्याची शिकस्त करून पाहिली.

चाणूरनें पवित्रे वेळोवेळीं बदलून पाहिले. पण प्रत्येक वेळीं तोच कृष्णाच्या पेचांत अडकत गेला. चाणूरची बाजू पडती होत चाललेली पाहून प्रेक्षकांनीं टाळ्या वाजवायला सुरवात केली. तेव्हां कंसानें चिडून जाऊन सर्वांना गप्प बसायला सांगितलें.



कृष्णानें गमती खातर इतका वेळ चाणूरला खेळवून लोकांचें थोडें मनोरंजन केलें होतें. पण कंसानें राग दाखविल्यावर त्यानें चाणूरचा शेवट करायचा ठरविला. चाणूर-देखील आपल्या शेवटच्या घटका मोजूं लागला होता. चाणूरचा धीर पूर्णपणें खचला होता, हें पाहून कृष्णानें त्याला धरलें व त्याला गरगर फिरवून त्याच्या डोक्यांत मुष्टिप्रहार केला. नंतर उडी मारून तो त्याच्या छातीवर चढून बसला आणि दोन्ही मांड्यांत त्याची मान आवळली. त्याबरोबर तो भडभडा रक्त ओकला.



इकडे कृष्णानें चाणूराला यमसदनाची वाट दाखविली व तिकडे बलरामानें मुष्टिकाला ठार केलें. दोघां मल्लांना ठार करून दोघे विजयी वीर रंगशाळेंत उभे राहून प्रेक्षकांकडे पाहूं लागले. त्याचवेळीं कंसानें कृष्णाकडे क्रूर दृष्टीनें पाहिलें. नंदानें तें पाहिलें आणि त्याचें अंग आपादमस्तक थरारलें. त्याच्या तोंडांतून शब्दच उमटेना.

तोंपर्यंत देवकीला वाटत होतें कीं चाणूरच्या व मुष्टिकाच्या हातून कृष्णबलराम वांचणें अशक्य. तिची बोलण्याची छातीच होत नव्हती. पण दोघे विजयवीर समोर आनंदानें येत असलेले पाहून तिच्या डोळ्यांत आनंदाश्रु उभे राहाले. वसुदेवाच्या आनंदाला तर पारावारच नव्हता.

कंसाच्या अंगाला वरपासून खालपर्यंत घाम सुटला. रागानें त्याचें सर्व अंग थर थर कांपत होतें. त्याचे डोळे निखाऱ्यासारखे लालबुंद झाले होते. त्यानें एकदां चारी बाजूला पाहिलें आणि आपल्या नोकरांना बोलावून म्हणाला—"या गवळ्याच्या दोघां मुलांना धरून राजधानीबाहेर टाकून या. नंद गवळ्याला बेड्या ठोका आणि इतर सर्व गवळ्यांचीं डोकीं उडवा. माझ्या राज्यांत तेथें जेथें म्हणून कोणी गवळी किंवा गवळ्याचा पोर असेल त्याला चोरासारखें धरून बडवून काढा. त्यांचा जमीन जुमला सरकार जमा करा आणि दुष्ट वसुदेवाला दंड करा."

तें ऐकून जो जेथें होता तेथें आवाक् उभा राहाला. देवकीला फार वाईट वाटलें व ती भीतीनें बेशुद्ध होऊन पडली. कृष्ण त्याच्या आईवडिलांची ती स्थिति पाहून व त्याचे सर्व बंधुमित्र भयभीत झालेले पाहून तत्काळ कंस उभा होता तिकडे निघाला. तो झपझप पायऱ्या चढून कंसाच्या सिंहा-

सनापर्यंत जाऊन पोंचला. भीतीनें कंसाचा चेहरा पांढरा फटू झाला होता. राजसभेंत बसलेल्या लोकांना कळलें देखील नाहीं. एका क्षणापूर्वी तो आखाड्यांत उभा होता व दुसऱ्या क्षणांत तो कंसाच्या सिंहासना-जवळ उभा होता.

नंतर कृष्णानें कंसाला हात धरून खालीं पाडलें व त्याचा मुकुट लाथेनें भिरकावून दिला. त्याच्या गळ्यांतले मोती तुटून जमिनीवर पसरले. कृष्णानें कंसाचे केस धरून त्याचें डोकें हलविलें आणि त्याला उताणा पाडून तो त्याच्या छातीवर बसला. कृष्ण हतबल आणि निस्सहाय होऊन कृष्णाच्या दयेची जणुंकाहीं भीक मागत होता. त्याच्या गळ्यांतला हार तुटला होता. त्याच्या नाकातोंडांतून रक्त वाहूं लागलें होतें. डोळे बाहेर निघाले होते. कृष्णानें त्या स्थितींत कंसाला पायऱ्यावरून खालीं ढकललें. कंसाचा केवढा मोठा दरारा होता. पण आज तो एका किड्यासारखा मरून जमिनीवर लोळत होता.

त्याच वेळीं बलरामानें कंसाचा भाऊ सुनाम याला सिंहासारखी गर्जना करून ठार केलें.

कृष्णानें त्या रक्तरंजित हातांनींच वसुदेवाला पाय धरून नमस्कार केला. वसुदेवानें त्याला पोटाशीं धरून आशीर्वाद दिला. नंतर कृष्णानें देवकीला नमस्कार केला. तिनें पण त्याला आशीर्वाद दिला.

नंतर कृष्णानें उग्रसेन इत्यादी वृद्ध वडिलांना नमस्कार केला व त्यांचे आशीर्वाद मिळविले. सर्वांना जायला सांगून बलरामा-बरोबर कृष्ण आपल्या वडिलांच्या घरीं निघून गेला.





# अरण्यपुराण

[ १४ ]

बलदेव जमिनीवर पडून खोकत व कण्हत होता. प्रश्नांमागून प्रश्न सर्व विचारीत होते. झाडावर चढल्यामुळें त्याच्या हातां-पायांना छान खरचटलें होतें. तोंडांतून सरळ शब्दपण उमटत नव्हता.

मौवलीनें विचार केला कीं जोंपर्यंत बलदेवच्या या गोष्टी चालू राहतील तोंपर्यंत मेस्सुवावर नजर ठेवणारांचें लक्ष तिच्यावर राहणार नाहीं. नंतर तो झोंपडीच्या खिडकीजवळ पोंचला तेव्हां त्याला कोणीतरी पाय चाटीत असल्याचा भास झाला.

"तूं का आई? इकडे काय करते आहेस?" त्यानें विचारलें.

"जंगलांत मुलांचें गाणें ऐकूं आलें आणि मी निघून आलें. बरें, पण मी आलें आहें, तुला अंगावर दूध पाजणाऱ्या बाईला पहायचें आहें मला." लांडगीण म्हणाली.

"तिचे हातपाय बांधून तिला ठार करण्याचा बेत होता या दुष्टांचा. मी तिला सोडविलें. तो व तिचा नवरा दोघे रानाच्या वाटेनें निघून जातील." मौवली म्हणाला.

"मी जाईन बरोबर. वय झालें असलें तरी दांत शाबूत आहेत माझे." असें म्हणत लांडगीण उभी राहाली आणि आंत काळोखांत पाहूं लागली.

मौवली पुन्हां आंत गेला. म्हणाला—"या वेळीं सर्व बलदेवच्या सभोंवती घोळका करून त्याच्या गप्पा ऐकण्यांत गर्क झाले आहेत. नंतर ते इकडे विस्तव घेऊन येतील आणि या झोंपडीला आग लावतील."

शेवटचें मलपृष्ठ



"मी आपल्या धन्याला विचारलें आहे, खान्हीवारा येथून तीस मैलावर आहे, तेथें इंग्रज आहेत." मेस्सुवा म्हणाली.

"ते कोणत्या जातीचे आहेत?" मौवलीनें विचारलें.

"मला नाहीं माहीत. त्यांचें सर्व देशावर राज्य आहे. आपण रात्रीच्या रात्रीं निघून गेलों आणि त्यांच्या वस्तींत पोंचलों तर जीव वांचेल." मेस्सुवा म्हणाली.

"तर मग दोघे उठा आणि पळा. आज रात्रीं कोणी मनुष्य गांवाच्या बाहेर पडूं शकणार नाहीं." मौवली म्हणाला.

मेस्सुवाचा नवरा उकीडवा बसून झोंपडीच्या एका कोंपऱ्यांत खणूं लागला.

"अरे, हे पुरलेले पैसे बरोबर नाहीं नेतां यायचे आपल्याला." मेस्सुवा म्हणाली.

मेस्सुवाचा नवरा मौवलीकडे पाहून म्हणाला—"एक घोडा विकत घ्यायला पुरेल हा पैसा. एका तासाभरांत गांववाले येतील आपला पाठलाग करायला."

"मी येथून त्यांना जाऊं देईपर्यंत त्यांच्यापैकीं एकजण देखील तुझ्या वाटेला येणार नाहीं. तूं म्हणतोस तसा घोडा घेतां आला तर चांगलेंच." मौवली म्हणाला.

मेस्सुवाचा नवरा सर्व रुपये काढून घेऊन उठला. त्यानें ते रुपये कमरेला खोंचले. मौवलीनें मेस्सुवाला उचलून खिडकीबाहेर पोंचविलें. बाहेरचा थंडगार वारा लागल्यावर तिला हुशारी वाटली.

"खान्हीवाराची वाट तुम्हांला माहीत आहे का?" मौवलीनें विचारलें. मेस्सुवा व तिचा नवरा दोघांनीं मुंडी हलवून होकार दिला.

"तरमग तुम्हांला कसलीच भीति नाहीं. निघा, चला. तुम्हांला तुमच्या मागें पुढें व आजूबाजूला थोडें संगीत म्हणजे लांडग्यांचें ओरडणें ऐकूं येईल. तरी भिण्याचें कारण नाहीं." मौवली म्हणाला.

"हे सर्व दुष्ट आम्हांला जाळणार नाहींत, ही भीति आम्हांला नसती तर आम्ही या मध्यरात्रीच्या वेळीं गांवाबाहेर पाऊल टाकलें असतें का? मनुष्यांच्या हातीं रानटी जनावरांसारखें मरण्यापेक्षां रानटी जनावरांच्या हातीं मरण आलें तरी परवडेल आम्हांला." मेस्सुवाचा नवरा म्हणाला.

"मी सांगितलें ना तुला कीं जंगलांत तुझ्या वाटेला कोणी येणार नाहीं. तुम्ही दोघे खान्हिवारा पोंचेपर्यंत तुमचें रक्षण होईल. मनुष्य किंवा पशु दोघांपैकीं एकाची हि भीति मनांत बाळगण्याचें कारण नाहीं." मौवली ठासून म्हणाला.

मेस्सुवा मौवलीच्या पायाला चिकटून बसली. मौवलीच्या सर्वांगांत आनंदाची एक लहर चालू झाली. त्यानें तिला प्रेमानें व हळुवारपणानें उठविलें. मेस्सुवानें त्याला पोटाशीं घट्ट धरलें आणि त्याच्या डोक्यावर हात फिरवून आशीर्वाद दिला.

तिच्या नवऱ्यानें आपल्या शेतांकडे पाहिलें. "आम्ही इंग्रजांना भेटून त्यांच्याकडे गाऱ्हाणें नेलें आणि ब्राह्मण व बलदेव



दोघांवर खटला चालवाला तर गांवचें दिवाळेंच निघेल. माझ्या शेतांतल्या पिकावर व माझ्या म्हशींच्या दुधावर दुप्पट प्राप्ती होणार नाहीं का?"

मौवली म्हणाला—"पुढल्या हिंवाळ्यांत येऊन पहा, येथें काय उरलें आहे तें?"

ते जंगलाकडे निघाले. लांडगीण आईनें पुढें उडी मारली. "यांच्याबरोबर जा. सर्व जंगलांत सांग कीं यांच्यावर कोणत्याहि प्रकारचें संकट येतां कामा नये. जरूर पडली तर हांक मार. काळ्या वाघाला पण मदतीला बोलाव." मौवली लांडगीण आईला म्हणाला.

      



लांडग्यांची एक आरोळी विजेसारखी सर्व जंगलाला जणुं कांहीं भेदून गेली. ती शांत पण झाली. मेस्सुवाचा नवरा दचकला आणि घराच्या वाटेनें उलटा पळूं लागला.

"नीच पुढें....नव्हतें का सांगितलें कीं थोडेंसें संगीत ऐकूं येईल म्हणून. त्यान्ही हारापर्यंत संगीत ऐकूं येत राहील. याचा अर्थ असा कीं जंगलांत तुला भीति नाहीं." मौवली म्हणाला.

मेस्सुवानें आपल्या नवऱ्याला पुढें चलायला ढकलेलें. त्यांच्याबरोबर लांडगीण आई पण जंगलांत अदृश्य झाली. इतक्यांत काळा वाघ मौवलीच्या पायांजवळ आला.

"चौघे भाऊ कोठें आहेत ? आज रात्र-भर कोणाला गांवाबाहेर पडूं देऊं नका." मौवली म्हणाला.

"मी एकटा हें काम करायला पुरणार नाहीं का ?" काळ्या वाघानें विचारलें.

"गप्पा अजून चालू आहेत. बलदेवनें आतांपर्यंत कित्येक कपोलकल्पित गोष्टी सांगितल्या असतील. ते झोंपडीजवळ येऊन तिला आग लावायला उतावळे झाले आहेत. ते येतील तेव्हां त्यांना येथें काय आढळेल ? रिकामें झोंपडें ! बस "हः हः हः हा !" मौवली मोठ्यानें हंसला.

"ते येतील तेव्हां मला आंत राहूं दे ना. पाहूं तर दे कीं माझे पाय बांधायला कोण धजतो तें." म्हणत काळा वाघ झोंपडींत शिरला आणि त्यानें खाटेवर ताणून दिली. त्यानें मौवलीला पण जवळ बसायला सांगितलें. पण कोणी मनुष्यानें त्याला न पाहिलेलेंच बरें असें मौवलीला वाटत होतें. [ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]



# ६८. व्हिक्टोरिया धबधबा

"मिसि-ओअ-तुन्य" (धूर गुर्दा बोलतो) या नांवाचा धबधबा ऱ्होडेशिया (आफ्रिका) मध्यें आहे याची लांबी एक मैल व उंची २५६ तें ३४३ फूट आहे.












अनेक प्रकारें त्याला सांगून पाहिलें, पण त्यानें फ्रेंचांना बाहेर काढलें नाहीं. युद्ध चालू असतां फ्रेंचांना नवाबाचा असा पाठिंबा मिळणें आपल्या हिताचें नाहीं हें इंग्रजांना माहीत होतें. म्हणून सिराजउद्दौलाला गादीवरून काढून दुसऱ्याला गादीवर बसविण्याचा इंग्रजांनीं घाट घातला. त्या साठीं त्यांनीं फितुरीचा मार्ग घेतला. या कटांत नवाबाचा सेनापति मीर जाफर, दुर्लभ राय आणि जगतशेट सामील झाले. मीर जाफर व त्याच्या मित्रमंडळींबरोबर १० जून रोजीं इंग्रजांनीं एक गुप्त तह केला. या तहाप्रमाणें इंग्रजांनीं मीरजाफरला सैनिक सहाय्य करण्याचें वचन दिलें आणि त्याबद्दल कटांत सामील झालेल्या सर्वांनीं इंग्रजांना मदत करण्याचें वचन दिलें. अमीचंदनें लुटलेल्या धनाचा प्रमुख वांटा मागितला. क्लाइव्हनें तहाचीं कलमें लेखी लिहून काढलीं व अमीचंदची अटदेखील त्यांत नमूद करून ठेवली. वॉटसननें त्या तहावर सही करण्यास नकार दिला, तेव्हां क्लाइव्हनें स्वतःच वॉटसनची सही करून अमीचंदला तहाचा कागद दिला.

फ्रेंचांना आपल्या दरबारांत आश्रय दिल्यामुळें इंग्रजांशीं वितुष्ट वाढल्याचें ओळखून सिराजउद्दौलानें आपल्या अधिकाऱ्यांच्या सल्ल्यानें फ्रेंचांना परत पाठविण्याचें ठरविलें. त्यांनीं परत जात असतां नवाबाला त्याच्या विरुद्ध होत असलेल्या कटाबद्दल सावध केलें होतें. नवाबानें मीरजाफरला तावडतोब कैद केलें असतें तर इतर कटवाल्यांचे डोळे उघडले असते. परंतु सिराजद्दौलानें मीरजाफरच्या बोलण्यावर विश्वास केला व त्यालाच सेनापति राहूं देऊन युद्धाची तयारी चालू ठेवली.





# गौरीचंद्र

एका गांवीं एका सुखवस्तु शेतकरी जोडप्याला चंद्र नांवाचा एक मुलगा होता. तो मोठा होत गेला तसतसा त्याचा खोडसाळपणा वाढत गेला.

एकदां त्याच्या बापानें त्याला धाक दाखवून सांगितलें कीं तो जर इतर शहाण्या मुलांसारखा वागला नाहीं तर त्याच्याशीं लग्नाला कोणी मुलगी तयार होणार नाहीं.

मुलानें बापाला एखाद्या विद्वान पंडितासारखें उत्तर दिलें—"विस्तवाची ज्योत खालून नेहमीं वर जाते व पाणी उंचावर असलें तरी खालींच जातें."

"अरे खुळ्या! मी आहे तोंपर्यंत ठीक आहे. मी निघून गेलों तर कसें रे होणार तुझें?" बापानें वैतागून विचारलें.

"मी सुद्धां जाणारच आहें. पण तुम्ही आधीं आलांत तसे आधीं जाणार एवढेंच!" चंद्र म्हणाला.

तें उत्तर ऐकून बापाला इतका राग आला कीं त्यानें त्याला घराबाहेर काढलें. चंद्र वहाणा घालून व छत्री घेऊन निघाला. तो दुपारच्या सुमारास एका तलावाच्या काठीं आला. थोड्या वेळानें तेथें नागेश नांवाचा एक मनुष्य आला. त्यानें आपली शिदोरीची गांठ सोडीत चंद्रला विचारलें—"कोण रे तूं? कोठें निघालास?"

"मी एक अनाथ आहें. पाय जिकडे नेतील तिकडे जाणार आहें." चंद्र म्हणाला.

"तर मग चल माझ्या घरीं आणि घरचें काम कर." असें सांगून नागेशनें त्याला बरोबर आणलेल्या शिदोरींतलें थोडें

श्री. रामकांत देसाई



कांहीं तरी खायला दिलें आणि बाकी स्वतः खाऊन घेतलें. नंतर दोघे निघाले. वाटेंत एक जंगल लागलें. चंद्र छत्री डोक्यावर उघडून घेऊन चालत असलेला पाहून नागेशनें विचारलें—"सावलींत छत्री रे कशाला?"

"छत्री उघडायला माझ्या डोक्यानें सांगितलें" चंद्र म्हणाला.

कांहीं अंतर चालून गेल्यावर एक ओढा लागला. नागेशनें वहाणा काढून हातांत घेतल्या. पण चंद्र वहाणा काढल्या शिवायच पाण्यांत उतरला. अर्थातच नागेशनें त्याला विचारलें, तेव्हां तो म्हणाला—"माझे पाय तसे म्हणतात. कांहीं अंतर चालून गेल्यावर चंद्रनें विचारलें—"या वाटेवर शिडी किंवा जिना असता तर?"

"वाटेंत शिडी किंवा जिन्याचें काय रे काम?" नागेशनें चकित होऊन विचारलें.

अशातऱ्हेनें बोलत बोलत दोघे नागेशच्या गांवीं पोंचले. नागेशनें दाराची कडी वाजवून हांक मारली—"गौरी!"

तेव्हां एका मुलीनें येऊन दार उघडलें. तिनें एक तपेली भरून नागेशला पाय धुवायला पाणी दिलें. चंद्रला पाहून दुसरी तपेली भरून पाणी आणून ठेवलें आणि ती घरांत निघून गेली.

"ही तपेली नवी आहे का जुनी?" चंद्रनें नागेशला विचारलें.

"हा काय प्रश्न वेड्यासारखा?" नागेशनें विचारलें.

चंद्रला बाहेर बसायला सांगून नागेश आंत गेला व बायकोला म्हणाला—"काम झालें नाहीं." नागेश गौरीसाठीं स्थळ पहायला गेला होता. कांहीं वेळानें पुन्हां म्हणाला—"आला आहे हा, कोणी तरी अनाथ दिसतो आहे. मुलीचें लग्न जमेपर्यंत राहील पडून, करील लहान सहान कामें. थोडा वेडपट दिसतो आहे."

इतक्यांत सैंपाक तयार झाल्याचें गौरीनें सांगितलें व दोघांचीं पानें वाढलीं. साध्या जेवणाबरोबर तिनें कांहीं गोडधोड सुद्धां केलें होतें त्या दिवशीं. जेवण झाल्यावर नागेश चंद्रबरोबर ओटीवर जाऊन बसला. त्यानें विचारलें—"कसा काय वाटला सैंपाक?"

"डोसकें माझें!" चंद्र म्हणाला.

ती गोष्ट गौरीनें ऐकली. ती मागच्या बाजूनें शेजारच्या घरीं गेली. नागेशला मात्र चंद्रचें तें उत्तर ऐकून भयंकर राग आला. "नीच, चालता हो माझ्या घरून. माझ्या घरीं नाहीं तुला रहायला जागा."

"कर्ज असेल तें तुम्हीच फेडावें." चंद्र असें सांगून निघाला.

तेवढ्यांत गौरी विडा घेऊन आली व विचारलें—"ते कोठें आहेत?"

"लबाड, चोर! मी त्याला हाकलून लावलें." नागेश म्हणाला.

"या लहानशा गोष्टीबद्दल? विड्याशिवाय पंच पक्वान्नांचें जेवण देखील फुकटच नाहीं का? म्हणून मी शेजारच्या घरीं



जाऊन विडा लावून आणला." गौरी म्हणाली.

"जातांजातां तो गर्वानें आणली काय म्हणाला, आहे का माहीत? कर्ज असेल तें आम्ही फेडावें, म्हणे." बाप म्हणाला.

"त्यांचें कर्ज बाकी होतें म्हणून तर आपण घरीं बोलवून त्यांना जेवायला घातलें?" गौरी म्हणाली.

"माहीत आहे का तुला, वाटभर तो काय बडबड करीत आला तें?" असें सांगून नागेशनें चंद्र वाटेंत जें कांहीं बोलला तें सविस्तार सांगितलें.

तें ऐकून गौरी म्हणाली—"बाबा, त्यांत वेडपटपणा नव्हता." असें सांगून गौरीनें त्या सर्वांचा अर्थ सांगितला.

नवी तपेली व जुनी तपेली म्हणून गौरीचें लग्न झालें कीं नाहीं हें त्यानें विचारलें. वाटेंत 'शिडी किंवा जिना' याचा अर्थ आपण गोष्टी सांगत गेलों तर वाट सहजीं संपेल. वहाणा घालून तो पाण्यांत उतरला. कारण आंतले कांटे बोचले असते. झाडाखालून जात असतां झाडावर बसलेले पक्षी शिटतात. तेव्हां छत्री उघडली तर कपडे घाण होणार नाहींत एवढेंच.

असें सांगून गौरी म्हणाली—"वेडेपणाचें तें सोंग आहे. त्यांच्या प्रत्येक बोलण्यांत कांहीं तरी गूढ अर्थ असतो."

ती आपल्या मोलकरणीला बोलावून म्हणाली—"तूं चौकांतल्या दुकानांत जाऊन एका आण्याचें 'चटचट' व एका आण्याचें 'चिटचिट' माग. जो कोणी येऊन दुकानदाराला त्याचा अर्थ सांगेल त्याला त्याचें नांव विचार. चंद्र हें नांव सांगितलें तर त्यांना बरोबर बोलावून घेऊन ये."

तिनें दुकानदाराकडे जाऊन एका आण्याचें 'चटचट' व एका आण्याचें 'चिटचिट' द्यायला सांगितलें.

"म्हणजे ग काय?" दुकानदारानें विचारलें.

"एका आण्याची मोहरी व एका आण्याच्या भुइमुगाच्या शेंगा हव्या आहेत तिला." चंद्र म्हणाला. मोलकरणीनें त्याला त्याचें नांव विचारून मालकिणीनें बोलाविलें आहे असें सांगितलें.

चंद्र घरीं आल्यावर गौरीनें चंद्रला पसंत केल्याचें नागेशनें ओळखलें. त्यानें त्यांचें लग्न करून दिलें.





# पाताळ कोट

[ १६ ]

[धूमक व त्याचे साथी, राक्षसांच्या हातावर तुरी देऊन डोंगराकडे पळाले. तेथें त्यांना एक धबधबा दिसला. सोमकला तहान लागली होती म्हणून तो त्या धबधब्याजवळ गेला. त्या बरोबर पाणी वहायचें एकाएकीं थांबलें आणि त्यांना तेथें एक दार दिसलें. ते जवळ पोंचले तेव्हां तें दार उघडलें. आंत त्यांना ज्वाळा दिसल्या.—पुढें]

गुहेंत ज्वाळा दिसतांच धूमकचे पाय दारांतच थबकले. सोमकनें व विरूपानें आपापलीं हत्यारें सावरून धरलीं. विरूपाच्या खांद्यावर बसलेला काळा गरुड पक्षी जोरानें पंख फडफडवूं लागला व उडण्याचा यत्न करूं लागला.

"कालशंबर मांत्रिक कोठें आहे? तो धबधबा जादूचाच होतासा वाटतो. ह्या ज्वाळा पण तशाच असाव्यात. ही सर्व फसवणूक तर होत नाहीं ना आपली!" असें म्हणत विरूपानें एक पाऊल पुढें टाकलें आणि धूमकच्या खांद्यावरून पलीकडे डोकावून पाहिलें.

"कोण तो? जंगलाचा नाईक विरूप का!" या प्रश्नापाठोपाठ ज्वाळांच्या पलीकडे कालशंबर दिसला. विरूपानें दोन्ही





हात जोडून प्रथम नमस्कार केला आणि त्यानंतर दारांतूनच साष्टांग नमस्कार पण केला.

मांत्रिक स्मित करून दरवाज्यापर्यंत आला. विरूपाला आशीर्वाद देण्यासाठीं त्याचा हात वर होता—"हे दोघे कोण तुझ्याबरोबर?" त्यानें खुणेनें धूमक व सोमक विषयीं चवकशी केली.

विरूप उठून उत्तर देणार त्यापूर्वीच कालशंबरनें पुन्हां प्रश्न केला—"तुम्ही दोघे कदंब देशाचे नाहीं का? तुमच्या देशाचा राजा उग्रसेन याच्या विषयीं कांहीं वार्ता? तुमच्या राज्याच्या सीमेवर मला तुमच्या दोघांपैकीं कोणी रे बाण मारला होता?"

कालशंबरशीं मैत्री करून आपलें काम काढून घ्यायचें आहे, हें आठवून व त्यासाठीं हा चांगला योग आहे असा विचार करून धूमकनें पुढें होऊन नमस्कार केला व म्हणाला—"महामांत्रिक! त्या डोंगराळ प्रदेशांत व काळोखांत या पाप्याच्या हातूनच ती चूक घडली. त्याबद्दल मी आपल्या वतीनें व आपल्या या मित्राच्या वतीनें आपली माफी मागतों. हा आहे आपला मंत्रदंड. याच्या सहाय्यानेंच आम्ही येथवर पोंचूं शकलों."

कालशंबरनें मंत्रदंड घेतला व तो कपाळाला व डोळ्यांना लावून म्हणाला—"जें झालें तें विसरा आतां. यापुढें करण्यासारखीं पुष्कळ कामें आहेत. या तुम्हीं आंत, गुहेंत."

धूमक व त्याचे दोघे साथी गुहेंत गेले. लगेच गुहेच्या तोंडाचें जंगी दार लागलें. पुन्हां पूर्ववत धबधबा सुरू झाला आणि त्याचा आवाज ऐकूं येऊं लागला.

मांत्रिक त्या गुहेंतून आणखी एका गुहेंत त्यांना घेऊन गेला. त्या गुहेंत वरून चांगला उजेड येत होता. तेथून भुयाराची एक वाट होती. त्याच वाटेनें मांत्रिक धूमक वगैरेंना हळूहळू खालीं घेऊन गेला.

भुयारांतली ती जागा सपाट होती. डोंगरांत तशा आणखी कांहीं गुहा होत्या. त्यांत आरामानें राहतां येण्यासारखें होतें. समोरच्या अंगणांत कांहीं लोक काम करीत होते.

कांहीं लोक झाडाचा पाला व मुळें उखळींत घालून कुटीत होते व कांहीं तो लगदा चटायांवर वाळत घालीत होते.

कालशंबर मागें वळून मागून येणाऱ्या धूमक वगैरेंना स्मित करून म्हणाला—"हें पाहून तुम्हांला आश्चर्य होत असेल कीं ही सर्व काय भानगड आहे? होय ना?"

धूमकनें होकारार्थी मान हलविली.

"हीं येथें काम करणारीं सर्व माणसें मंत्री गंगाधर यानें पाठविलेलीं आहेत. यांचा नायक भद्र आणखी कांहीं जणांना बरोबर घेऊन डोंगरावर गेला आहे. आपण येथें त्याच डोंगराच्या पोटांत आहों. काल-कली राक्षसाचा किल्ला तो पाताळकोट आहे, तर आपला हा किल्ला पर्वतगर्भकोट आहे. त्या पाताळकोटाचा त्याच्यासह संहार



करण्यासाठींच तर ही सर्व तयारी आहे." कालशंबर म्हणाला.

"पण भद्र कसा काय येथवर आला?" धूमकनें चकित होऊन विचारलें.

"तो एका फार दूरच्या वाटेनें आला. तुम्ही थोड्या जवळच्या वाटेनें आलांत, पण तुम्हांला वाटेंत पुष्कळ कष्ट सहन करावे लागले आहेत. विरूपानें तुम्हांला मदत केली तशी भद्रला इतरांनीं मदत केली होती." कालशंबर म्हणाला.

"पण हीं सर्व औषधें व वनस्पती द्रव्यें काय आहेत?" विरूपानें विचारलें.



"राक्षसांच्या संहाराला आवश्यक शस्त्रास्त्रांपैकीं तें एक मुख्य आहे. तूं रानांत जंगलांत राहतोस. प्रत्येक झाडाच्या पानांत किंवा मुळांत कोणत्या ना कोणत्या तरी रोगावर औषध असतें हें तुला माहीतच आहे."

धूमकनें पण एक प्रश्न विचारला– "महामांत्रिक ! राजकुमारी कांतिसेना सकुशल आहे ना ?"

"अगदीं सकुशल आहे. त्याच बरोबर मंत्री गंगाधरचा मुलगा शशिकांत पण सकुशल आहे का, कां नाहीं विचारीत ? त्याच्या सर्वांगाला वनस्पती द्रव्यें लावून त्याच्या सर्व जखमा मी बऱ्या केल्या आहेत. परंतु जंगलांतल्या गांवावर राक्षसांची धाड आली आणि तो राक्षसांच्या हातीं सांपडला. सुदैवानें मी वांचलों. आतां तो कालकली राक्षसाकडे कांतिसेनेबरोबरच कैदेंत आहे. कैदेंतच त्यांचें परस्परांवरचें प्रेम फार वाढलेलें दिसतें आहे. पण हें झालें कसें हें नाहीं मला कळत." असें म्हणत कालशंबरनें विरूपाकडे पाहून डोळे मिचकावले.

थोडा वेळ कोणीच कांहीं बोललें नाहीं. कालकली राक्षसाला ठार करण्यास कालशंबरनें कोणते उपाय योजले होते हें धूमकला कळेना. त्याच्या मतानें फक्त दोनच उपाय शक्य होते. एक मोठें सैन्य आणून त्याचा पूर्ण पराभव करणें आणि दुसरा त्याला एकटा कोठें तरी गांठून ठार करणें.

याच विचारांत धूमक असतां प्रश्न विचारण्यापूर्वीच पायऱ्या उतरून पळत दोन जण येत असलेले दिसले. दोघांच्या अंगावर कातड्याचीं वस्त्रेंच होतीं. दोघांनीं धूमक व त्याच्या साथीदारांकडे चकित होऊन पाहून, 'हे कोण' या अर्थी मांत्रिकाकडे पाहिलें.

मांत्रिक म्हणाला–"भद्र, तुला जें कांहीं सांगावयाचें असेल तें खुशाल सांग. कारण हे आपले मित्रच आहेत आणि कदंब देशाचे रहिवाशी आहेत. हे राजकन्या कांतिसेनेच्या रक्षणार्थ इतक्या दुरून सर्व प्रकारच्या हाल अपेष्टा सहन करून आले आहेत."

"राजकुमारीचें रक्षण तर स्वत: राक्षसच करीत आहेत. आपल्याला शशिकांतला वांचवायचें आहे. ते कालकली राक्षसाच्या बापाच्या शतसांवत्सरिक उत्सवाच्या तयारींत आहेत. हा उत्सव उद्यां दुपारीं एक वाजतां सुरू होईल व शशिकांतचा बळी दिल्यावर तो उत्सव संपेल." भद्र म्हणाला.

"माझ्या बापाला कालकली राक्षसानें जितकें सहजीं ठार केलें आहे तितकें सहजीं शशिकांतला बळी देणें शक्य नाहीं. उद्यां सूर्योदयापूर्वीं दंडकारण्यांतल्या सर्व राक्षसांचा मी संहार करून टाकीन. मी आपल्या बापाच्या अमानुष वधाचा सूड घेईन. चला, मी स्वत: पाहतों, त्यांचे काय बेत चालू आहेत ते." असें म्हणत कालशंबरनें जमिनीवर जोरानें पाय आपटला आणि दांत ओठ चावत निघाला.



गर्भकोटांतल्या कित्येक गुप्त वाटा पार करीत सर्व डोंगराच्या टोंकाला येऊन पोंचले. त्या जागीं मोठमोठीं झाडें होतीं. त्या झाडांवर मोठमोठ्या वेलींचें जाळें पडलेलें होतें. मांत्रिक बोलल्या शिवाय पुढें गेला आणि एका जागीं वेलांचें जाळें एका बाजूला सरकवीत त्यानें खालीं खोल दरींत पाहिलें. पाताळकोट व त्यांतलीं घरें व महाल स्पष्ट दिसत होते. राजवाड्या-समोरच्या मोठ्या अंगणांत मेजवानीची












त्याला एक मोठें सरोवर दिसलें. त्याच्या काठीं एका झाडाखालीं कुंभीर राक्षस बसला होता. तेथून थोड्या अंतरावर भिल्लिणीबरोबर राजकन्या सरोवराच्या कांठीं हिंडत होती.

तिला पाहतांच "कांतिसेना, कांतिसेना!" अशी हांक मारण्याचा विचार धूमकच्या मनांत येऊन गेला. पण त्यानें स्वतःला आवरून मांत्रिकाला विचारलें— "राजकुमारी सकुशल आहे ना? त्या झाडाखालीं जो राक्षस बसला आहे तोच ना तिला उचलून घेऊन आलेला राक्षस कुंभीर! राजकुमारीबरोबर एक बाई आहे, ती कोण?"

"ती भिल्लांचा नाईक पुलिंद याची दहावी बायको असावी, यांत मला तरी शंका नाहीं." विरूप म्हणाला.

"पुलिंदची बायको! हें नाहीं मला माहीत. ती तर सांगत होती कीं ती अजून अविवाहित कन्या आहे. ती असें पण सांगत होती कीं कालिकली राक्षस राजकन्या कांतिसेनेबरोबर लग्न करते वेळीं तिच्याशीं पण लग्न करणार आहे. ती पाताळकोटाची महाराणी आहे असेंच सांगत फिरत आहे ती." कालशंबर म्हणाला.

धूमकच्या मनांत त्याविषयीं कांहीं तरी बोलावयाचें होतें. पण तो कांहीं बोलणार इतक्यांत कुंभीर उठत असलेला त्याला दिसला. कुंभीरनें कांहीं वेळ इकडे तिकडे पाहून आपली दगडी गदा उचलून घेतली आणि त्या झाडाच्या विशाल बुंधाकडे जोरजोरानें पावलें टाकीत येऊं लागला.

[ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]



# खास कसब

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं.

झाडाजवळ जाऊन त्यानें प्रेत खांद्यावर काढून घेतलें आणि नेहमींप्रमाणें मौनपणें स्मशानाच्या दिशेनें चालूं लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला— "राजा, तुला पाहून मला अशी शंका वाटूं लागली आहे कीं विक्रम देशाचा राजा महेंद्र याचा मुलगा जयंत याच्यासारखा तूं सुद्धां नीच निकृष्ट काम तर करूं लागला नसशील! मी तुला जयंतची गोष्ट सांगतों. लक्ष देऊन ऐक" असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

महेंद्र विक्रम देशाच्या गादीवर राज्य करीत असतां प्रजा सुखी होती. परंतु राजधानींत कांहीं लबाड चोर रहात होते. त्यांचें भय राजधानींतल्या श्रीमंतांना फार वाटे.












लोक त्यांच्या विषयीं नानाप्रकारें आपसांत बोलत. परंतु खरी माहिती मात्र कोणास नव्हती. राजकुमार जयंत हा एक हुशार, शूर व साहसी तरुण युवक होता. त्यानें सुद्धां त्या चोरांच्या विषयीं पुष्कळ ऐकलें होतें. परंतु चोर किती हुशार आहेत व बहाद्दर आहेत हें प्रत्यक्ष पहावयाचें त्यानें ठरविलें.

म्हणून अमावास्येच्या दिवशीं वेष पालटून व काळे कपडे घालून तो मध्यरात्रीच्या सुमारास चोरांसारखा राजवाड्याबाहेर पडला. थोडेंच अंतर चालून गेला असेल, त्याला समोर एक काळी आकृति चालत येत असलेली दिसली. त्याला हा प्रश्न ऐकूं आला—“कोण तूं ?”

“मी चोर आहें....” जयंत म्हणाला.

“तरमग ये माझ्याबरोबर ! मी चोरांचा सरदार आहें.” तो मनुष्य म्हणाला.

दोघे मिळून कांहीं अंतर चालत गेले. वाटेंत त्यांना आणखी दोन जण भेटले. चोरांच्या सरदारानें जयंतचा त्यांच्याशीं परिचय करून दिला—“आपलाच भाऊबंद आहे. पण अजून नवशिका आहे.”

“ए पोरा. चोरी म्हणजे थट्टा वाटली का रे तुला ? अट्टल चोर व्हायला कांहीं तरी असामान्य गुण अंगीं असावा लागतो.” चोरांपैकीं एक जण म्हणाला.

“तुमच्यांत असामान्य असें काय आहे ? ऐकूं तर द्याल.” जयंतनें विचारलें.

“काठी जमिनीवर वाजवून खालीं काय पुरलें आहे, हें सांगतां येतें मला.” एक चोर म्हणाला.

“मी कोणाला एकदां पाहिलें कीं तो कोणता का वेष पालटून येईना, मी त्याला ओळखीन.” दुसरा चोर म्हणाला.

सरदारानें पण असेंच कांहींतरी उत्तर दिल्यावर जयंत म्हणाला—“कोणी कोणत्याहि



प्रकारच्या संकटांत पडला असला तरी त्यांतून त्यांचें रक्षण करण्याची शक्ति माझ्या अंगांत आहे.”

तें ऐकून चोरांना फार आनंद झाला. “असें असेल तर तूंच आजपासून आमचा सरदार. तुझ्या जवळ एवढी शक्ति असल्यावर आमचें सर्व कसब कुचकामाचें ठरेल.” ते म्हणाले.

“तुम्ही आपापल्या अंगचें कसब वर्णन करून सांगितलेंत. पण मला तें प्रत्यक्ष पहावयाचें आहे.” जयंत म्हणाला.

“त्यांत काय मोठेंसें ? पदोपदीं आम्हांला त्याचा उपयोग करावा लागतो. तरमग बोल, आज कोठें जाऊं या चोरी करायला ? तुला प्रत्यक्षच पहायला मिळेल आमचें कसब.” चोर म्हणाले.

“तरमग लहान सहान जागीं कशाला चोरी करायला जायचें ? राजवाड्यांतच शिरूं या चोरी करायला.” जयंत म्हणाला.

चौघे राजवाड्याच्या पिछाडीला गेले. वाड्याच्या चारीबाजूला आवार होतें. आवारांत बाग होती व बागेच्या चारीबाजूला भिंत होती. आवाराच्या भिंतीवरून चोघांनीं आंत उड्या मारल्या. पाहाऱ्यावर कुत्रें होतें. तें भुंकूं लागलें.



“हें कुत्रें आम्हांला पाहून नाहीं भुंकलें. आपल्या मालकाला पाहून भुंकत आहे. याच्या भुंकण्यावरून मी ओळखलें.” एक चोर म्हणाला.

दुसऱ्या चोरानें एका जागीं काठीनें जमीन चाचपून पाहिली व म्हणाला—“येथें भुयार आहे. येथें खड्डा खणला तर भुयाराच्या वाटेनें राजवाड्यांत जातां येईल.”

बागेंत खणायला कुदळ फावडें वगैरे कांहींतरी सांपडेल, असा विचार करून तिथे चोर शोधार्थ निघाले तेव्हां जयंत पाहारेकऱ्यांना जाऊन म्हणाला—“बागेंत





तीन चोर शिरले आहेत. त्यांना जाऊन पकडा." असें सांगून तो स्वतः राजवाड्यांत गेला आणि आपल्या खोलींत जाऊन झोंपला.

पाहारेकऱ्यांनीं तिघां चोरांना पकडलें. दुसऱ्या दिवशीं त्यांना दरबारांत राजासमोर हजर करण्यांत आलें. चोरांना पाहारेकऱ्यांनीं पकडलें असल्याची बातमी गांवभर पसरली होती. म्हणून लोकांचे थवेच्या थवे राजवाड्याकडे आले. चवकशी सुरू होण्यापूर्वी जयंत युवराजाचा पोशाख करून स्वस्थानीं दरबारांत येऊन बसला.

चोरांना हजर करण्याचा हुकूम झाला. तिघां चोरांच्या तोंडावर दुःख दिसत होतें. आजपर्यंत त्यांनीं शिपायांना हुलकावण्या दिल्या आणि आज राजवाड्यांतच नेमके ते पकडले गेले, म्हणून त्यांना स्वतःवर फार राग आला. परंतु राजाच्या शेजारीं जयंतला बसलेला पाहून, चेहरा पाहतांच माणसाला ओळखणारा चोर आपल्या मित्रांना म्हणाला—"आपला सरदार राजाच्या जवळच बसला आहे. आपल्याला भय कसलें!" तें ऐकून जयंतकडे पाहून तिघांनीं स्मित केलें.

जयंत राजाकडे पाहून म्हणाला—'महाराज! हे माझे मित्र आहेत. यांना सोडून द्यावें." राजानें चकित होऊन एकदां आपल्या मुलाकडे पाहिलें आणि चोरांना सोडून द्यावें अशी आज्ञा दिली. चोर जयंतला व राजाला नमस्कार करून निघून गेले.

वेताळ येथवर गोष्ट सांगून म्हणाला—"राजा, माझ्या मनांत एक शंका येते. जयंतनें त्या चोरांना कां सोडविलें? चोरांना पकडून त्यांना योग्य शिक्षा देणें राजाचें कर्तव्य आहे, नव्हे का? त्यानें आपल्या कर्तव्याचें पालन कां केलें नाहीं? एवढेंच नव्हे तर, त्यानें, चोर त्याचे मित्र आहेत असें कां सांगितलें? हा वाईट संगतीचा परिणामच कीं नाहीं? कीं आणखी कांहीं कारण असेलसें वाटतें तुला? या प्रश्नांचें उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

विक्रमार्क म्हणाला—"कायदेशीर चवकशीचा व शिक्षा देण्याचा प्रश्नच उद्भवत नाहीं. चोरी केलीच नाहीं तर चोरांना शिक्षा त्याबद्दल शिक्षा कशी द्यायची? चोरांना पकडवणें हाच एक उद्देश त्याच्या मनांत असता तर त्यानें दरबारांत येण्याचें कारणच नव्हतें. तो त्यांची फक्त परीक्षा घेत होता. दोघांचें कसब जयंतनें स्वतःच पाहिलें होतें. तिसऱ्याचें कसब त्याला पहावयाचें होतें. त्याची परीक्षा करण्यासाठीं त्यानें पाहरेकऱ्यांकरवीं चोरांना पकडवलें होतें. तो स्वतः चोरांना राजवाड्याच्या आवारांत बोलावून घेऊन आला होता. तरी स्वतः राजवाड्यांत जाऊन झोंपला. त्याच्या मनांत चोरांना पकडवण्याचा हेतू असता तर त्यानें तसें केलें नसतें. तिसऱ्या चोरानें फक्त त्याला ओळखलेंच नाहीं तर तो त्या सर्वांना सोडवील असा त्याच्यावर विश्वासपण केला. म्हणूनच तो आपल्या वडिलांना म्हणाला कीं ते त्याचे मित्र आहेत. सर्व दृष्टींनीं विचार करितां जयंत चातुर्यानेंच वागला असें म्हणावें लागेल."

अशाप्रकारें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेताबरोबर अदृश्य झाला आणि पुन्हां झाडावर जाऊन बसला. (कल्पित)





# अती शहाणा

एका गांवीं शरभ नांवाचा एक शिकारी रहात असे. त्याच्या घरची स्थिति बरी होती. त्याला शिकारीचा नाद होता व तो रोज शिकारीला जात असे. दररोज तो गौरीनाथ नांवाच्या एका समवयस्क तरुण स्नेह्याला बरोबर घेऊन जात असे. गौरीनाथाची घरची स्थिति शरभच्या मानानें सामान्य होती. त्यालापण शिकारीचा नाद होता. शरभ त्याच्यावर अधिकार गाजवी. शिकारीसाठीं सर्व व्यवस्था गौरीनाथालाच करावी लागे. पण गौरीनाथ हुशार होता आणि आपल्या हिताची गोष्ट त्याला छान कळे. शरभ आपल्या श्रीमंतीच्या तोऱ्यांत बोले व वागे. गौरीनाथाला त्याचा फायदाच मिळे.

एकदां गौरीनाथाबरोबर शरभ जंगलांत गेला. शरभ झाडाखालीं विश्रांतीसाठीं झोंपला असतां गौरीनाथानें एक खड्डा खणला. खड्ड्यांत त्यानें गवत व पाचोळा भरला व तो निघून गेला.

दुसऱ्या दिवशीं दोघे तेथें गेले तेव्हां त्या खड्ड्यांत त्यांना रानटी मांजर पडलेलें दिसलें. "या शिकारींतला हिस्सा तुला दिला तर काय उरणार? एक किरकोळ रानटी मांजर तर आहे. मीच घेतों हें." शरभ गौरीनाथाला म्हणाला. नंतर थोडा वेळ विचार करून म्हणाला—"पण नको, तूंच ठेवून घे हें मांजर, उद्यां ह्या खड्ड्यांत जें जनावर सांपडेल तें मी घेईन." असें सांगून शरभनें तें मांजर गौरीनाथाला दिलें. गौरीनाथानें खड्ड्यांत पुन्हां गवत व पाचोळा घालून ठेवला आणि दोघे घरीं निघून गेले.

दुसऱ्या दिवशीं दोघे आले तेव्हां खड्ड्यांत एक हरण पडलेलें होतें.

"आज माझी पाळी आहे. मी हें हरण घेतों." शरभ आनंदातिरेकानें म्हणाला.

"ठीक घे. उद्यां ह्यांत मोठा रानटी रेडा पडला तर मी घेईन." गौरीनाथ म्हणाला.

"तर मग तूं हें हरणच ठेवून घे. उद्यां यांत जें पडेल तें माझ्या वांट्याचें." शरभ म्हणाला.

दुसऱ्या दिवशीं खरोखरच एक गलेलठ्ठ रेडा खड्ड्यांत पडलेला होता. शरभच्या आनंदाला पारावर नव्हता. म्हणाला—"मग मी हा घेतों. आज माझी पाळी आहे."

"घे ना. उद्यां माझ्या वांट्याला हत्ती येईल. मी किती दिवसांपासून हत्ती पडेल म्हणून वाट पहात आहें." गौरीनाथ म्हणाला.

"असें म्हणतोस होय? तसा मला पण हत्तीच हवा आहे. तरमग हा रेडा आज तूंच घे. उद्यां हत्ती पडला तर मी घेईन." शरभ म्हणाला.

दुसऱ्या दिवशीं दोघे येऊन पाहतात तर खरोखरच एक हत्ती खड्ड्यांत



पडला होता. शरभच्या आनंदाला पारावार नव्हता. म्हणाला—"गौरी, याला म्हणतात अक्कल. लागोपाठ तीन दिवस आपला हिस्सा मी तुला देत आलों आणि म्हणून आज हत्ती माझ्या वांट्याला आला. हस्तीदंतांचीच किंमत पुष्कळ मिळेल."

"ठीक आहे ठेवून घे हा हत्ती, उद्यां या खड्ड्यांत मूल्यवान पानें पडतील तीं माझ्या वांट्याचीं होतील." गौरीनाथ म्हणाला.

"समज, लक्षावधि पानें पडलीं तरी काय मिळणार रे तुला त्यांत?" शरभनें विचारलें.

"मी तीं विकीन, तुला काय माहीत? प्रत्येक जण हमरी तुमरीनें घेऊन विकत घेईल तीं पानें." गौरीनाथ म्हणाला.

"तर मग तूं हा हत्ती ठेवून घे आणि उद्यां मूल्यवान पानें मिळालीं तर तीं मी घेईन. आपण जुने मित्र ना?" शरभ म्हणाला.

"नको रे, तूंच ठेवून घे ना हत्ती. पानें राहूं देत मला." गौरीनाथ म्हणाला.

"नाहीं, मी नाहीं घेत हत्ती. तूंच ठेवून घे." शरभ मूर्खपणानें हट्टाला पेटला होता.

दुसऱ्या दिवशीं दोघे खड्ड्याजवळ आले तेव्हां खड्ड्यांत पुष्कळ पानें पडलेलीं होतीं. तीं सर्व एका मोठ्या गांठोड्यांत बांधून घेऊन शरभ बाजारांत गेला. तेथें तीं पानें तो विकूं लागला तेव्हां सर्व लोकांनीं त्याला वेड्यांत काढलें व हंसूं लागले. तेव्हां त्याचा मूर्खपणा शरभच्या लक्षांत आला.





# दोन आई बाप

एका लहानशा गांवीं संतू नांवाचा एक शेतकरी रहात असे. त्याच्याकडे थोडी जमीन होती. तो त्यांतच शेती करून पीक काढी व तेवढ्यावर त्याचा उदरनिर्वाह चाले. त्याचें लग्न झालें. दहा वर्षें लोटलीं तरी त्याला मूलबाळ कांहीं झालें नाहीं.

त्या गांवानजीक एक नदी होती. नदीच्या काठीं त्याला एक शिवलिंग दिसलें. गांवच्या पाटलानें चंदा वसूल करून एक देऊळ बांधून त्यांत त्या शिवलिंगाची स्थापना करण्याचें ठरविलें. त्यानें गांवकऱ्यांना यथाशक्ति मदत करण्यास विनंति केली. मूल व्हावें म्हणून संतूनें कित्येक नवस आज पावेतों केले होते. या खेपेस त्यानें देवाचें दार करून देण्याचें ठरविलें.

दुसऱ्या दिवशीं संतू खांद्यावर कुऱ्हाड टाकून चंदनाचें झाड हुडकीत रानांत निघून गेला. सुदैवानें त्याला चंदनाचें एक मोठें झाड दिसलें. पण जवळच एक राक्षस उभा होता. राक्षस म्हणाला—"बरा भेटलास. मला नाहीं तरी भूक लागलीच होती. मी खाऊन टाकतों तुला."

"मी देवाचें काम घेऊन आलों आहे. माझा वध करणें शोभतें का तुला?" संतूनें राक्षसाला विचारलें.

"माझ्या झाडाखालीं जो कोणी येतो त्याला खाण्याचा मला अधिकार आहे. देवाच्या कामानें आला आहेस तर माझ्या झाडाला तूं कां हात लावलास?" राक्षसानें विचारलें.

संतूच्या डोळ्यांतून खळ्ळकन पाणी आलेलें पाहून राक्षसानें विचारलें—"तुझ्या

डोळ्यांत आलेलें पाणी पाहून मी तुला सोडून देईन असें वाटलें होय तुला ?"

"मी स्वत: मरणार म्हणून नाहीं रडत. मी एकटा आणि तूं सुकेला दिसतो आहेस. तूं मला खाल्लेंस तरी तुझें अर्धें पोटदेखील भरणार नाहीं. मला मूलबाळ नाहीं. म्हणून मी किंवा माझी बायको किती दिवस जगलों तरी विशेष फायदा नाहीं आम्हांला. म्हणून विचार केला, माझी बायको सुद्धां-बरोबर असती तर दोघांना खातां आलें असतें व तुझें पोट भरलें असतें. एकाचें पोट भरल्याची पुण्याई पुढल्या जन्मीं फळास आली असती व निदान पुढल्या जन्मीं मुलाचें तोंड पहायला मिळालें असतें. परंतु तें देखील भाग्यांत नाहीं म्हणून मी रडत होतों." संतू म्हणाला.

राक्षसानें बराच वेळ विचार केला व मग म्हणाला—"गेल्या वीस वर्षांपासून या झाडा-खालीं जो कोणी प्राणी नजरेस पडला त्याला मी खात आलों. मला पोटभर खायला मिळालें तर मी आणखी वीस वर्षें वाट पाहूं शकेन. मी सांगतों तें कर. या झाडाची एक फांदी मी तोडून देतों. ती तूं घेऊन जा. ती उगाळून आपल्या बायकोला खायला दे. तिला मुलगा होईल. त्या मुलाला विसावें वर्ष लागल्यावर त्याचें लग्न कर. त्यानंतर तूं, तुझी बायको, मुलगा व सून सर्व या. मी तुम्हांला सर्वांना खाईन म्हणजे माझें पोट भरेल."

संतू त्याला कबूल झाला. दाराला लागणारें लाकूड कापून घ्यायला राक्षसानें परवानगी दिली आणि अदृश्य झाला.

कांहीं दिवसांनीं संतूनें देवळाचें दार करून दिलें. पुढें कांहीं दिवसांनीं संतूच्या बायकोला दिवस राहाले आणि यथासमयीं बाळंत होऊन तिला एक मुलगा झाला. त्याचें नांव भद्रू असें ठेवण्यांत आलें. तो घरच्या व गांवच्या लोकांचा लाडका होता. गांवच्या पाटलाला पुष्कळ मुलें झालीं, पण एका मुलाशिवाय सर्व एकामागून एक देवाघरीं निघून गेलीं. पाटलांचा मुलगा व भद्रू दोघे वयानें बरोबरीचे होते, म्हणून दोघे बरोबरच गांवभर हिंडत फिरत.

दहावें वर्ष लागलें असेल, दोघे एकदां डोंगर चढून जात असतां पाटलाच्या मुलाचा पाय घसरला व तो एका खड्ड्यांत पडला. भद्रूनें पाटलाकडे धांवत जाऊन त्याचा मित्र खड्ड्यांत पडल्याचें सांगितलें. पाटलानें







येऊन पाहालें तर मुलाचें प्राणोत्क्रमण होऊन गेलें होतें.

पाटलाला वेड लागल्यासारखें झालें. तो मोठमोठ्यानें ओरडूं लागला—"भद्रूनें माझ्या मुलाचा जीव घेतला. एकुलता एक मुलगा होता मला आणि त्याला तुझ्या पोरानें ठार केलें. आतां या पुढें मला मुलाचें तोंड पहायला कोठून मिळणार! संतूचा मुलगा जिवंत असेपर्यंत माझें हें दुःख दूर होणार नाहीं."

गांवकऱ्यांनीं त्याची समजूत घालण्याचा यत्न केला. म्हणाले—"तुला किती मुलें झालीं व किती देवाघरीं गेलीं. त्याला जबाबदार कोण? बिचाऱ्या संतूच्या मुलाच्या नांवानें कां खडे फोडतोस?"

पण पाटलाच्या मनाचें तेवढ्यावर समाधान झालें नाहीं. खरें बोलावयाचें तर भद्रूवर देखील त्याचें स्वतःच्या मुलासारखेंच प्रेम होतें. दोघां मुलांना फिरतांना पाहून मनांतल्या मनांत त्याला किती आनंद होई? जणूं रामलक्ष्मणच. म्हणून त्यानें एकदां संतूला सांगितलें कीं भद्रूला माझा मुलगा म्हणून सहा महिने माझ्या घरीं राहूं दे व सहा महिने तुझा मुलगा म्हणून आपल्या घरीं ठेवून घे. ही एवढी अट कबूल केलीस तर माझ्या मनाचें थोडें तरी समाधान होईल.

तें ऐकून सर्वांना आनंद झाला. संतू पण कबूल झाला. एक दिवशीं दुपारीं सर्वां-समक्ष पाळी पाळीनें सहा सहा महिने भद्रूनें पाटलाकडे व संतूकडे रहायचें ठरलें.

भद्रूला अठरावें वर्ष लागलें तेव्हां संतूनें त्याचें लग्न एका शेतकऱ्याच्या मुलीशीं करून दिलें. पुढें भद्रू पाटलाच्या घरीं सहा महिने रहायला गेला तेव्हां पाटलानें त्याचें लग्न आणखी एका मुलीशीं करून दिलें. संतूच्या घरीं त्याची सून व पाटलाच्या घरीं त्याची सून अशा दोघी बायका भद्रूच्या दोघां आई वडिलांकडे राहूं लागल्या. भद्रूचा दोन्ही घरचा संसार चालू झाला.

भद्रूला विसावें वर्ष लागलें तेव्हां तो संतूच्या घरीं रहात असे. संतूला राक्षसाला दिलेलें वचन आठवलें. तो आपल्या बायकोला, मुलाला व गरोदर असलेल्या सुनेला घेऊन राक्षसाकडे गेला. चंदनाच्या झाडाखालीं पोंचेपर्यंत सूर्य मध्यावर आला होता. चौघे झाडाखालीं पोंचतांच राक्षस आला. तो संतूला म्हणाला—"तूं खरोखरच इमानदार मनुष्य दिसतोस. दिलेलें वचन तूं मोडलें नाहींस. तुम्हांला सर्वांना खाऊन मी आपली भूक भागवतों."

संतू म्हणाला—"होय, परंतु एका गोष्टीची अडचण उत्पन्न झाली आहे. गेल्या कांहीं क्षणापासून हा मुलगा माझा राहाला नाहीं. गांवच्या पाटलाचा झाला आहे." असें सांगून संतूनें सर्व खरें तें राक्षसाला सांगितलें.

"बरें तर, मी तुला, तुझ्या बायकोला व सुनेला खाऊन टाकतों." राक्षस म्हणाला.

"सुनेला पण सोडावी लागेल. कारण ती गरोदर आहे. तिला जें मूल होईल तें पाळी पाळीनें दर सहा महिन्यांनीं पाटलाचा नातू किंवा नात होईल. म्हणून मला व माझ्या बायकोला खाऊन आपली भूक भागव." संतू म्हणाला.

"म्हणजे इतके दिवस मी वाट पाहिली ती फुकट गेली म्हणावयाची?" राक्षस रागानें म्हणाला आणि अदृश्य झाला.

संतू कांहीं वेळ झाडाखालीं उभा राहाला आणि नंतर बायकोला, मुलाला व सुनेला घेऊन घरीं परत आला.





# लाकडी तलवार

एका राजाच्या पदरीं पतंग नांवाचा एक नोकर होता. त्याला सैनिक शिक्षण मिळालें होतें. तो चलाखपण दिसत होता. परंतु पुरेंसें वय नव्हतें म्हणून राजानें त्याला राजवाड्याच्या एका दारावर पाहारेकरी म्हणून नेमलें.

राजा, रात्रीं पाहारेकरी ठीक काम करतो आहे कीं नाहीं. हें पाहण्यासाठीं त्या बाजूला आला तेव्हां त्याला पाहारेकरी तलवार बाजूला ठेवून भिंतीला टेंकून झोंपलेला दिसला. राजानें त्याला सर्वांसमक्ष बोलावून दंड देण्याचें ठरवून त्याला उठविलें नाहीं. त्याच्या म्यानेंतली तलवार काढून घेतली आणि निघून गेला.

थोड्या वेळानें झोंप मोडल्यावर पतंगनें तलवार आहे का पाहिलें तर फक्त म्यानच त्याला दिसली. आपली तलवार घालवून बसल्याबद्दल त्याला मृत्युदंडसुद्धां भोगावा लागला असता. पाहरेकऱ्यांना उजाडल्यावर शस्त्रें परत करावयाचा नियम होता. त्याच प्रमाणें रात्रीची पाळी संपल्यावर प्रत्येक पाहरेकऱ्याला राजासमोर हजेरी द्यावी लागत असे. म्हणून कोठून तरी तलवार आणून दाखविणें जरूरी होतें. नाहींतर शिरच्छेदाची शिक्षा होण्याची शक्यता होती.

राजवाड्याच्या शेजारींच पतंगचा एक सुतार मित्र रहात असे. तो त्याच्याकडे धांवत गेला. त्याला उठवून मदत करण्यास विनंति केली.

सुतार म्हणाला—"अरे, तूं आपल्यावर स्वतःच्या मूर्खपणानें केवढें मोठें संकट ओढवून घेतलें आहेस. मी एक लाकडी तलवार तयार करून देतो. म्यानबाहेर मूठच दिसते, म्हणून तलवार लाकडी असली तरी काम भागेल. आजचें संकट टळलें कीं उद्यां राजाकडे फिर्याद कर कीं तुझी तलवार कोणी चोरून नेली आहे. नंतर तुला नवी तलवार मिळेल."

सुतारानें वचन दिल्याप्रमाणें एक लाकडी तलवार रात्रीच्या रात्रीं करून दिली. तल-वारीची मूठ चांगल्या तलवारीसारखी होती.

सूर्योदयानंतर इतर पाहारेकऱ्यांबरोबर पतंग पण राजासमोर हजेरी द्यायला रांगेत उभा राहाला. राजा पाहारेकऱ्यांची हजेरी घ्यायला नेहमीं एकटाच येत असे. पण त्या दिवशीं सैनिक एका कैद्याला पण बरोबर घेऊन आले होते.

राजानें पाहारेकऱ्यांना तो कैदी दाखवला व म्हणाला—"हा एक राजद्रोही आहे. याला शिरच्छेदाची शिक्षा झाली आहे. याला ही शिक्षा माझ्यासमोर आतां येथें देण्यांत यावी अशी माझी इच्छा आहे." असें सांगून त्यानें सर्व पाहारेकऱ्यांवर एकदां नजर फिरविली. पतंगावर त्याची नजर खिळली. म्हणाला—"जा, याला शिरच्छेदाची शिक्षा तूं दे."



पतंगला वाटलें कीं आतां त्याचें बिंग फुटणार. लाकडी तलवारीनें शिरच्छेद होणें अशक्यच आणि पोलादी तलवारीच्या जागीं लाकडी तलवार असल्याची गोष्ट सर्वांसमक्ष प्रगट होणार.

"महाराज, हें काम कृपा करून दुसऱ्या कोणाला द्यावें." कांपऱ्या आवाजांत तो म्हणाला.

"तूं माझ्या आज्ञेचें पालन करण्याचें नाकारतो आहेस!" राजानें दरडावून विचारलें.

"महाराज! मी एक सैनिक आहें. शूरासारखें युद्ध करून मरणें मला शोभतें. चांडाळाचें काम करणें शोभत नाहीं."

"हें पाप कर्म असेल तर त्याला जबाबदार मी. तूं माझ्या आज्ञेचें पालन केलें नाहींस तर तुला शिरच्छेदाची शिक्षा करवी लागेल." रागानें राजा म्हणाला.

पतंगनें डोळे मिटून हात जोडले आणि देवीचा धांवा करीत म्हणाला—"हे जगदंबे! भवानी माते! या संकटांतून तूंच वांचविलेंस तर मी वांचेन. हें पाप माझ्या हातून घडूं नये असें तुला वाटत असेल तर माझी तलवार लाकडी करून टाक." असें म्हणत त्यानें म्यानेंतून तलवार काढली. ती लाकडी तलवारच होती. सर्व पाहारेकरी हंसूं लागले. राजादेखील आपलें हंसूं आवरूं शकला नाहीं. त्यानें पतंगची कानउघाडणी करून त्याला माफ केलें. मात्र त्यानें दाखविलेल्या प्रसंगावधानाबद्दल राजानें त्याची पाठ थोपटली व अंतःपुराच्या पाहाऱ्यावरून त्याची बदली करून आपला खास अंगरक्षक म्हणून नेमलें.





# पगडीचा हुकूम

मणिमंगल राज्याच्या गादीवर जयंधर बसला त्या वेळेपासून 'पगडीचा हुकूम' अमलांत येऊं लागला. त्या हुकुमाप्रमाणें प्रत्येकानें घराबाहेर पडण्यापूर्वीं पगडीचें किंवा पागोट्याचें एक टोंक उजव्या डोळ्यावर येऊन उजवा डोळा झांकला जाईल अशा तऱ्हेनें पगडी किंवा पागोटें बांधावयाचें होतें. जो कोणी तो हुकूम मोडील त्याला शिरच्छेदाची शिक्षा मिळणार होती.

या हुकुमापाठीमागचें रहस्य असें होतें कीं स्वतः जयंधरला उजवा डोळा नव्हता. म्हणून तो उजवा डोळा झांकला जाईल अशा तऱ्हेनेंच फेटा किंवा पागोटें बांधीत असे. गादीवर बसल्यापासून त्याला रोज दरबारांत यावें लागे. दरबारांत येतांना उजवा डोळा झांकून राहील अशा बेतानें तो पगडी बांधीत असे. तो एकटाच तशी पगडी बांधून आला तर लोक नांवें ठेवतील, असा विचार करून सर्वांनीच तशी पगडी बांधावी असा हुकूम त्यानें काढला होता. ही युक्ति त्याला राजपुरोहितानें सुचविली होती. म्हणून गादीवर बसल्याबरोबर त्यानें तसा हुकूम काढला. तेव्हांपासून राजा पगडी बांधी त्या प्रमाणें सर्व दरबारी पगडी बांधून येऊं लागले. म्हणून राजाच्या पगडींत वैगुण्य काढण्याचें कारण राहालें नाहीं. गांवांत देखील लोक तशीच पगडी बांधून हिंडूं फिरूं लागले. म्हणून परदेशी कोणी आला कीं त्याला राजाची पगडी विचित्र वाटत नसे.

फक्त एका डोळ्यानें पाहाण्यांत प्रत्येकाला त्रास मात्र फार होत असे. परंतु



राजाचा व्यवहार सर्वांशीं चांगला होता. राज्य कारभारांत तो बाकबगार पण होता. म्हणून कोणी कधीं तो हुकूम मोडला नाहीं. परंतु इतर राज्यांतून जे लोक स्वतःच्या अगर राज्याच्या कामानें येत त्यांना फार त्रास होई, कारण त्यांना देखील त्या हुकुमाची अंमलबजावणी करावी लागे. त्यांना हा हुकूम मूर्खपणाचा वाटे.

जयंधरला धुरंधर नांवाचा एक मुलगा होता. बापासारखा त्याचा उजवा डोळा फुटका नव्हता. तो सुंदर होता, तसेच त्याचे डोळे पण टपोरे व सुंदर होते. परंतु तो घराबाहेर निघे तेव्हां तो देखील पगडीच्या हुकुमाचें पालन करी.

धुरंधर मोठा झाल्यावर राज्यभर भ्रमण करायला निघाला. परदेश भ्रमणाला पण गेला. आपल्या योग्य राज्यकन्या कोठें तरी मिळेल, हा भ्रमणाचा मुख्य उद्देश होता. कांहीं दिवस भ्रमण केल्यावर कंजर देशाच्या राजकन्येवर त्याची दृष्टि पडली. त्याला ती पसंत पडली. त्यानें घरीं येऊन वडिलांजवळ निवेदन केलें कीं त्याला कंजर देशाच्या राजाची मुलगी पसंत पडली आहे व कंजरचा राजापण या लग्नास तयार आहे. कंजर राजाचा निरोप घेऊन त्या देशाचा मंत्री येत आहे, हें ऐकून जयंधरला आनंद झाला. मुलाला मुलगी व मुलीला मुलगा पसंत पडल्यावर आई वडिलांना तसें इतर कांहीं वैगुण्य कळल्याशिवाय नकार देण्याचें कारणच काय?

ठरल्याप्रमाणें कंजर देशाचा मंत्री नजराणा व निरोप घेऊन मणिमंगलच्या राजधानींत आला. तो वृद्ध होता. पण त्यानें डावा डोळा झांकून पगडी बांधली होती. तो आल्याबरोबर राजाच्या अधिकाऱ्यांनीं त्याचें यथोचित स्वागत व सत्कार केला व म्हणाले—"आपण डाव्या बाजूला पगडी बांधली आहे. परंतु आमच्या राज्यांत उजव्या बाजूला डोळ्यावरून पगडी बांधावी असा राजे सरकारांचा हुकूम आहे."

"असें होय! पण माझ्या डाव्या डोळ्याला दिसत नाहीं. म्हणून मी डाव्या बाजूला पगडी बांधली आहे. आतां या देशाच्या हुकुमाप्रमाणें उजव्या डोळ्यावरून पगडी बांधली तर मला मुळींच दिसणार नाहीं. काय करूं सांगा!" वृद्ध मंत्र्यानें विचारलें.

अधिकाऱ्यांनीं पगडीचा हुकूम फार कडक आहे, असें निवेदन केलें. म्हणाले—कोणीहि कोणत्याहि परिस्थितींत तो मोडतां कामा नये. उजव्या डोळ्यावर पट्टी बांधल्यानें मुळींच दिसणार नसेल तर आंधळ्यासारखें कोणाचा तरी हात धरून चालायला काय हरकत आहे!"

कंजरमंत्री हुकुमाचें पालन व्हावें म्हणून उजव्या डोळ्यावर पगडी बांधून व एका डोळस माणसाला मदतीला घेऊन दरबारांत आला आणि म्हणाला—"महाराज, मी कंजर देशाच्या महाराजांच्या वतीनें





निरोप घेऊन आलों आहें. आपण आमच्या राजकन्येला आपली सून करून घ्यावी अशी विनंति आहे. या महत्वाच्या प्रश्नावर आपणांशीं बोलावें म्हणून आलों होतों. परंतु आपल्या अधिकाऱ्यांनीं राज्यांतल्या कायद्याप्रमाणें माझ्या उजव्या डोळ्यावर पट्टी बांधून मला आंधळा केलें आहे आणि अशा तऱ्हेनें माझा अपमान पण केला आहे. असा विचित्र हुकूम काढणाऱ्या राजाच्या घराण्याशीं संबंध जोडणें आमच्या महाराजांना मुळींच पसंत पडणार नाहीं. एवढेंच नव्हे तर या अपमानाबद्दल नुकसान भरपाई करून द्यावी म्हणून आम्ही आग्रह धरूं व तें आपण न केल्यास आपल्या राज्यावर स्वारीपण करूं." असें सांगून तो मागें सरकला.

तें उर्मटपणाचें बोलणें ऐकून जयंधरला मनस्वी राग आला. म्हणाला—"मुलीची बाजू, आणि इतका गर्व? आमच्या देशांत चालू असलेला कायदा माहीत असूनहि तुमच्या राजानें एका आंधळ्या मंत्र्याला आमच्याकडे पाठविलें आहे तर तो आमचा अपमान नाहीं काय? तुझें आव्हान कबूल. ये युद्धाला. तुझा गर्व भंग करून तुझ्या राजकन्येचें आम्ही हरण करूं व तिच्याशीं आपल्या मुलाचें लग्न करून देऊं. पाहतों तूं काय करतोस तें."

त्यानें कंजरच्या मंत्र्याला कैद करण्याचा हुकूम दिला आणि मंत्र्याबरोबर आलेल्या लोकांना म्हणाला—"जा, तुम्ही आपल्या राजाला युद्धाला तयार रहा म्हणून जाऊन सांगा." नंतर त्यानें आपल्या सेनापतीला बोलावून आज्ञा केली कीं सैन्य सज्ज करून कंजर देशावर स्वारी करण्यांत यावी.

सेनापति सैन्य घेऊन युद्धास गेला व कांहीं दिवसांनीं एकटाच परत येऊन म्हणाला—"महाराज! शत्रूनें आपल्या सर्व



सैनिकांना कैद केलें आहे. मी कसाबसा आपला जीव बांचवून आपणांस ही बातमी देण्यासाठीं परत आलों आहें."

राजानें चकित होऊन विचारलें—"पण इतका मोठा पराभव होण्याचें कारण काय!"

सेनापति म्हणाला—"माफ करा महाराज! आपल्या देशांतल्या या पगडीच्या हुकुमामुळेंच आपल्या सैन्याची अशी दुर्दशा झाली आहे." आपल्या सैनिकांनीं उजव्या-डोळ्यावर फेटा बांधून युद्ध केलें. त्यांच्यावर कोणी डाव्या बाजूनें वार केला तर तो कळे. पण उजव्या बाजूनें केला तर कळत नसे. ही गोष्ट शत्रूला कळली. त्यांनीं उजव्याच बाजूनें छापा मारून सैनिकांना धरलें व त्यांचीं शस्त्रें काढून घेऊन त्यांना ओढून घेऊन गेले. आतां कंजर राजा स्वतः आपलें सैन्य घेऊन आपल्या राज्यावर चालून येत आहे."

"आतां काय करावें म्हणतां?" राजानें मंत्र्याला विचारलें.

"पगडी बांधण्यासंबंधीचा हुकूम मागें घेण्यांत यावा. निदान राजवाड्यांतले सैनिक तरी शत्रूला थोपवून धरतील. नंतर कंजर



देशाच्या मंत्र्याला सुटका देऊन त्याची माफी मागावी व त्याला आदरपूर्वक निरोप द्यावा. पगडीचा हुकूम मागें घेतला असल्याची गोष्ट तो आपल्या राजाला कळवील. त्यानंतर त्या राजाशीं कांहीं तरी सलोखा करून घेतां येईल." मंत्री म्हणाला.

राजा कांहीं वेळ विचार करून म्हणाला—"हा सल्ला बरोबर दिसतो आहे. मी पगडीचा हुकूम मागें घेतों. मंत्र्याला कैदेंतून सोडा व राजपुरोहिताला त्याच्या जागीं तुरुंगांत टाका. पगडीचा हुकूम त्याच्या सल्ल्यानेंच काढण्यांत आला होता."

लगेच मंत्र्यानें प्रथम आपली पगडी सरळ केली. दरबाऱ्यांनीं आपापल्या पगड्या ठीक केल्या. राजकुमार स्वतः पगडी सारखी करून कंजरच्या मंत्र्याला सोडण्याची अंमल बजावणी करण्यासाठीं गेला. तेव्हां त्याचा उजवा डोळा पण सुंदर आहे हें कळलें. त्याचे दोन्ही डोळे छान होते.

"हें सर्व मीच रचलेलें नाटक होतें मणिमंगलच्या लोकांच्या डोळ्यावरचें पगडीचें झांपड जावें म्हणून. या नाटकांत मणिमंगल मंत्री व सेनापतीनें जें कांहीं केलें तें माझ्याच सल्ल्याप्रमाणें केलें होतें. मणिमंगलच्या सैन्याचा पराभव झालाच नव्हता. युद्धच झालें नाहीं." राजकुमारानें हें सर्व सांगून आपल्या वडिलांची माफी मागितली. राजानें मुलाला फक्त माफच केलें नाहीं तर त्याच्या चातुर्याबद्दल त्याची पाठ थोपटली.

त्यानंतर धुरंधर व कंजरच्या राजकन्येच्या विवाह समारंभ थाटामाटानें पार पडला. मणिमंगलच्या प्रजेनें दोन्ही डोळे उघडून लग्नसोहळा पाहिला. त्यांच्या आनंदाला पारावारच नव्हता





# निरुपयोगी धन

एका देशांत एक मोठा श्रीमंत मनुष्य रहात असे. त्यानें आपलें सर्व धन तीन पिंपांत भरून तळघरांत ठेवून दिलें. त्यानें एका पिंपांत सोन्याचीं, दुसऱ्यांत चांदीचीं व तिसऱ्यांत तांब्याचीं नाणीं भरून ठेवलीं.

त्या देशावर एकदां शत्रूनें स्वारी केली. देशावर शत्रूचा अधिकार होणार हें नक्की दिसूं लागलें तेव्हां तो श्रीमंत मनुष्य देश सोडून पळून जायचा विचार करूं लागला. परंतु तीं पिंपें उचलून घेऊन जाणें त्याला शक्य नव्हतें. त्यांवर त्यानें मेण घालून ठेवलें. तळघराला त्यानें कुलूप सुद्धां लावलें नाहीं आणि देश सोडून निघून गेला.

कांहीं दिवसांनीं शत्रूनें तें नगर जिंकलें. सेनापतीनें स्वतःच्या देखरेखीखालीं श्रीमंताजवळचें धन लुटण्याचा सपाटा सुरू केला. त्या श्रीमंताच्या पिंपावर पण त्याची नजर पडली.

"हीं मेणानें भरलेलीं पिंपें दिसत आहेत. कोणी हीं पिंपें विकत घ्यायला तयार आहे का चवकशी करून पहा." त्यानें सैनिकांना आज्ञा केली. त्यांनीं पुष्कळ प्रयत्न करून पाहिला पण कोणी तीं पिंपें विकत घ्यायला पुढें येईना.

शेवटीं एक मनुष्य म्हणाला—"मेणबत्त्या तयार करून मी विकतों. मला हीं पिंपें कमी किंमतीला दिलीत तर घ्यायला मी तयार आहें. त्यानें दिले तेवढे पैसे ठेवून घेऊन सैनिकांनीं तीं पिंपें त्याला दिलीं. म्हणाले—"उचल, घेऊन जा. फुकटाचा पाहारा इतके दिवस देत होतों."

मेणबत्तीवाला तीं तिन्ही पिंपें मजुरांकरवीं आपल्या घरीं घेऊन गेला. शत्रूचें सैन्य तें

गांव सोडून निघून गेल्यावर त्यानें मेणबत्त्या करण्यासाठीं मेण काढायला म्हणून पिंपांत हात घातला तेव्हां कांहीं तरी टणक त्याच्या हाताला लागलें. त्यानें उचलून पाहिलें तर सोन्याचीं नाणीं. त्यानें चकित होऊन चाचपून पाहालें तर मेणाच्या खालीं सोन्याचीं नाणींच नाणीं.

त्यानें दोन्ही पिंपेंपण उत्सुकतेनें मेण काढून पाहिलीं तर त्याला एकांत चांदी व दुसऱ्यांत तांबें दिसलें. त्याला आश्चर्या-बरोबर फार आनंद झाला. परंतु त्यानें ती गोष्ट कोणाला सांगितली नाहीं. ज्या खोलींत तीं पिंपें ठेवलीं होतीं त्या खोलीला एक मोठें भक्कम कुलूप लावून ठेवलें. त्या खोलीच्या रक्षणासाठीं आणखी बंदोबस्तपण केला. त्याला आतां गरीबीचें भय उरलें नाहीं. तरी त्यानें श्रीमंतीचें प्रदर्शनपण केलें नाहीं व आनंदानें राहूं लागला.

काळ लोटत गेला, पण त्याचा खजिना का कमी होणार? एकदां त्यानें आपल्या एका शिंपी मित्राकडून स्वत:साठीं कपडे शिवबिले व त्याला मूठभर सोन्याचीं नाणीं दिलीं.



शिंपी चकित होऊन 'आ' वासून पाहूं लागला, इतकें सोनें त्याच्या मित्राकडे कोठून आलें? म्हणाला–"मला माझी मजुरी हवी आहे. एवढें सोनें घेऊन मी काय करणार?"

"माझ्याजवळ पिंप भरून सोनें आहे. मला काय करायचें आहे एवढें सोनें! तूं तरी माझ्या सारखाच गरीब आहेस. म्हणून घे ठेवून." मेणबत्तीवाला म्हणाला.

शिंप्याला त्याच्या बोलण्यावर विश्वासच बसेना.

"तुझ्याजवळ इतकें सोनें कोठून रे येणार! वेडबीड तर नाहीं लागलें तुला!" शिंप्यानें विचारलें.

"चल माझ्याबरोबर व स्वत:च्या डोळ्यांनीं पाहून घे मी म्हणतों तें खरें आहे कीं नाहीं." मेणबत्तीवाला म्हणाला. मेणबत्तीवाला आपल्या मित्राला बोलावून घेऊन गेला. त्याला पिंपांत ठेवलेला सोन्या चांदीचा ठेवा दाखवून म्हणाला–"मी हें सर्व ठेवून तरी काय करणार? यांतलें अर्धें मी तुला देतों. घेऊन जा."

शिंप्यानें दोन मुठी सोन्याचीं नाणीं घेतलीं "एवढी मला पुरे. माझें सर्व अनुष्य आरामानें मी घालवूं शकेन. एक गोष्ट मी सांगतों, लक्षांत ठेव. हें धन हजार वर्षं तूं जगलास तरी खपणार नाहीं. फक्त डोळ्यांनीं पाहून मनाचें समाधान करून घे. हें सर्व फुकटांत जाणार. म्हणून कोणाला कळूं दिल्याशिवाय गरीबांना वांटून टाक. निदान त्यांना तें उपयोगी पडेल."

मेणबत्तीवाल्याला तो सल्ला पटला. त्यानें त्याला आयुष्यभराला पुरेल एवढें धन ठेवून घेतलें व बाकी गोरगरीबांना वांटून टाकलें.





# दुःखामागून सुख

विश्वपूर नांवाच्या राज्यांत एकदां एक मोठा ज्योतिषी आला. त्यानें कित्येकांची जन्मकुंडली पाहिली. त्यानें भविष्य वर्तविलें तें ऐकून सर्वांना आश्चर्य वाटलें. तें पाहून विश्वपूरच्या सेनापतीनें आपल्या मुलाची जन्मकुंडली ज्योतिष्याला दिली व म्हणाला—"हा माझा एकुलता एक मुलगा आहे. नेहमीं कविता करीत बसतो. वीरपुरुषासारखी कीर्ति संपादन करून आपल्या कुळाचा उद्धार करीलसें मला नाहीं वाटत."

ज्योतिष्यानें प्रेमदत्ताची कुंडली पाहिली व म्हणाला—"सेनापति! मुलाच्या भाग्यांत तर राजयोग आहे. हा लहान वयांतच गादीवर बसणार आहे."

तें भविष्य कळल्यावर राजाला मात्र प्रेमदत्त आपला सर्वांत मोठा शत्रु आहे असें वाटलें. ज्योतिष्यानें सर्वांचें भविष्य बरोबर सांगितलें आहे तर प्रेमदत्ताचें भविष्य चुकीचें कसें सांगेल. तो गादी बळकावण्याचा कांहीं ना कांहीं प्रयत्न करणार.

राजाचें तोंड पाहूनच सेनापतीनें त्याच्या मनांत चाललेली काळ्वाकाळव ओळखली. राजा आपल्या मुलाचा वध करविल्याशिवाय राहणार नाहीं ही शंका त्याच्या मनांत घर करून बसली. तो आपल्या मुलाला म्हणाला—"तूं नुसत्या कविता करीत बसतोस माझा मुलगा शोभशील असें कांहीं कां नाहीं करीत? तूं राज्यकारभार आपल्या हातीं घेतलास तर बरें होईल. पण त्याचा आनंद मला मात्र होणार नाहीं. कारण राजा तुला लपूनछपून ठार करणार. त्याबद्दल त्याला दोष देणेंपण बरोबर नाहीं. म्हणून तूं आजच्या आज राज्य सोडून कां नाहीं निघून जात! तूं जिवंत राहून कोठेंहि राहलास तरी चालेल."

त्याच दिवशीं रात्रीं प्रेमदत्त विश्वपुर राज्य सोडून निघून गेला. सेनापतीनें दुसऱ्यादिवशीं येऊन राजाजवळ निवेदन केलें—"महाराज! आपल्या राज्यांत आपण स्वतः किंवा आपल्या मुलांपैकीं कोणी यांच्याशिवाय कोणाच्या भाग्यांत राजयोग असतां कामा नये. मी ज्योतिष्यानें वर्तलेलें भविष्य ऐकल्यानंतर आपल्या मुलाला राज्याच्या हद्दीबाहेर काढून लावलें आहे."

तें ऐकून राजाला आनंद झाला. त्याची सर्व काळजी दूर झाली. सेनापतीची राजभक्ति पाहून राजाला फार बरें वाटलें.

ज्योतिष्याच्या बोलण्यावर कोणाचा विश्वास नव्हता तर तो फक्त प्रेमदत्तचा. कारण त्याला काव्य वाचनांत व लेखनांत जो आनंद वाटे तो इतर कामांत,—त्यांत राज्यकारभारांत मुळींच वाटत नसे. त्याला राज्य नको होतें व राज्यकारभारपण नको होता. म्हणून घरदार सोडून वणवण फिरत राहण्याचें नशिबीं आलेलें त्याला मुळींच आवडलें नाहीं.



त्याला वेळेवर खायला प्यायला देखील मिळेनासें झालें. उन्हांतान्हांत तो वणवण फिरे, इतक्या हाल अपेष्टा सहन केल्या नंतर त्याला आयुष्याचा व त्या जीवनाचा वीट आला. त्या स्थितींत त्याला कविता काय सुचणार? कवितेनें जणुंकांहीं पाठच फिरविली.

एकदां तो उपासतापास काढीत कोठेंतरी जात असतां बेशुद्ध होऊन जमिनीवर पडला. शेजारच्या झोंपडींतून एक म्हातारी व तिची मुलगी आली व दोघींनीं त्याच्या तोंडावर पाणी शिंपडून त्याला प्यायला पाणी दिलें व त्याला उचलून आपल्या



झोंपडींत घेऊन आल्या. त्यांनीं त्याला खाटेवर झोंपविलें. शुद्धीवर आल्यावर व थोडें खाल्यावर त्याला हलकें वाटलें.

घर सोडल्यानंतर अगदीं पहिल्यानें त्याला इतक्या प्रेमादरानें कोणी जवळ करून खायला प्यायला दिलें होतें. म्हणून त्याला स्वतःच्या आयुष्याचा जो वीट आला होता तो अल्प का होईना, दूर झाला. त्याला त्या झोंपडींत राहणारी म्हातारी व तिची मुलगी जवळचीं माणसें वाटलीं.

"कोण तुम्ही, कोठले राहणारे?" मुलीनें विचारलें.

"माझें नांव प्रेमदत्त. माझें असें कोणी या जगांत नाहीं. माझ्या जीवनांत माझी साथ देणारी एकटी कविता काय ती आहे." तो म्हणाला.

"माझें तरी कोण आहे? ही आजी आहे म्हणून जिवाला थोडा आधार आहे. तुम्हांला कविताच लिहावयाची आहे तर ती आमच्या बरोबर या झोंपडींत राहून लिहितां येणार नाहीं का? तुम्हांला आमचें हें घर ज्या दिवशीं सोडावेंसें वाटेल त्या दिवशीं खुशाल जावें." ती मुलगी म्हणाली.

"तुम्ही दोघी इतक्या प्रेमानें मला उचलून घेऊन आलांत व आजपर्यंत खायला घातलेंत, मग तुमच्या घराचा मला कां बरें कंटाळा वाटेल?" प्रेमदत्त म्हणाला.

"मला रूप रंग नाहीं. मी काळी व कुरूप आहें. माझें तोंड पाहूनच कोणी तोंड फिरवून निघून जाईल." ती मुलगी म्हणाली.

प्रेमदत्तनें चकित होऊन तिच्याकडे पाहिलें व म्हणाला—"तुला कुरूप कोण म्हणतो?" त्यानें तिच्या रूपावर एक कविता रचून म्हणून दाखविली. तिला फार आनंद वाटला.



दिवसामागून दिवस जात होते व त्या 'कुरूप' मुलीला पाहून प्रेमदत्तच्या मनांत प्रेम वाढत होतें. तें पाहून व ओळखून म्हातारी त्याला म्हणाली—"बाळ! या मुलीचें लग्नाचें वय झालें आहे. पण तिचें हें रूप पाहून कोण लग्नाला तयार होणार? म्हणून तिचें लग्न झालें नाहीं. लग्न करून दिल्याशिवाय या मुलीला घेऊन मी गांवांत राहालें असतें तर लोकांनीं नांवें ठेवलीं असतीं. तें आम्हांला आवडलें नसतें म्हणून आम्ही गांवाबाहेर झोंपडें बांधून रहात आहों."

"हिला कुरूप म्हणणारे मूर्ख! हिच्या हृदयाचें सौंदर्य कोणी पाहिलें आहे का? तें डोळ्यांना दिसत नाहीं. मी आहे तिच्याशीं लग्नाला तयार. पण माझ्या सारख्या भिकाऱ्याशीं लग्न करून तिच्या व तुमच्या जिवाला काय सुख मिळणार? मी इतके दिवस फुकटाचें खाणें खात आहे? पण कधीं मी कांहीं मिळवून आणलें का? एका दिवसापुरेंसें तरी मी कांहीं मिळविलें का?" प्रेमदत्त म्हणाला.

"तूं तर सुंदर आहेस, आणि या मुलीशीं तूं लग्नाला तयार आहेस, म्हणतोस? पण हिच्यावरचें प्रेम हें किती दिवस टिकणार? दुसरी सुंदर मुलगी दिसली कीं तूं हिला देशील सोडून." म्हातारी म्हणाली.

"मी लग्न करण्याचें कधीं ठरविलें तर हिच्याशींच करीन. ही मी शपथ घेऊन सांगतों." प्रेमदत्त म्हणाला.

"तुझ्या गरीबीचें भय मला नाहीं. मी तुमचें दोघांचें लग्न करून द्यायला तयार आहें." म्हातारी म्हणाली.

दुसऱ्या दिवशींच लग्नाचा मुहूर्त होता. लग्नाच्या मुहूर्तावर त्या देशाचा राजा तेथें आला तेव्हां खरी गोष्ट कळली. त्या










झोंपडींत राहणारी मुलगी राजाची मुलगीच होती. तिचें नांव चंद्रिका होतें. ती वयांत आली तेव्हां राजानें तिचें लग्न करून द्यावयाचें ठरविलें. ती दिसायला बेताचीच होती, म्हणून तिच्याशीं लग्नाला कोणी तयार होईना. शेवटीं राजानें असें ठरविलें कीं तिच्याशीं जो लग्नाला तयार होईल त्याला त्याचें अर्धें राज्य मिळेल. पण चंद्रिकेला तें मान्य नव्हतें.

"जो फक्त रूप व सौंदर्य पाहून किंवा धनलोभानें लग्नाला तयार होतो त्याच्याशीं लग्न केल्यानें सुख काय मिळणार ? मला ज्या संसार सुखाची व प्रेमाची अपेक्षा आहे तें मला राजवाड्यांत व अशा तऱ्हेनें झालेल्या विवाहानें मिळणें शक्य नाहीं. म्हणून मला दूर कोठेंतरी झोंपडींत राहूं द्या. माझा होणारा पति माझ्या शोधार्थ स्वतःच्या पायांनीं चालून येईल." चंद्रिका आपल्या वडिलांना म्हणाली.

मुलीचें म्हणणें राजाला पटलें. त्यानें गांवाबाहेर पण जवळच एक झोपडी बांधवून त्यांत चंद्रिकेला राहण्यासाठीं आवश्यक ती सर्व व्यवस्था करून देऊन एका म्हाताऱ्या दाईला तिच्या सोबतीला ठेवलें. कांहीं दिवसांनीं प्रेमदत्तानें तिच्या झोंपडींत पाय ठेवला.

तें सर्व कळल्यावर प्रेमदत्तानें आपल्या आयुष्याचें खरें रहस्य उघडपणें सांगितलें. दोघांना कष्ट सहन केल्यावर सुखाचे दिवस पहायला मिळाले. त्यांनीं जे कष्ट सहन केले त्यामुळेंच त्यांच्या हृदयांत प्रेमाचा उदय झाला.

राजानें थाटानें मिरवणूक काढली व आपल्या मुलीला व जांवयाला राजधानींत घेऊन गेला. त्यानें दोघांचें लग्न करून देऊन प्रेमदत्तला आपलें अर्धें राज्य दिलें.





# मंतरलेला चाबूक

कधीं काळीं केरळ प्रांतांत सामान्य माणसाला सुद्धां मंत्रविद्या अवगत होती. म्हणें, एका जहागीरदाराकडे गाडी हांकायला एक नोकर होता. जहागीरदाराकडे तीस घोडे होते. त्यांची निगा ठेवण्यासाठीं निराळे नोकर होते.

एकदां जहागीरदार गाडींत बसून कोठें-तरी जात असतां वाटेंत एका एकीं घोडे थांबले. गाडीवाल्यानें त्यांना चालवण्याचा निरनिराळ्या प्रकारें प्रयत्न करून पाहिला. पण घोडे एकहि पाऊल पुढें टाकीत ना.

गाडीवाल्यानें डोकें वर करून पाहिलें तर एक जण घर शाकारींत असलेला दिसला. तो त्याला म्हणाला—"आम्हांला जाऊं दे कीं रे!"

तो मनुष्य छपरावरून खालीं उतरून आला व विचारूं लागला—"मला कांहीं म्हणालास का? मी तर आपलें काम करतों आहें. मी अडविलें का ? खुशाल जा."

गाडीवाला कांहीं बोलला नाहीं. त्यानें आपला चाबूक उचलून तीनदां त्यावर फुंकर घातला, आणि जोरानें घोड्याला मारला. लगेच घर शाकारणारा मोठमोठ्यानें ओरडत जमिनीवर येऊन आदळला.

हें सर्व जहागीरदार स्वतः पहात होता. हें आपल्याच नोकराचें काम आहे हें त्यानें ओळखलें. अशा नोकराला आपल्या पदरीं नोकरीला ठेवणें बरोबर नाहीं असें त्यानें ठरविलें आणि एका वर्षाचा पगार देऊन त्याला काढून टाकलें.

गाडीवाल्याला काढून टाकल्यावर घोडे कोणालाजवळ येऊं देत ना. कोणी दाणा-पाणी घेऊन आलें कीं ते चांवायला धांवत

सौ. शालिनी इनामदार

किंवा मागच्या पायांवर उभे राहून त्यांच्या अंगावर उडी मारीत. तीन दिवस लागो-पाठ घोड्यांनीं कांहीं खालें नाहीं, कीं कांहीं प्याले नाहींत. नोकरांनीं जहागीरदाराला तें कळविलें.

हें त्या गाडीवाल्याचेंच काम असलें पाहिजे हें कळायला जहागीरदाराला वेळ लागला नाहीं. त्यानें एका नोकराला बोलवायला पाठविलें. "मालकानें बोलावलें आहे तुला." नोकर त्याला म्हणाला.

"आतां मी त्यांचा नोकर नाहीं, त्यांनीं बोलावल्याबरोबर यायला. भेटलों नाहीं म्हणून सांग." गाडीवाला म्हणाला.

दुपारीं पुन्हां एक जण आला व म्हणाला—"मालकानें बोलावलें आहे."

"मालकानें मला नोकरीवरून काढल्याचें मी या कानांनीं ऐकलें आहे, त्यांनीं बोला-विलेलें मी नाहीं ऐकलें." गाडीवाला म्हणाला.

शेवटीं जहागीरदार स्वतः त्याला बोलावून घेऊन आला. तो आला तेव्हां तबेल्यांत सर्व अस्तव्यस्त दिसलें. गाडीवाल्यानें आपला जुना चाबूक खुंटीवरून काढून घेतला आणि घोड्याजवळ जाऊन म्हणाला—"काय रे, काय भानगड आहे?" नंतर त्यानें चाबूक दोन तीनदां हवेंत फिरविला व नोकरांना म्हणाला—"द्या दाणापाणी. पाहातों कसे खात नाहींत ते."

घोड्यांचें भूत उतरल्यासारखें दिसलें. समोर ठेवलेला दाणा खाऊन पाणी दाखविल्याबरोबर पिऊं लागले. जहागीर-दारानें गाडीवाल्याचा पगार वाढविला व त्याला पुन्हां कधीं नोकरीवरून काढला नाहीं.






कंसाच्या वधाची बातमी वणव्यासारखी राजधानीभर पसरली. अंतःपुरांत गोंधळ उडून गेला. कंसाच्या बायका त्याच्या प्रेतावर पडून हंबरडा फोडून रडत होत्या.

कंसाची आई पण आपल्या सुनांबरोबर रडत होती. ती तिचा पति उग्रसेन याच्या-कडे जाऊन म्हणाली—"तुम्ही पाहिलेंत का आपल्या मुलाला जाऊन? त्याच्यावर जणुं कांहीं वीजच पडली आहे. त्याचा दहन संस्कार करण्याची व्यवस्था करायला हवी. कृष्णानें आपल्या बाहुबलानें हा विजय मिळविला आहे. आतां त्याच्याजवळच दहन संस्काराची परवानगी मागायला हवी."

कृष्ण आपल्या यादव मित्रांच्या बरोबर बोलत उभा होता. त्याला कंसाच्या राण्यांचें रडणें ऐकूं आल्याशिवाय राहालें नाहीं. त्यांचा तो शोक पाहून त्याचें हृदय पण द्रवलें व डोळे ओलावले. तो आपल्या स्नेही आप्तबांधवांना म्हणाला—"मी या पोरकटपणानें पहा किती निरपराधांचा शाप घेत आहें. परंतु कंसाचा दुष्टपणा थांब-वायला दुसरा मार्गच नव्हता. स्वतःच्या बापाला तुरुंगांत टाकून गादी बळकावणारा दुष्ट मुलगा या जगांत कोठें आहे का! अशा पापी मूर्खांची कींव करणें म्हणजे देखील मोठें पाप आहे. मी लोक कल्याणा-

१२. बलराम आणि कृष्ण यांचा विद्याभ्यास



साठींच हा वध केला. पुढें काय करावयाचें हें देखील मी ठरवून ठेवलें आहे."

उग्रसेन आपल्याबरोबर शिनी वगैरे यादवांना घेऊन कृष्णाकडे आला आणि गद्‌गद्‌कंठानें म्हणाला—"बाळ! तूं एका महापापी व दुष्ट अशा राजाचा नाश करून मोठी कीर्ति संपादन केली आहेस आणि यादवकुळाचा उद्धार केला आहेस. आजपासून तूंच या राज्याचा धनी झाला आहेस. तूं शत्रूचा नाश केला आहेस, तेव्हां त्याच्या विषयीं दुष्टावा तुझ्या मनांत असूं नये. आम्ही त्याचे बांधव व आप्त आहोत, म्हणून आमच्याशीं वैर ठेवण्याचें मुळींच कारण नाहीं. आतां कंसाचा दहन संस्कार करावयाचा आहे. तुझी परवानगी असेल तर आम्ही त्या प्रयत्नास लागूं. त्यानंतर मी वानप्रस्थाश्रम ग्रहण करीन."

कृष्ण म्हणाला—"आजोबा! यासाठीं माझ्या परवानगीची गरज आहे का? कंसाच्या दहनसंस्कारास का मी नकार देणार? आणखी एक गोष्ट मी सांगूं इच्छितों. मी गादी बळकावण्यासाठीं आपल्या मामाचा वध केला नाहीं. तो पितृद्रोही होता, अत्याचारी दुष्ट होता म्हणून लोककल्याणास्तव कर्तव्य म्हणून मी हें कृत्य केलें. आतां मी व माझे आप्तबंधू परत आपल्या गाईगुरांमध्यें परत जाऊं. गवळ्यांच्या वस्तींत राहून गुराखी सवंगड्यांच्या संगतींत राहण्यांतच मला आनंद वाटेल. आपलें हें राज्य आपल्या दुष्ट मुलानें बळकावून घेतलें होतें. हें आपलें राज्य संभाळून तुम्हीच प्रजेचें पितृवत् वात्सल्यानें पालन करावें. राज्य परत मिळवून देण्याच्या कामीं मी निमित्तमात्र होतों. माझ्यावर तुमचें खरें प्रेम असेल तर तुम्ही माझी ही विनंति स्वीकारावी."



कृष्णानें जास्त वेळ न घालवितां उग्रसेनाचा विधिवत राज्याभिषेक करून दिला. उग्रसेनानें कृष्ण व बलराम दोघांचा यथोचित सत्कार केला. कृष्णानें मथुरेला पूर्वीपेक्षां जास्त वैभव मिळवून दिलें.

एके दिवशीं तो बलरामाला म्हणाला—"दादा! आपण जन्मलों तेव्हां पासून रानांत हिंडत फिरत राहिलों. विद्याभ्यास कधीं केला नाहीं. निदान आतां तरी गुरुगृहीं राहून विद्याभ्यास केला पाहिजे."

मनांत येतांच तो विचार त्यांनीं आपल्या सर्व आप्तेष्टांना कळविला. त्यांच्या परवानगीनें अवंतीपूरच्या सांदीपनी नांवाच्या प्रख्यात गुरूकडे ते गेले आणि गुरुदीक्षा देण्यास विनंति केली. सांदीपनी मुनींनीं दोघांना आपले शिष्य करून घेतलें व चौसष्ट दिवसांत त्यांना चारही वेद व षड्शास्त्रें शिकवून दिलीं. त्यांनीं बारा दिवसांत धर्मशास्त्र, तर्क, न्याय, गणित, संगीत व युद्धविद्या शिकून घेतल्या, पन्नास दिवसांत संपूर्ण अर्थशास्त्र शिकून घेतलें. दोघांची कुशाग्रबुद्धि व तीक्ष्ण स्मरणशक्ति पाहून सांदीपनी गुरु संतुष्ट झाले.



बलराम व कृष्ण दोघांनीं विद्याभ्यास संपूर्ण झाल्यावर गुरूला वंदन करून निवेदन केलें—"गुरुवर्य! आपल्या कृपेनें व आशीर्वादानें आपला विद्याभ्यास संपवून आम्ही घरीं जात आहों. आतां गुरुदक्षिणा म्हणून आम्ही काय द्यावें कृपा करून सांगावें. गुरुदक्षिणा कितीहि कठीण असली तरी ती देणें आमचें कर्तव्य आहे व आम्ही तें पुरें करूं."

तें ऐकून सांदीपनी म्हणाले—"मला एकुलता एक मुलगा होता. तो तीर्थयात्रेला गेला असतां समुद्रस्नानाच्या वेळीं एका देवमाशानें त्याला खाऊन टाकलें. पुत्र-



शोकानें मी व त्याची आई आज पावेतों दुःखी आहों. माझा मुलगा काय वाटेल तें करून तुम्ही आणून द्यावा."

गुरुदक्षिणा देण्याचें व्रत पूर्ण करण्यासाठीं कृष्ण आपल्या मोठ्या भावाची परवानगी घेऊन व धनुष्य बाण घेऊन समुद्र काठीं आला आणि समुद्राला संबोधन करून म्हणाला—" माझे गुरु सांदीपनी यांचा मुलगा तुझ्याजवळ आहे. त्याला ज्या कोणी गिळलें त्याला घेऊन माझ्यासमोर हजर कर."

कृष्णाची ती वाणी ओळखून समुद्र प्रकट झाला व हात जोडून म्हणाला—

" पंचजन नांवाचा राक्षस देवमाशाचें रूप घेऊन आला व त्यानें तुझ्या गुरुपुत्राला गिळलें आहे. त्या राक्षसाला मी थोड्या वेळांत तुझ्यासमोर हजर करतों."

कांहीं वेळानें मोठमोठ्या लाटा उसळूं लागल्या व देवमाशाच्या रूपानें समुद्रांत वावरत असलेल्या त्या राक्षसाला समुद्रानें किनाऱ्यावर आणून आदळलें. कृष्णानें आपल्या तलवारीनें त्याचें पोट चिरलें. पण त्यांत गुरुपुत्र नव्हता. एक मोठा शंख निघाला. तो शंख पाहून कृष्णाला फार आनंद झाला. त्यानें तो शंख स्वत:जवळ ठेवून घेतला. तोच पांचजन्य शंख म्हणून प्रसिद्ध झाला.

परंतु गुरुपुत्र मिळेपर्यंत कृष्णाला चैन पडणें शक्य नव्हतें. तो मुलगा मेल्यानंतर यमलोकीं गेला असावा असा विचार करून कृष्ण सरळ दक्षिणेकडे निघाला आणि यमलोकांत आला. सिंहासनावर यमराजा बसला होता. कृष्णानें त्याला विचारलें—" आमचे गुरु सांदीपनी यांचा मुलगा कोठें आहे? तूं त्याला घेऊन आला आहेस. बऱ्या बोलानें तूं त्याला दिलें नाहींस तर माझ्याशीं गांठ आहे, लक्षांत ठेव."



यम थरथर कांपूं लागला व हात जोडून म्हणाला—“मी प्राण्यांच्या पापापुण्याच्या हिशोबाप्रमाणें त्यांना शिक्षा किंवा स्वर्ग सुख देतों. त्यांचें प्राण-हरण हें मृत्यूचें काम आहे. तुझ्या गुरुपुत्राला मृत्यु घेऊन आला होता.”

“मृत्यूला इतका गर्व झाला का ! तो गुरुपुत्राला इकडे घेऊन आला आणि त्यानें आम्हांला येथपर्यंत येण्यास भाग पाडलें. आज त्याचें आयुष्य भरलें असें समज.” असें सांगून कृष्णानें धनुष्यावर एक दिव्यबाण ठेवला. तें पाहून मृत्यु घाबरून गेला आणि गुरुपुत्राचे प्राण पुन्हां त्याच्या देहांत ठेवून कृष्णा-समोर आला.

अशा प्रकारें कृष्ण समुद्राला, यमाला व मृत्यूला भयकंपित करून पांचजन्य व गुरुपुत्राला घेऊन आला. गुरूच्या आनंदाला पारावार नव्हता. त्यानें आपल्या मुलाला पोटाशीं धरलें. ही अपूर्व गुरु-दक्षिणा देऊन कृष्णानें गुरूचे आशीर्वाद मिळविले. नंतर कांहीं दिवस बलराम व कृष्ण गुरुगृहीं राहून व गुरूचा निरोप घेऊन मथुरेला परत आले.

उग्रसेनानें कृष्णाचें थाटामाटानें स्वागत केलें. त्यांची मिरवणूक काढली आणि आप्तेष्ट व बंधुबांधवांसह सामोरा गेला. बलराम व कृष्ण वसुदेवाच्या घरीं गेले. त्यांनीं आपल्या विद्याभ्यासाचें व गुरुकृपेचें वर्णन केलें.

त्या वेळीं मगध देशावर जरासंधाचें राज्य होतें. आस्ति व प्रास्ति नांवाच्या त्याच्या दोघी मुली कंसाच्या बायका होत्या. कृष्णानें जांवयाचा वध करून दोघां मुलींना वैधव्य प्राप्त करून दिल्याचें ऐकून त्याला भयंकर राग आला. कृष्ण महापराक्रमी आहे हें ऐकून त्यानें अनेक



राजांना स्वतःकडे वळवून घेतलें व एकवीस अक्षौहिणींचें सैन्य घेऊन मथुरेवर चालून आला. त्यानें यमुनेच्या कांठीं तळ ठोकून विंद व अनुविंद नांवाच्या दोघां राज-कुमारांना आपला दूत म्हणून कृष्णाकडे पाठविलें. दोघे सरळ उग्रसेनाच्या सभेंत पोंचले. त्या वेळीं सभेंत बलराम व कृष्ण पण हजर होते. दोघांना उद्देशून त्यांनीं जरासंधाचा संदेश सांगितला.

“तूं व तुझ्या भावानें कंसाचा व त्याच्या भावांचा वध केला आहे. कंस माझा जांवई होता. आपल्या मुलींचें दुःख पाहून मला राहवेना. म्हणून मी तुम्हां दोघांचें पारिपत्य करण्यास व तुमची खोड मोडण्यासाठीं आलों आहें. मी तुला युद्धा-साठीं आव्हान करीत आहें. या जगांत तूं तरी जिवंत राहशील नाहीं तर मी. दोघांसाठीं या पृथ्वीच्या पाठीवर जागा नाहीं. तूं समोरासमोर युद्ध केलेंस तर तुझा वध निश्चितच आहे, आणि तूं पळून गेलास तरी मी पाताळांत देखील तुला हुडकून काढून तुझा वध करीन. माझ्या शक्तीची माहिती तुला हवी असेल तर अक्रूराला किंवा सात्यकीला विचार.



उद्यां मी मथुरेला वेढा देत आहें-खबरदार !”

तो संदेश ऐकून कृष्ण स्मित करून म्हणाला—“इतका मोठा संदेश ऐकून मला आनंद झाला. मला इतकें बोलतां येत नाहीं. जरासंधाचा गर्वभंग करण्याची संधी सहज मिळाली आहे. राक्षसांनीं त्याचा दुभंगलेला देह जोडला आहे, तो मी चिरून फेंकून देण्याचा विचार करीत आहें. कंसाचा वध करून त्याचें राज्य मी उग्रसेन महाराजांना दिलें तसेंच जरासंधाचा वध करून मी त्याच्या मुलाला त्याचें राज्य देईन.”

जरासंधानें पाठविलेल्या राजकुमारांचा कृष्णानें यथोचित सत्कार करून त्यांना निरोप दिला. त्यांनीं कृष्णाचें उत्तर जरासंधाला जाऊन सांगितलें.

जरासंधाचें नुसतें नांव ऐकूनच उग्रसेन व त्याचे यादव सेनापति घाबरून गेले. त्यांच्या पैकीं विकद्र नांवाचा वृद्ध सरदार कृष्णाला म्हणाला—"बाळ! ज्याप्रमाणें कमळांतून ब्रह्मदेवाचा जन्म झाला त्याच प्रमाणें तूं या यदुकुळांत जन्मला आहेस. तूं असेपर्यंत यादवांस कसलेंहि भय नाहीं. जरासंधाच्या बाजूनें असंख्य राजे उभे आहेत. तो दुष्ट व क्रूर आहे. तूं एकटाच त्याचें पारिपत्य करण्यास समर्थ आहेस. कंसाला आपल्या शक्तीचा मद नव्हता का चढला? म्हणून त्यानें किल्ल्याची डागडुजी करण्याची सुद्धां कधीं फिकीर केली नाहीं. शस्त्रास्त्रें जमविली नाहींत. रसद एकत्र करून ठेवली नाहीं. खरें बोलावयाचें म्हणजे या किल्ल्याला किल्ला म्हणणें हास्यास्पद होईल. शत्रू चालून आला आहे. आपण युद्ध करण्याचें ठरविलें तर मथुरा नगरीचा संहार होईल. म्हणून किल्ल्याची काय व्यवस्था करावयाची हें ठरवायला हवें. पूर्वी मुचिकुंद, पद्मवंत, सारस व हरित वगैरे यादव राजांनीं ऋक्षवंत, विंध्य व सह्य नांवाच्या पर्वतांवर पश्चिम किनाऱ्या लगतच्या बेटांत अजेय किल्ले बांधले होते. या चौघांपूर्वी माधव नांवाच्या वीरानें मथुरा येथें राज्य केलें होतें. पण आतां या नगरीचें रक्षण करणें शक्य नाहीं. आणखी एक दुर्ग बांधून तयार ठेवणें बरोबर होईल. मी फक्त सुचविलें आहे. योग्य वाटेल तें करावें."





# अरण्यपुराण

[१५]

गांवाबाहेर झाडाखालीं बसलेल्या गांवकऱ्यांचा गलका कमी झाला तेव्हां तेथून काठ्या, कोयते, विळे कुऱ्हाडी वगैरे हत्यारें घेऊन बायका, पुरुष सर्व बलदेव व पुजारी यांच्याबरोबर गल्लींत आले. त्यांनीं दार ठोठावलें. मशालींचा उजेड झोंपडींत पडला. खाटेवर काळा वाघ पंजे आवळून पडून होता. त्याला पाहतांच सर्वांची वाचाच बसली. जे पुढें होते त्यांनीं मागच्यांना ढकलून पळून जाण्याची खटपट केली. त्याच वेळीं काळ्या वाघानें एकदां डोकें वर करून एक मोठी जांभई घेतली.

एकाएकीं गल्ली रिकामी झाली. काळा वाघ खिडकींतून उडी मारून बाहेर आला आणि मौवलीजवळ येऊन उभा राहिला.

"आतां उजाडण्यापूर्वी कोणी घराबाहेर पडण्याची छाती करणार नाहीं. पुढें काय करूं म्हणतोस?" काळ्या वाघानें विचारलें.

"छान कामगिरी बजावलीस. उजाडेपर्यंत यांच्यावर नजर राहूं दे. मी थोडा वेळ झोंपणार आहें." असें सांगून मौवली जंगलांत पळून गेला आणि एका दगडाच्या फरशीवर जाऊन झोंपला. तो उठला तेव्हां त्याच्याजवळ काळा वाघ होता.

"ते दोघे खान्हीहाराला सुखरूप पोंचले. लांडगीण आईनें हा निरोप कळविला आहे. मध्यरात्रीच्या सुमारास त्यांना एक घोडें मिळालें. प्रवास निर्विघ्न पार पडला. आज सकाळीं बराच वेळपर्यंत



कोणी घराबाहेर पाळून टाकलें नाहीं." काळा वाघ म्हणाला.

मौवली थोडा वेळ विचार करीत बसून राहाला. झाडाखालीं बसून बलदेवनें सांगितलेली गोष्ट त्याला आठवली. डोकें वर करून तो काळ्या वाघाला म्हणाला—"हत्तीला व त्याच्या तिघां मुलांना जरा बोलावून आणतोस का?"

काळ्या वाघानें चकित होऊन विचारलें—"तो आहे जंगलाचा मालक त्याला 'ये' किंवा 'जा' असा हुकूम करणें बरोबर होईल का?"

"एक गोष्ट त्याच्या कानांत पडूं दे तो जरूर येईल. 'भरतपूरच्या शेतावर हला' म्हणून सांग." मौवली म्हणाला.

काळा वाघ हत्ती व त्याच्या मुलांच्या शोधार्थ निघाला. मनांत म्हणाला, मौवलीनें बोलाविलें आहे असें सांगितलें तर त्याला राग येईल. आला राग, तर येऊं दे.

मौवलीचें रक्त खवळून आलें होतें. त्यानें कधीं मनुष्याच्या रक्ताचा वास घेतला नव्हता. तो मेस्सुवाच्या रक्ताचा वास घेऊन घाबरून गेला. त्याच्या मनांत थोडें प्रेम होतें तें फक्त मेस्सुवापुरतेंच होतें. तिला मनुष्यांनीं बांधून ठेवलें होतें म्हणून त्यांच्यावर सूड उगवायचें त्यानें ठरविलें होतें. त्या करितां हत्तीच्या मदतीची गरज होती. बलदेवनें सांगितलेल्या एका कपोल कल्पित गोष्टीवरूनच त्याला ती गोष्ट आठविली होती.

जास्त कांहीं बोलण्याची किंवा विनवण्यांची गरजच पडली नाहीं. हत्ती आपल्या तिघां मुलांसह काळ्या वाघाबरोबर मौवलीजवळ आला. मौवली बराच वेळ कांहीं बोलला नाहीं. नंतर काळ्या वाघाकडे वळून म्हणाला—"मी तुला एका हत्तीची गोष्ट सांगतो. फार पूर्वी भरतपूरच्या शिकाऱ्यांनीं एक तासभर वेरा दिल्यानंतर एका हत्तीला घेरलें. खड्ड्यांत पडल्यानें त्याच्या पायाला कांहीं तरी लागलें व त्याची पांढरी खूण त्याच्या पायाला राहून गेली. नंतर शिकाऱ्यांनीं त्याला खड्ड्यांतून बाहेर काढण्याचा प्रयत्न केला. पण तो हत्ती होता मोठा पराक्रमी. तो दोरखंड तोडून पळून गेला. त्याला तीन मुलगे होते, असें मला आठवतें. चांदण्यांत तो हत्ती हिंडत असतां त्याच्या पायाचा तो पांढरा वण जास्त चकाकून दिसू लागला. मौवलीनें हत्तीकडे वळून विचारलें—"पीक तयार असलेलें पाहून काय झालें?"

"मी व माझ्या तिघां मुलांनीं पीक तुडवून टाकलें." हत्ती म्हणाला.

"नंतर शेतांचें काय झालें?"

"काय होणार! कांहीं नाहीं."

"नाहीं! म्हटलें, त्या शेतांत काम करणारांचें काय झालें?"

"ते शेतें सोडून पळाले."

"त्यांचीं घरें?"

"आम्ही उध्वस्त करून टाकलीं. तीं पांच ही गांवें नष्ट झालीं व या जंगलांत आहेत तीं आतां. भरतपूरच्या शेतांवर मी व माझ्या मुलांनींच तर हल्ला केला होता. पण तूं तर मनुष्य दिसतो आहेस तुला कसें काय कळलें हें सर्व!" हत्तीनें विचारलें.

"एका माणसाच्या तोंडूनच मी तें सर्व ऐकलें. तो हला सामान्य नव्हता. गांवांचा नायनाट झाला होता. आतां तसाच एक हला व्हायला हवा. मला ज्या गांवाबाहेर काढलें होतें, तें गांव तर तुला माहीतच आहे. तें गांवसुद्धां या जंगलांत आलें पाहिजे." मौवली म्हणाला.











"त्यासाठीं खंडीभर राग आला पाहिजे. माझें त्या गांवच्या लोकांशीं काय वैर ?" हत्तीनें शंका व्यक्त केली.

"जंगलांत शाकाहारी तूं एकटाच आहेस का ? शेतें संपत नाहींत तोंपर्यंत तूं जवळ येऊं नकोस. हरणें, सांबरें व डुकरें यांना येऊं दे इकडे." मौवली म्हणाला.

हत्ती आपल्या मुलांबरोबर निघून गेल्यावर काळा वाघ भयभीत होऊन थर थर कांपूं लागला व म्हणाला—"हे बनमम् ! गरज भासली तर मला व अस्वलाला विसरूं नकोस. तुझ्यासमोर आम्ही लहान पोरें आहोंत."

ही अफवा कशी उडाली, नकळे, पण उडाली कीं अमुक खोऱ्यांत चांगलें हिरवें गार गवत आहे व स्वच्छ गोड पाणी पण आहे. अशा अफवा कधीं फुकट जात नाहींत. जंगलांतलीं हरणें वगैरे हळूहळू एका दिशेनें निघालीं. त्यांनीं ठीक वाटेनें तिकडे जावें म्हणून प्रोत्साहन देणारीं इतर जनावरें होतींच. हें सर्व पूर्वी योजल्याप्रमाणें कोणी तरी पाठीमागें राहून घडवीत असल्यासारखें दिसत होतें. गांवाजवळ असंख्य जनावरें चरायला जमा झालीं.

सकाळीं उठून गांवकरी पाहतात तर त्यांचीं शेतें फस्त झालेलीं. त्यांच्या जनावरांना चारा नव्हता. त्यादिवशीं रात्रीं कांहीं क्रूर रानटी जनावरें गांवांत शिरलीं व गांवांत उभ्या चार तट्टांना ठार करून निघून गेलीं. नंतर हत्ती आले. त्यांनीं घरें दारें उध्वस्त केलीं.

तोंपर्यंत गांवकरी गांव सोडून निघायला तयार झाले होते. इतक्यांत मुसळधार पाऊस कोसळूं लागला. गांव रिकामें झालें. अशातऱ्हेनें त्या गांवांत रान शिरायला आवश्यक सर्व तयारी झाली.



# ६९. मिह्रिमा मशीद

इस्तांबूल (टर्की)च्या सर्वांत उंच डोंगरावर ही मशीद आहे. या मशीदीला पुष्कळ खिडक्या आहेत.

ही मशीद बांधणारा सिनान हा आर्मेनियन शिल्पकार होता. सोफियन याची मुलगी मिह्रिमा हिची इच्छा होती कीं ती मशीदींत असेल तेव्हां ती आकाशाखालींच आहे असें तिला वाटावें.









सिराजउद्दौलानें पुन्हां सैन्याची जमवाजमव सुरू केली. त्याच्या मदतीला धांवेल त्याला त्यानें खूप पैसे देण्याचें वचन दिलें. पण कोणी त्याच्याजवळ फिरकायला तयार झाला नाहीं.

शेवटीं निरुपाय होऊन तो आपली बेगम लुत्फुन्न बानू हिलाबरोबर घेऊन राजधानी सोडून निघून गेला.

नबाब निघून गेल्यावर दुसऱ्या दिवशीं म्हणजे २३ जूनला मीरजाफर मुर्शिदाबाद येथें आला. कांहीं दिवसांनीं क्लाइव्ह पण आला आणि मीरजाफरला मुर्शिदाबादचा नबाब करण्यांत आलें. कांहीं दिवसांनंतर सिराजउद्दौला सांपडला. त्याला कैद करून मुर्शिदाबादला आणण्यांत आलें. लगेच मीरजाफरचा मुलगा मीरन यानें सिराजउद्दौलाचा वध करण्यास हुकूम दिला.

अशा तऱ्हेनें नबाबाच्या विरुद्ध केलेला मीरजाफरचा कट यशस्वी झाला.

क्लाइव्ह व त्याच्या साथी मित्रांना मोठमोठीं बक्षिसें मिळालीं. चोवीस परगणा या जिल्ह्याची जमीन्दारी मिळाली. इंग्रजांच्या कंपनीला अलोट पैसा व सवलती मिळाल्या.

खरें बोलावयाचें तर पलाशीचें युद्ध हें तसें मोठें युद्ध नव्हतेंच. परंतु या युद्धाचा परिणाम मात्र एका महायुद्धाहून फार मोठा झाला.

या युद्धांत क्लाइव्हनें मोठें युद्धकौशल्य किंवा चातुर्य दाखविलें असें म्हणणें चूकीचें होईल. मीरजाफरनें आपला स्वार्थसिद्ध करून घेण्यासाठीं इंग्रजांना, म्हणजे शत्रूला आंतून सामील होऊन आपल्या धन्याशीं विश्वासघात केला असेंच म्हणावें लागेल.





# उपकाराची फेड

हिमालय पर्वतांत वाहणाऱ्या एका नदीच्या दक्षिण तीरावर एक लहानसें राज्य होतें. त्या देशाचा राजा आपल्या राजवाड्यांत बसला असतां एका द्वारपालकानें आंत येऊन उंदरांचा राजा दर्शनाला आला असल्याची वर्दी दिली.

तें ऐकून राजाला आश्चर्य वाटलें, उंदरांचा राजा आणि तो आपल्यासारखा बोलतो! तरी राजानें द्वारपालकाला आंत पाठवून द्यायला सांगितलें.

एक उंदीर राजासारखा डौलांत चालत आंत आला. त्याच्या पाठीमागें कांहीं उंदीर शिपाई पण होते. राजानें आदरपूर्वक त्यांचा सत्कार करून येण्याचें कारण विचारलें. तेव्हां उंदरांचा राजा म्हणाला— "महाराज! या वर्षीं पीक चांगलें झालें नाहीं. म्हणून माझ्या प्रजेची उपासमार होत आहे. आपण आम्हांला धान्य उधारीवर दिलें नाहीं तर मी व माझी प्रजा नष्ट होणार."

"धान्य द्यायला मी तयार आहें. पण किती पाहिजे?" राजानें विचारलें.

"एक कोठारभरून द्यावें. पुढल्या वर्षी व्याजासकट परत करण्याचें आम्ही वचन देतों." उंदरांचा राजा म्हणाला.

"कोठारभरून! कबूल, पण तूं तें नेणार कसें, हें तर सांग." राजानें चकित होऊन विचारलें.

"त्याची जबाबदारी आमच्यावर." उंदरांचा राजा म्हणाला.

राजानें एक कोठार भरून धान्य उंदरांना देण्यासाठीं एक कोठारच उघडून दिलें. त्या दिवशीं रात्रीं एक लाख उंदीर आले आणि



सर्व धान्य उचलून घेऊन गेले. एक दाणा देखील औषधाला उरला नाहीं. दुसऱ्या दिवशीं राजानें जाऊन पाहिलें तर कोठार रिकामें झालें होतें.

"हे उंदीर फक्त हुशारच नव्हे तर इमानदार पण आहेत." कारण, पहा ना, मी जें कोठार दाखविलें होतें त्याच्या बाहेर एक दाणादेखील जास्त घेऊन गेले नाहींत. सर्व धान्य परत पण केलें." राजा आपल्या दरबाऱ्यांना म्हणाला.

कांहीं काळ लोटला. नदीच्या उत्तर तीरावरील राजानें दक्षिण तीरावरच्या उंदरांना मदत करणाऱ्या राजाच्या राज्यावर स्वारी केली. नदीकाठीं त्यानें तळ टाकला होता.

शत्रू मोठा बलाढ्य होता. म्हणून दक्षिणेकडील राजाला कसें युद्ध करावयाचें हें सुचेना. या युद्धांत आपला पराभव नक्की होणार या काळजीनें दुःखी होऊन तो एका जागीं बसला असतां उंदरांचा राजा तेथें आला. हात जोडून तो राजाला म्हणाला—

"महाराज! आपल्यावर आलेल्या संकटाची वार्ता कळतांच मी आलों आहें. या प्रसंगीं माझ्या हातून आपली काय सेवा होऊं शकेल तें सांगावें. मी ती करायला तयार आहें. आपण आम्हांला संकट समयीं मदत केली होती. त्या उपकाराची अल्प फेड कां होईना करतां आली तर आम्ही स्वतःला धन्य समजूं."

राजा उदास मनानें विचार करीत बसला होता. परंतु उंदरांच्या राजाचें तें बोलणें ऐकून तो आश्चर्य व कौतुक करूं लागला. उंदीर हा किती लहान व क्षुद्र प्राणी, पण त्याचें मन किती मोठें आहे! उपकार कोण आठवतो? पण हा क्षुद्रप्राणी किती आपुलकीनें संकट समयीं माझ्या मदतीला



धांवला आहे. गरजेच्या वेळीं मदत करील तोच खरा मित्र. राजा म्हणाला—"मूषकराज! मी तुमची कर्तव्यनिष्ठा व सद्भावना या बद्दल फार आभारी आहें. युद्धासारख्या संकटसमयीं उंदीर काय मदत करणार? शत्रू बलाढ्य आहे. त्याचें सैन्य मोठें आहे. आणि थेट माझ्या दारावर नदीपलीकडे येऊन धडकला आहे. शत्रूला जिंकणें तर दूरच, त्याला नदीपार करतां येऊं नये या साठीं देखील आम्हांला कांहीं करतां येण्यासारखें दिसत नाहीं.

"पूर्वीदेखील आपण आमच्या शक्तिसामर्थ्याबद्दल शंका दर्शविली होती, परंतु आम्ही धान्य घेऊन गेलों व तें परत पण केलें आहे. अशा तऱ्हेनें आपली ती शंका दूर झाली होती. आमच्यावर विश्वास ठेवा व आम्हांला आपली मदत करण्याची संधी द्या. आज रात्रीं काळोख पडण्यापूर्वी एक लाख बारीक बारीक लाकडें नदीच्या काठीं पाण्यालगत ठेवून देण्याची व्यवस्था करावी." उंदरांचा राजा म्हणाला.

उंदरांच्या हातून मदत होऊं शकेल अगर होणार नाहीं याचा विचार केल्याशिवाय उंदरांच्या राजानें सांगितल्याप्रमाणें



राजानें एक लाख काटक्या नदीकाठीं पाण्यालगत आणून ठेवण्याची व्यवस्था केली.

त्या रात्रीं लक्षावधि उंदीर नदीकाठीं आले. त्यांनीं त्या काटक्या एकेक करून नदींत ओढून नेल्या व दोन दोन तीन तीन उंदीर त्यांवर बसून शेपटांचीं वल्हीं करून नदी पार करून शत्रूच्या गोटांत शिरले.

शत्रुसैन्य गाढ झोंपीं गेलें होतें. उंदरांनीं जाऊन त्यांच्या धनुष्याच्या दोऱ्या कुरतडून टाकल्या आणि त्यांनीं बरोबर आणलेलें सर्व धान्य फस्त करून टाकलें. दोन तासांत शत्रुसैन्याची सर्व तयारी पूर्णपणें निरुपयोगी

करून टाकून सर्व उंदीर पुन्हां त्या काटक्यांवर बसून अलीकडे आले आणि आपापल्या बिळांत निघून गेले.

दुसऱ्या दिवशीं शत्रुसैन्यानें उठून पाहिलें तर त्यांचीं धनुष्यें तुटलेलीं, कपडे कुरतडलेले आणि धान्याचीं पोतीं रिकामीं. सैन्यांत सर्वत्र ओरड सुरू झाली.

शत्रुसैन्यांत गोंधळ उडून गेला असतां मूषक राजाच्या दूतानें येऊन राजासमोर निवेदन केलें कीं महाराज! शत्रूवर हल्ला करण्यास सर्वांत उत्तम संधी हीच आहे."

राजा सैन्य घेऊन युद्धाला निघाला. त्याचें निशाण व समोर येणारें सैन्य पाहून शत्रुसैन्याची गाळणच उडून गेली आणि त्यानें पळ काढला.

नंतर राजानें शत्रूकडे निरोप पाठविला— "मी या खेपेस आपल्या राज्यांतलें उंदरांचें सैन्यच पाठविलें आहे. पुन्हां कधीं सैन्य घेऊन आलास तर खबरदार! मांजरें, कुत्रीं, बैल व घोडे यांचें सैन्य येईल. आणि तरी देखील तुला अक्कल आली नाहीं तर वाघ, सिंह इत्यादि क्रूर जानावरांचें सैन्य पाठवीन. शेवटीं जरूर पडल्यास मी स्वत: आपलें सैन्य घेऊन येईन."

ज्याच्या उंदराच्या सैन्यानेंच इतका धुमाकूळ माजविला त्याच्याशीं वैर करणें हिताचें नाहीं असा विचार करून शत्रूनें स्वारी करण्याचा विचारच कधीं केला नाहीं.

उंदरांनीं राजाला जी मदद केली होती, त्या उपकाराची अल्प फेड म्हणून राजानें हुकूम काढला कीं राज्यांत कोणी मांजर बाळगूं नये. नंतर नदीला पूर येई तेव्हां उंदरांच्या बिळांत पाणी शिरूं नये यासाठीं राजानें नदीकाठीं पक्के घाट बांधविले.





# पाताळ कोट

[ १७ ]

[कालशंबर मांत्रिक, धूमक व त्याच्या साथीदारांना डोंगराच्या टोकाला घेऊन गेला. तेथें त्यांना एका सरोवराच्या काठीं कांतिसेना दिसली. तिच्या रक्षणासाठीं कुंभीर उभा होता. त्या बाजूला कालशंबर मांत्रिक आला असल्याचें त्याला कळलें. तो त्या बाजूला झपझप पावलें टाकीत येऊं लागला......पुढें.]

कुंभीरला जवळ येत असलेला पाहून धूमकला वाटलें कीं हा आपल्या सर्वांना ठार करणार. म्हणून त्यानें तलवार उपसली आणि म्हणाला—"महामांत्रिक! आपण इकडे गुप्तपणें आल्याची गोष्ट कुंभीरला कळलेली दिसते आहे. इतर राक्षसांना सुगावा लागण्यापूर्वीच याला यमलोकीं पोंचविलें पाहिजे."

मांत्रिक स्मित करून म्हणाला—"धूमक! अशी घाई करूं नकोस. कुंभीर आपल्या बाजूनें आहे रावणाच्या घरांत बिभीषणा-सारखा. कुलद्रोही सर्व युगांत झालेले आहेत."

कुंभीर झाडाजवळ आला आणि एका वाळक्या खोडावर येऊन बसला. म्हणाला— "कालशंबर! राक्षसांना मोठमोठे कान अस-तात. त्यांची श्रवण शक्ति विलक्षण दांडगी



असते. कांहीं दिवसांपासून मला तुझ्या विषयीं संशय वाटूं लागला आहे. तूं माझा विश्वासघात तर करणार नाहींस! ऐक, मी कालकली राक्षसाचा भाऊ नाहीं. मग तूं मला बिभीषण कसा काय म्हणालास? मी त्याच्या केतु कुळांत जन्मलों नसून राहू कुळांत जन्मलों आहें. म्हणजे कुळद्रोही म्हणूनदेखील मला नांवें ठेवतां येणार नाहीं."

मांत्रिक दोन पावलें पुढें जाऊन कुंभीरला हळूंच म्हणाला—"कांहीं नवे लोक आले आहेत. त्यांच्या मनांत तुझ्याविषयीं प्रेमादर व विश्वास उत्पन्न व्हावा यासाठीं मी थोडें फार खोटें बोलून वेळ मारून नेतों. तूं फुकट शंकाकुशंका काढूं नकोस. ते तुला ओळखतात. कदंब राज्याच्या गुहेंत तूं राजकन्या कांतिसेनेला जें वचन दिलें होतेंस तें देखील त्यांना माहीत आहे."

तें ऐकून कुंभीर धूमक व सोमककडे वळून त्यांना नीट न्याहाळून पाहून म्हणाला—"हे सर्व जिवंत येथें आले? हा काळा गरुडपक्षी कोणाचा? ह्याला कोठेंतरी पाहा-ल्यासारखें वाटतें."

"पाहिलें असशील, हा रानटी लोकांचा नायक विरूप आहे." कालशंबर मांत्रिक म्हणाला. विरूप, सोमक व धूमक तिघांनीं लवून राक्षसाला नमस्कार केला.

"हा एवढा विनय कशाला?" कुंभीर डोळे मिचकावून म्हणाला. "शंबर! आपल्या वंशाचा गौरव राखण्यासाठीं मी तुला मदत करण्याचें वचन दिलें. पण, विश्वासघात तर करणार नाहींस ना?"

"ही शंका वारंवार तुझ्या मनांत कां येते?" मांत्रिकानें विचारलें.

"मी एका डोळ्यानें नव्हें, हजार डोळ्यांनीं सर्व कांहीं पहात आलों आहें. पर्वताखालच्या घनघळ्यांत, डोंगरावरच्या सरोवरांत, तुझे साथी मित्र जे कांहीं करीत आहेत, तें सर्व मला माहीत आहे व मी तें ओळखतों पण." कुंभीर म्हणाला.

"कुंभीरा! हें एक रहस्य व गुपित आहे. आतांच हें सर्व उघड बोलण्यांत अर्थ नाहीं. पण एक गोष्ट मी तुला सांगतों. तुझ्यावर आणि तुझ्या कुळांतल्या तीस जणांवर कोणतें हि संकट येणार नाहीं. मी या गोष्टीचें वचन देतों." मांत्रिक म्हणाला.

त्यावर कुंभीर कांहींच बोलला नाहीं. उठून सरोवराच्या काठीं परत निघून गेला.

मांत्रिक झाडाच्या खोडांतलें दार बंद करून विचार करीत मागें फिरला. म्हणाला—"भद्र! सर्व तयारी ठीक ठीक झाली आहे ना? एक दोन तासांत छान काळोख पडेल. निरनिराळीं भस्में यथास्थान ठेवून दे. राक्षसांच्या शेतांतले प्राणी, म्हणजे चित्ते, वाघ व हत्ती यांचें कसें काय? आजपासून त्यांना उपास घडणार ना? कुंभीरचे अनुयायी त्यांना काल दुपारपर्यंत अडवून ठेवून नंतर त्यांना शिकार करायला सोडणार आहेत ना?"

"सर्व ठीक आहे, महामांत्रिक! औषधी द्रव्यें व भस्में आज रात्रीं यथास्थानीं पोंचतीं



होत आहेत. वाघ सिंह व हत्ती आजपर्यंत शांत होते ते उद्यां खवळून जातील. फक्त सरोवराकडची सावधगिरी आपण राखावी. ती मोठी शिळा, ज्या जागीं असावयास पाहिजे त्या जागीं आहे कीं नाहीं, हें नाहीं कळलें आम्हांला, जलस्तंभन विद्या अवगत असलेला आमच्याकडे कोणी नाहीं." भद्र म्हणाला.

"त्या दगडाची फिकीर करण्याचें तुला कारण नाहीं. त्या संबंधी थोडी जरी चूक झाली तर राक्षसांचा संहार खोटा ठरेल व आपल्याला निश्चित मरण येईल. थोडा



काळोख पडूं दे. त्याविषयीं जें कांहीं करावयाचें तें सर्व मी करतों." मांत्रिक म्हणाला.

त्यानंतर सर्व पर्वताच्या गुहेंत आपापल्या जागीं निघून गेले.

ते भुयाराच्या पायऱ्या उतरून जात होते, तेवढ्यांत कांहीं लोक समोरून मांत्रिका-कडे पळत आले. घाबऱ्या आवाजांत म्हणाले—"महामांत्रिक! भुयाराच्या भिंतीं-तून पाणी झिरपत आहे. आपण राहतो ती जागा पाण्यांत बुडून आपणां सर्वांना जल-समाधि तर मिळणार नाहीं?"

तें ऐकून मांत्रिक क्षणभर स्तब्ध उभा राहिला व झपझप पायऱ्या उतरून भुयारांत राहण्यासाठीं केलेल्या जागेकडे गेला. तेथें त्याला पाण्याचे ओघळ स्पष्ट दिसले. त्यानें एक लहान भांडें मागविलें व त्यांत पाणी भरून घेऊन आपल्या अनुयायांपैकीं एकाला प्यायला सांगितलें, आणि विचारलें—"कसें आहे पाणी? खारें कीं गोड?"

"गोड आहे!" पाणी पिणारा म्हणाला.

"गोड? म्हणजे आपल्या धबधब्याचें पाणी आहे तसें गोड?" मांत्रिकानें विचारलें.

अनुयायानें मान हालवून होकार दिला.

तरमग आपल्याला कसलें हि भय नाहीं. पण लक्ष ठेवा, पाणी जास्त येतां कामा नये." नंतर भद्रकडे वळून म्हणाला—"भद्र! दोरखंड तयार आहेत ना? मी थोड्या वेळानें सरोवराजवळ जाणार आहें. बरोबर धूमक, सोमक व विरूपला नेत आहें. येथल्या तयारीची सर्व जबाबदारी तुझ्यावर."

सूर्यास्तानंतर काळोख पडल्यावर काल-शंबर धूमक, सोमक व विरूप तिघांना बरोबर घेऊन गुहेतून पर्वताच्या टोंकाला गेला.



तेथें एका झाडाखालीं वेलांचा एक मोठा दोरखंड होता. धूमक, सोमक व विरूप तिघांनीं, मांत्रिकानें सांगितल्याप्रमाणें दोरखंड उचलून खांद्यावर घेतलें.

त्यांना तें सर्व विचित्र वाटत होतें. भद्र आणि मांत्रिक यांच्या मध्यें जें कांहीं बोलणें झालें त्यांतला एक शब्ददेखील त्यांना कळला नाहीं. औषधी वनस्पती, सरोवर, दगड, जलस्तंभन सर्वच त्यांना एकाद्या कोड्यासारखें वाटत होतें. विचारलें तर कालशंबर म्हणे; तें एक गुपित आहे. म्हणून त्यांचें कुतूहल जास्तच वाढत होतें.

आकाशांत तारे चकाकूं लागले. त्यांच्या उजेडांत सर्व डोंगरावरच्या सरोवराच्या कांठीं चालत येऊन पोंचले. ते आले होते त्याच्या दुसऱ्या बाजूला कुंभीर राक्षस व कांतिसेना दोघं कांहीं वेळापूर्वीच फिरत होतीं आणि आतां तेथें नव्हतीं. हा प्रदेश पाताळकोटालगत होता.

सरोवराच्या किनाऱ्यावर पोंचल्याबरोबर मांत्रिकानें आपला मंत्रदंड पाण्यांत अर्धा बुडविला. कांहीं मंत्र म्हणत त्यानें एकदां चारी बाजूला पाहिलें. किनाऱ्यावर पुष्कळ मोठमोठे वृक्ष होते.



मांत्रिक मंत्रदंड उचलून व त्या झाडांकडे बोट दाखवून धूमक व सोमक यांस म्हणाला—"त्या दोरखंडाचें एक टोंक त्या झाडाला बांधा व दुसरें माझ्या हातांत द्या. मी सरोवरांत प्रवेश करणार आहें. केव्हां परत येईन हें आतांच सांगूं शकत नाहीं. परंतु तुम्ही येथेंच बसून रहा." असें म्हणत त्यानें दोरखंडाचें एक टोंक हातीं धरलें आणि "शांभवी" असा घोष करीत त्यानें पाण्यांत उडी मारली.

धूमक, सोमक व विरूप कांहीं बोलल्या-शिवाय तें दृश्य पहात होते. एक तास



झाला. झाडींत एक घुबड बोललें. विरू-पाच्या खांद्यावर बसलेला काळा गरुड घुबडाचा आवाज ऐकून पंख फडफडवीत एकदां ओरडला. इतक्यांत एका वटवा-घळानें येऊन त्याच्या डोक्याला चोंच मारली व एका झाडींत उडत जाऊन लपून बसलें. गरुडाला राग आला. विरूपाच्या खांद्यावरून उतरला. आपल्या पायांनीं जमीन उकरली व उडण्याचा यत्न करूं लागला.

धूमकनें पुढें जाऊन त्याच्या पायाला बांधलेली दोरी घट्ट धरली आणि म्हणाला—

"विरूप! याला उडूं देऊं नकोस. याचा उपयोग होईल आपल्याला."

"याला पळून जाऊं देऊं नको म्हणतां? हा मला सोडून जातो कोठें?" विरूप म्हणाला आणि दोन्ही हातांनीं गरुड पक्षाला धरून ठेवलें. "मांत्रिकाला जाऊन बराच वेळ झाला. अजून परत आला नाहीं!" विरूप आश्चर्य करीत म्हणाला.

"मी तरी तेंच म्हणतों. जलस्तंभन विद्या किती माहीत असली तरी इतका वेळ कोणी पाण्यांत बुडी मारून राहूं शकणार नाहीं. तो संकटांत सांपडला तर आपणा सर्वांना राक्षसाच्या हातीं मरण येईल." धूमक निराश होऊन म्हणाला।

ते इकडे बोलत होते व त्याच वेळीं त्यांना डोंगराच्या पायथ्याशीं पाताळ कोटा-नजीक वाजंत्र्यांचा आवाज व राक्षसांच्या फटाक्यांचा धूमधडाका ऐकूं आला व उजेडपण दिसला.

"त्यांनीं उत्सवाला आतांच सुरवात केली असें दिसत आहे" विरूप म्हणाला.

"असेंच दिसतें आहे. उद्यां दुपारीं ते शशिकांतचा शिरच्छेद करणार आहेत. त्याला व राजकन्येला मांत्रिक या दुष्टांच्या हातून













कसा काय वांचविणार आहे बुवा? आपण ज्या डोंगराच्या मध्य भागांत आहों त्याच्या भुयारांच्या वाटा त्यांना कळतील व ते यांत शिरून प्रथम आपलीच शिकार करतील." सोमक म्हणाला.

"तेंहि अशक्य नाहीं. आतां थोड्या वेळांत मांत्रिकाचें प्रेत पाण्यावर तरंगत असलेलें आपल्याला दिसलें तर त्याचें देखील मला आश्चर्य वाटणार नाहीं." धूमक म्हणाला.

त्याचें बोलणें पुरें होण्यापूर्वीच सरोवरांत लहान लहान लाटा दिसू लागल्या. नंतर मांत्रिक वर येत असलेला दिसला. त्याच्या एका हातांत मंत्रदंड होता व दुसऱ्या हातांत सोन्यासारखें चकाकणारें एक मगरीचें पिल्लू होतें. तो काठाकडे पोहोत येत होता. धूमक व त्याचे साथी त्या बाजूला धांवले.

मांत्रिक आनंदातिरेकानें मगरीचें पिल्लू दाखवीत म्हणाला—"हें शुभसूचक चिन्ह आहे. तुम्ही कधीं सोनेरी रंगाची मगर पाहिली आहे का? मी या पिलाचा व गरुड पक्ष्याचा उपयोग करून एक दिव्य करून दाखविणार आहें."

धूमक व त्याचे थक्क होऊन साथी सोनेरी रंगाचें तें मगरीचें पिल्लू पहात होते. मांत्रिकानें डोंगराच्या बाजूला होत असलेला गलका कांहीं वेळ ऐकून घेतला व म्हणाला—"असं! कालकली राक्षसाच्या बापाचा वाढदिवस आला वाटतें? जय शांभवी!" असें म्हणत त्यानें दोन्ही हात वर केले. "हे दोरखंड झाडाच्या बुंधाला छान घट्ट बांधले आहेत ना? कालकली राक्षस व कालशंबर यांचें घोर युद्ध सुरू झालें आहे."

(पुढील गोष्ट पुढील अंकीं)



विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतलें आणि स्मशानाच्या दिशेनें नेहमीप्रमाणें कांहीं बोलल्याशिवाय चालूं लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तुला जो कोणी इतके कष्ट देत आहे त्याच्यावर तुला राग येत नसलेला पाहून मला सुंदरवदन याची गोष्ट आठवते. तुला कंटाळा येऊं नये म्हणून मी त्याची गोष्ट सांगतों, ऐक." असें सांगून तो गोष्ट सांगूं लागला.

कामरूप देशांत ब्रह्मपुत्रा नदीच्या काठीं कामाख्या नामक गांवीं दोन मित्र रहात असत. एकाचें नांव गंगापुत्र होतें व दुसऱ्याचें सुमित्र. गंगापुत्र उच्च कुलीन घराण्यांत जन्मला होता. त्याचे आजोबा

वेताळाच्या गोष्टी



राजाचे मंत्री होते. त्यांनीं आपल्या मागें जमीनजुमला पुष्कळ ठेवला होता. म्हणून मुलांना किंवा नातवंडांना कधीं पैशाचा तोटा भासला नाहीं.

सुमित्र त्या मानानें इतक्या मोठ्या श्रीमंत घराण्यांत जन्मला नव्हता. त्यानें आपलें घर विकून एक घरवजा नाव विकत घेतली व ती भाड्यानें चालवूं लागला. तेवढ्यावर दोघां नवरा बायकोचा उदर-निर्वाह चाले. गांवच्या घाटावर नाव लागे तेव्हां तो आपल्या मित्राला भेटत असे. दोघां मित्रांना अपत्य नव्हतें.

एकदां सुमित्र आपल्या मित्राला म्हणाला—“ मित्रा ! आपल्या गांवच्या देवीला नवस केला तर आपल्याला मूल होईल. मी देवीच्या दर्शनाला जात आहें. तूं येतोस का ? मित्राच्या आग्रहाला तो नकार देऊं शकला नाहीं. दोघां मित्रांनीं देवीच्या देवळांत जाऊन नवस केला व मित्राला पुन्हां पोंचता करून सुमित्र घरीं परत आला.

एका वर्षानंतर गंगापुत्राला मुलगा व सुमित्राला मुलगी झाली. गंगापुत्रानें आपल्या मुलाचें नांव सुंदरवदन व सुमित्रनें मुलीचें यशोवती ठेवलें.

सुंदरवदनला सहावें वर्ष लागलें तेव्हां-पासून त्याचे कष्टाचे दिवस सुरू झाले. सर्वांत प्रथम त्याचा बाप वारला. नंतर दुष्काळ सुरू झाला. गंगापुत्राच्या बायकोला आपली इस्टेट संभाळतां आली नाहीं. सरकारी अधिकाऱ्यांनीं इस्टेटीवर निरनिराळे कर लावून तिला सतावून सोडलें. तिनें ज्यांना शेतें खंडानें दिलीं होतीं त्यांनीं तिला फसवून लुबाडलें. ती इतकी घाबरून गेली कीं तिनें घरदार सर्व विकून टाकलें आणि एक लहानसें घर भाड्यानें घेऊन त्यांत जाऊन राहूं लागली. कशीबशी दहा वर्षें



लोटलीं. जवळचे सर्व पैसे संपुष्टांत आले व हातीं करवंटी आली. ती आजारी पडली व त्याच आजारांत तिनें या जगाचा निरोप घेतला.

आई वारली तेव्हां सुंदरवदनजवळ अंगा-वरच्या कपड्याखेरीज कांहीं उरलें नव्हतें. त्याला थोडें लिहितां वाचतां येत होतें म्हणून एका व्यापाऱ्याच्या दुकानावर तो मुनीम म्हणून नोकरी करूं लागला. व्यापारी नेहमीं त्याला नोकरासारखा वागवी. तें त्याला असह्य वाटूं लागलें. म्हणून त्यानें नोकरी सोडली. पण पोटाची खळगी भरणें आवश्यक होतें. म्हणून भीक मागूं लागला. कोणी स्वतःच्या मर्जीनें जें देई त्यावर संतोष करून राही.

हिंवाळा सुरू झाला. एकदां त्याला फार भूक लागली होती. पण थंडीची पर्वा करून पोट कसें भरणार ? म्हणून तो भीक मागायला निघाला. तो चारच पावलें गेला असेल त्याला त्याच्या बापाचा मित्र सुमित्र भेटला. सुंदरवदन त्याला पाहून त्याला ओळखलेंच नाहीं असें दाखवून पुढें निघून जाऊं लागला. पण सुमित्र त्याचा हात धरून त्याला थांबवून म्हणाला—“ तूं सुंदरवदनच नाहीं का ? काय रे तुझी ही



दशा ?” गंगापुत्र वारल्यानंतर तो त्याच्या घरीं कधीं गेला नव्हता. म्हणून त्याच्या घरची झालेली सर्व वाताहत त्याला कळली नव्हती. सुंदरवदननें त्याच्यावर आणि त्याच्या आईवर ओढवलेल्या संकटांचें वृत्त थोडक्यांत सांगितलें.

“ अरे रे ! एवढें सारें झालें आणि मला कांहींच कळवूं नयेस तूं ? तूं येतोस का, माझ्याबरोबर ? माझ्या घरनावेंत काम कर. तुला पोटा पाण्याला व रहायला कशाचीच काळजी करण्याचें कारण नाहीं.” सुमित्र म्हणाला. सुंदरवदन त्याला कबूल झाला.

दोघे सुमित्राच्या घरीं, म्हणजे घरनावेंत गेले. सुमित्रानें सुंदरवदनची बायकोला ओळख करून दिली व म्हणाला—"प्रथम याला पोटभर जेवायला घाल."

बायको म्हणाली—"जेवायला भात आहे घरांत. पण शिळा आहे."

"हरकत नाहीं, वाढ. लोणचें, चटणी जें असेल तें वाढ तोंडी लावायला." सुमित्र म्हणाला.

"मागच्या खोलींत माझा पंचा आहे तो आणून दे तर बाळ!" सुमित्र आपल्या मुलीला म्हणाला.

यशोवतीनें पंचा पाहिला तर फाटलेला होता. तिनें लगेच सुईदोरा घेऊन फाटलेल्या जागीं शिवून पंचा सुंदरवदनला आणून दिला.

नंतर सुमित्र आपल्या कामानें बाजारांत निघून गेला. व्यापाऱ्यांशीं बोलत असतां संध्याकाळ झाली. म्हणून परत यायला रात्र झाली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठून नावेच्या वरच्या बाजूला गेला तर सुंदरवदन नावेच्या मागच्या बाजूला एकटाच विचार-मग्न बसलेला दिसला. म्हणाला—"काय रे, आम्ही तुला जेवायला घालतों तर फुकटाचें का? रिकामटेकडा बसून काय करतो आहेस? दोरी कां नाहीं वळत बसून कोठें तरी?"

"बरें वळतों." सुंदरवदन म्हणाला. त्यानंतर तो कधीं रिकामा बसला नाहीं.

सुंदरवदन हिशोब वगैरे लिहिण्यांत हुशार होता. नावांचे इतर मालक पण त्याची या कामांत मदत घेत आणि त्याचा आदर करीत. आयुष्यांतले कष्ट थोडे कमी झाल्यावर त्याची तब्येत थोडी सुधारली व तोंडावर तजेला आला.

सुमित्र व त्याची बायको दोघांना वाटूं लागलें कीं त्यांच्या मुलीला सुंदरवदनपेक्षां दुसरा चांगला वर कोठें मिळणार? म्हणून दोघांनीं विचार करून सुंदरवदनला विचारलें—"आमच्या मुलीशीं तुझें लग्न करून द्यावें म्हणतों. ठीक आहे ना?"

"यशोवतीला मी योग्य वर नाहीं!" सुंदरवदन म्हणाला. परंतु सुमित्र व त्याची बायको दोघांनीं आग्रह केला तेव्हां तो कबूल झाला. कामाख्या गांवीं ईश्वरकृपेनें दोघांचें लग्न मोठ्या थाटामाटानें झालें. त्यांना एका वर्षानें एक मुलगी झाली व ती एका वर्षानें देवी येऊन त्यांतच गेली.







मुलगी गेल्यामुळें सुंदरवदन त्याच दुःखानें इतका झिजत गेला कीं त्या काळजींत त्याला क्षयाचा वहम झाला. तो इतका अशक्त झाला कीं त्याला उठून बसवेना. सुमित्रनें त्याला शक्य झालें तेवढा पैसा खर्च करून औषधपाणी केलें. भूत-पिशाच असेल म्हणून मांत्रिकाकडून मंत्रतंत्र करविले. ताईत बांधविले. पण कांहीं फायदा झाला नाहीं. एका वर्षाच्या आंत अस्थिपंजर देह झाला. त्याचे सासूसासरे जांवई दोन दिवसांचा पाहुणा आहे असें समजून त्याच्या मृत्यूची वाट पाहूं लागले.

या आजारांत मुलीनें नवऱ्याजवळ राहाणें तिच्या हिताचें नाहीं व रोग्याला मरण आलें तर मुलीचें दुसरें लग्न करून देतां येईल असें पण त्यांना वाटलें. तशी रीत त्यांच्या जातींत होती देखील.

परंतु त्यांचीं इच्छा पुरी होण्याचीं लक्षणें दिसेनात. कारण सुंदरवदनचें मरण दूर टळत चाललें होतें. सुमित्र बायकोला म्हणाला—"म्हातारपणीं मुलगा उपयोगी पडेल असें वाटलें होतें. पण पाहूं आतां देव काय काय दाखवतो तें. मुलीचें तारुण्य हळू हळू कमी होऊं लागलें आहे. कसा तरी तिचा उद्धार झालाच पाहिजे." सुमित्राची बायको सुद्धां फार कंटाळून गेली होती. पण दोघांनीं मुलीजवळ त्यांच्या मनांतल्या विचारासंबंधानें कांहीं बोलायचें नाहीं किंवा तिला कांहीं कळूं द्यायचें नाहीं असें ठरविलें होतें.

दुसऱ्या दिवशीं सुमित्र नाव घेऊन निघाला. तेव्हां उघड्या हवेंत हुशारी वाटेल असें सांगून सुंदरवदनला नावेंत वर बसायला सांगितलें. एका जागीं पाण्याचा ओघ जोराचा होता. म्हणून जांवयाला म्हणाला—"काठी धर कीं जरा." जांवई म्हणाला—



"काठी धरतां आली असती तर आणखी काय पाहिजे होतें?"

"असें किती दिवस चालणार आमचें तरी! फुकटाचें खायला तुला लाजलज्जा कांहीं आहे कीं नाहीं? जा, जाऊन चार लाकडें तरी तोडून गोळा करून घेऊन ये." असें सांगून सुमित्रनें एका निर्जन स्थानीं नाव काठाला लावली व सुंदरवदनच्या हातांत दोरी व कुऱ्हाड देऊन त्याला खालीं उतरवलें. सुंदरवदन आपल्या नशिबाला दोष देत देवाच्या भरंवशावर खालीं उतरला. कांहीं अंतर चालत गेला. सपाट वाळवंटच होतें. पण मग एक रान लागलें. वाळक्या काटक्या गोळा करून त्यानें त्यांची एक मोळी बांधली व ती डोक्यावर घेऊं लागला. पण डोक्यावर घेतां आली नाहीं तेव्हां जमिनीवरच दोरीचें एक टोक धरून ओढीत कसाबसा नदीकाठीं आला. पण तेथें घरनाव नव्हती व सुमित्र पण नव्हता. ऊन वर डोक्यावर आलें होतें. भोंवळ येऊन तो जमिनीवर पडला. शुद्ध आली तेव्हां समोर त्याला एक साधू उभा दिसला. साधू म्हणाला—"या भयंकर जागीं तूं कशाला आला आहेस? जा, पळ कोठें तरी."



"मला उठवत नाहीं कीं चालवत नाहीं. तुम्हीच मला वांचवा." सुंदरवदन म्हणाला.

"आजचा दिवस रहा माझ्या झोंपडींत. उद्यांचें पाहूं." असें सांगून साधू त्याला आपल्या झोंपडींत घेऊन गेला. सुंदरवदननें त्याच्यावर जो प्रसंग ओढवला होता, खरा खरा जसाच्या तसा वर्णन करून सांगितला.

"तुला क्षय नाहीं कीं कांहीं नाहीं. नुसतें मनाचें दुखणें आहे. औषधानें का हें दुखणें बरें होणार आहे! मी तुला बुद्धाच्या वज्रपाणी धारणी मंत्राचा उपदेश करतों. तूं रोज त्या मंत्राचा जप केलास





तर तुझा मनाचा विकार बरा होईल." साधू म्हणाला.

वज्रपाणी धारणी मंत्राची दीक्षा त्या साधूकडून घेतल्यावर सुंदरवदनला तो पाठ झाला. इतका कीं त्याला पुष्कळशा जुन्या विसर पडलेल्या गोष्टींचीं पण आठवण झाली.

रात्रीं साधूच्या झोंपडींत तो झोंपला खरा, पण सकाळीं त्याची झोंप मोडली तेव्हां तो नदीकाठीं होता. तो साधू नव्हता कीं ती झोंपडी पण नव्हती. त्याला आणखी कोठें जाणें शक्य नव्हतें, म्हणून तो पुन्हां हळू हळू जंगलांत गेला. झाडींत एका जागीं त्याला एक घर दिसलें. भूक लागली होती. कांहीं मिळालें तर मागून खावें या हेतूनें तो त्या घरासमोर गेला.

तें घर नव्हतें, एक जुनें पडकें देऊळ होतें. त्यांत आठ पेट्या होत्या व त्यांच्यावर पानांचा ढीग सांचलेला होता. उघडून पाहण्याचा त्याला मोह झाला. पण धीर होईना. त्याला वाटलें, चोरांनीं आपली मिळकत जमा करून ठेवली असेल, ती घेतली तरी पाप नाहीं.

तो पुन्हां नदी काठीं गेला. सुदैवानें त्याच वेळीं एक मोठी नाव येत असलेली त्याला दिसली. त्यानें नाववाल्याला हाक मारून बोलाविलें आणि म्हणाला—"श्रीकंठ गांव आहे आमचें. माझें नांव श्रीवत्स मी व माझे काका पश्चिमेकडे व्यापाराला जात होतों. चांचेकऱ्यांनीं हल्ला केला. माझे काका त्या चकमकींत ठार झाले. मी त्यांचा नोकर आहे असें सांगून चोरांच्या हातून आपली सुटका करून घेतली. या शिवाय मी आजारी पण होतों. म्हणून त्यांनीं मला जीवदान दिलें. चोरांनीं आमचें सर्व सामान या जंगलांत एका पडक्या देवळांत पेट्यांत नेऊन ठेवलें आहे. मला देखील येथेंच डांबून ठेवून ते निघून गेले. जातांना माझ्यावर नजर ठेवायला एका नोकराला त्यांनीं ठेवलें होतें. त्याला रात्रीं सांप चावला व तो मेला. मी इकडे पळून आलों आहें. मला आपल्या नावेंत जागा देता का?"

"आणि त्या पेट्या?" नाववाल्यानें विचारलें.

"त्या न्यायच्या आहेत, पण कशा, मला चालवतदेखील नाहीं. तुम्ही आणल्यांत तर मी फार आभारी होईन तुमचा. आठ पेट्या आहेत. एक पेटी तुमची मजुरी म्हणून ठेवून घ्या." सुंदरवदन म्हणाला.







नाववाल्यानें आपल्या नोकरांकरवीं सर्व पेट्या आणवल्या. नाववाल्यांना पेटी मिळाली त्यांत हिरे, माणकें व दागिने होते. फुकटाची एवढी ठेव मिळालेली पाहून त्यांना आनंद झाला.

नाववाल्यांनीं सुंदरवदनला विचारलें– "दादा! तुम्हांला कोठें हो जायचें?" सुंदरवदन म्हणाला–"तेजपुरास."

तो तेजपूरला नावेंतून उतरला. सातही पेट्या उतरवून घेवून तो गांवांत गेला. एक घर भाड्यानें घेऊन त्यांत राहूं लागला. एका लोहाराच्या मदतीनें त्यानें त्या पेट्या उघडवल्या. त्यांत त्याला जो ठेवा सांपडला तो कित्येक पिढ्या जमा केलेला ठेवा होता. त्यानें एक एक वस्तु विकून पैसा जमा करायला सुरवात केली. कोणाला संशय येऊं नये अशा बेतानें तो राहूं लागला. नंतर त्यानें हळू हळू गांवाबाहेर एक मोठा वाडा बांधला व चारी बाजूला बाग लावून त्यांत तो राहूं लागला. पुष्कळ नोकर चाकर पण त्यानें कामाला ठेवून घेतले आणि सुखानें त्या वाड्यांत राहूं लागला. त्यानें पुष्कळ दानधर्म केला. श्रीवत्सची कीर्ति तेजपुरांत सर्वत्र पसरली. त्याचा आजार पार नाहींसा झाला व तो पहिल्यासारखा हिंडूं फिरूं व काम करूं लागला. पैसा तर त्याच्याकडे आलोट जमा झाला होता.

तिकडे सुंदरवदनला नदीकाठीं उतरवून नाव परत निघाली. यशोवती नावेच्या वरच्या बाजूला आली. सुंदरवदनला नावेंत न पाहून यशोवतीला आश्चर्य वाटलें. ती त्याच्यासाठीं औषध घेऊन आली होती. तिनें आईला विचारलें–"आई, ते कोठें आहेत ग?"

आईनें तिच्या हातांतलें औषध घेऊन नदींत फेंकून दिलें व म्हणाली–"पिडा गेली ती! सुटलीस एकदाची पोरी!" आई म्हणाली.

आईच्या तोंडून झालें तें ऐकून यशोवती रडूं लागली. तिनें नाव परत घेऊन चला म्हणून रडत रडत बापाला सांगितलें. बाप म्हणाला–"तें प्रेत घेऊन तूं काय करणार? तो मेला असें आतां समज आणि दुसरें लग्न करून घे."

"तुम्ही दोघं माणसें आहां कीं राक्षस? पहिल्यानें मागें नाव वळवा आणि त्यांना घेऊन या. नाहींतर माझ्या गळ्यांत दगड बांधून मला ढकला पाण्यांत. तुम्ही ढकललें नाहीं तर मी उडी टाकून जीव देईन." यशोवती म्हणाली.

अगदीं नाइलाजानें सुमित्राला नाव मागें वळवावी लागली. पण त्या निर्जन स्थानीं सुंदरवदन नव्हता. नदीकाठीं त्यांना दोरी व कुऱ्हाड मात्र दिसली.

"निराश व असहाय होऊन त्यांनीं जीव दिला असेल. मी जातें त्यांना भेटायला असें सांगून यशोवती नदींत उडी मारायला उभी राहाली. आई बापांनीं तिला अडवलें व शोध काढूं, अशी घाबरूं नकोस म्हणून तिची समजूत घातली.



सहा महिनेपर्यंत ती आपल्या पतीसाठीं रडत त्याची वाट पहात होती. तिच्या बापानें आपल्या जांवयाच्या नांवानें श्राद्ध करून पिंडदान करून टाकलें. पण तिच्या डोळ्याचें पाणी थांबलें नाहीं व तिनें दुसरें लग्न करून घेतलें नाहीं. आई बापांनीं पुष्कळ आग्रह केला. पण प्रत्येक वेळीं ती जीव द्यायची धमकी देई म्हणून त्यांनीं पण तो नाद सोडला.

दोन वर्षें होऊन गेलीं. सुंदरवदन आपल्या नवीन जागीं स्थिरस्थावर झाला होता. एकदां सासू सासऱ्याला भेटून

जावें असें त्याच्या मनांत आलें. त्यानें पुष्कळसें धन व नोकरचाकर बरोबर घेतले आणि एका नावेंत बसून कामाख्या येथें आला. चवकशी करतां कळलें कीं सुमित्र कोठें परगांवीं गेला आहे. सुंदरवदन कामाख्या गांवीं उतरला व नदी काठीं हिंडत असतां एका नावेंत त्याला यशोवती वैधव्य स्थितींत उभी असलेली दिसली.

तो परत आपल्या नावेंत गेला आणि एका विवाह जमविणाऱ्या माणसाची चवकशी करून त्याला बोलावून घेऊन म्हणाला— "मी सांगतों त्या नावेंत एक विधवा आहे. तिच्याशीं मी लग्नाला तयार आहें. ती लग्नाला तयार असेल तर येऊन सांग. मी तिच्या आईवडिलांना विचारून पुढली व्यवस्था करतों. तीन हजार रुपये मी द्यायला तयार आहें. तूं लग्न ठरवून दिलेंस तर तुला शंभर रुपये बक्षिस."

तो मनुष्य सुमित्रला जाऊन भेटला म्हणाला—"तेजपूरचा कोणी श्रीवत्स नांवाचा श्रीमंत गृहस्थ आहे. तुझ्या मुलीला त्यानें पाहिलें आहे. तो मुलीच्या आईला तीन हजार रुपये द्यायला तयार आहे. फक्त तूं होकार देण्याची खोटी आहे."

"नकोरे बाबा! तिच्या लग्नाची गोष्ट काढूस. आम्ही आहों त्यांत सुखी आहोंत. लग्नाचे नांव काढलें कीं ती जीव द्यायला तयार होते." असें सांगून सुमित्रनें त्याला निरोप दिला. दलाल परत सुंदरवदनकडे आला व म्हणाला—"मालक! त्या मुलीशीं लग्नाचा विचार सोडा. तिला लग्न नाहीं करायचें. वैधव्यांतच दिवस काढण्याचा तिच्या मनाचा निर्धार आहे. मयत पतीवर तिचें फार प्रेम होतें."

"बरें, तें सोड. म्हणावें, मला दोन दिवसांकरितां नाव हवी आहे भाड्यानें. त्याला ते लोक तयार आहेत कीं नाहीं पहा." सुंदरवदन म्हणाला.

"कां नाहीं देणार? हाच त्यांचा धंदा आहे." तो मनुष्य म्हणाला.

सुमित्रकडे पुन्हां जाऊन तो मनुष्य म्हणाला—"श्रीवत्साला तुझी नाव कांहीं दिवस भाड्यानें हवी आहे. देतोस का? मागशील तें भाडें मिळेल."

सुमित्र कबूल झाल्यावर त्याच्या हातावर शंभर रुपये अगाऊ भाडें म्हणून ठेवून तो मनुष्य सुंदरवदनकडे आला.







सुंदरवदन चार नोकरांना बरोबर घेऊन घरनावेंत येऊन बसला. त्याचा तो पोशाख व रुबाब पाहून आणि त्याच्या प्रकृतींत पुष्कळ बदल झाला होता म्हणून सुमित्र किंवा त्याची बायको दोघांपैकीं कोणीच सुंदरवदनला ओळखलें नाहीं. पण यशोवतीनें त्याला पाहाल्याबरोबर चांगलें ओळखलें. पतीला त्या वेषांत व रुबाबांत पाहून ती थक्क झाली.

सुंदरवदननें खोलीकडे बोट दाखवून बायकोला विचारलें—"कांहीं खायला आहे का? खूप भूक लागली आहे. शिळा भात असला तरी चालेल. लोणचें मिरची जें असेल तें चालेल तोंडी लावायला." तें ऐकून तिला जास्तच आश्चर्य वाटलें.

नंतर तो आपल्या नोकराला म्हणाला—'काय रे रिकामटेकडा बसला आहेस? दोन वेळ पुक्खा चालू.-आहे तो काय फुटकाचा. निदान बसून दोरी तरी वळ."

नंतर तो सुमित्रला म्हणाला—"तुमच्या मागच्या खोलींत एक फाटका पंचा आहेना तो घाल का जरा." यशोवतीनें तें सर्व ऐकलें—"सुमित्रनें पण ऐकलेंच. पण त्याच्या डोक्यांत कांहीं प्रकाश पडला नाहीं. उलट त्याला या गोष्टीचें आश्चर्य वाटत होतें कीं या लक्षाधीशाला फाटक्या पंचाची गरज कां वाटावी? त्यानें आंत जाऊन मुलीला विचारलें—"कोठें आहे ग तो फाटका पंचा?"

यशोवतीनें पंचा काढून दिला व म्हणाली—"तुमचे जांवई आहेत ते!"

तें ऐकून तिची आई म्हणाली—"गप बैस! आली आहे शिकवायला आम्हांलाच. तो गेला गंगेच्या आहारीं केव्हांच. इतके दिवस लग्न करून घे म्हणून आम्ही रडत आलों. पण ऐकलें नाहींस. आतां एका गोऱ्या गोमट्या श्रीमंताला पाहून त्याला



आमचा जांवई म्हणून सांगून त्याच्याबरोबर संसार करायला तयार झाली आहेस होय?"

यशोवतीनें कांहींच उत्तर दिलें नाहीं.

रात्रीं सुमित्रला बायकोनें विचारलें—"मुलीची लक्षणें पाहिलीत का?" तेव्हां तो म्हणाला—"उगाच आग कां पाखडलीस तिच्यावर? तिचें मन याच्यावर गेलें आहे तर त्यांत काय वाईट झालें? या माणसानें पहिल्यानें निरोप पाठवला होता कीं तो आपल्या मुलीशीं लग्न करायला तयार आहे व बद्दल तीन हजार रुपये द्यायला तयार आहे. पण मुलीच्या भीतीनेंच मी नकार देऊन टाकला होता. आतां ती स्वतःच तयार झाली आहे तर वाईट काय? लक्षाधीश नाहीं, कोट्याधीश दिसतो आहे. जन्माचें दारिद्र्य जाईल, म्हणतों."

"मग उद्यां त्याच्याशीं बोला, पाहिजे तर! मुलगी तयार झाली तर लग्न करून देऊं." बायको म्हणाली.

दुसऱ्या दिवशीं सुमित्रनें सुंदरवदनजवळ मुलीच्या लग्नाची गोष्ट काढली तेव्हां सुंदरवदननें त्याला विचारलें—"काय हो तुमचा पहिला जांवई मेला कसा?"



"काय सांगूं, कर्म आमचें. लाकडें आणायला तो नदीकाठीं उतरला. मला तें लक्षांत राहालें नाहीं. मी नाव घेऊन पुढें जात होतों व परत यायचें विसरलों. पण मुलीनें आठवण करून दिली तेव्हां येऊन पाहातों तर तो तेथें नव्हता. लाकडें, दोरी व कुऱ्हाड काय ती दिसली. तो फार आजारी पण होता. मेला असावा."

"तुमचा जांवई जिवंत आहे. तुमच्या समोर बसून बोलत आहे." सुंदरवदन म्हणाला.

"मी म्हणालें तेव्हां तुम्ही दोघें रागावलांत." खोलींतून बाहेर येत यशोवती म्हणाली. पति-पत्नी परस्परांस भेटलीं. दोघांच्या डोळ्यांतून आनंदाश्रू वहात होते. त्या अश्रूंच्या प्रवाहांत सर्व दुःखें व कष्ट धुवून निघाले.

सासूसासऱ्यांच्या माना लाजेनें खालीं झाल्या. परंतु सुंदरवदननें त्यांना जास्त लज्जित न करतां घरनाव व तो धंदा सोडून त्याच्या वाड्यांत सुखानें राहण्यासाठीं त्यांना बोलावून नेलें. म्हणाला—"गरिबीमुळें माणसाला काय वाटेल तें करावें लागतें. सर्व आतां विसरा व सुखानें म्हातारपण माझ्या घरीं काढा."

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा! सुंदरवदननें आपल्या दुष्ट सासूसासऱ्यांना आपल्या घरीं कां बोलावून घेतलें? त्यांनीं त्याच्याशीं किती दुष्टपणाची वागणूक केली होती? याचें उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींस तर, तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

विक्रमार्क म्हणाला—"त्याच्यावर सासूसासऱ्यांनीं ते अत्याचार केले म्हणूनच नाहीं का त्याचें नशीब उद्याला येऊं शकलें? तो मरणाची वाट पहात होता, पण वांचला आणि कोट्याधीश झाला. त्याच्या कष्टसुखाला त्याचे सासूसासरे निमित्त मात्र होते. म्हणून त्यानें त्यांना म्हातारपणीं मदत केली."

अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेताबरोबर नाहींसा झाला व पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळूं लागला.

(कल्पित)





# खजिना भरला

फार प्राचीन काळीं लंबक नांवाच्या एका बेटावर उत्तम नांवाचा राजा राज्य करीत असे. त्याची प्रजा नेहमीं सुखी असे. कारण तो धर्मभीरु आणि एक प्रजावत्सल राजा होता. कधीं राज्यांत दुष्काळ पडला नाहीं कीं अराजकता पसरली नाहीं.

इतकें असूनहि एकदां त्याच्या समोर एक मोठा प्रश्न उभा राहिला. त्याचा खजिना हळूहळू कमी होऊं लागला. प्रजेकडून वसूल केलेला कर खजिन्यांत नियमितपणें पोंचत नसे. त्याचें कारण कळेना. राजाला वाटे कीं प्रजा नियमितपणें कर्ज देत नसावी. तसें करांचें ओझें पण नव्हतें. एक मूठभर तांदूळ प्रत्येकानें दिले तरी खजिना नेहमीं भरून राहील असें राजाचें म्हणणें होतें.

कापणी होतांच प्रत्येक कुटुंबाचा प्रमुख कुटुंबांत जितकीं माणसें होतीं त्या हिशोबानें कर गांवाच्या अधिकाऱ्याकडे भरीत असे. तो कर जिल्ह्याच्या अधिकाऱ्याकडे जमा केला जाई. जिल्हाधिकारी प्रांत प्रमुखाकडे व तो राजाकडे पोंचता करी.

लंबक राज्य बारा प्रांताधिकारी किंवा सामंतांना वांटून देण्यांत आलें होतें.

प्रजेकडून वसूल झालेला कर थोडा फार ग्रामाधिकाऱ्यांजवळ किंवा जिल्हाधिकाऱ्यांजवळ पडून राही व खजिन्यांत पोंचत नसे. कोठें किती अडकून राही हें कळायला मार्ग निघेना. कारण राज्यांत किती गांवें आहेत आणि प्रत्येक गांवांत किती कुटुंबें व प्रत्येक कुटुंबांत किती माणसें आहेत याची माहिती राजाकडे नव्हती. त्यामुळें पैसा

सौ. सरलाबाई ओझेर



कोठें व कसा दडून राहाला आहे हें कळेना. म्हणून कोणाला सुगावा लागूं न देतां ही आंकडेवारी माहिती मिळविणें आवश्यक होतें. राजानें पुष्कळ विचार केला. शेवटीं त्याला एक उपाय सुचला.

राजानें सर्व बारा सामंत व त्यांच्या हाताखालचे जिल्हाधिकारी यांना खास खलिते पाठवून राजधानींत बोलाविलें. दरबार भरल्यावर राजा म्हणाला—"मी एका अत्यावश्यक प्रश्नासंबंधीं तुमचा सल्ला घेण्या-साठीं तुम्हांला बोलाविलें आहें. आपल्या देशाच्या, प्रजेच्या व आपल्या सर्वांच्या हिताचा हा प्रश्न आहे. गेल्या कांहीं दिवसांपूर्वी मला लंबकेश्वराचा दृष्टांत झाला. देव स्वप्नांत म्हणाला, तुझ्या या सुंदर व सुखी राज्यावर व जवळपासच्या बेटांवर आपत्ति येणार आहे. त्या आपत्तीला तोंड घ्यायला आम्ही काय केलें पाहिजे हेंदेखील मी देवाला विचारलें. तेव्हां देव म्हणाला कीं आपण बारा तलवारी तयार करवून देवाला अर्पण कराव्या. त्या देवळांतच ठेवाव्या. त्या कशा तयार करवायच्या हें देखील देवानें सांगितलें. प्रत्येक गांवांतल्या प्रत्येक व्यक्तीकडून एकेक सुई घ्यावी. ग्रामाधिकारी गांवांतल्या सुर्व सुया एकत्र करून त्यांच्या बरोबर गांवाचें नांव लिहून एक चिठ्ठी ठेवील आणि तें पुडकें जिल्हा-धिकाऱ्याकडे पाठवील. कोठें दुर्लक्षपणा किंवा चूक होऊं नये व कोणाला बोल लागूं नये यासाठीं जिल्हाधिकाऱ्यानें जमा झालेलीं सर्व पुडकीं एकत्र बांधून आपल्या जिल्ह्याचें नांव त्यावर लिहून सामंताकडे पाठवावीं. सामंतानें सर्व जिल्ह्याधिकाऱ्यांकडून आलेल्या पुडक्यांचें एक मोठें ओझें बांधून किंवा पेटींत ती पुडकीं घालून पेटी राजधानींत पाठवून द्यावी. तलवारी तयार करून लंबकेश्वराच्या चरणीं अर्पण करण्याची व्यवस्था राजधानींत होईल. ती जबाबदारी मी घेतों.

"कोणत्याहि भागांत रोगराई, दुष्काळ किंवा असेंच कांहीं संकट आलें तर त्या भागाच्या सामंताची तलवार त्या भागांत किंवा गांवांत पाठविण्यांत येईल. तलवार येतांच संकट दूर होईल. तसें झालें नाहीं तर जितके लोक विशिष्ट गांवीं आहेत तितक्या सुया त्या गांवांतून आल्या नाहींत असें समजावयाचें."

सर्व सामंत व जिल्ह्याधिकारी यांचा राजानें जें सांगितलें त्यावर विश्वास बसला. प्रत्येक गांवांत सुयांची वसूली सुरू झाली. प्रत्येक ग्रामाधिकाऱ्यानें प्रत्येक कुटुंबांत जितकीं माणसें होतीं त्याची नोंद घेऊन त्याप्रमाणें सुया वसूल केल्या व गांवभरच्या सुया एका पुडक्यांत बांधून गांवाच्या नांवाची चिठ्ठी त्याला शिवून ठेवली. अशातऱ्हेनें प्रत्येक गांवांतलीं पुडकीं जिल्ह्याधिकाऱ्याकडे येऊन जमा झालीं. जिल्ह्याधिकाऱ्यानें त्या सर्वांचें मोठें पुडकें बांधून सामंताकडे पाठविलें व सामंतानें सर्व जिल्ह्याधिकाऱ्याकडून आलेल्या पुडक्यांचें एक मोठें ओझें गाडींत घालून राजधानींत







पोंचतें केलें. बारा गाड्या राजधानींत पोंचल्या झाल्या.

राजानें आपल्या खासगी अधिकाऱ्यां-करवीं गांवें, जिल्हे व प्रांत या प्रमाणें सुया मोजून खानेसुमारी घेतली व आंकडेवारी यादी तयार केली. राजाला पाहिजे होती ती माहिती मिळाली.

चांगला मुहूर्त दिवस पाहून राजानें लोहाराकरवी त्या सुयांच्या बारा तल्वारी तयार करविल्या. नंतर त्या तल्वारींची राजधानींत मिरवणूक काढण्यांत आली. लोकांनीं तोरणें पताका लावून व आरत्या आणून तल्वारींवरील आपली भक्ति दर्शविली. नंतर त्या तल्वारी लंबकेश्वराच्या देवळांत ठेवण्यांत आल्या.

त्यानंतर करवसुली ठीक ठीक होऊं लागली. कोणी कमी कर आणून दिला तर राजा कमी वस्तीच्या गांवांत किती कर मिळाला हें सांगून ग्रामा-धिकाऱ्याची चूक त्याच्या पदरांत बांधून देई. त्यामुळें कराची रकम चोरून ठेवणारांची हिंमत होईना. त्यांनीं पुरी रकम खजिन्यांत जमा करायला सुरवात केली. अशा तऱ्हेनें खजिना पुन्हां भरला.

एखाद्या गांवांत रोगराई किंवा इतर दुसरी कांहीं आपत्ति आली कीं त्या प्रदेशांतली तल्वार पाठवून देण्यांत येई. रोगराई दूर झाली की लोक म्हणत हा सर्व तल्वारीचा परिणाम आहे. दूर झाली नाहीं तर म्हणत—"आमच्या गांवच्या लोकांनीं किंवा ग्रामाधिकाऱ्यानें सुया मोजण्यांत किंवा पाठविण्यांत कांहींतरी चूक केली असावी.





# मंत्र विद्या

एका गांवीं मदन नांवाचा एक आळशी मुलगा रहात असे. कोणतेंहि काम तो करीत नसे. एवढेंच नव्हें तर स्वतः कांहीं काम करण्यांत तो कमीपणा मानीत असे. मंत्रविद्या अवगत करून घेतली तर कोणतेंहि काम सहजीं होऊं शकेल व उदरनिर्वाहाची पंचाईत करण्याचें कारण उरणार नाहीं, असें एकदां त्याला वाटलें.

गांवापासून दूर एका डोंगरांतल्या गुहेंत एका मठांत एक सिद्ध पुरुष रहात असे. त्याला मंत्रविद्या अवगत होती. मदन त्याच्या शोधार्थ निघाला. तो मठांत पोंचला तेव्हां तो सिद्ध पुरुष दर्भासनावर बसला होता. त्याचे शिष्य निरनिराळ्या प्रकारच्या कामांत गुंतले होते.

मदननें त्या सिद्धपुरुषाला नमस्कार करून शिष्य करून घेण्यास विनंति केली.

सिद्ध म्हणाला—"मुला, मंत्रविद्या संपादन करण्यास आवश्यक शक्ति तुझ्या अंगीं नाहीं."

तें ऐकून मदन थोडा निराश झाला. तरी धीर करून म्हणाला—"बुवा! मला प्रयत्न करून पाहण्याची इच्छा आहे. येथेंच राहण्याची परवानगी द्यावी."

"त्याला हरकत नाहीं. इतर शिष्यांबरोबर तूं पण रहा." सिद्ध म्हणाला.

दुसऱ्या दिवशीं उजाडतांच त्या सिद्ध पुरुषानें मदनला बोलविलें आणि एक कुऱ्हाड देऊन लाकडें फोडून घेऊन यायला सांगितलें.

लाकडें फोडण्याचें काम केलें तर मंत्रविद्या अवगत होणार नाहीं असें त्याला वाटत

श्री. श्यामकांत पाटील

होतें. परंतु सिद्ध पुरुषानेंच आज्ञा केल्यावर तो लाकडें फोडून घेऊन आला. पुरा एक महिना तो हेंच काम करीत राहला. त्यामुळें त्याच्या हाताला घट्टे पडले.

एक दिवशीं संध्याकाळीं तो लाकडें घेऊन मठांत पोंचला तेव्हां सिद्ध पुरुषासमोर दोन जण नवीन कोणीतरी बसले होते. तिथे कांहीं तरी बोलत होते. खोलींत काळोख होता. परंतु सिद्ध पुरुषानें आपल्या एकाहि शिष्याला दिवा लावून आणायला सांगितलें नव्हतें. तो स्वतःच उठला व त्यानें भिंतीवर निखाऱ्यांतून कसला तरी गोळा काढून ठेवला. तो गोळा चंद्रासारखा चकाकूं लागला. खोलींत चांदण्यासारखा उजेड झाला.

नंतर दोघां नव्यापैकीं एक जण म्हणाला—"थोडा वेळ कांहीं करमणुकीचा कार्यक्रम ठेवूं या." असें सांगून त्यानें एक जळकी काडी काढून भिंतीवर काढलेल्या एका वर्तुळावर टाकली. त्या काडीची एक अप्सरा झाली व ती त्या वर्तुळांतून बाहेर खोलींत आली. कांहीं वेळ नृत्यगान करून ती अप्सरा पुन्हां काडी झाली व खालीं पडली.

नव्या अनोळखी माणसांपैकीं एकानें एक तांब्या सिद्धपुरुषाच्या शिष्याच्या हातांत दिला व म्हणाला—"यांत जी खीर आहे ती तूं पिऊन टाक."

मदनला वाटलें कीं तांब्यांत कितीशी खीर असणार. तळाला असेल थोडीशी ! तेवढ्या खिरीनें कोणाचें पोट कसें काय भरणार ! परंतु तांब्यांतल्या खिरीनें सर्वांचीं पोटें भरलेली पाहून त्याला आश्चर्य वाटलें.

नंतर सिद्धपुरुष दोघांना म्हणाला—"चला, थोडा वेळ चंद्रमंडळांत भ्रमण करून येऊं."

मदनच्या डोळ्या देखत तिथे भिंतीवरच्या चंद्रमंडळांत जाऊन बसले. शिष्यांनीं कांहीं वेळ त्यांची हालचाल पण पाहिली.

इतक्यांत भिंतीवरचा चंद्र एकाएकीं विझला. खोलींत काळोख झाला. शिष्यांनीं एक दिवा आणून ठेवला. तेव्हां फक्त सिद्धपुरुष काय तो बसलेला दिसला. तो आपल्या शिष्यांजवळ मदनला जें कांहीं दिसलें होतें त्या विषयीं कांहीं एक बोलला नाहीं. तो एवढेंच म्हणाला—"जाऊन झोपा सर्व. सकाळीं लवकर उठायचें आहे ना ?"

आणखी दोन महिने होऊन गेले. मदन लाकडें फोडून नित्य नियमितपणें आणीत







होता. त्याला सिद्धपुरुष मंत्रविद्या शिकविणार असल्याचीं चिन्हें दिसत नव्हती.

शेवटीं मदननें धाडस करून एकदां सिद्धपुरुषाला विचारलें—"गुरुवर्य! मी तीन महिने झाले, श्रद्धा भक्तिपूर्वक आपली सेवा करीत आलों. गेले तीन महिने लाकडें फोडून आणण्या व्यतिरिक्त मी कांहीं केलें नाहीं. इतके शारीरिक श्रम मी आपल्या आयुष्यांत कधीं केले नाहींत व मला कामाची संवय पण नाहीं. आतां मी घरीं जावें म्हणतों."

"ठीक आहे, जा! मी नको केव्हां म्हटलें? उलट तूं आलास त्याच दिवशीं मी तुला सांगितलें होतें, आवश्यक बळ तुझ्या अंगीं नाहीं. खुशाल जा आपल्या घरीं." सिद्धपुरुष म्हणाला.

"गुरुवर्य! मी इतकी मेहनत केली. मला एकादा ल्हानसाच का होईना मंत्र शिकवणार नाहीं का?" मदननें विचारलें.

"एवढेंच ना? त्याला हरकत कसली? तुला मंत्र शिकायचा आहे का?" सिद्धपुरुषानें विचारलें.

"मी आपणाला भिंतींत व भिंतीवर चालतांना पाहिलें आहे. ती मंत्रशक्ति मला अवगत झाली तर माझ्या मनाचें समाधान होईल." मदन म्हणाला.

तो सिद्धपुरुष थोडा हंसला. त्यानें मदनला एक ल्हानसा मंत्र शिकवला. तो मंत्र म्हटल्याबरोबर मदन भिंतींतून पलीकडच्या खोलींत जाऊन पोंचला आणि परत पण आला.

मदन सिद्धानें शिकवलेला मंत्र म्हणून पुन्हां एकदां भिंतीच्या पलीकडे जाण्याचा प्रयत्न करूं लागला. पण भिंतीनें त्याला पलीकडे जाऊं दिलें नाहीं.

"असें हळूहळू चालून काय उपयोगी? डोकें खालीं करून वांकून लवकर पळत गेलास तर भिंती पलीकडे जाशील." सिद्ध पुरुष म्हणाला. सिद्धानें सांगितल्याप्रमाणें केल्यावर मदन पलीकडे जाऊन पुन्हां परत आला. नंतर त्यानें त्या सिद्ध पुरुषाचे आभार मानले.

"तुला ही विद्या आतां अवगत झाली आहे. परंतु वाटेल त्याच्या समोर या विद्येचें प्रदर्शन करूं नकोस बरें का? लक्षांत ठेव!" असें सांगून सिद्ध पुरुषानें मदनला निरोप दिला.

मदननें घरीं गेल्याबरोबर, घरच्या व गांवच्या लोकांसमोर बढाया मारल्या कीं एका सिद्ध पुरुषाकडून त्यानें निरनिराळ्या प्रकारची मंत्रविद्या शिकून घेतली आहे. परंतु कोणती मंत्रविद्या तो शिकून आला आहे, हें स्पष्टपणें त्यानें कोणालाच सांगितलें नाहीं. म्हणून त्याच्या बोलण्यावर कोणाचाच विश्वास बसेना.

म्हणून एकदां मदननें गांवकऱ्यांसमोर त्याला मिळालेल्या सिद्धीचें प्रदर्शन करण्याचें ठरविलें. एक जागा ठरवून त्यानें गांवच्या लोकांना तेथें जमा केलें. गांवकरी जमा झाल्यावर मदन मंत्र म्हणून मेंढ्यासारखा डोकें खालीं करून वांकून समोरच्या भिंतीच्या दिशेनें धांवला. पण भिंतीवर त्याचें डोकें आदळल्यामुळें तो बेशुद्ध होऊन जमिनीवर पडला. डोक्याला एक मोठें टेंगूळ आलें. मदनच्यां त्या मंत्रविद्येची चर्चा गांवांत कित्येक वर्षे चालू होती. लोक ती गंमत सांगून गालांतल्या गालांत हंसत.

म्हणूनच कीं काय अशक्य काम करणाऱ्याला पाहून आपण म्हणतों. "असें भिंतीवर डोकें आपटून काय मिळणार आहे?"





# फशारी

एका सुलतानाच्या राज्यांत एका गृहस्थाला दोन मुलगे होते. त्या गृहस्थानें मरण समयीं मुलांना जवळ बोलाविलें व म्हणाला— "आजपर्यंत मी होतों म्हणून तुम्हांला कसलीच काळजी नव्हती. परंतु या पुढें तुम्हांला स्वतःच्या पोटापाण्याची काळजी करावी लागणार. इतर धंद्यांत तुम्हांला कदाचित यश येणार नाहीं. चोरीचा एकच धंदा तुम्हांला करतां येईल." असा विक्षिप्त सल्ला देऊन त्यानें डोळे मिटले.

चोरीच्या धंद्यांत एक म्हातारा मनुष्य पटाईत आहे हें कळल्यावरून दोघे भाऊ त्याच्या कडे गेले आणि चौर विद्या शिकूं लागले. कांहीं काळ लोटला. एकदां गुरूनें आपली हातचलाखी दाखविण्याचें ठरविलें. तो झाडावर चढला आणि घरट्यांतल्या पक्ष्याला त्याची झोंप मोडल्याशिवाय उचलून घेऊन आला. गुरूनें तो पक्षी आपल्या मोठ्या शिष्याला दाखविण्याचा विचार केला. पण तो पक्षी त्या शिष्याच्या हातांत केव्हां व कसा जाऊन पोंचला हें त्या म्हाताऱ्याला देखील कळलें नाहीं.

गुरूनें आपल्या शिष्याच्या हातचलाखी बद्दल त्याची पाठ थोपटली. म्हणाला— "आतां मी तुला नवीन कांहीं शिकवूं शकेन असें दिसत नाहीं. म्हणून तूं स्वतःच्या पायावर उभा राहून धंदा सुरू कर." असें सांगून व शिष्याला आशी-र्वाद देऊन गुरूनें त्याला निरोप दिला. चोरी करण्यांत दोघे पटाईत होते. त्यांची प्राप्ती दिवसेदिवस खूप वाढूं लागली.

एकदां धाकटा भाऊ मोठ्याला म्हणाला— "या लहान सहान चोऱ्यांत काय फायदा? सुलतानाचा खजिना लुटूं या."

"होय! बाबांचें सुद्धां हेंच मत होतें कीं धनी श्रीमंत माणसांच्या घरीं चोरी करावी. सुलतानाहून मोठा श्रीमंत कोण आहे जगांत?" मोठा भाऊ म्हणाला.

त्यानंतर एका काळोख्या रात्रीं दोघां भावांनीं सुलतानाच्या महालाच्या भिंतीला भोंक पाडलें व धाकटा भाऊ भोकांतून आंत शिरला. म्हणून तो सहजीं आंत शिरला आणि हिरे माणिक्यें, सोन्याचीं नाणीं दागदागिने, जें हातीं लागलें तें एकेक करून आणून भोकांतून मोठ्या भावाला देत गेला.



दुसऱ्या दिवशीं चोरी झाल्याचें कळलें. सुलतानानें वजिराला बोलावून विचारलें— "वजीरसाहेब! आमच्या महालांत चोर शिर-लाच कसा?" सुलतानानें पुन्हां विचारलें. "त्यानें कोठें भोंक पाडलें होतें का, हें कळायला कांहीं मार्ग?"

"खिडकी दरवाजे बंद करून महालांत धूर करावा. महालाच्या चारी बाजूला शिपाई उभे करावेत. ज्या जागेतून धूर निघेल तेथें चोरांनीं भिंतीला भोंक पाडलें होतें हें उघड आहे." वजीर म्हणाला.

वजिरानें सांगितल्याप्रमाणें करून पाहातां चोर ज्या जागीं भोंक पाडून वाड्यांत शिरला होता ती जागा कळली. एक पाहरेकरी धांवतधांवत सुलतानाकडे गेला व म्हणाला— "महाराज! जागा सांपडली."

सुलतान म्हणाला— "अरे! त्यानें पाडलेलें भोंक कोणाला हवें आहे? चोर कोठें आहे हें सांग!"

"त्या भोकांत चोर नव्हता, सरकार!" तो पाहरेकरी म्हणाला.

       



"भोंकावर सतत पाहारा ठेवा. चोर पुन्हां जरूर येईल." वजीर म्हणाला.

वजिरानें सांगितल्याप्रमाणें दोघे भाऊ चोरी करायला त्या जागीं पुन्हां आले. धाकटा भाऊ भोंकांत शिरला त्याला सुल्तानाच्या शिपायांनीं अटक केली आणि मोठा भाऊ बाहेरच्या बाहेर पळून गेला. पकडलेल्या चोराला हातकड्या व बेड्या घालून शिपायांनीं राजासमोर हजर केलें.

"याचें डोकें उडवा!" सुल्तानानें हुकूम सोडला.

"अशी घाई करूं नये सुल्तान! याचा एक साथी फरार आहे. म्हणून याला बांधून एका पिंजऱ्यांत ठेवावें व पिंजरा बाहेर टांगून ठेवावा. महालांत चोरी केल्याबद्दल कशी शिक्षा मिळते हें चोरी करणाऱ्याला कळेल. नंतर याच्यावर जो कोणी दया दाखवतो त्याला अटक करायला सांगावें." वजीर म्हणाला.

पिंजरा महालाबाहेर टांगून ठेवण्यांत आला, लोक येत व कुजकीं फळें पिंजऱ्यावर फेंकीत. "उद्यां त्याचें डोकें उडविण्यांत येईल" ही वार्ता राजधानीभर पसरली.

रात्रीं काळोख पडल्यावर मोठा भाऊ तोंडावर बुरखा घेऊन आणि खांद्याला पंख बांधून व एका घोड्यावर बसून, ज्या जागीं पाहारेकरी पहारा देत उभे होते तेथें आला.

"कोण तूं?" पाहारेकऱ्यांनीं विचारलें.

"नराधमांनो! तुम्ही मला ओळखलें नाहीं वाटतें? माझें नांव इस्राईल. प्रत्यक्ष अल्लानें मला पाठविलें आहे. हा माझा कैदी आहे. मी याला धरून घेऊन जात आहें." असें सांगून त्यानें पाहारेकऱ्यांकडून किल्ली मागून घेतली. पिंजरा उघडून भावाला घोड्यावर बसविलें व जोरानें घोडा सोडला.



सैनिक तर भीतीनें थरथर कांपत होते. काय करावें, त्यांना सुचेना.

मोठ्या भावानें रात्रीच्या रात्रीं धाकट्या भावाला परदेशांत पोंचता केला. कारण स्वदेशांत राहणें धोक्याचें होतें. कारण सहस्रावधी लोकांनीं त्याला प्रत्यक्ष पाहिलें होतें. मोठ्या भावाला कोणी पाहिलें नव्हतें. तो स्वदेश सोडून गेला नाहीं. महालांतून चोरी करून आणलेली एकेक वस्तु बाजारांत तो विकी व त्यावर त्याचा उदरनिर्वाह छान चाले. परंतु मोठमोठीं रत्नें व माणिक्यें जशीच्या तशीं पडून होतीं. तीं विकायला बाजारांत नेलीं तर चोरी पकडली जाईल अशी धास्ती त्याला वाटत होती.

सुल्तानाला मात्र फार वाईट वाटलें, हातीं आलेला चोर हातावर तुरी देऊन निसटून गेला. सैनिकांना भुलावणी देऊन तो निघून गेल्यामुळें राजाला जास्तच राग आला. त्यानें वजिराला बोलावून विचारलें—"आतां काय करावयाचें?"

"मला बारा सोन्याचीं नाणीं द्या." वजीर म्हणाला.

"काय करणार नाणीं घेऊन?" राजानें विचारलें.





"मी तीं महालाच्या वाटेवर टाकून ठेवीन." वजीर म्हणाला.

"काय फायदा? त्यांत काय मिळणार?" राजानें विचारलें.

"सुलतान! सोन्याचीं नाणीं वाटेंत पडलेलीं पाहून चोर स्वस्थ बसेल का? सामान्य चोर असेल तर त्याला वाटेल कीं त्याला पकडण्यासाठीं हें जाळें टाकलेलें आहे. म्हणून त्यांच्या पैकीं कोणी त्या नाण्यांजवळ फिरकणार सुद्धां नाहीं. परंतु साहसी चोर ही संधी दवडणार नाहीं. काय वाटेल तें करून तीं चोरून नेण्याचा तो खात्रीनें यत्न करील. आपले शिपाई चोरावर पाळत ठेवतीलच."

सुलतान तें ऐकल्यावर कबूल झाला. त्यानें वजिराला बारा मोहोरा दिल्या. त्या महालाच्या वाटेवर टाकण्यांत आल्या. जागोजागीं शिपाई गुप्तपणें नेमण्यांत आले.

परंतु चोरानें तें सर्व ओळखलें. नाण्यांची चोरी करणाऱ्याला धरण्यासाठीं जागोजागीं सैनिक नेमण्यांत आले आहेत, हें देखील त्याला कळलें. तरी तीं नाणीं आपण चोरली नाहींत तर आपण चोरच कसले? असा विचार करून तीं नाणीं चोरण्यासाठीं त्यानें एक युक्ति केली.

त्यानें एका व्यापाऱ्याचा वेष घेतला. उंट भाड्यानें देणाऱ्याकडे गेला आणि म्हणाला—"मी दुरून प्रवास करीत आलों आहें. माझे उंट दूर आजारी आहेत. त्यांचें औषधपाणी चालू आहे. कांहीं माल तावडतोब किल्ल्यापर्यंत पोंचवायचा आहे. म्हणून मला तुमचे उंट आज संध्याकाळ पर्यंत भाड्यानें हवे आहेत."

तो भाड्यानें दहा उंट घेऊन आला. त्यांच्या तळपायांना त्यानें गोंद लावून ठेवला. नंतर स्वतः उंट हाकणाऱ्यांचा वेष



पालटून तो ज्या वाटेवर मोहरा टाकून ठेवल्या होत्या त्या वाटेनें उंटांना हाकलत निघाला. परत आल्यावर त्यानें उंटांच्या तळपायाच्या मोहरा काढून घेऊन उंटवाल्याकडे उंट पोंचते केले आणि घरीं आला.

"आपल्या डोळ्यांत धूळ फेंकून चोर मोहरा घेऊन गेला. आतां पुढें काय?" सुलतानानें विचारलें.

वजीर थोडा वेळ विचार करून म्हणाला—"एका मेजवानीची व्यवस्था करून सर्व नागरिकांना मेजवानीचें बोलावणें करावें."

"आणखी पैसे वायां कां घालवायला सांगतोस? मेजवानी देऊन काय मिळणार आहे?" सुलतानानें विचारलें.

"मेजवानीला चोर नक्की येईल. आणि मी सांगायला विसरलों होतों, हा चोर जेव्हां आपल्या मित्राला सोडवून न्यायला बुरखा घेऊन आला होता तेव्हां त्याच्या तोंडावरचा बुरखा थोडा बाजूला झाला होता आणि त्याच वेळीं एका पाहारेकऱ्यानें त्याला पाहलें होतें. तो पाहरेकरी त्याला ओळखीन म्हणतो. म्हणून दारावर त्यालाच उभे करूं. चोर आल्याबरोबर तो चोराला ओळखील. लगेच चोराला पकडतां येईल." वजिरानें सांगितलें.



ठरल्यावेळीं मेजवानीची उत्तम व्यवस्था करण्यांत आली. वजिरानें सांगितल्या-प्रमाणें चोर आला. मुख्य दारावर नेमलेल्या त्या पाहारेकऱ्यानें त्याला पाहतांच ओळखून त्याला पकडण्याचा यत्न केला व "चोर चोर" म्हणून मोठ्यानें ओरडला. त्या झटापटींत चोराच्या उजव्या बाजूच्या मिशाच काय त्या चोराच्या हातांत आल्या. चोरानें चटकन खिशांतून चाकू काढून डाव्या बाजूच्या मिशा कापून टाकल्या आणि गर्दींत शिरला.

"चोर चोर" म्हणून झालेला ओरडा ऐकून इतर शिपाई धांवून आले. पण दारावरच्या त्या पाहारेकऱ्याच्या हातांत फक्त मिशाच होत्या.

"अरे अरे अरे! पुन्हां चोराला निसटून जाऊं दिलेंस तूं?" सुलतान हताश होऊन म्हणाला.

"पण तो जाणार कोठें? आंत पक्वान्नां-वर हात मारीत असेल. त्याला इकडूनच बाहेर निघावें लागणार. तेव्हां त्याला पकडूं." असें सांगून वजीर सैनिकांना म्हणाला—"तुम्ही मेजवानीला आलेल्या सर्व लोकांना नीट लक्षपूर्वक पाहून या. उजव्या मिशा नसणारा कोणी दिसला तर त्याला पकडून घेऊन या.

थोड्या वेळानें शिपाई दहाजणांना पकडून घेऊन आले. त्यांपैकीं एकाला देखील उजव्या बाजूची मिशी नव्हती. चोरानें गर्दींत फिरतांना आठ दहा जणांच्या मिशा कापून टाकल्या होत्या. आपली उजव्या बाजूची मिशी छान कापून घेऊन तो इतरांबरोबर मेजवानीला बसला होता.

दुसऱ्या दिवशीं सुलतानानें वजिराला बोलविलें. आणि म्हणाला—"वजीर साहेब! आतां वय झालें तुमचें. आतां तुम्ही आराम करा. आपल्या जागीं दुसरा वजीर नेमण्या-साठीं दवंडी पिटून जाहीर करा कीं ज्या चोराला हजार युक्त्या करून मी व वजीर आजपर्यंत पकडूं शकलों नाहीं, तो स्वतः जर हजर झाला तर मी त्याला आपला जांवई करून घेऊन आपला वारस म्हणून त्याला राज्य देईन."

दवंडी ऐकून चोर आला. राजानें त्याला आपला जांवई करून घेऊन आपलें राज्य दिलें.






विकद्रानें जें कांहीं सांगितलें तें कृष्णानें सर्व ऐकून घेतलें व म्हणाला—"आतां याला तोड एकच दिसते आहे. मी व बलरामदादा दोघे जरासंधादेखत दक्षिणेकडे निघून जातों. म्हणजे तो मथुरेला घातलेला वेढा काढून घेईल आणि आमचा पाठलाग करीत दक्षिणेकडे येईल. आम्ही विन्ध्य पर्वतावरील एक किल्ला सर करून त्यांत बसून जरासंधाला पुरें करून सोडूं. अशा-तऱ्हेनें यादवकुळाची कीर्ति जगजाहीर होईल व प्रतिष्ठा पण वाढेल.

सर्वांना तें बरोबर वाटलें. कृष्ण व बलराम कांहीं शस्त्रास्त्रें घेतल्याशिवाय मथुरेहून निघाले व सरळ जरासंधाला जाऊन म्हणाले—"तूं इतकें मोठें सैन्य व या सर्व राजांना घेऊन इकडे येण्याचें कारण? आम्ही देखील पाहिजे तर तुला मदत करूं."

जरासंध कृष्ण व बलराम येत आहेत हें कळतांच कवच घालून व धनुष्य बाण घेऊन सज्ज झाला. तो कृष्ण बलरामांना म्हणाला—"तुम्ही फार बलवान व पराक्रमी आहांत असें मी ऐकतों. तुमच्याशीं युद्ध करून तुम्हांला जिंकण्याच्या हेतूनें मी इकडे आलों आहें. म्हणून तुम्ही युद्ध करण्यास तयार होऊन या."

१३. जरासंध पराजय



त्याचें तें उत्तर ऐकून कृष्ण बलराम कांहीं उत्तर दिल्याशिवाय तेथून दक्षिण दिशेला निघाले. अनेक पर्वत, नद्या व देश पहात ते विन्ध्य पर्वताच्या वनप्रदेशांत येऊन पोंचले. सह्याद्री पर्वतावर असलेल्या एका वडाच्या झाडाखालीं त्यांनीं परशुरामाला ध्यानमग्न बसलेला पाहिलें. तेथें परशुराम शंकराचें ध्यान करून तपश्चर्या करीत बसला होता. एका बाजूला गाय आपल्या वासरा-बरोबर बांधलेली होती. परशुरामाच्या एका बाजूला कमंडलु वगैरे होतें तर दुसऱ्या बाजूला धनुष्य बाण, तलवार व परशु होता. परशुरामाच्या मुखावर ब्रह्मतेज व क्षात्रतेज झळकत होतें. कृष्णबलरामांनीं परशु-रामाच्या पायांवर मस्तक ठेवून नमस्कार केला व त्याचें स्तोत्र म्हटलें.

नंतर कृष्ण येण्याचें कारण सांगून म्हणाला–"महात्मन् ! आम्ही यमुने-कांठच्या मथुरा नगरीचे रहिवासी आहों. यादवकुलावतंस वसुदेव हे आमचे वडील. माझें नांव कृष्ण व माझ्या मोठ्या भावाचें नांव बलराम. कंसाच्या भीतीनें आमच्या वडिलांनीं आम्हांला जन्मतांच गोकुळांत पोंचतें केलें. तेथेंच आम्ही लहानाचे मोठे झालों. नंतर आम्ही मथुरेला आलों. आम्ही कंसाचा वध केला व त्याचें राज्य त्याचे वडील महाराज उग्रसेन यांस दिलें. कंसाचा वध केल्यामुळें त्याचा सासरा जरासंध याला आमचा राग आला व तो एक मोठें सैन्य घेऊन मथुरेवर चालून आला. आम्ही निःशस्त्र होतों म्हणून त्याच्या बरोबर युद्ध करणें आम्हांस शक्य नव्हतें. तरी त्याच्या समोरच आम्ही पाय काढला व येथवर पळून आलों आहों. आतां आपला सल्ला असेल तसें करावयास आम्ही तयार आहों."



परशुराम सर्व वृत्त ऐकून म्हणाला—"त्यानें तुम्हां दोघांना दक्षिणेकडे येत असतांना पाहिलें आहे, तेव्हां तो तुमचा पाठलाग करीत आल्याशिवाय राहणार नाहीं. जरासंधाला जिकावयाचें असेल तर एकच उपाय आहे. एकच एक किल्ला स्वरक्षणार्थ तुम्हांला उपयोगी पडेल. मी तो किल्ला स्वतः तुम्हांला दाखवितों."

परशुरामाबरोबर कृष्ण बलराम् निघाले व गोमंत नामक पर्वताजवळ पोंचले. "या पर्वताला एकच एक गगनभेदी शिखर आहे. तेथून सूर्य चंद्रांच्या उदयास्ताचीं स्थानें अगदीं जवळ वाटतात आणि समुद्रांतली अनेक बेटें पण दिसतात." परशुरामानें गोमंत पर्वताच्या शिखराचें असें वर्णन केलें व पुढें म्हणाला—

"या शिखरावर चढून तुम्हांला स्वतःचें रक्षण व जरासंधाचा पराभव करतां येईल. जरासंधाला व त्याच्याबरोबर येणाऱ्या राजांना निराश होऊन परत जावें लागेल."

तिघे त्या शिखरावर चढूं लागले.

"तुझ्या शत्रूंचा जयघोष ऐकूं येत आहे. त्यावरून ते जवळ पोंचले आहेत. तुम्ही सावधपणें त्यांच्याशीं युद्ध करा." असें सांगून परशुरामानें दोघांचा निरोप घेतला. कृष्ण बलरामांनीं कृतज्ञतापूर्वक परशुरामाला नमस्कार केला.

कृष्ण बलराम गोमंत पर्वतावरचीं दृश्यें व गुहा पहात वर चढत होते. त्यांना भिण्याचें कारणच नव्हतें. तेवढ्यांत जरासंधाच्या सैन्याचा कोलाहल ऐकूं आला. जरासंधानें त्या पर्वताभोंवती वेढा घालण्याचा हुकूम देतांच सैन्यानें वेढा दिला. जरासंधाबरोबर शिशुपाल, रुक्मी, चेकितान, वाल्हिक, द्रुपद, विराट, उत्तमौज, जयद्रथ वगैरे राजे होते.



जरासंधानें सर्व राजांची एक मोठी सभा भरविली आणि म्हणाला—"दोघे यादव-कुमार या पर्वतावर चढले आहेत असें वाटतें. म्हणून पर्वतावर चढावयाचें आहे. वाटेंत येणारे अडथळ दूर करीत चला चढूं या पर्वतावर. वर कोणी दिसेल त्याच्यावर शरवृष्टि करा. जरूर पडल्यास या पर्वताचाच धुव्वा उडवूं या आणि ज्या कामासाठीं आपण येथवर आलों आहों तें पुरें करून परत फिरूं या."

शिशुपाल म्हणाला—"या पर्वतावर प्रत्यक्ष देवादिकांना देखील चढणें अशक्य आहे. नेहमीं रथांत बसून युद्ध करणाऱ्या राजांना पायीं पर्वतावर चढून जाणें शक्य होईल का? आपण संख्याबलानें जास्त आहों एवढ्यावरच लगेच हल्ला चढविणें शहाणपणाचें होणार नाहीं. बलराम व कृष्ण यांना सामान्य पोरें समजून चालावयाचें नाहीं. या शिवाय ते वर किल्ल्यांत बसून युद्ध करणार. त्यांचें नुकसान आपल्याला करतां येणार नाहीं. ते मात्र आपलें फार मोठें नुकसान करूं शकतील. म्हणून आपण किल्ल्याला वेढा देऊन या पर्वतालाच आग लावली तर दोघे आगींत सांपडून ठार होतील."



शिशुपालाची ती सूचना जरासंधाला पटली.

जरासंधाच्या आज्ञेनें सैन्यानें झाडें पाडून चारी बाजूला आग लावली. आगीचे लोट आकाशाला जाऊन भिडले व धुरानें सर्व आकाश भरून गेलें.

तें सर्व पाहून बलराम कृष्णाला म्हणाला—"कृष्णा! पाहिलेंस का, आपल्यामुळें या पर्वताची कशी दुर्दशा होत आहे ती?



हें सर्व उघड्या डोळ्यांनीं पहात राहून आपण कांहीं केलें नाहीं तर आपली अपकीर्ति होईल. मी या जरासंधाचा आतां वध करतों. त्याला इतका गर्व ? इतकें मोठें सैन्य घेऊन तो आला आहे. मी ही पृथ्वी निःक्षत्रिय करून टाकतों." असें सांगून बलराम पर्वतावरून खालीं उडी मारून आला. कृष्णानें पण त्याच्या पाठोपाठ उडी मारली. त्यांचा तो भयंकर प्रताप पाहूनच जरासंधाच्या सैन्याची गाळण उडून गेली व सैन्य पळूं लागलें.

त्या दोघांच्या पायांच्या धक्क्यानें पर्वत थोडा दबला आणि पाताळगंगा वर आली. तिच्या पाण्यानें आग विझली.

त्या दोघांचा पराक्रम पाहून देवांनी आकाशांतून पुष्पवृष्टि केली आणि त्यांनी शस्त्रास्त्रें पुरविलीं.

तेव्हां कृष्ण विष्णूसारखा व बलराम सहस्र फण असलेल्या शेषनागासारखा दिसला. त्यांनीं सैन्यावर प्रहार करायला सुरू केल्यावर जरासंधाच्या मदतीला आलेले शिशुपाल आदिक राजे पळूं लागले. त्यांना मागें फिरायला आव्हान करून जरासंध म्हणाला—"थोरामोठ्यांचें असें म्हणणें आहे कीं युद्धभूमीवरून पराङ्मुख होऊन जे पळून जातात त्यांना हत्येचें पाप लागतें. तुम्ही सर्व स्वतःला वीर म्हणवितां आणि गवळ्यांच्या पोरांना भिऊन भित्रीभागूबाईसारखे पळतां काय ? मी असेपर्यंत तुम्हांला भिण्याचें कारणच काय ? मी या यादवांना आपल्या बाणानें ठार करतों."

तें ऐकून पळून जाणारे राजे परत फिरले. त्यांनीं कृष्ण बलरामांना चारी बाजूंनीं घेरलें आणि सर्वांनीं मिळून एकाच वेळीं शस्त्रप्रहार केला. पण कृष्ण बलरामांचा धीर खचला नाहीं, उलट त्यांना त्वेष चढला व त्यांनीं स्वरक्षणासाठीं देवांकडून मिळालेल्या शस्त्रास्त्रांचा मारा सुरू केला. त्यामुळें सहस्रावधि वीर धरातीर्थी पडले व राजांचा धीर सुटूं लागला. त्यांनीं पाय मागें घ्यायला सुरवात केली. तेव्हां कृष्ण त्यांना म्हणाला—"वीर हो ! तुम्ही सर्व रथांत बसून किंवा कोणत्या तरी सवारीवर बसून युद्ध करीत आहां. स्वतःला वीर म्हणतां. रणांगणावर असें पाठ दाखवून पळून जाणें शोभत नाहीं तुम्हांला. तुमच्या भरंवशावर तो पहा भित्रा जरासंध दूर उभा राहून तुमचें शौर्य पहात आहे. त्याच्यासाठीं तुम्ही आपला जीव व्यर्थ कां खर्ची घालतां ? मी त्याला ठार करून तुम्हांला त्याच्या दास्यांतून मुक्त करतों."

तें ऐकून जरासंध चिडल्यासारखा कृष्णा-वर धांवून येऊन म्हणाला—"मी येथें जिवंत उभा असतां तूं या शूर राजांचा असा अपमान करतोस काय ? गवळ्याच्या पोरा ! आज मी तुझा दिमाख उतरवतों पहा. क्षणार्धांत तुला यमाच्या घरीं पाठवितों."



"तुझ्या या वल्गना कुचकामाच्या आहेत. मी समोर उभा आहें. दाखव ना आपला पराक्रम !" असें म्हणत कृष्णानें पांच बाण जरासंधाच्या सारथ्याला व आठ बाण स्वतः जरासंधाला मारले. बलरामानें जरासंधाचें धनुष्यच तोडून टाकलें. जरा-संधाचे सेनापति कौशिक व चित्रसेन त्याच्या मदतीला धांवले. घोर युद्ध झालें व त्या युद्धांत कृष्ण, बलराम व जरासंध अनुक्रमें बेशुद्ध होऊन पडले. ते शुद्धीवर आल्यावर पुन्हां युद्ध करूं लागले त्यावेळीं मात्र जरासंध टिकाव धरूं शकला नाहीं.





तो व त्याचें सैन्य पळून गेलें. कृष्णानें विजयोल्लासानें आपला पांचजन्य शंख वाजविला.

कृष्ण बलरामांनीं त्यानंतर कांहीं काळ गोमंत पर्वतावरच विश्राम करण्याचें ठरविलें. त्या सुमारास एक मनोरंजक व विचित्र अशी गोष्ट घडली.

जरासंधाबरोबरचे सर्व राजे पळून गेले. परंतु शिशुपालाचा बाप, म्हणजे चेदी देशाचा राजा दमघोष, ससैन्य गोमंत पर्वतावर परत आला. तो कृष्णाला म्हणाला—"मी तुझ्या आतेचा पति आहें. तुझ्याशीं युद्ध करूं नये असें मी जरासंधाला किती सांगितलें. पण त्यानें माझें ऐकलें नाहीं. आज मी त्या दुष्टाचा तुझ्या हातून झालेला पराभव पाहून तुझ्या बाजूला आलों आहें. त्या दुष्टाचा पराभव झाला असें मात्र तूं समजूं नकोस. पुन्हां संधी मिळाल्यावर तो युद्धाला येईल. या प्रेतांच्या ढिगाऱ्यावर राहण्यांत काय अर्थ आहे. जवळच करवीर-पूर येथें वासुदेव नांवाचा राजा राज्य करतो. तुझ्याशीं वैर करून तो तुझ्या शत्रूशीं संगनमत करीत आहे. त्याची खोड मोडली पाहिजे."

कृष्ण दमघोषला म्हणाला—"बंधु म्हणावें तर तुमच्या सारख्यांनाच. तुमच्या मदती-बद्दल आम्ही फार आभारी आहों. तुम्ही आजचें युद्ध पाहिलेंच आहे. अशीं युद्धें कितीहि असली तरी आम्ही त्याला भिणार नाहीं."

त्याच दिवशीं कृष्ण बलराम रथांत बसून दमघोष याच्या सैन्याबरोबर निघाले. वाटेंत दोन जागीं त्यांनीं पडाव टाकला. तिसऱ्या दिवशीं ते करवीरला पोंचले.





# अरण्यपुराण

[ १६ ]

मौवली लांडगिणीकडे लहानाचा मोठा होत होता व अस्वल त्याला रानटी पशुजीवनाचें शिक्षण देत होतें, तेव्हां त्याची आणखी एकाशीं मैत्री जमली. तो मित्र म्हणजे काग नांवाचा सांप.

मौवली मनुष्यजातींत जन्मला असल्या-कारणानें त्याला पुष्कळ गोष्टी शिकणें आवश्यक होतें. पोहणें व झाडावर चढणें त्यानें पूर्वीच शिकून घेतलें होतें. झाडाची अमुक फांदी चिवट आहे कीं नाहीं, पोळ्यां-तला मध कसा अलगद काढून घ्यायचा हें आणि झाडाला लोंबकळणाऱ्या वटवाघळांची झोंप मोडली तर काय करायचें, पाण्यांत उडी मारण्यापूर्वीं पाण्यांतल्या सापांना कसें सावध करावयाचें. हें सर्व त्यानें उत्तम प्रकारें शिकून घेतलें होतें. अस्वलानें हें सर्व शिक्षण फार कडक शिस्तींत दिलें होतें. मधून मधून काळा वाघ येऊन अस्वलाला म्हणे—"कां त्या पोराला इतका त्रास देतोस?"

"तुला माहीत नाहीं, हा मनुष्य जातींत जन्मला आहे ना? लांडग्याचें पिल्लू असतें तर गोष्ट निराळी होती. आवश्यक सर्व शिक्षण यानें घेतलेंच पाहिजे." अस्वल उत्तर देई.

कधीं कधीं मौवली दुर्लक्ष करी तेव्हां अस्वल त्याच्या डोक्यावर टपली मारी. मौवली चटदिशी झाडावर जाऊन बसे व बराच वेळ खालीं येत नसे. तरी अस्वलानें शिक्षण देण्याचें सोडलें नाहीं रानांतल्या सर्व



भाषा अस्वलाच्या मदतीनें मौवलीनें शिकून घेतल्या. पण सापांची भाषा अस्वलाला येत नव्हती. म्हणून अस्वलानें मौवलीला ह्वीकरवीं ती भाषा शिकवून दिली. अशा प्रकारें मौवलीला रानांत कसलेंच भय उरलें नाहीं. "फक्त त्याच्या स्वतःच्या जातीच्या भयाशिवाय दुसरें भय उरलें नाहीं." काळा वाघ मनांतल्या मनांत म्हणाला.

एकदां मौवलीच्या हातून एक भयंकर चूक घडली. त्या अपराधाबद्दल अस्वल व काळा वाघ दोघांना मनस्वी राग आला. त्यानें माकडांशीं मित्रता केली होती. केवढा अपराध! त्याचें असें झालें, कीं एकदां मौवली अस्वलाचा तडाखा पडतांच झाडावर जाऊन बसला. त्यावेळीं माकडें त्याच्याजवळ आलीं. त्यांनीं सहानुभूति व्यक्त करून त्याला खायला फळें आणून दिलीं आणि झाडाच्या टोंकाला बोलावून घेऊन जाऊन म्हणालीं—"तुला शेपटी नसली म्हणून काय झालें, तूं आहेस आमचाच भाईबंद. केव्हां ना केव्हां तरी तूं आमचा नायक होण्यालायक खास आहेस."

मौवली माकडांशीं मैत्री करून आल्याचें कळतांच अस्वल रागावून म्हणालें—"तूं माकडांशीं गप्पा मारायला गेला होतास नाहीं का? लाज नाहीं वाटली तुला? त्यांच्याकडे नियम कायदा कांहीं आहे का? मिळेल तें खायला तयार."

मौवली घाबरला. त्यानें काळ्या वाघाकडे पाहिलें. "माकडें खोटें बोलतात. तीं नेहमींच खोटें बोलतात." काळा वाघ मौवलीला म्हणाला.

"पण तीं इतक्या प्रेमानें बोललीं माझ्याजवळ व मला पुन्हां मेजवानीला त्यांनीं बोलाविलें आहे. त्यांना देखील माझ्यासारखेंच दोन पायांवर उभें राहतां येतें.



दिवसभर खेळत व गमत करीत असतात. मी पुन्हां त्यांच्याबरोबर जाऊन खेळणार आहे. सोडा मला." मौवली म्हणाला.

"मनुष्याच्या पिल्ला, मूर्खा! मी तुला रानांतले सर्व नियम व भाषा शिकवून दिल्या. सर्व जनावरांचीं नांवें व ओळख करून दिली. नाहीं करून दिली ती फक्त माकडाची. कारण, माकडांच्या जातींत कांहीं नियमच नाहीं. ते दुसऱ्यांची भाषा चोरून बोलतात. त्यांना नायक पण नसतो. त्यांची रीत निराळी, आमची रीत निराळी. त्यांना जात गोत आठवत नाहीं. पण गर्व मात्र फार दांडगा. म्हणे त्यांची जात मोठी. इतक्यांत एखादें फळ पडलें कीं तीं सर्व विसरून धांवतात सगळीं तिकडे आणि भांडूं लागतात. आम्हां रानटी जातीच्या जनावरांचा त्यांच्याशीं कांहीं एक संबंध नाहीं. तीं पाणी पितात तेथें आम्ही नाहीं पीत. तीं शिकार करतात तेथें आम्ही नाहीं शिकार करीत. एवढेंच काय तीं मरतात तेथें आम्ही मरत पण नाहीं. त्यांच्या जातींत स्वच्छता नाहीं कीं लाज लज्जा नाहीं. रानटी जनावरांचें लक्ष आपल्याकडे वळवून घेण्यासाठीं नाना प्रकारच्या



कुचेष्टा तीं करीत असतात. पण आम्ही त्यांच्याकडे ढुंकून सुद्धां पहात नाहीं. माकडांची संगत निषिद्ध आहे" अस्वलानें सांगितलें.

"अस्वल जें म्हणतें आहे तें सर्व खरें आहे, मौवली! पण अस्वला, या पोराला तूं हें सर्व माकडाची गांठ पडण्यापूर्वीच नको होतें का शिकवून ठेवायला?" काळा वाघ म्हणाला.

"मला काय ठाऊक कीं हा मूर्ख त्या नीच जातीशीं संगत करील म्हणून?" अस्वल म्हणालें.






मौवलीनें आपली चूक कबूल केली व वचन दिलें कीं पुन्हां कधीं तो तसें करणार नाहीं. परंतु माकडांनीं त्याला सोडलें नाहीं.

वर घडलेल्या संभाषणानंतर उन्हाच्या वेळीं मौवली अस्वल व काळा वाघ यांच्या मध्यभागीं झोंपला. त्याची झोंप मोडली तेव्हां तो झाडाच्या फांदीवर होता. पुष्कळ माकडांनीं त्याला घट्ट धरून ठेवलें होतें.

अस्वलाची झोंप मोडली तेव्हां त्यानें इतक्या मोठ्यानें एक किंकाळी फोडली कीं सारें जंगल हादरलें. काळा वाघ दांत काढून रागारागानें झाडावर चढूं लागला. माकडें जणुंकांहीं जयघोष करीत वरवर चढूं लागलीं. कारण वाघाला इतक्या वर चढून येणें शक्य नाहीं, हें त्यांना चांगलें माहीत होतें. काळ्या वाघानें आपल्याला पाहिलें आहे, पाहिलें आहे." अशीं माकडें मोठमोठ्यानें ओरडूं लागलीं. नंतर तीं मौवलीला धरून झाडाच्या टोंकाला जास्त वर वर चढूं लागलीं.

माकडांना झाडांवर वरच्या वर पळून जायला वाटा असतात. त्यांना खालीं यायला पण वाटा असतात. वाटेल तिकडे जायला त्यांना सर्व वाटा मोकळ्या. त्या वाटांचा उपयोग फक्त माकडांनाच होऊं शकतो. त्या वाटेनें तीं पळून जाऊन आपलें रक्षण करतात. पण आतां तीं मौवलीला धरून घेऊन चालली होतीं. म्हणून त्यांची पळण्याची गति अर्धी देखील नव्हती. तरी देखील अस्वल व काळा वाघ त्यांचा पाठलाग करून त्यांना धरूं शकले नाहींत.

[पुढील गोष्ट पुढील अंकीं.]



# ७०. दक्षिणी ध्रुवाचीं शिखरें

दक्षिणी ध्रुव प्रदेशांत कित्येक उंच पर्वत आहेत. त्यांत सर्वांत उंच (१६,८६० फुट) विन्सन हें शिखर आहे. अमेरिकावासी या शिखरावर सहजी चढून गेले. परंतु याहून ५७० फुट कमी उंच असेलेलें टीरी नांवाचें शिखर मात्र (चित्रांत दिलेलें) चढून जाणें त्यांना दुरापास्त झालें. एका आठवड्याच्या सतत प्रयत्नानंतर ६ जानेवारी १९६७ या दिवशीं ते या शिखरावर पोंचले.



लष्करी दृष्ट्या बंगाल प्रांतावर इंग्रजांचा अधिकार झाला. परंतु राजकीय दृष्ट्या तेथें कांहीं बदल झाला नाहीं. सिराजउद्दौलाच्या जागीं मीरजाफरला बंगालचा नवाब करण्यांत आलें. त्याच्या दरबारांत एक इंग्रज रेसिडेण्ट म्हणून नेमण्याचें अवश्य ठरलें होतें आणि मीरजाफरची शासन सूत्रें क्लाइव्हच्या हातीं आली होतीं.

१७५८ च्या जून महिन्यांत कलकत्ता कौन्सिलनें क्लाइव्हला गव्हर्नर म्हणून नेमलें. ही नेमणूक एका वर्षानंतर कंपनीनें मान्य केली. परंतु क्लाइव्हचें आसन अस्थिरच होतें. तिकडे नवाब मिरजाफरला क्लाइव्हच्या हातांत स्वतःची वेसण देऊन चूक केल्याबद्दल वाईट वाटूं लागलें. परंतु इंग्रजांच्या सैन्याच्या मदतीशिवाय त्याला कांहीं करतां येणें पण शक्य नव्हतें. ही गोष्ट १७५९ मध्यें प्रत्ययास आली. अलिगौहर शाह आलम द्वितीय यानें बंगाल व बिहार प्रांतांवर स्वारी करून पाटणा नगराला वेढा दिला. क्लाइव्हच्या मदतीनें मीरजाफर त्या संकटांतून स्वतःला सोडवूं शकला.

परंतु मीरजाफरला इंग्रजांवर अवलंबून राहण्याची इच्छा नव्हती. म्हणून त्यानें चिन्सुरा येथील डच वसाहतवाल्यांशीं बोलणीं सुरू केलीं. बंगालमधील इंग्रजांचें वर्चस्व कमी करून त्यांची जागा पटकावण्याच्या हेतूनें डच लोकांनीं जावाहून सैन्य मागविलें. परंतु क्लाइव्हनें त्यांचा एकही बेत पार पडूं दिला नाहीं. १७५७ च्या नोव्हेंबर महिन्यांत बेदारानजीक त्यानें डच लोकांचा पराभव केला आणि त्यांना संधी करून घ्यायला भाग पाडलें.





# पवित्र तीर्थ

पूर्वी कधीं धरणीपुर राज्याच्या गादीवर दिवाकर नांवाचा राजा राज्य करीत असे. त्याचें एकदां शत्रूशीं युद्ध झालें. तो विजय मिळवून धरणीपूरला परत येत असतां राज्याच्या वेशीवरच्या वाळवंटाच्या प्रदेशांत त्याला तहान लागली. सैनिक पाण्याच्या शोधार्थ निघाले. त्यांना एका जागीं एक खड्डा दिसला. त्याच्या तळाला तीन बोटें बुडतील एवढें पाणी होतें. त्यांनीं तें पाणी पिऊन पाहिलें तेव्हां त्यांना तें नारळाच्या पाण्यासारखें गोड लागलें. सैनिकांना फार आनंद झाला. एक तांब्या भरून पाणी घेऊन ते राजाकडे गेले. राजानें पाणी पिऊन पाहिलें व म्हणाला—"या वाळवटांत इतकें गोड पाणी आहे, हें पूर्वी कधीं आम्ही ऐकलें नाहीं." असें सांगून तो स्वतः त्या खड्ड्याजवळ गेला. त्यानें व बरोबर गेलेल्या सरदारांनीं व नोकरांनीं त्यांतलें पाणी पोटभर पिऊन घेतलें. तरी खड्ड्यांतलें पाणी कमी झालें नाहीं.

त्या दिवशीं राजानें त्याच जागीं पडाव टाकायचें ठरविलें. त्याच वेळीं तेथें एक संन्यासी आला. तो खड्ड्यांत उतरला, खड्ड्यांतलें पाणी डोक्यावर प्रोक्षण करून व आचमन करून तो राजाच्या दर्शनाला गेला. राजाला आशीर्वाद देऊन तो म्हणाला—"हें पवित्र तीर्थ आहे. हें पिण्याचें भाग्य तुला इतक्या वर्षांनीं मिळालें."

संन्याशानें त्या पवित्र तीर्थाचें महात्म्य वर्णन केलें तें असें.

"एका काळीं येथें हा खड्डा पण नव्हता. उन्हाळ्यांत एकदां पाऊस पडला. दुसऱ्या



दिवशीं एका चिमणीला खूप तहान लागली. ती येथें येऊन पडली. तहानेनें तडफडत तिनें या जागीं चोंच मारली. तिच्या अंगाला ओलावा भासला. तिच्या जिवांत जीव आला. तिच्या अंगांत शक्तीचा संचार झाला व ती येथून उडून निघून गेली. तेव्हां तेथें एक लहानसा खड्डा झाला. त्या खड्ड्यांत थोडें पावसाचें पाणी सांचलें. एक तहानेलें गिधाड तेथें आलें. त्यानें पाणी पिऊन खड्डा थोडा मोठा केला. नंतर त्या प्रदेशांतले कोल्हे, लांडगे इत्यादि प्राणी पाणी प्यायला तेथें आले. पाण्यासाठीं खड्डा मोठा करून व पाणी पिऊन ते निघून गेले. हळूहळू रानटी डुकरें हा खड्डा खोल व मोठा करूं लागलीं. नंतर हा खड्डा इतका मोठा झाला कीं त्यांत हत्ती देखील येऊन आपली तहान भागवूं लागले. पावसाळ्यांत या खड्ड्यांत पाणी सांचतें. किती कडक ऊन पडलें तरी याच्या तळाला पाणी राहातें आणि या वाळवंटांतल्या प्राण्यांची त्यावर तहान भागते. साऱ्या वाळवंटांत हीच एक पाणी मिळायला जागा आहे. याचें पाणी गोड व पवित्र आहे."

तें ऐकून संन्यासी निघून गेल्यावर राजा आश्चर्यानें विचार करूं लागला. इतके लोक व प्राणी येऊन येथलें पाणी पितात पण पाणी कां कमी होत नाहीं? याचें कारण वाळूंत दूरवर हें पाणी पसरलें असावें. येथें जर एक मोठा तलाव बांधून दिला तर वाळवंटांत फिरणाऱ्या लोकांना पिण्याच्या पाण्याची सोय होईल. त्यामुळें माझी कीर्ति पण अमर होईल.

असा विचार करून राजानें त्या जागीं एक मोठा तलाव खणविला. त्याच्या काठावर पायऱ्या बांधून शेजारीं एक मोठी धर्मशाळा पण बांधली. धर्मशाळेंत येऊन



राहणारांना रानटी श्वापदांचा त्रास होऊं नये यासाठीं त्यानें धर्मशाळेच्या चारीबाजूला उंच भिंत बांधली. रात्रंदिवस पाहारा देण्यासाठीं त्यानें पाहारेकरी नेमले आणि त्या तलावाचें नांव दिवाकर सरोवर असें ठेवलें.

सर्व बांधकाम संपल्यावर समारंभानें पूजा प्रार्थना वगैरे झाली. नंतर तीर्थ म्हणून तें पाणी घेऊन राजानें तोंडांत घातलें तेव्हां त्याला तें कडवट लागलें. त्याला थोडा वास पण येत होता. राजाला वाटलें कीं तलाव नुकताच बांधून झाला आहे म्हणून वास येत असावा.

राजाला वाटत होतें कीं हा तलाव बांधल्यामुळें त्याची प्रतिष्ठा वाढेल. म्हणून तो मधून मधून चवकशी करी कीं पाण्याचा उपयोग कसा काय होत आहे? तेव्हां त्याला कळलें कीं पाण्याचा उपयोग आंघोळीला व धुण्याला भरपूर होत आहे. कोणी तें पाणी पीत नाहीं. पाहारेकऱ्यांना तेंच पाणी प्यावें लागे. त्यांनाच कष्ट सहन करावे लागत. म्हणून सैनिक कांहीं ना कांहीं तरी सबब सांगून तेथून निघून जाऊं लागले. त्यांच्या जागीं कोणी काम करायला जायला तयार होत नसे.



राजाला वाईट वाटलें. राजानें सैनिकांना सांगितलें कीं तेथें रोज जो एक संन्यासी येतो त्याला माझ्याकडे बोलावून घेऊन या.

"तलाव बांधून झाला तेव्हांपासून तिकडे कोणी संन्यासीच काय दुसरा मनुष्य किंवा चिटपाखरूं देखील आलेलें नाहीं." सैनिक म्हणाले.

राजाला जास्तच आश्चर्य वाटलें. राजा सैनिकांना म्हणाला—"त्या तलावाच्या आसपास कोठेंतरी तो संन्यासी भेटेल. त्याला भेटून मी बोलाविलें आहे म्हणून सांगा."

काहीं दिवसांनीं संन्यासी आला. म्हणाला—"राजा! तूं मला बोलाविलें आहेस, असें तुझे शिपाई सांगत आहेत?"

"आपल्या सारख्या थोर पुरुषांच्या सोयीसाठीं मी हा तलाव बनविला. तेथें सर्व सुखसोयी करून ठेवल्या आहेत. पण आपण त्या बाजूला फिरकत सुद्धां नाहीं. असा राग का?" राजानें विचारलें.

"होय, अलीकडे मी दुसऱ्या जागीं जात आहें. तूं कारण विचारलेंस म्हणून सांगतों. आतां हें पवित्र तीर्थ राहालें नाहीं. मूक प्राण्यांनीं आपल्या शक्तीच्या बळावर देवावर विश्वास ठेवून जो खड्डा खणला तो तूं आपल्या शक्तिसामर्थ्यानें कीर्तिलाभ व्हावा म्हणून इतका मोठा केलास. त्यांत कांहीं गैर नाहीं. परंतु यांत पूर्वी सर्व प्राणी येऊन पाणी पीत. ते मोठी भिंत चारीबाजूला बांधल्यापासून यायचे बंद झाले. तूं वर पाहारेकरी पण नेमलेस. तूं याचें नांव दिवाकर सरोवर ठेवलेंस. म्हणून हें पाणी आतां पवित्र राहलें नाहीं. कलुषित झालें." संन्यासी म्हणाला.

राजाच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. त्यानें सरोवराच्या चारीबाजूला बांधलेली भिंत तोडून टाकविली आणि पाहारेकरी काढून स्वतःच्या नांवाची शिळा पण काढविली.

पुढें कांहीं दिवसांनीं त्या सरोवराचें पाणी पुन्हां गोड झालें व लोक म्हणूं लागले कीं पाणी अमृतासारखें गोड लागतें आहे. वाळवंटाच्या मध्यभागीं तसें गोडपाणी मिळूं लागल्यामुळें वाटसरूंची उत्तम सोय झाली.





# पाताळ कोट

[ १८ ]

[कालशंबर मांत्रिक सरोवरांत बुडी मारून बऱ्याच वेळानें एक सोनेरी रंगाचें पिल्लूं घेऊन बाहेर आला. त्याचवेळीं राक्षसांनीं पाताळकोटांतून फटाके व बार सोडायला सुरवात केली. मांत्रिक आपल्या अनुयायांसह आपल्या गुप्त निवास स्थानीं जाण्यासाठीं निघाला. —पुढें]

महाकली राक्षसाच्या पाताळ कोटाचें क्षेत्रफळ सुमारें एक चौरस मैल असेल. किल्ल्याच्या चारीबाजूला उंच डोंगर असल्या कारणानें डोंगरापलीकडच्या लोकांना आंत किल्ला असेल याची कल्पना येणेंदेखील शक्य नव्हतें.

किल्ल्यांतून जंगलांत बाहेर जायला राक्षसांनीं किल्ल्याच्या पायथ्याजवळ एक भुयाराची वाट तयार करून ठेवली होती. त्या वाटेनें राक्षस व त्यांचे गुलाम जात येत.

फक्त ऐन दुपारच्या वेळीं सूर्याचीं किरणें किल्ल्यावर पडत. सकाळीं किंवा संध्याकाळीं डोंगरापलीकडच्या जंगलांत सूर्यप्रकाश झाडांतून चाळून आल्यासारखा पडत असे. परंतु पाताळ कोटांत त्याला शिरकाव मिळत नसे. तेथें काळोखच असे, इतका कीं



मोठमोठीं ओणकीं जळत ठेवून त्यांच्या उजेडांत राक्षस काम करीत.

राक्षसांचा संहार करण्याची तयारी कालशंवर कित्येक दिवसांपासून करीत होता. आपले प्रयत्न पूर्णपणें यशस्वी होत आहेत हें पाहून त्याला आनंद गगनांत मावेनासें झालें होतें.

पाताळकोटांतून कुंभीर व त्याचे अनुयायी राक्षस फुटून त्याच्याकडे आले होते. शशिकांत व कांतिसेना महाकली राक्षसाच्या तुरुंगांत होते. कांतिसेनेशीं महाकलीनें राक्षसविवाह करून घ्यायचें ठरविलें होतें. म्हणून कुंभीरनें संधी पाहून तिला पर्वताच्या गुप्तगुहेंत सुखरूप पोंचती करण्याचें वचन दिलें होतें. याबद्दल बक्षिस म्हणून कालशंबरनें कुंभीरला पाताळकोटाचें राज्य देण्याचें कबूल केलें होतें.

सरोवरांतून मगरीचें सोनेरी पिल्लू आणलें तेव्हां मांत्रिकानें धूमक व सोमक दोघांजवळ, तो हें करणार आहे व तें करणार आहे अशा अनेक गप्पा मारल्या होत्या. परंतु महाकली राक्षसाचा व त्याच्या पाताळकोटाचा संहार तो कसा करणार आहे हें त्यानें सांगितलें नव्हतें.

परंतु त्याचें तें गुपित काय होतें हें सोमक, धूमक व विरूप तिघांना थोडें थोडें कळलें होतें. ते मांत्रिकाबरोबर येत असतां कित्येक लोक मोठमोठीं टोपलीं भरून डोक्यावर घेऊन येत असलेले त्यांना दिसले. एक दोन ठिकाणीं त्यांनीं तीं टोपलीं मोठ्या झाडावर चढवितांना पण पाहिलीं.

ते गुहेच्या तोंडाशीं पायऱ्यांजवळ येऊन पोंचले तेव्हां त्यांना भद्र दिसला होता. त्यानें कालशंबर मांत्रिकला सांगितलें कीं जवळ जवळ सर्व तयारी झाली आहे. औषधी वनस्पती व भस्में झाडांवर



पोंचती झाली आहेत. सूर्योदय होतांच त्यांचा प्रयोग पाताळ कोटांतील राक्षसांवर करण्यांत येईल.

“ठीक आहे, राक्षसांना तसेंच दारूचें व्यसन असतें. ते दारूच्या गुंगींत असतांना जर त्यांच्यावर औषधांचा प्रयोग झाला तर त्यांना ते आहेत कोठें हें देखील कळणार नाहीं. त्यानंतर दगडांची वृष्टी, शरवृष्टी आणि रानटी क्रूर जनावरें सर्व मिळून त्यांना यमसदनास पाठवितील, यांत मुळींच शंका करण्याचें कारण नाहीं. महाकलीकडे कैद असलेल्या आपल्या साथी मित्रांना सोडवून सूर्योदयाच्या सुमारास सरोवराच्या कांठीं पोंचतें केलें पाहिजे. नाहीं तर इतर राक्षसांबरोबर दारूच्या धुंदींत कुंभीर व आपण ज्यांना सोडविण्यासाठीं इतकी खटपट चालविली आहे, सर्व माझ्या मंत्रशक्तीला बळी पडतील.” कालशंबर म्हणाला.

भद्र तें ऐकून कांहीं वेळ विचार करीत उभा राहला. “महा मांत्रिक! कुंभीरकडे मी निरोप पोंचता करतों कीं त्यानें शशिकांत व कांतिसेना दोघांना सरोवराच्या काठीं आतांच घेऊन यावें.” भद्र म्हणाला.



तें ऐकून मांत्रिक डोळे वटारून पाहून म्हणाला—“तूं आपल्या मित्रांच्या रक्षणाच्या घाईंत माझे सर्व बेतच ढांसळून पाडणार आहेस. तूं ज्याला कुंभीरकडे पाठविणार आहेस त्याला कालकली राक्षसाच्या अनुयायांनीं पाहिलें आणि पकडलें तर आपलें सर्व गुपित त्यांना कळेल. म्हणून कांहीं विशिष्ट गोष्टी मी कोणाला कळूं दिल्या नाहींत. कुंभीरकडे तूं कोणालाहि पाठविण्याची गरज नाहीं.”

भद्रनें होकारार्थी मान हलविली आणि निघून गेला. मांत्रिकानें विरूपकडे वळून



विचारलें—"तुझा गरुड माणसाळला आहे नव्हे का? या सोनेरी मगरीशीं त्याची दोस्ती करून दिली पाहिजे. राक्षसांचा एक अंधविश्वास आहे त्याचा होईल तितका फायदा पदरांत पाडून घेतला पाहिजे."

विरूप आपला गरुड पक्षी मांत्रिकाच्या हातांत देत म्हणाला—"हा गरुड साधी घार किंवा गिधाड नसून कोणी तरी देवपक्षी आहे. याला माणसापेक्षां जास्त कळतें. त्या ओसाड देवळाजवळच्या वन माणसाला मर्मस्थानीं यानें एकच चोंच मारली आणि गार केला."

मांत्रिकानें गरुड पक्ष्याला खालीं जमिनीवर ठेवलें आणि त्याच्याजवळ सोनेरी मगरीला सोडलें. गरुड प्रथम तिला चोंचीनें मारायला पुढें सारसावला पण विरूपानें नको म्हणून खुणावल्यावर "की....की...." करून ओरडला.

"शाबास!" असें म्हणून कालशंबरनें गरुडाच्या पायाला लोंबत असलेलें दोरीचें टोंक धरून तें मगरीच्या कमरेला बांधलें. नंतर त्यानें त्या दोघांना खूप खायला घालायला सांगितलें.

खालीं पाताळकोटांतून हळू हळू ओरडा वाढतच गेला. राक्षस जागोजागीं जाळ करून त्याच्या सभोंवती घोळका करून नाचूं लागले. कांहीं दारूच्या धुंदींत आगींत उडी मारून मोठ्यानें ओरडत बाहेर पळूं लागले. कालशंबर आनंदाच्या भरांत त्यांच्याकडे पाहून म्हणाला—"ही गंमत लेक हो शेवटची समजा. आमचे लोक मंत्रवलेलें भस्म त्यांच्यावर टाकीत आहेत. दिसलें का? कोटाच्या वरच्या बाजूला पांढऱ्या धुरासारखें जें दिसत आहे तेंच तें. त्यांना देहभान राहणार नाहीं. महाकली अजून तिथें आला नाहीं. त्याच्यावर माझ्या



औषधांचा व भस्मांचा कांहीं परिणाम झाला नाहीं व तो वांचला तरी त्याचे सर्व अनुयायी खास ठार होणार. तो एकटा जिवंत राहाला तर मी आपल्या या मंत्रदंडाचा प्रयोग करून त्याला ठार करीन."

मांत्रिकानें याप्रमाणें आपल्या साथी अनुयायांना गप्पांत गुंतवून पाताळ कोटांतील राक्षसांचा ओरडा ऐकत कांहीं वेळ घालविला. इतक्यांत पूर्वेकडे दिशा फाकूं लागल्या. कालशंबर ज्या जागीं बसला होता ती जागा सूर्यप्रकाशांत स्वच्छ दिसूं लागली. म्हणून खालच्या राक्षसांना दिसणार नाहीं अशा बेतानें तो व त्याचे साथी झाडींत जाऊन बसले. त्यांची वटवट चालू होती—"दारूच्या धुंदींतच राक्षस आगींत उड्या टाकीत आहेत, असें नका समजूं. मंत्रवलेल्या भस्माचाच तो मुख्य परिणाम आहे. थोड्या वेळानें सर्वांना पूर्ण वेड लागेल."

कालशंबर जें कांहीं बोलत होता तें कांहीं त्याचें बरगळणें नव्हतें. जे राक्षस थोड्या वेळा पूर्वीं गाणीं गात नाचत होते, तेच एकाएकीं परस्परांवर बाण सोडूं लागले व गदाप्रहार करूं लागले. त्यांचे दोन गट झाले व त्यांचें परस्परांशीं युद्ध सुरू झालें.



ज्याच्या जें हातीं लागे तेंच घेऊन तो दुसऱ्यावर वार करूं लागला.

पाताळ कोटासमोरच्या मैदानाला रणांगणाचें रूप आलें. मांत्रिक आनंदातिरिकानें ओरडला—"शांभवी!" आणि मंत्रदंड आदरपूर्वक डोळ्यांजवळ आणून त्याला नमस्कार करूं लागला. तेवढ्यांत हत्तींच्या रथांत बसून कालकली राक्षस मारामारी करणाऱ्या राक्षसांच्या मधोमध येऊन उभा राहिला. त्याच्याबरोबर पंचवीस तीस बलवान राक्षस गदा घेऊन आले होते. इतर राक्षसांहून ते मोठे होते. महाकलीचे



तेच अंगरक्षक होतें. कालकली इतक्या मोठ्यानें गरजला कीं सर्व गिरिकंदरांत तो आवाज दुमदुमला. नंतर तो गेंड्याच्या कांतड्याच्या चाबकानें त्या बंडखोर राक्षसांना बडवूं लागला. त्याचे अंगरक्षक दंगेखोर राक्षसांना रेटीत बाजूला सारूं लागले. कोणी ऐकलें नाहीं तर गदाप्रहार करून त्याला कपाळमोक्ष देण्यांत येई.

“मार बसला तर भूताला देखील धसका बसतो. तेंच दिसतें आहे समोर. आमच्या औषधांचा व भस्मांचा परिणाम कांहीं वेळानें कमी होण्याची शक्यता आहे.” असें म्हणत कालशंबर बाजूला वळून विचारूं लागला— “भद्र कोठें आहे? शशिकांत व कांतिसेनेला सोडवून घेऊन जायला कुंभीरला हीच संधी आहे, म्हणावें.”

मांत्रिकाच्या बोलण्यांत पूर्वीइतका आत्मविश्वास झळकत नव्हता या वेळीं. धूमकच्या लक्षांत ही गोष्ट आल्याशिवाय राहाली नाहीं. तो कचरलेला दिसत होता. त्याचे सर्व बेत ढांसळून जाणार कीं काय असें त्याला वाटत असावें.

पाताळकोटांत महाकली व त्याचे अंगरक्षक राक्षसांना ल्हान ल्हान रांगेंत उभे करून त्यांना कांहीं तरी सांगत होते. मांत्रिकाकडून त्यांच्यावर येणाऱ्या संकटाची आगाऊ सूचना कुंभीरच्या अनुयायांपैकीं कोणी कालकलीला तर दिली नसेल.

धूमक या विचारांत गर्क असतां भद्र आपल्या दोघां अनुयायांबरोबर धांवत धांवत धापा टाकीत आला. “महामांत्रिक! कुंभीर, किल्ल्यांत मारामारी व दंगा कानावर येतांच आपल्या अनुयायांना बरोबर घेऊन सरोवराकडे पळत निघाला आहे. अगदीं ऐन वेळीं माया सिंगी, आपण करीत असलेल्या मदतीसंबंधीं कांहीं बडबड करूं

लागली असावी. म्हणून तिचें तोंड बंद करून तिला खांद्यावर उचलून घेऊन येत आहे. ही बातमी झाडावर बसलेल्या आपल्या अनुयायांच्या तोंडी मिळाली आहे."

"जय शांभवी! जय आपला होणार. आणखी फक्त दहा मिनिटें आपण राक्षसांचें ध्यान तिकडे जाऊं दिलें नाहीं तर ते ठार झालेच समज. विरूप! तूं आपल्या काळ्या गरुडाला राक्षसांवर सोड. त्याच्या पायाच्या दोरीला तें सोनेरी मगरीचें पिलूं बांधलेलें आहे ना?" मांत्रिकानें विचारलें.

विरूपानें आपल्या गरुडाच्या डोक्यावर व मानेवर हळुवारपणानें हात फिरविला. नंतर त्याला दोन्हीं हातांनीं उचलून राक्षसांच्या मैदानाच्या बाजूला सोडलें. तो "की....की...." करीत त्यांच्या डोक्यावर घिरट्या घालूं लागला. त्याच्या पायाला बांधलेलें मगरीचें पिलूं सूर्याच्या प्रकाशांत जास्तच चकाकत होतें. ज्या ज्या राक्षसानें गरुडाला व मगरीच्या पिल्लाला पाहिलें त्यानें हात जोडून त्यांना नमस्कार केला. "महाकलीचे वडील आपल्या शंभराव्या वाढदिवसाच्या समारंभाला हजर राहण्यासाठीं स्वतःच आले आहेत." असें मोठमोठ्यानें ओरडत ते गरुडाला साष्टांग नमस्कार करीत होते.

ते दृश्य पाहून कालशंबरला फार आनंद वाटल्यासारखा दिसत होता. सरोवराजवळीक झाडाच्या बुंधाना बांधलेले वेलाचे दोरखंड पाण्यांतून बाहेर ओढा. त्याच्याबरोबर एक दगड बाहेर येईल. त्या वाटीं आपल्या लोकांना गुहेंतून बाहेर वर यायला सांगा." त्यानें आपल्या अनुयायांना आज्ञा केली.

[पुढील गोष्ट पुढील अंकीं]





# सहिष्णुता

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतलें व नेहमींप्रमाणें कांहीं बोलल्याशिवाय श्मशानाच्या दिशेनें चालूं लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तुझी ही सहनशक्ति पाहून आश्चर्य वाटतें. तुला पाहून मला शिवकाम नांवाच्या एका माणसाची बायको केतकी ही आठवते. तुला मी तिची गोष्ट सांगतों. लक्ष देऊन ऐक." असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

एका डोंगराळ प्रदेशांत एका गांवीं एक शेतकरी तरुण रहात असे. त्याची जमीन डोंगराच्या पायथ्याशीं होती. जवळच त्याच्या गुरांचा गोठा पण होता. कापणी होऊन पीक घरीं पोंचे पर्यंत तो गोठ्यांतच



रात्रीं रहात असे. कारण त्या प्रदेशांत चोरांचा उपद्व्याप जास्त होता.

एके दिवशीं शिवकाम झोपण्यासाठीं खाटेवर अंग टाकणार इतक्यांत त्याला डोंगराच्या बाजूनें कोणी तरी येत असल्याचा भास झाला. बाहेर येऊन त्यानें पाहिलें तेव्हां त्याला कोणी तरी डोंगराच्या बाजूनें पळत असलेला दिसला. शिवकाम एक काठी घेऊन पाठोपाठ निघाला.

एका जागीं वाट वळली तेव्हां त्याला-समोर एक घर दिसलें. घरांतून दिव्याचा अंधुक उजेड दिसत होता. तें घर पाहूनच त्याला आश्चर्य वाटलें. कारण पूर्वीं कधीं त्या जागीं घर नव्हतें.

घरांत कोण आहे हें पाहण्यासाठीं तो जवळ गेला. घर नवीन नव्हतें. आंत चांदीच्या वस्तू व लाकडी सामान पुष्कळ होतें. तो आंत गेला. आंत एक मध्यम वयाचा पुरुष व एक बाई होती आणि एक तरुण मुलगी. तिनें शिवकामला तोंड फिरविल्या शिवायच पाहून घेतलें.

तो तेथें उभाच होता, ती मुलगी त्या दोघांना म्हणाली—"उठा जेवायला."

तो मध्यम वयाचा मनुष्य शिवकामला म्हणाला—"येरे बुवा! तूं पण जेवायला!"

शिवकामला तें सर्व पाहूनच आश्चर्य वाटत होतें. त्याचा पाय पुढें पडत नव्हता.

त्याला मागें पुढें करीत असलेला पाहून तो मनुष्य म्हणाला—"घाबरण्याचें कारण नाहीं. तुझ्यावर आकाश नाहीं कोसळणार. तूं आलास तसाच परत जाशील."

परंतु शिवकाम इतका भ्यालेला होता कीं त्याच्या तोंडांतून शब्दच उमटत नव्हता. त्याचे डोळे त्या मुलीवर खिळून होते. इतक्या सुंदर स्त्रीची कल्पना स्वप्नांत देखील त्यानें केली नसती. ती त्याच्याकडे चोरट्या



नजरेनें मधून मधून पाहात आहे हें देखील त्याच्या लक्षांत आल्याशिवाय राहालें नाहीं.

इतक्यांत त्याला घेरी आल्यासारखें वाटलें. त्यानें डोळे मिटले व पुन्हां उघडून पाहिलें तेव्हां दृश्य अगदीं निराळेंच होतें. तो आपल्या गुरांच्या गोठ्यांत होता. समोर डोंगर व चारी बाजूला काळोख. घर नव्हतें कीं कोणी दुसरें माणूस पण नव्हतें. आकाशाकडे पाहिलें तेव्हां जे तारे डोक्यावर असायला पाहिजे होते ते पश्चिमेकडे वळलेले होते. म्हणजे गुरांच्या गोठ्यांतून बाहेर येऊन त्याला बराच वेळ झाला होता.

त्या सर्व गोष्टींसंबंधीं विचार करीत असतां त्याला छान झोंप लागली. परंतु दुसऱ्या दिवसापासून तो अगदीं बदललेला दिसला. पहिल्या रात्रीं त्यानें ज्या मुलीला पाहिलें होतें ती राहून राहून त्याच्या नजरेसमोर येऊन उभी राही. कोणतें ही काम करीत असतां त्याला ती मुलगी आठवे. वेड्यासारखा तो तासन् तास डोंग-राच्या खोऱ्यांत हिंडे. पण त्याला तें घर, तो मनुष्य, ती स्त्री किंवा ती मुलगी कधीं दिसली असेल तर शपथ. स्वतःचें देहभान विसरून तो हिंडे फिरे.



असेंच एक वर्ष लोटलें. पुन्हां कापणीचे दिवस आले. शिवकाम पुन्हां गोठ्यांतच रात्र काढूं लागला. एके दिवशीं रात्रीं त्यानें गोठ्याच्या बाहेर पाऊल टाकलें मात्र, पुन्हां त्याला त्या जुन्या घरांत तो असल्याचा भास झाला. पुन्हां त्याला तो मनुष्य, ती स्त्री व ती मुलगी तशीच दिसली. त्या मुलीला पाहतांच शिवकामला जिवांत जीव आल्यासारखें वाटलें. या खेपेस तो घाबरला नाहीं. त्या माणसानें त्याला जेवा-यला बोलावतांच तो आंत गेला. जेवण त्याला फार आवडलें. त्यानें पोटभर जेवून





घेतलें. इतकें स्वादिष्ट जेवण आयुष्यभरांत जेवल्याचें त्याला आठवलें नाहीं. जेवतांना दोघं नवरा बायको त्याला म्हणाली– "आमच्या मुलीचें लग्न तुझ्याशीं करून द्यावें असें म्हणत आहों. आयुष्यभर तूं सुखांत घालविशील."

शिवकामनें त्याचें कांहींच उत्तर दिलें नाहीं. पण तो लग्नाला कबूल झाला. त्या मुलीचें नांव केतकी असें होतें.

त्या वर्षीं तो पीक घेऊन आपल्या घरीं गेला नाहीं. गुरांच्या गोठ्यांत पण राहिला नाहीं. तो कोठें आहे, हें त्याच्या नातेवाइकांना पण कळलें नाहीं. पण तो जेव्हां घरीं आला तेव्हां त्याच्या बरोबर अप्सरेसारखी एक सुंदर स्त्री आलेली पाहून सर्वांना आश्चर्य वाटलें.

"ह्या मुलीशीं मी लग्न करणार आहें." शिवकाम म्हणाला. कोणी त्याला नकार दिला नाहीं व लग्न समारंभ पार पडला. मुलगी कोठून आली, कोणाची, हें कोणाला माहीत नव्हतें, तरी कोणी कधीं तिला किंवा शिवकामला एका शब्दानें विचारलें नाहीं. सर्व तिचें कौतुकच करीत.

त्या मुलीनें घरांत पाऊल ठेवलें त्या दिवसापासून घरांचें रूपच बदललें. शिवकामला सर्व वैभव प्राप्त होतें. तिच्या रूपें प्रत्यक्ष लक्ष्मीनेंच जणुंकांहीं त्याच्या घरांत प्रवेश केला. जो कोणी त्याच्या घरीं येई, जें कांहीं मागे, तें त्याला देऊन केतकी आनंदानें पाठवी. जवळपासच्या गांवीं त्याचें औदार्य व दानवृत्ती यांची प्रसिद्धी झाली. म्हणून गोरगरीब त्याच्याकडे येऊं जाऊं लागले व त्याच्याकडून आपल्या गरजा भागवून जाऊं लागले.

केतकीशीं लग्न झाल्यानंतर शिवकाम लवकरच सामान्य माणसासारखा वावरूं





लागला आणि हातांत थोडे पैसे जमा झाल्यावर त्याला थोडा गर्व पण झाला. तो आपल्या बायकोला देखील तोंडाला येई तें बोले. केतकी तो जें बोले वा करी, त्याबद्दल कधीं कांहीं बोलत नसे.

कांहीं दिवसांनंतर एक मस्तवाल बैल संक्रांतीच्या आधीं कांहीं दिवस एकदां शिवकामला खुंट्यासकट ओढूं लागला. तें पाहून केतकी घराबाहेर धांवत आली व नवऱ्याच्या हातचा खुंटा घेऊन तिनें तो शिताफीनें जमिनींत दाबून रोंवला. लगेच बैल जमिनीवर इतक्या जोरानें आदळला कीं जणुं खुंटा त्यालाच कोणी भोसकला. मोठ्या कष्टानें तो उभा राहिला. शिवकामनें चकित होऊन त्याच्याकडे पाहिलें. बैल थरथर कांपत होता.

नंतर केतकी बैलाला जणुंकांहीं बकरीसारखें धरून खुंट्याजवळ घेऊन गेली व त्याला तेथें बांधून टेवला. बैल तिला पाहूनच भ्याला होता. तें पाहून शिवकाम पण घाबरला. त्याची बायको म्हणजे सामान्य स्त्री नव्हे हें माहीत असूनहि त्यानें तिची कधीं कदर केली नव्हती. तिचा अपमान केला होता व तिला कित्येकदां रागावला पण होता. शिवकामच्या लक्षांत त्याची ती चूक आली व तेव्हांपासून तो बायकोचा आदर करूं लागला. त्यांना त्यानंतर मुलें बाळें झालीं, त्यांनीं पुष्कळ दौलत मिळविली व कित्येक वर्षें त्यांचा संसार सुखाचा झाला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा, मला एका गोष्टीची शंका आहे. शिवकाम आपल्या बायकोला एक सामान्य स्त्री मानूनच तिच्याशीं वागला. परंतु केतकीच्या अंगीं दैवी शक्ति असूनही ती सर्व कष्ट मुकाट्यानें कां सहन करीत होती ? सामान्य स्त्रीसारखी सहिष्णुता तिनें दाख-

विण्याचें काय कारण? या प्रश्नाचें उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींस तर परिणाम तुला माहीतच आहे. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

विक्रमार्क म्हणाला—" केतकी तसें वागली त्याला पुष्कळ कारणें होतीं. एक, ती देवी होती तरी तिनें एका सामान्य माणसाशीं लग्न स्वतःच्या इच्छेनें केलें होतें. त्यासाठीं तिनें मनुष्य जातीच्या स्त्रीचें रूप घेतलें होतें. म्हणून एका सामान्य स्त्रीसारखें वागणेंच तिला योग्य होतें. प्रत्येक वेळीं आपल्या असामान्य शक्तीचें प्रदर्शन करून त्याच्या मनांत दहशत उत्पन्न करणें दोघांच्या जीवनाला सुखाचें ठरलें नसतें. दुसरी गोष्ट ती देवी होती म्हणूनच सामान्य स्त्रीला वाईट जांचक वाटणाऱ्या गोष्टींची तिनें कधींच फिकीर केली नसावी. शक्तिशाली व्यक्तीच्या अंगीं अशक्तापेक्षां जास्त सहनशक्ति असावीच लागते. तिसरी गोष्ट, केतकीनें ज्या बळाचा प्रयोग बैलावर करून दाखवला त्या बळाचा प्रयोग तिनें आपल्या पतीवर केला असता तर तो लंगडा, लुळा व निस्तेज होऊन गेला असता. मग तिचा संसार कधींच सुखाचा झाला नसता. म्हणून आपल्या शक्तीची कल्पना करून देण्यासारखा प्रसंग येईपर्यंत केतकी सर्व सहन करीत गेली. त्याला स्वतः धडा देण्याऐवजीं तो स्वतःच धडा घेईल असा प्रसंग अनायासें घडून आला."

अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेताबरोबर नाहींसा झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळूं लागला.

(कल्पित)





# भुतीणीचें बाळंतपण

एका गांवीं एक फार गरीबीनें नडलेली बाई रहात असे. ती बुरडाचा धंदा करी व टोपल्या विणून आपला उदरनिर्वाह चालवी.

एकदां ती घागर घेऊन पाण्याला निघाली असतां तिला एका झुडपाखालीं एक बेडूक दिसला. ती त्या बेडकाला थट्टेत म्हणाली—" या खेपेस तूं बाळंत होशील तेव्हां मी येईन हो सुईण म्हणून. प्रथम वाटेंतून बाजूला हो पाहूं." तें ऐकतांच बेडूक वाटेंतून बाजूला झाला व तिला पुढें जायला वाट दिली.

कांहीं दिवसांनीं ती आपल्या झोपडींत बसून चरख्यावर सूत काढीत असतां एक जण सरळ तिच्या घरांत शिरला व म्हणाला—" हें पहा, माझ्या बायकोचें बाळंतपण जवळ येऊन ठेवलें आहे. तूं म्हणाली होतीस ना कीं तिच्या बाळंतपणाच्या वेळीं सुईणीचें काम करायला तूं येशील म्हणून. तर मग चल."

ती गरीब बाई घाबरून गेली. मी मी? सुईणीचें काम करूं तें कसें काय? मी कधीं तें काम केलेंच नाहीं."

" तर मग वचन कशाला दिलें होतेंस? तूं वचन दिलें होतेंस तर तें तूं पुरें केलेंच पाहिजेस." तो मनुष्य म्हणाला.

" मी कोणाला तसें वचन कधीं दिलेंच नाहीं." ती म्हणाली.

" तुला नाहीं आठवत, तूं एकदां एका बेडकाला तसें वचन दिलें होतेंस तें. ती बेडकीणच माझी बायको आहे. मी कामिनी भुतांचा राजा आहें." तो मनुष्य म्हणाला.

ती बाई घाबरून गेली. ती त्या माणसाला म्हणाली—" मी तुझें हें गुपित

श्री. गो. स. सुतार

कोणाला सांगणार नाहीं. तुझ्या बायकोच्या पोटांत दुखूं लागलें म्हणजे मला कळव. मी येऊन माझ्याकडून होईल ती मदत करीन."

तो मनुष्य निघून गेला. दोन तीन दिवसांनीं मध्य रात्रीच्या सुमारास तो आला आणि म्हणाला—"माझ्या बायकोच्या पोटांत दुखूं लागलें आहे. ये माझ्याबरोबर."

दोघे बरोबर निघून गेले. थोड्या वेळानें दोघे एका सुंदर राजवाड्यांत येऊन पोंचले. घरांत पाऊल टाकतांच तो मनुष्य हात-पायांवर उभा राहला. नवरा असा उभा राहला तर बायकोची सोडवणूक सोपी नसते. म्हणून त्या गरीब बाईनें त्या मनुष्याला निरनिराळीं कामें सांगून पाहिलीं. पण तो मनुष्य दगडासारखा जागच्या जागीं ओणवा उभा राहाला. तिला तेवढ्यांत एक युक्ति सुचली. ती त्याच्याजवळ जाऊन म्हणाली—"तुझी बायको बाळंत झाली."

नवऱ्यानें लगेच विचारलें—"बाळंतपण कसें गेलें?" आणि उठून उभा राहाला. लगेच तिकडे त्याची बायको बाळंत झाली. ती गरीब स्त्री, मुलाची दृष्ट काढून म्हणाली—"माझें काम झालें. येतें मी आतां."

भुतांचा राजा तिला घरीं पोंचवायला गेला. त्यानें तिला ती मागेल तें देण्याचें वचन दिलें होतें. पण तिनें मागितलें नाहीं व त्यानें दिलें नाहीं.

ती गरीब बाई कांहीं वेळ घरांत विश्रांती घेऊन केरवारा करायला म्हणून जरा बाहेर आली तेव्हां तिला एक रुपया दिसला. त्यानंतर दररोज ती सडा घालायला जाई तेव्हां तिला एक रुपया मिळे. अशातऱ्हेनें तिचें दारिद्र्य दूर झालें.





# शिलकेचा महिमा

कधीं काळीं उज्जयनी येथें कुंभीराम नांवाचा एक फार गरीब मनुष्य रहात असे. तो रोज गवत कापून तें श्रीमंतांच्या घरीं विकत असे. तेवढ्यावर त्याचा उदरनिर्वाह चाले. त्याचें घर राजधानीच्या एका टोंकाला होतें. रोज अडीच आणे त्याची प्राप्ती होती. दोन आण्यांत स्वतःच्या पोटापाण्यापुरेसें तो विकत घेई आणि अर्धा आणा शिलक टाकी. त्याला बायको नव्हती व मुलेंबाळें पण नव्हतीं.

एके दिवशीं त्यानें मडक्यांत ठेवलेली शिलक जमिनीवर ओतली. त्या शिलकेचा एक ढीग झाला. त्यानें विचार केला कीं एवढ्या पैशांचा मला काय उपयोग? स्वतःच्या घरावरलें छप्पर गवताचें होतें तें बदलून कवलारू करण्याची इच्छा सुद्धां त्याच्या मनांत उपजली नाहीं.

त्याला एक दिवशीं पहाटे स्वप्न पडलें. स्वप्नांत एक सुंदर तरुण स्त्री दिसली. झोंप मोडल्यावर देखील ती डोळ्यासमोरून दूर होत नव्हती. आपल्या पैशाचा आतां कसा उपयोग करावा हें त्याला कळलें. तो शिलकेंतले सर्व पैसे घेऊन गांवांतल्या एका प्रख्यात जव्हेऱ्याच्या दुकानांत गेला. त्यानें आपल्या जवळचे सर्व अर्धे आणे जव्हेऱ्याच्या समोर ओतले आणि म्हणाला—"ही माझ्या आयुष्यभराची शिलक आहे. ही रक्कम घेऊन मला एक सुंदर दागिना द्या."

जव्हेऱ्याच्या मुनीमानें पैसे मोजून पैसे किती आहेत हें सांगितल्यावर जव्हेऱ्यानें कुंभीरामाला एक सोन्याची माळ व बांगड्या आणून दाखविल्या व म्हणाला—"तुला यांपैकीं जें पाहिजे तें या पैशावर विकत

श्री. म. ल. जोशी



घेतां येईल." कुंभीरामला एक बांगड्यांची जोडी फार आवडली. त्यांत पन्ना व नीलमणी जडलेले होते. ती जोडी आपल्या उपरण्यांत बांधून तो एका व्यापाऱ्याच्या घरीं गेला. तो त्याला म्हणाला—"तुम्ही व्यापारासाठीं देशोदेशीं हिंडत फिरत असतां. कोठें तुम्ही त्या सुंदर सोळा वर्षाच्या मुलीविषयीं ऐकलें आहे का?" असें विचारून त्यानें स्वप्नांत पाहलेल्या मुलीचें वर्णन त्याला सांगितलें.

तें ऐकून व्यापारी म्हणाला—"ती मुलगी म्हणजे सागर देशाची राजकन्या असावी. तिच्या सौंदर्याचें वर्णन सर्वत्र ऐकलें आहे. ती स्वभावानें पण चांगली मुलगी आहे."

कुंभीरामला तें वर्णन ऐकून आनंद झाला. त्यानें उपरण्यांतली बांगड्यांची जोडी काढून व्यापाराला देत म्हटलें—"या खेपेस तुम्ही सागर देशांत व्यापाराला जाल तेव्हां ह्या बांगड्या त्या राजकन्येकडे पोंचत्या करा. परंतु या कोणी दिल्या हें मात्र तिला कळतां कामा नये."

"मी पुढल्याच आठवड्यांत निघत आहें. ही भेट देऊन काय सांगूं तिला!" व्यापाऱ्यानें त्याला विचारलें.

"मला कांहीं नको. फक्त ह्या बांगड्या तिच्याकडे पोंचत्या व्हाव्या एवढीच इच्छा माझ्या मनांत आहे." कुंभीराम म्हणाला.

व्यापारी आपल्या काफल्याबरोबर निघाला. वाटेंत जागोजागीं थांबत पडाव टाकीत काफला सागर देशांत जाऊन पोंचला. तेथें तो राजकुमारीला जाऊन भेटला व म्हणाला—"ही भेट एका व्यक्तीची आहे. खास राजकन्येसाठीं म्हणून आणली आहे." असें सांगून त्यानें ती बांगड्यांची जोडी तिला दिली.

राजकन्येनें बांगड्या हातांत घातल्या. तिला त्या फार आवडल्या. म्हणाली—"जणुं कांहीं माझ्याचसाठीं घडवल्या आहेत, माझ्या हाताच्या मापाच्या आहेत. परंतु ह्या कोणी पाठविल्या, नाहीं सांगितलेंत?"

"क्षमा करा! तेवढा एकच प्रश्न मला विचारूं नका. मी त्या व्यक्तीचें नांव सांगायला तयार नाहीं." व्यापारी म्हणाला.

राजकुमारी तें उत्तर ऐकून चकित झाली. "पण त्यानें कोणत्या आशेनें ही भेट पाठविली आहे, हें तरी सांगाल कीं नाहीं?" तिनें विचारलें.

"त्यानें तें सर्व मला कांहीं सांगितलें नाहीं. त्याला याबद्दल कांहीं हवें असेल असें पण दिसलें नाहीं. तुम्ही ही कांकणें स्वीकारावीत एवढीच त्याची इच्छा दिसली." व्यापारी म्हणाला.

"त्याच्या मनांत कांहीं इच्छा नसेल, पण मी कांहीं न देणें बरोबर दिसणार नाहीं." राजकन्या म्हणाली आणि तिनें पुरुषी पोशाखाला शोभतील अशी अनेक रेशमी वस्त्रें व पुष्कळ धन दिलें.

कांहीं महिन्यांनीं व्यापारी स्वदेशीं परत आला. कुंभीरामला भेटून म्हणाला—"तुझी





भेट राजकन्येनें स्वीकारली आणि बदल हीं वस्त्राभूषणें व रुपये दिले आहेत." त्यानें तीं वस्त्रें व धन कुंभीरामासमोर ठेवलें.

कुंभीराम चकित होऊन म्हणाला—"मला काय करायचीं आहेत हीं वस्त्राभूषणें? हीं वस्त्रें वापरायची आवड असणारा कोणी तुमच्या ओळखीचा असेल तर सांगा."

"कां नाहीं? विदर्भ देशाचा राजा आहे. तो आहे पण तरणा बांड व सुंदर." व्यापारी म्हणाला.

"असें असेल तर तुम्ही या खेपेस व्यापारासाठीं त्या देशांत जाल तेव्हां हीं वस्त्रें त्याला नेऊन घाल का?" कुंभीरामनें व्यापाऱ्याला विचारलें.

पुढें कांहीं दिवसांनीं व्यापारी विदर्भ देशांत व्यापारासाठीं गेला. तेव्हां त्यानें तीं वस्त्रें तेथील राजाला नेऊन दिलीं. तीं वस्त्रें पाहून राजा फार खूष झाला. त्यानें सागरच्या राजकन्येप्रमाणेंच विचारलें—"पण काय हो, हीं वस्त्रें माझ्याकडे कोणी पाठविलीं हें नाहीं सांगितलेंत? पाठविणाऱ्यानें कांहीं अपेक्षा ठेवूनच हीं वस्त्रें पाठविली असणार?" पण व्यापारी एवढेंच म्हणाला कीं त्या व्यक्तीनें कोणतीहि इच्छा मनांत बाळगून हीं वस्त्रें पाठविलेली नाहींत. तरी राजानें उत्तम जातीचे बारा घोडे निवडून व्यापाऱ्याला देत म्हटलें कीं हे घोडे त्या व्यक्तीकडे माझी परतभेट म्हणून पोंचते करा."

ते घोडे आल्यावर कुंभीराम त्या घोड्यांचें काय करायचें या काळजींत पडला. तो पुन्हां आपल्या व्यापारी मित्राला म्हणाला—"यांपैकीं दोन घोडे तुम्ही स्वतःसाठीं ठेवून घ्या व बाकी दहा घोडे सागरच्या राजकुमारीकडे पोंचते करा."

व्यापाऱ्यानें घोडे आणून पोंचते केले तेव्हां राजकुमारीला एका अनोळखी माणसाकडून ही भेट घेतेवेळीं संकोच वाटला. म्हणाली—"आपली ओळख दिल्याशिवाय अशी भेट कोणी पाठवूं लागला तर ती कशी काय स्वीकार करावयाची?"

"मी त्याच्या विषयीं एवढेंच सांगूं शकतों कीं तो त्याला न देता येण्यासारखी वस्तू देत नाहीं. या पेक्षां जास्त मी कांहीं सांगूं शकणार नाहीं व आपण विचारूं पण नये." व्यापारी म्हणाला.

राजकन्येनें त्या विषयीं आपल्या वडिलांचा सल्ला घेतला. राजा म्हणाला—"तूं एकदम परतभेट म्हणून इतकी मोठी कांहींतरी वस्तु पाठवून दे कीं त्याहून मोठी वस्तु तो पाठवूंच शकणार नाहीं."

राजकुमारीनें इतकी चांदी दिली कीं ती घेऊन जायला वीस उंट लागले. व्यापाऱ्यानें ती सर्व चांदी कुंभीरामकडे पोंचती केली. कुंभीराम घाबरूनच गेला.

"मी काय करूं एवढी चांदी घेऊन? यां पैकीं सहा उंट व त्यांच्यावरची चांदी तुम्ही स्वतःसाठीं ठेवून घ्या. बाकी उंट व त्यांच्यावरची चांदी तुम्ही विदर्भ देशाच्या राजाकडे पोंचती केलीत तर तुमचे माझ्यावर फार फार उपकार होतील."



व्यापाऱ्यानें स्वतःचा व्यवसाय करायचा सोडून दिला. कारण त्याला निरोप पोंचविण्याच्या कामांतच कल्पनेबाहेर फायदा होऊं लागला. तो उंट घेऊन विदर्भ देशांत गेला आणि भेट म्हणून ते उंट व त्यांच्यावरची चांदी राजाला दिली. सागरचा राजकुमार पण अनोळखी व्यक्तीकडून एवढी मोठी भेट घ्यायला संकोच करूं लागला, आणि भेट पाठविणाऱ्यानें पुन्हां भेट पाठवूं नये इतकी मोठी भेट पाठविण्याचें त्यानें मनाशीं ठरविलें. त्यानें व्यापाऱ्याला वीस घोडे, वीस उंट व वीस हत्ती दिले. प्रत्येक












हत्तीवर सोन्याची मोत्यांनीं मढवलेली अंबारी होती. साठच्या साठ जनावरांच्या पाठीवर रेशमी शाली घातलेल्या होत्या.

तें सर्व घेऊन व्यापारी कुंभीरामकडे गेला तेव्हां तें पाहून त्याला वेड लागल्यासारखें झालें. तो व्यापाऱ्याला म्हणाला—"तुम्ही आतांपर्यंत माझ्यावर अपरंपार उपकार केले आहेत. यां पैकीं दोन घोडे, दोन उंट व दोन हत्ती स्वतःसाठीं ठेवून घ्या बाकी राजकन्येकडे पोंचते करण्याची कृपा करा."

"मला हें सर्व कांहीं नको. तुम्हीच ठेवून घ्या. पुन्हां राजकन्या किंवा राजकुमारासमोर जाण्याची हिंमत माझ्यांत तरी उरली नाहीं. मला माझ्या श्रमाचा मोबदला मिळायला हवा त्यापेक्षां पुष्कळ जास्त मिळाला आहे. ही भेट कोण पाठवतो हें कळल्याशिवाय ती स्वीकारण्यास दोघांनीं साफ नकार दिला आहे. मी जाऊन सांगूं का कीं आमच्या गांवचा गवत विकणारा ही भेट पाठवीत आला आहे. हें सांगायला हरकत नसेल तर मी सागरला जायला तयार आहें." व्यापारी म्हणाला.

कुंभीराम बराच वेळ विचार करीत राहाल्यावर म्हणाला—"असें सांगा कीं आपल्याला माहीत नाहीं का हे घोडे, हत्ती वगैरे कोणी दिले आहेत? हे त्या.... त्यांनींच दिले आहेत. त्यानंतर तुम्हांला कांहीं उत्तर देण्याचें कारण नाहीं व मला पण काळजी करण्याचें कारण राहणार नाहीं."

कुंभीरामचा हेतू तसें उत्तर देण्यांत काय असावा हें व्यापाऱ्याला कळलें. त्यानें दिलेले घोडे, उंट व हत्ती त्यानें स्वतःकडे ठेवून घेतले व बाकींना घेऊन तो सागरला निघाला.

सागरच्या राजाला दुरून धूळ उडत असलेली दिसली. घोड्यांचें खिकाळणें व हत्तींचें ओरडणें ऐकून त्याला वाटलें कीं कोणी शत्रू आपल्या राज्यावर स्वारी करायला आला आहे. परंतु व्यापाऱ्यानें येऊन, ते सर्व घोडे वगैरे राजकन्येला उपहार व नजराणा म्हणून आहेत, असें सांगितलें तेव्हां राजाला आश्चर्य वाटलें.

"हे सर्व कोण पाठवितो हें जोंपर्यंत तूं सांगत नाहींस तोंपर्यंत आम्ही या सर्वांचा स्वीकार करण्यास तयार नाहीं." राजा म्हणाला.

"महाराज, आतां मी तरी किती दिवस हें गुपित लपवून ठेवूं? विदर्भच्या राजकुमारानें ही भेट पाठविली आहे." व्यापारी म्हणाला.

राजानें आपल्या मुलीला त्या विषयीं विचारलें. म्हणाला—"विदर्भचा राजकुमार तुझ्याशीं लग्न करण्याच्या हेतूनें ही भेट पाठवीत आला आहे. त्यानें दूत पाठविला व आपण नकार दिला तर त्याच्या इभ्रतीला कलंक लागेल. म्हणून त्यानें आजपर्यंत ही युक्ति केली असावी. त्याच्याशीं तुझें लग्न झाल्यास त्याहून जास्त आनंदाची गोष्ट आणखी काय असणार!" तें ऐकून राजकुमारीला पण आनंद झाला.



राजानें व्यापाऱ्याला पुष्कळ बक्षिस देऊन निरोप दिला व म्हणाला—"आम्ही या खेपेस स्वतःच विदर्भ देशाच्या राजाकडे आपला दूत पाठवूं."

व्यापारी म्हणाला—"छान! मला तरी तेंच पाहिजे होतें." असें सांगून तो उज्जयनीला परत गेला.

नंतर सागर राजा मुलीला बरोबर घेऊन सर्व लव्याजम्यासह तीर्थयात्रेला निघाला. कित्येक ठिकाणीं थांबत दर्शन व स्नान करीत तो विदर्भ देशांत आला. विदर्भ देशाच्या राजाला भेटून म्हणाला—"आपल्या

राजकुमारानें आमच्या राजकन्येसाठीं वेळो-वेळीं जी भेट व उपहार पाठविले त्याबद्दल आम्ही आपले फार आभारी आहों. कोणी हे उपहार पाठविले हें कळायला मार्ग नसल्यानें आम्ही परतभेट म्हणून उपहार पाठवीत राहालों. परंतु आतां कळलें कीं राजकुमारानें ती भेट पाठविली होती. म्हणून आम्हांला वाटलें कीं स्वतः येऊन एक अशी भेट द्यावी कीं राजकुमाराला ती फार आवडेल."

विदर्भच्या राजाला तें सर्व कांहीं कळलें नाहीं. परंतु तो कांहींच उघड बोलला नाहीं. "मी मुलाला बोलावतो. आपण स्वतःच काय तें त्याच्याजवळ बोलावें." राजा म्हणाला.

विदर्भचा राजकुमार आला. सागरच्या राजकन्येचें सौंदर्य पाहून तो चकित झाला. बोलण्यावरून त्याला सद्भानें कळलें कीं उपहार व भेट राजकन्येकडूनच येत होती व परत भेट तिच्याचकडे तो पाठवीत राहाला होता. तो म्हणाला—"राजकन्येशीं विवाहास मी तयार आहें. आपण ही भेट दिल्यास याहून मोठी भेट मी प्रत्युपकार म्हणून काय देऊं शकेन?"

त्या लग्नास सर्व थोरा मोठ्यांनीं संमति दिली. ज्योतिष्यांनीं मुहूर्त सांगितला व त्या मुहूर्तावर लग्नसमारंभ थाटामाटानें पार पण पडला. त्यांच्या विवाहास कारण कुंभीराम होता हें दोघांपैकीं एकालाहि कळलें नाहीं. तो नेहमींप्रमाणें रानांत जाऊन गवत कापून आणीत होता व त्यावर त्याचा उदरनिर्वाह चालू होता. तो दोन आण्यांत आपल्या पोटापाण्या पुरेसें विकत घेई व अर्धा आणा शिल्केंत टाकी.





# संशयाचे भूत

कोशल देशाच्या राजाला दोन मुलगे होते. एकाचें नांव सुनंद व दुसऱ्याचें जीवक असें होतें. दोघांपैकीं मोठा राजाचा थोडा जास्त लाडका होता. कारण तोच युवराज होता व राजाच्या गादीला वारस होता. एवढेंच नव्हे तर शस्त्रास्त्र विद्येंत पण तो जास्त हुशार होता.

परंतु जीवकच्या मनांत त्याच्या मोठ्या भावापेक्षां बापावर जास्त प्रेम होतें. याशिवाय इतर सर्व बाबतींत तो मोठ्या भावाहून जास्त योग्य पण होता.

कोशल देशाच्या प्रधानाला वासंतिका नांवाची एक मुलगी होती. दोघे राजकुमार लहानपणापासून तिच्याबरोबरच लहानाचे मोठे झाले होते. तिचें लग्नाचें वय झाल्यावर दोघां राजकुमारांना तिच्याशींच लग्न करावें असें वाटूं लागलें.

राजा व मंत्री तिला म्हणाले—"मुली! अग तूं दोघांशीं लग्न कशी काय करणार? शहाणपणानें वाग. जगाची रीत म्हणून कांहीं आहे कीं नाहीं." राजकुमारांना पण दोघांनीं पुष्कळ समजावून सांगितलें. पण सर्वच हट्टाला पेटले होते.

तेव्हां राजानें दोघां राजकुमारांत एक प्रतिद्वंद्विता ठेवायचें ठरविलें. असें ठरलें कीं राजवाड्यांतून दोघांनीं बाण सोडावयाचे. ज्याचा बाण जास्त दूर जाऊन पडेल त्यानें वासंतिकेशीं लग्न करावें.

राजानें ती अट कळविल्यावर जीवकला वाटलें कीं आतां वासंतिकेशीं आपला विवाह होणें अशक्य. तरी त्यानें अटीप्रमाणें प्रतिस्पर्धेंत भाग घेण्याचें मनाशीं ठरविलें.

सौ. यमुनाबाई मो. कामत



सुनंदनें सर्वांत पहिला बाण राजवाड्यांतून सोडला. तो पुष्कळ दूर जाऊन पडला. नंतर जीवकनें पण सोडला. परंतु तो कोठें जाऊन पडला व किती दूर जाऊन पडला हें कोणाला कळलें नाहीं. राजाच्या शिपायांनीं पुष्कळ हुडकून पाहिलें, पण निरूपयोग. तो बाण सांपडला नाहीं.

"काय नेम कदाचित जीवकचा बाण जास्त दूर गेला असावा. पण त्याला कांहीं प्रमाण नाहीं. म्हणून आम्ही सुनंदनेंच ही पैज जिंकली असें मानतों." राजानें असें घोषित केलें आणि त्याबरोबर सुनंदचा राज्याभिषेकपण करून टाकावा असें राजानें ठरविलें.

हें ऐकून इतरांना जितका आनंद झाला तितका जीवकला न वाटणें साहजीक होतें. त्याचा बाण गेला कोठें व अदृश्य कसा झाला या गोष्टीचा शोध लावण्याचें त्यानें मनाशीं ठरविलें. म्हणून तो लग्नसमारंभ पाहण्यासाठीं पण थांबला नाहीं. तो राजवाड्याबाहेर निघाला आणि ज्या दिशेनें त्यानें बाण सोडला होता त्या दिशेनें सरळ निघाला.

बाण शोधीत तो सोळा मैल चालत आला आणि एका डोंगराळ प्रदेशांत येऊन पोंचला. त्या जागीं डोंगराचा कडा सरळ उभा होता व तेथें एक बाण पडलेला त्याला दिसला. तो त्याचाच बाण होता. पण टोंक त्याच्याचकडे वळलेलें होतें. तें सर्व पाहून त्याला फार आश्चर्य वाटलें.

त्यानें विचार केला, यांत जरूर कांहीं तरी माया किंवा गूढ असलें पाहिजे. नाहींतर मीच काय, देवानें सोडलेला बाणदेखील सोळा मैल येणें शक्य नाहीं. आणि समजा येथवर येऊन पडलाच तर त्याचें टोंक पुढें असायला पाहिजे, मागें उलटें नाहीं. अर्थात हा बाण येथवर येऊन अशा तऱ्हेनें पडायला निराळेंच कांहींतर कारण असलें पाहिजे. जीवकला त्यांत शंका उरली नाहीं.

असेल कोणी इकडेच, असा विचार करून जीवक डोंगरालगत चालूं लागला. कांहीं अंतर चालत गेल्यावर एक गुहा दिसली. त्यानें साहस करून गुहेंत प्रवेश केला. आंत पाऊल टाकतांच त्याला आंत एक दरवाजा दिसला तेव्हां दार एका बाजूला सरकलें.

जीवक दरवाजा ओलांडून आंत गेला व आश्चर्य चकित होऊन पाहूं लागला. स्वप्नांत दिसावें असें दृश्य. डोंगराच्या पोटांत त्याला एक मोठें मैदान दिसलें त्या मैदानांत गगनचुंबी वाडे व त्यांच्या मधोमध एक रत्नखचित राजवाडा होता. मोठमोठे रुंद व स्वच्छ रस्ते राजवाड्याच्या चारी बाजूला होते.

जीवक मुख्य रस्त्यानें राजवाड्यापर्यंत गेला. त्यानें राजवाड्यांत पाऊल टाकलें. आंत एक मोठा दिवाणखाना होता. त्यांत बसायला सोन्यानें मढवलेल्या खुर्च्या व दीवाण होते. अप्सरांच्या सुद्धां माना खालीं होतील, अशा एकाहून एक सुंदर स्त्रिया





त्यांवर बसल्या होत्या. त्यांच्यांत प्रमुख राणीसारखी शोभणारी एक स्त्री आसनावरून उठून समोर आली व म्हणाला—" जीवक! ये, मी तुझीच वाट पाहात होतें."

जीवक तर थक्कच झाला. त्यानें विचारलें—" पण तूं कोण हें आधीं सांग, आणि तुला माझें नांव कसें कळलें? आमच्या राजधानी-पासून इतक्या जवळ तुमचें हें वास्तव्य कसें काय? आणि आम्हांला तें कोणालाच इतकें दिवस कसें काय कळलें नाहीं?"

" मी यक्षपुत्री आहें. माझें नांव शंपा-लता. माझ्या वडिलांनीं माझ्यासाठीं हें नगर फार पूर्वी वसविलें. मी तुला फार पूर्वीपासून ओळखतें. खरें बोलावयाचें तर ती वासंतिका तुझी राणी होण्यालायक मुळींच नव्हती. तूं आपल्या मोठ्या भावाहून मोठा भाग्यशाली आहेस. तूं बाण सोडलास तेव्हां मी आपल्या यक्षविद्येनें तो बाण येथवर आणून टाकला आणि तूं त्या बाणाचा शोध काढीत येथवर येशील या आशेनें मी आजवर वाट पहात होतें. तुला हरकत नसेल तर तूं येथेंच रहा. माझ्याशीं विवाह करून येथेंच स्वर्गसुखाचा उपभोग कर." यक्षिणी म्हणाली.

जीवकला तें सर्व खरेंच वाटेना. शंपा-लता यक्षिणीच असेल काय? वासंतिकेहून सहस्र पटीनें जास्त सुंदर आहे ही. हिच्याशीं लग्न करून घ्यायला कोणी नकार देईल हा विचारच मुळीं खुळेपणाचा दिसेल. असा विचार करून म्हणाला—

" ठीक! जशी तुझी मर्जी! तूं सांगशील तें करायला मी तयार आहें. मी तुला पाहिलें तेव्हांपासूनच तुझा दासानुदास झालों आहें. तुझ्या सहवासांत मला आयुष्यभर राहतां आलें तर याहून मोठें भाग्य तें माझें काय असणार?"



त्यानें तिच्या बरोबर फिरून सर्व राजवाडा पाहिला. जिकडे नजर फिरे तिकडे सोनें, चांदी, रत्नें व माणिक्यें दिसत होतीं. कुबेराच्या अलकापुरींत तरी इतकें मोठें वैभव असेल कीं नाहीं शंकाच.

दोघं लग्न करून सुखानें राहूं लागलीं. जें सुख इतरांना स्वप्नांत देखील मिळणें शक्य नव्हतें त्या सुखाचा प्रत्यक्ष अनुभव त्याला मिळत होता.

एक महिना लोटला. जीवकला आपल्या वडिलांची व इतर जवळच्या नातेवाइकांची आठवण होऊं लागली. तो घराचा वीट आल्यामुळें कोणाला सांगितल्याशिवाय घरा-बाहेर निघून आला होता. तो नाहींसा झाल्याचें कळल्यावर घरची मंडळी सुखी होती कीं दुःखी याची कांहींच कल्पना त्या वेळीं त्याला नव्हती. सर्व लग्न समारंभांत मग्न असल्या कारणानें जीवक निघून गेल्याची गोष्ट कोणाच्या लक्षांत देखील आली नसणार. परंतु विवाह समारंभ व राज्यारोहणाचा उत्सव संपल्यावर सर्वांना मी नसल्याचें कळेल व वाईट वाटेल, या गोष्टीचा विचार करून त्याला घराची आठवण जास्तच होऊं लागली. यक्षिणीनें



त्याला दुःखी होण्याचें कारण विचारलें. तेव्हां त्यानें खरें तेंच सांगितलें. तेव्हां यक्षिणी म्हणाली—" मग जाऊन भेटून ये सर्वांना. मी तुझ्या प्रवासाची सर्व तयारी करून देतें. परंतु एक अट आहे. तूं माझ्याविषयीं किंवा माझ्या येथील वास्तव्या-विषयीं कोणाजवळ एक चकार शब्द काढतां कामा नये." तिनें बजावून सांगितलें.

जीवकनें तें कबूल केलें. त्याच्या प्रवासाची शंपालतेनें सर्व तयारी करून दिली. त्याच्यासाठीं रत्नांनीं मढवलेला एक रथ तयार करवून दिला. कित्येक घोडेस्वार,



रत्नमाणिक्यांचे भार व वस्त्रालंकार सर्व नातेवाइकांना देण्यापुरेसे तयार करून दिले.

कोणाला कांहीं कळविल्याशिवाय निघून गेलेला मुलगा परत आलेला पाहून राजाला फार आनंद झाला. परंतु मंत्री व इतर दरबारी संशयाच्या नजरेनें त्याच्याकडे पाहूं लागले. दंगा किंवा राजद्रोह पसरावा म्हणून हा आला असावा असें त्यांना वाटलें.

जीवकनें आपल्या वडिलांना तो सुखानें परदेशांत रहात आहे असें सांगितलें. पण तो कोठें रहात आहे हें नाहीं सांगितलें. एका यक्षिणीशीं त्यानें लग्न करून घेतलें असल्याचें पण त्यानें कळविलें नाहीं. वडिलांनीं त्याला आग्रह करून स्वदेशींच रहावयास सांगितलें पण त्यानें नाकबूल केलें. दोन दिवस राहून तो परत निघाला. परंतु जाताना मधून मधून येऊन भेटत जाईन असें वचन देऊन गेला.

जीवक निघून गेल्यावर मंत्री आदिकांनीं राजाला सावध रहायला सांगितलें. कोशल राज्य जिंकण्यासाठीं जीवक कांहीं गुप्त कारस्थान करीत असल्याचें त्यांनीं राजाला सांगितलें. त्याच्या पाठीशीं पुष्कळ लोक आहेत हें देखील त्यांनीं राजाला बजावून सांगितलें.

हें संशयाचें भूत राजाच्या हृदयांत देखील घर करून बसलें. त्यानें विचार केला कीं मंत्री आदिकांची शंका बरोबर असणार. कारण मंत्र्याच्या मुलीशीं त्याचें लग्न न झाल्यामुळें त्याला निराशा वाटली असेल आणि सूड उगविण्याचा विचारच त्याच्या मनांत असेल. पितृप्रेमाचा किंवा मातृप्रेमाचा एवढा ओढा असेल ही गोष्ट त्याला खरी वाटेनाशी झाली. नंतर एवढें ऐश्वर्य तरी त्यानें कोठून संपादन केलें? हे घोडेस्वार व नोकर चाकर कोठून आले?



तो आला कोठून व गेला कोठें, हे देखील सांगायला तो तयार नव्हता. म्हणजे, तो येथली स्थिति पाहून घेण्यासाठींच इकडे आला असावा. मधून मधून भेटायला येण्याचें वचन देण्यांत तरी त्याचा वेगळा हेतु काय असणार?

आणखी एक महिना लोटला. या खेपेस जीवक पहिल्यापेक्षां जास्त तयारी करून आला होता. त्याच्याकडे रत्नमाणिक्यें जास्त होतीं व घोडे आणि घोडेस्वार पण जास्त होते. त्यावेळीं राजा जीवकला म्हणाला—"बाळ! तूं मधून मधून असा भेटायला येतोस म्हणून मनाला बरें वाटतें. पण तूं येथेंच कां नाहीं रहात? येथें तुला कोणत्या वस्तूची कमतरता आहे?"

"तें शक्य नाहीं बाबा! मी आणखी एका जागीं दुसऱ्या कामांत गुंग असतो व त्यांतच मला आनंद व समाधान वाटतें." जीवक म्हणाला.

"हो, पण तूं राहतोस ती जागा कोठें आहे? सांग तरी. आम्ही तिकडे येत जात राहूं." राजा म्हणाला.

"तेवढें एकच तुम्ही विचारूं नका. मी आहें त्या जागेविषयीं कोणाला कांहीं



सांगणें इष्ट नाहीं. तें एक गुपित आहे आणि आपल्यापैकीं कोणी तिकडे येऊं नये, हेंच बरें." जीवक म्हणाला.

राजाच्या मनांतली शंका दुणावली. जीवक निघून गेल्यावर त्यानें मंत्र्याला बोलावून त्याचा या विषयीं सल्ला घेतला. मंत्र्यानें सल्ला दिला कीं जीवक कोठें राहातो याची सर्व माहिती काढून घेणें आवश्यक आहे.

एका महिन्यानंतर जीवक पुन्हां वडिलांना भेटण्यासाठीं आला. या खेपेस त्याच्याबरोबर आणखी जास्त लोक होते.



आहेत. त्यांचा एकट्यानें संहार करूं शकेल असा कोणी शूर आणून दिलास तर हवा आहे."

राजाची ती इच्छा पुरी करणें अशक्य आहे असें जीवकला वाटलें. तरी परत गेल्यावर त्यानें यक्षिणीला तें जाऊन सांगितलें. तेव्हां ती म्हणाली—"तुमच्या वडिलांनीं जें मागायला नको होतें तेंच नेमकें मागितलें आहे."

"मला पण तसेंच वाटलें कीं असा एक मनुष्य कोठून मिळणार?" जीवक म्हणाला.

"न मिळायला काय झालें? आहे, माझा भाऊच. मी सांगितलें तर तो तुमच्या वडिलांकडे जाईल आणि ते सांगतील तसें करील सुद्धां. परंतु तो आहे फार तापट. त्याचें तुमच्या वडिलांशीं कितपत पटेल हें नाहीं मला माहीत."

"माझ्या वडिलांच्या आज्ञेप्रमाणें वागायला तो तयार असला कीं मग तो किती तापट असला म्हणून काय झालें? मग तूं त्याला पाठवतेस का माझ्या वडिलांकडे?" जीवकनें विचारलें.

"आजच पाठवतें." शंपावती म्हणाली.

त्या दिवशीं कोशल देशाचा राजा दरबारांत बसला असतां तेथें राक्षसासारखें शरीर असलेला धिप्पाड मनुष्य पन्नास मण वजनाची एक गदा घेऊन आला. त्याच्या प्रत्येक पावलाबरोबर जमीन हादरत होती. राजासमोर उभा राहून तो म्हणाला—"तूं मला कशाला बोलाविलें आहेस?" त्याच्या आवाजानें सर्व राजवाडा दुमदुमला. सर्व थरथर कांपूं लागले. राजा त्याच्या दृष्टीला आपली दृष्ट भिडवूं शकला नाहीं. दोन्ही हात डोळ्यावर ठेवून बसून राहाला.



"अरे विचारलें तुला कीं तूं कशाला बोलावलें आहेस आणि तूं कांहींच बोलत नाहींस?" असें म्हणत त्यानें आपली गदा राजाच्या डोक्यावर नुसती ठेवली. त्या गदेच्या वजनानेंच राजाचें डोकें फुटून गेलें व तो तत्काळ मरण पावला.

"अरे अरे अरे....! ते आमचे महाराज! त्यांचा असा जीव घेतलास!" मंत्री मोठ्यानें ओरडला व त्याच्या बरोबर सर्व दरबारी पण ओरडले. त्यानें एकदां गदा फिरवल्याबरोबर ते सर्व ठार झाले. जे जिवंत होते त्यांना तो म्हणाला—"राजा, सांगेल तें करायला सांगून माझा मेहुणा जीवक यानें मला पाठविलें आहे. पण तुमचा राजा मला पाहतांच घाबरला. त्याच्यासारख्या भित्र्याच्या हाताखालीं का मी काम करणार? या पुढें तुमच्यावर माझा मेहुणा जीवक हाच राज्य करणार. कोणाला कबूल नसेल तर त्यानें आतांच सांगावें."

कोणाच्या तोंडांतून शब्दच उमटेना. शंपालताचा भाऊ परत गेला आणि जें झालें तें त्यानें जाऊन सांगितलें. तें सर्व ऐकून जीवकला फार वाईट वाटलें.

"तुझ्या बापाच्या डोक्यांत तूं त्याचें राज्य बळकावणार अशी शंका आली तेव्हांच त्यानें स्वतः आपल्या मरणाला स्वतःवर ओढवून घेतलें. लपून फसवून तुला ठार करण्याचा सल्ला पण राजाला त्याच्या मंत्र्यानें दिला होता. तुला त्याचें इतकें भय होतें. म्हणून त्याचा शेवट असा झाला." शंपालता म्हणाली.

त्यानंतर दोघे आपल्या गुप्तस्थानांतून बाहेर येऊन कोशलच्या राजधानींत आले व तेथें राहून त्यांनीं अनेक वर्षें राज्य केलें.





# तांब्याचा तुकडा

एका गांवीं गणोजी नांवाचा एक गरीब गाडीवाला रहात असे. त्याची संपत्ति काय ती एक बैलगाडी होती. गांवांतले व्यापारी बाजार पेठेंतून माल आणायला न्यायला त्याची गाडी भाड्यानें घेत. परंतु तो दिवसभर काम करी, तरी त्याची गरीबी मात्र कायमच होती.

एके दिवशीं गणोजी बाजारपेठेंतून गाडींत माल भरून गांवांतल्या एका व्यापाऱ्याच्या घरीं येत असतां वाटेंत त्याला एक बैरागी साधू भेटला. तो एका झाडाखालीं कोणत्यातरी आजारानें कण्हत पडला होता. त्यानें गणोजीला थांबण्यासाठीं हातानें खुणावलें. "मी फार आजारी आहें, मला आपल्या गाडींत बाजारपेठेच्या गांवीं पोंचता करतोस का?" त्यानें विचारलें.

गणोजीनें त्याला गाडींत बसवून घेतलें. बाजारपेठेंत पोंचल्यावर त्यानें त्या बैराग्याला विचारलें–"कोठें जायचें आहे तुम्हांला?"

"येथें कोणी ओळखीचा नाहीं. कोणत्यातरी धर्मशाळेंत अगर मठांत पोंचता कर. देव तुला सुखी करील." साधू म्हणाला.

कोणाच्या घरीं घेऊन गेलों तर या बैराग्याला आणि त्यांत आजारी असलेल्याला कोण ठेवून घेईल? असा विचार करून तो त्याला आपल्या घरीं घेऊन गेला. नंतर व्यापाऱ्याच्या घरीं माल उतरवून आपल्या घरीं परत आला.

गणोजी घरीं परतला तेव्हां बैरागी झोंपडीच्या एका कोपऱ्यांत कण्हत पडला होता. गणोजीला त्याची बायको एका बाजूला बोलावून नेऊन हळूच म्हणाली– "हा तर अगदीं मरणाला टेकलेला दिसतो आहे. असा कोणी परका आपल्या घरीं मेला तर!"

गणोजीच्या बायकोनें जें म्हटलें अगदीं तसेंच झालें. मध्य रात्र उलटल्यावर तो बैरागी मेला. "पाहिलेंत, आतां काय करणार? लोक म्हणतील ना कीं या बैराग्याला लुबाडून आपण याचा जीव घेतला!" गणोजीच्या बायकोनें विचारलें.

"आतां जें होऊन गेलें तें बोलण्यांत काय अर्थ आहे? पुढें काय करायचें तें बोल." गणोजी म्हणाला.

"काळोख पडल्यावर हा आपल्या घरीं आला होता. कोणाला माहीत सुद्धां नाहीं. उजाडण्यापूर्वीं याला खड्डा खणून पुरून टाकून मोकळे होऊं या." गणोजीची बायको म्हणाली.



गणोजीच्या घरामागें थोड्या अंतरावर कांटेरी झुडपें होतीं. तेथें जाऊन गणोजीनें एक मोठा खड्डा खणला. त्यांत त्या बैराग्याला पुरून उजाडण्यापूर्वीं तो घरीं आला. तरी एकानें त्याला त्या कांटेरी झुडपाजवळ पाहिलेंच. त्याला वाटलें कीं गणोजीला कांहींतरी ठेवा सांपडला असावा. परंतु त्यानें जवळ जाऊन माती बाजूला सारून पाहिलें तेव्हां त्याला त्या जागीं एक प्रेत दिसलें. तें पाहून त्याला वाटलें कीं खुनाबिनाची भानगड दिसते आहे ही. म्हणून तो तेथून आपणांला कांहीं माहीतच नाहीं अशा तऱ्हेनें निघून गेला.

झोंपडीच्या ज्या कोपऱ्यांत बैरागी मेला त्या कोंपऱ्यांत त्याची एक झोळी पडलेली होती. तिच्यांत कांहीं फाटके कपडे होते. गणोजीनें ती झोळी दूर फेंकून दिली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं गणोजीचीं मुलें



तलावाच्या बाजूला खेळायला गेलीं तेव्हां त्यांना तेथें त्या वैराग्याची झोळी दिसली. तिच्यांत त्यांना हिरवा निळा थर असलेला तांब्याचा एक तुकडा सांपडला.

गांवांतल्या शाळेचे मास्तर तलावावर आले तेव्हां त्यांना मुलांच्या हातांत तो तांब्याचा तुकडा दिसला. तो तुकडा घेऊन त्यांनीं लक्षपूर्वक वाचलें तेव्हां त्यांना त्यावर कांहींतरी लिहिलें असल्यासारखें दिसलें. त्यांनीं तो तुकडा घासून पुसून स्वच्छ करून पाहिला व मुलांना विचारलें—"अरे, तुम्हांला हा तुकडा कोठें मिळाला ?"

मुलें म्हणालीं—"काल रात्रीं काळोख पडल्यावर एक वैरागी साधू आमच्या घरीं आला. उजाडण्यापूर्वीं तो निघून गेला. जातां जातां त्यानें आपली ही झोळी येथें टाकून दिली. तिच्यांत सांपडला आम्हांला हा तुकडा."

तेव्हां शिक्षकानें गणोजीला त्याच्या घरीं जाऊन विचारलें—"तुझ्या घरीं रात्रीं एक वैरागी आला होता तो कोण ?"

"तो कोण व कोठें गेला हें नाहीं मला माहीत. सांगितल्याशिवाय उठून निघून गेला. झोळी येथेंच टाकून गेला होता. मीच नेऊन ती दूर फेंकून दिली होती. तिच्यांत कामाची वस्तू कांहीं सांपडली नाहीं."

शिक्षकानें तांब्याचा तुकडा दाखवीत विचारलें—"तुला देण्यासाठींच तर त्यानें हा तांब्याचा तुकडा झोळींत ठेवला नव्हता ?"

गणोजीनें तांब्याचा तुकडा उलटसुलट करून पाहिला व म्हणाला—"नाहीं बुवा ! हा झोळींत होता खरा, पण मी तो झोळीबरोबर फेंकून दिला."

"अरे खुळ्या, या तुकड्यावर तुला केवढा मोठा ठेवा मिळेल याची कांहीं कल्पना आहे का ? यावर सिद्ध वैराग्याचा मंत्र लिहिलेला आहे. श्मशानांत पुरलेल्या एका मढ्यांबरोबर जो ठेवा पुरला गेला होता तो कळतो या मंत्राच्या सहाय्यानें. अमावास्येच्या रात्रीं श्मशानाखालची जमीन तीन घटका उघडी राहाते. तेवढ्या अवधींत ज्याला हा मंत्र माहीत आहे त्याला उचलून आणतां येईल एवढें धन मिळूं शकेल."

शिक्षकानें मंत्र वाचून दाखविला आणि गणोजीनें तोंडपाठ करून घेतला. तीन दिवसांनीं अमावास्या आली. मध्यरात्रीच्या सुमारास गणोजी व शिक्षक श्मशानांत गेले. शिक्षक बाहेर उभे राहाले व गणोजी आंत गेला. "मध्यरात्र झाल्याबरोबर मी सांगतों. मंत्र म्हण. ठेवा दिसला तर मिळेल तितका घेऊन ये. तीन घटकापेक्षां जास्त वेळ आंत राहूं नकोस. लक्षांत ठेव." शिक्षकानें त्याला बजावून सांगितलें.

शिक्षकानें सांगितल्याबरोबर गणोजीनें मंत्र म्हटला. मंत्र म्हटल्याबरोबर त्याला श्मशानाखालीं एक मोठी गुहा दिसली. आंत दिवसासारखा प्रकाश होता. तेथें सोन्या चांदीचे ढीग होते. गणोजी दोन्ही मुठींत आल्या तेवढ्या मोहरा घेऊन बाहेर आला. एका मुठींतल्या मोहरा त्यानें



शिक्षकाला दिल्या व एका मुठींतल्या स्वतःसाठीं ठेवून घेतल्या.

गणोजी सारख्या गरिबाजवळ एवढें सोनें पाहून सर्वांना आश्चर्य वाटलें. त्या दिवशीं रात्रीं ज्या माणसानें गणोजीला कांटेरी झुडपाजवळ पाहिलें होतें त्यानें गांवच्या व्यापाऱ्याला सर्व जाऊन सांगितलें. त्या व्यापाऱ्याला देखील गणोजीकडे एवढें सोनें कोठून आलें या बद्दल आश्चर्य वाटत होतें. त्यानें त्याला येऊन विचारलें—"काय रे कोठून आलें एवढें सोनें तुझ्याकडे ? कोणाचा खून करून मिळविलेंस ? खरें



काय तें सांगितलें नाहींस तर तुझें सर्व बिंग बाहेर काढीन."

गणोजी थोडा घाबरला व त्यानें घडलेलें सर्व वृत्त खरेंखरें सांगून टाकलें. तो तांब्यांचा तुकडा पण त्यानें त्या व्यापाऱ्याला दाखविला. "तो दे मला. राहूं दे माझ्याकडे. मी अमावास्येच्या दिवशीं खऱ्याखोट्याचा तपास काढतो. खोटें निघालें तर तुला फांशी करवीन. खरें ठरलें तर तांब्याचा तुकडा मी आपल्या जवळच ठेवून घेईन आणि तुला जेव्हां पैशाची गरज भासेल तेव्हां देत जाईन." व्यापारी असें म्हणाला. गणोजीला तें मान्य करावें लागलें.

पुन्हां अमावास्येची रात्र आली. व्यापारी मध्यरात्रीच्या सुमारास एक ल्हानसा कंदील, तांब्याचा तुकडा व एक पोतें घेऊन स्मशानांत गेला.

मध्यरात्र होण्यापूर्वी दिव्याच्या उजेडांत त्यानें तांब्याच्या तुकड्यावर लिहिलेला मंत्र कित्येकदां वाचला. बरोबर मध्यरात्रीच्या सुमारास त्याला एका जागीं लःख प्रकाश दिसला. त्यानें जवळ जाऊन पाहिलें तर त्याला गुहा दिसली. तो आंत गेला. बरोबर त्यानें पोतें घेतलें होतें. उत्तमोत्तम रत्नें व माणिक्यें निवडून त्यानें पोत्यांत भरलीं. त्याचें पोतें जेम तेम भरलें असेल. तेवढ्यांत प्रकाश अंधुक झाला व गुहा बंद झाली. व्यापारी हें पार विसरून गेला कीं फक्त तीन घटकाच ती गुहा उघडी राहते. तांब्याचा तुकडादेखील गुहेंतच त्याच्याबरोबर राहून गेला.

व्यापाऱ्याचें काय झालें कोणाला कळलें नाहीं. त्यानें बरोबर नेलेला कंदीलमात्र स्मशानांत सांपडला.





# कृष्णावतार

कुरवीर येथें पोंचतांच कृष्णबलरामांनीं तेथल्या पाहारेकऱ्यांना आपला परिचय देऊन सांगितलें कीं आम्ही सृगाल वासुदेव याच्याशीं युद्ध करणाच्या हेतूनें आलों आहों. पाहरेकऱ्यांनीं तो निरोप आपल्या राजाकडे पोंचता केला.

तो निरोप आपला अपमान करण्यासाठींच दोघांनीं पाठविला आहे असें समजून वासुदेव सूर्याकडून मिळालेल्या सुवर्णरथांत बसून सोन्याचें कवच धारण करून आणि धनुष्यबाण व इतर शस्त्रास्त्रें घेऊन तो सैन्यालाबरोबर येण्याची गरज नाहीं असें सांगून एकट्यानेंच युद्धाला निघाला.

त्याचें त्या वेळचें रूप जणुंकांहीं प्रत्यक्ष यमासारखेंच होतें. तें पाहून थोडा वेळ कृष्णबलरामदेखील भांबावून गेले. परंतु दमघोषनें त्यांना धीर दिला. तेव्हां कृष्णानें आपला रथ शत्रूसमोर नेऊन उभा केला. नंतर दोघांचें घोर युद्ध झालें. परस्परांवर त्यांनीं शरवृष्टी केली. परस्परांचीं शस्त्रास्त्रें भंग केलीं. कृष्णानें वासुदेवाचें धनुष्यच भंग केलें आणि सारथ्याला ठार केलें.

परंतु सृगाल वासुदेवानें त्याची यत्किंचित हि फिकीर केली नाहीं. दुसरें एक धनुष्य घेऊन व स्वतः रथ हांकीत तो कृष्णाला म्हणाला—"गोमंत पर्वतावर तूं कांहीं





राजांना जिंकलेंस. परंतु तो पोरखेळ होता. त्या लटक्या राजांवर विजय मिळविण्यांत काय भूषण? आतां माझ्याशीं गाठ आहे. तूं एकटा आहेस म्हणून मी पण एकटाच आलों आहें. हें धर्मयुद्ध आहे. या जगांत दोन वासुदेवांना जागा नाहीं. म्हणून तुझा वध करून मीच पृथ्वीचें राज्य करणार आहें."

कृष्ण स्मित करून म्हणाला—"पाहू दे तुझा पराक्रम, नंतर काय करायचें तें मी आतांच नाहीं सांगत."

सृगाल वासुदेवानें त्यानंतर कृष्णावर शरवृष्टि, परशु, तलवार व चक्र सर्वांचा एकदम इतक्या जोरानें मारा सुरू केला की सूर्य झांकला गेला व काळोख पडला.

कृष्ण म्हणाला—"तुझ्या शक्तीचें प्रदर्शन तूं केलेंस. आतां माझ्या शक्तीची मजा पण पहा." असें सांगून कृष्णानें आपल्या सुदर्शन चक्राचा प्रयोग केला. सुदर्शन चक्रानें वासुदेवाच्या डोक्याचीं दोन छकलें केलीं व तें परत कृष्णाच्या हातीं आलें.

पतीच्या मृत्यूची वार्ता कानीं पडतांच सृगाल वासुदेवाच्या अंतःपुरांतल्या स्त्रिया धांवत रडत त्याचा देह पडला होता तेथें आल्या. पट्टराणी आपला मुलगा शक्रदेव याला घेऊन आली व त्याला कृष्णा समोर ठेवून खूप रडली.

कृष्णानें तिचें सांत्वन केलें व मंत्री, सामंत आणि प्रमुख नागरिकांना बोलावून शक्रदेवाचा राज्याभिषेक करविला.

नंतर कृष्ण मथुरेला परत निघाला. कृष्णाचा मामा दमघोष याला कृष्ण मथुरेला निघाल्याचें कळतांच तो आपलें सैन्य घेऊन चेदी देशाला निघाला.

कृष्ण व बलराम पांच दिवसांनीं मथुरेला पोंचले. नगर दुरून दिसूं लागतांच कृष्णानें पांचजन्य शंख वाजवून आपण येत असल्याची बातमी मथुरेच्या नागरिकांना कळविली.

पांचजन्य शंखाचा आवाज ऐकून उग्रसेन स्वतः यादव प्रमुखांना व पुरोहितांना बरोबर घेऊन, हत्ती व घोडे सजवून व धान्य घेऊन मंगल वाद्यें वाजवीत कृष्णाच्या स्वागतासाठीं सामोरा आला. ब्राह्मणांनीं कृष्ण बलरामांना आशीर्वाद दिला व मोठ्या समारंभानें कृष्ण व बलराम दोघांनीं मथुरेंत प्रवेश केला.

कृष्ण व बलराम यांच्या हातून पराजय झाल्यामुळें जरासंध जळफळत होता. इतकें मोठें सैन्य घेऊन व आपल्या मांडलिक राजांना बरोबर घेऊन तो गेला होता व दोघां गवळ्याच्या पोरांनीं त्याला पिटाळून लावावें या सारखी लज्जास्पद गोष्ट ती काय असणार? त्याच्या चित्ताला थोडीदेखील शांतता नव्हती.

त्याची युद्धाची खुरखुरी जिरलेली नव्हती. म्हणून आपल्या मांडलिक राजांना बोलावून त्यांना पुन्हां प्रोत्साहन देऊन म्हणाला—"त्यावेळीं आपल्या भाग्यानें पाठ दाखविली म्हणून आपला पराभव झाला. नाहीं तर इतक्या मोठ्या सैन्यासमोर व तुमच्या सारख्या कसलेल्या शूर वीरांसमोर गवळ्याच्या त्या





दोघां पोरांची काय बिशात होती युद्ध करण्याची व जय मिळविण्याची ? म्हणून चला, पुन्हां प्रयत्न करून पाहूं या. सर्व मिळून पुन्हां मथुरेवर स्वारी करूं या."

सर्वांनीं जरासंधाच्या म्हणण्याला दुजोरा दिला. कारण गोमंतावर त्यांचा सर्वांचा अपमान झाला होता व सुडाची भावना त्याच्या हृदयांत धुमसत होती. पौण्ड्र, कलिंग, दन्तवक्र, शिशुपाल, साल्व, रुक्मी, गांधार, त्रिगर्त, भगदत्त व कृष्णाचे इतर पुष्कळ विरोधी अंग, वंग, विदेह, काश, करूषा, भद्र, पाण्ड्य वगैरे देशांचे प्रमुख पण जरासंधाच्या बाजूनें कृष्णाशीं युद्ध करण्यास तयार झाले. एकवीस अक्षौहिणी सैन्य मथुरेच्या द्वारावर जाऊन थडकलें.

कृष्णानें किल्ल्याच्या तटावर चढून महा-प्रलयासारखें पसरलेलें जरासंधाचें सैन्य पाहिलें. कृष्ण बलरामाला स्मित करून म्हणाला—"भूभार हलका व्हावा अशीच परमेश्वराची इच्छा दिसते आहे."

जरासंधानें आपल्या अनुयायी राजांना उद्देशून मथुरेला वेढा देण्याची आज्ञा केली आणि म्हणाला—"संधी मिळेल तेथें किल्ल्याच्या भिंतीला खिडारें पाडा. मथुरा-नगरी जमीन दोस्त झाली पाहिजे. गोमंत पर्वतावर स्वारी केली त्यावेळीं ज्याला जेथें नेमलें होतें त्याच प्रमाणें या युद्धांतहि सर्वांनीं आपापल्या जागीं जाऊन उभें रहावें."

या खेपेस यादव जरादेखील कचरले किंवा घाबरले नाहींत. तसें पाहिलें तर जरासंधाच्या अफाट सैन्यासमोर त्यांचें सैन्य लहान होतें. पण कृष्ण त्यांच्या बाजूनें उभा आहे, हीच गोष्ट मुख्यपणें त्यांना धीर यायला कारण होती.

गरुडध्वज फडकत असलेल्या रथांत बसून कृष्ण सुदर्शन चक्र वगैरे शस्त्रें घेऊन आणि



बलराम आपला नांगर, उखळी इत्यादि आपलीं शस्त्रास्त्रें घेऊन युद्धाला निघालेले पाहून लोकांना फार आनंद झाला.

दोघे आपलें सैन्य घेऊन उग्रसेनाबरोबर जरासंधाच्या समोर जाऊन उभे राहाले. जरासंध स्वतः सैन्याच्या अघाडीला उभा होता, जणुंकांहीं कृष्णाला आपलें सैन्य दाखवून, तुझी या खेपेस खोडच मोडतों, असें त्याला सांगावयाचें होतें.

कृष्णा शेजारी उग्रसेन उभा होता त्याला उद्देशून जरासंध म्हणाला—"भोजवंशाचे वंशज राज्य करीत असतां यादव त्यांची सेवा करतात. अशा भोजवंशांत जन्माला येऊन तूं आपली वंश मर्यादा गमावून बसला आहेस. तुझ्याहून जास्त मूर्ख कोणी असेल असें नाहीं मला वाटत. या कृष्णानें तुझ्या पोटच्या मुलाला ठार करून त्याचें राज्य बळकावलें आणि तुला भीक म्हणून दिलें. त्याचें उष्टें खायला या म्हातारपणीं तुला लाज कशी काय वाटत नाहीं. तूं कृष्णाचा दास आहेस, राजा किंवा स्वामी नाहींस तुझ्या सारख्याचें तोंडदेखील पाहूं नये."

कृष्णाला तें अपमानास्पद वाक्य उग्रसेनाला उद्देशून म्हटलेलें असलें तरी



झोंबलें. म्हणाला—"दुष्टा ! उग्रसेनासारख्या वृद्धांचा गौरव करण्या ऐवजीं त्यांची निंदा करण्यांत तुला मोठा पुरुषार्थ वाटतो, नाहीं का ? कांहीं बोलायचें असेल तर बोल माझ्या जवळ. मीच आहे तुझा खरा शत्रू. गोमंत पर्वतावर तुझें शौर्य पाहिलें आहे मी. भित्री भागूबाई शत्रूला पाठ दाखवून पळून गेली होती. निदान आज तरी दाखव तुझा काय पराक्रम आहे तो." असें म्हणत कृष्णानें एक बाण जरासंधावर व एक त्याच्या सारथ्यावर सोडला. आणखी एका बाणानें कृष्णानें जरासंधाचें धनुष्यच भंग केलें.

कारण जरासंधाचा वध दुसऱ्याच्याच हातीं होणार होता.

दिवसामागून दिवस लोटत होते. एकदां बलरामाला आपल्या बाळपणाची आठवण झाली व गोकुळांत जाऊन येण्याची अनिवार इच्छा झाली. तो कृष्णाला तसें म्हणाला पण. परंतु कृष्ण बरोबर यायला तयार झाला नाहीं. त्यानें बलरामाला जाऊन यायला सांगितलें. बलराम गोकुळांत गेला. दुरूनच त्याला गोपगोपींनीं ओळखलें व त्यांना फार आनंद झाला. त्यानें सर्वांना नमस्कार केला. जे लहान होते त्यांनीं बलरामाला नमस्कार केला. तो आपल्या सर्व मित्रांना प्रेमानें भेटला, गोपींनीं त्याला तर घेरलेंच व कृष्णाबरोबर मथुरेला गेल्यापासून जें जें घडलें तें सर्व विचारून घेतलें. गवळ्यांच्या घोळक्यांत बलरामाला बरें वाटलें.

वृद्ध गोपमंडळी म्हणाली—“बाळा! तुम्ही दोघांनीं एवढा पराक्रम गाजविला, चाणूर मुष्टिकांचा व कंसाचा वध केलात. गोमंत पर्वतावर जरासंधाची घमेंड जिरविलीत. एवढी कीर्ति संपादन केलीत, परंतु तुम्ही मातृभूमीला मात्र विसरलां नाहीं.”

“तुमच्या आशीर्वादानेंच तर आम्हांला यश मिळालें. तो राजभोग खाऊन देखील आम्हांला कधीं येथल्या दह्या लोण्याचा विसर पडला नाहीं. बालपणीं ज्या मातींत लोळलों त्या भूमीचा विसर कसा पडेल?” बलराम म्हणाला.

तें ऐकून सर्वांना आनंद झाला. सर्वांनीं बलरामाला प्रेमानें बोलवून त्याला आवडणारे पदार्थ खायला दिले.

[पुढील गोष्ट पुढील अंकीं]





# अरण्यपुराण

[१७]

दोन मोठीं गलेलठ्ठ माकडें मौवलीला आपल्या हातावर उचलून घेऊन झाडांवरून वरच्यावर पळून निघालीं. तीं इतक्या जोरानें पळत होतीं कीं मौवलीला भोंवळ आल्यासारखें झालें. परंतु त्यांत सुद्धां एक तऱ्हेची मजा वाटे त्याला. झाडाच्या टोकावरून जंगल दूरपर्यंत स्पष्ट दिसे. वरच्या फांद्यावरून खालच्या फांद्यांवर उड्या मारीत माकडें वरच्यावर त्यांना जिकडे जावयाचें असेल तिकडे जात.

पहिल्यानें मौवलीला भीति वाटली कीं माकडें त्याला कोठें तरी जमिनीवर तर टाकून देणार नाहींत. त्याला मधून मधून राग येई. परंतु तो दाखवीत नसे. नंतर तो विचार करूं लागला. काळा वाघ व अस्वलाकडे निरोप कसा पोंचता करावयाचा? माकडांसारखें पळणें त्यांना जमणार नाहीं. कोण निरोप पोंचवणार? खालीं फांद्या व पानांशिवाय त्याला कांहीं दिसत नव्हतें. मौवलीनें निळ्या आकाशाकडे पाहिलें. जंगलांत कोण केव्हां मरतो याची वाट पहात गिधाडें आकाशांत घिरट्या घालतांना दिसत.

गिधाडानें आकाशांतून माकडें कोणाला तरी धरून घेऊन जात असलेलें पाहिलें. त्याला वाटलें कीं आपल्या खाण्यालायक असेल. तें शंभर हातावर खालीं उतरून आलें. जवळ आल्यावर त्याला मौवली दिसला. गिधाडाच्या भाषेंत मौवली म्हणाला—“मी व तूं एकच.” गिधाड चकित होऊन मोठ्यानें ओरडलें. नंतर मौवलीला ज्या



वाटेनें माकडें नेत होतीं त्या वाटेनें वर आकाशांत गिधाडपण जात होतें.

"मला ज्या वाटेनें घेऊन जात आहेत ती नीट ओळखून ती बातमी अस्वलाला व काळ्या वाघाला आणि शिखरावरच्या आमच्या कळपांतल्यांना कळव." मौवलीनें गिधाडाला त्याच्या भाषेंत सांगितलें.

"तुझें नांव काय?" गिधाडानें विचारलें. तें मौवलीला तोंपर्यंत ओळखत नव्हतें.

"मौवली!"

गिधाड लगेच उंच आकाशांत उडालें व दूर एकाद्या काळ्या ठिपक्यासारखें दिसूं लागलें. माकडें कोणत्या वाटेनें जात आहेत यावर त्याची नजर होती.

इकडे अस्वल व काळा वाघ यांचा पारा चढत चालला होता. काळा वाघ उंच झाडावर त्या दिवशीं चढला. त्यापूर्वी इतक्या उंचीवर चढून तो गेला नव्हता. त्याच्या वजनानें फांद्या मोडल्या. त्याच्या नखांत झाडाचीं सालें शिरलीं. आपला सर्व राग अस्वलावर काढीत तो म्हणाला—"तूं मौवलीला पहिल्यानेंच कां नाहीं सावध करून ठेवलेंस?"

"आपण लवकर गेलों तर त्यांना धरतां येईल." अस्वल धापा टाकीत म्हणालें.

"तूं काय पळणार? जास्त पळलास तर पिकलेल्या फळासारखा फुटून जाशील. कोठेंतरी बसून स्वस्थपणें विचार कर. पोरांना टपली मारणें वाटलें होय तुला? आपण त्या दुष्टांचा पाठलाग केला तर तीं माकडें त्याला टाकून देतील." काळा वाघ म्हणला.

"टाकून देतील? बाप रे बाप!" असें सांगून अस्वल कपाळ धरून बसलें व पुन्हां उठून त्या काळजींत येरझाऱ्या घालूं लागलें.



"हें पहा, तूं उगाच असा रडूं लागलास तर पाहणारे हंसतील. मी देखील तुझ्या-सारखा रडत बसलों तर?" काळा वाघ म्हणाला.

"कोणी काय वाटेल तें म्हणो, त्याचें मला काय? तो आतांपर्यंत मेला नसेल असें मला...." असें अर्धवट बोलून अस्वल आत्मग्लानीनें डोकें खालीं करून स्वस्थ बसून राहालें.

थोड्या वेळानें तें येरझाऱ्या घालायचें सोडून ताठ उभें राहालें. त्याला कांहींतरी नवीन युक्ति सुचली होती. म्हणालें—

"चल, आपण काबा अजगराला जाऊन भेटूं या. माकडें फार भितात त्याला. त्याला झाडावर छान चढतां पण येतें. रात्रीच्या वेळीं तें त्यांचीं पिलें गिळतें. त्याची दहशत वाटते सर्व माकडांना."

"तो पापी, दुष्ट! त्याला पाय देखील नाहींत, तो आपल्या जातीचा पण नाहीं. तो मदत करणार आपल्याला?" काळ्या वाघानें शंका करीत विचारलें.

"तें फार हुशार व अनुभवी आहे. नेहमीं भुकेनें त्याचा जीव कासावीस असतो. त्याला सांगूं कीं त्याला वाटेल तेवढ्या
















बकऱ्या मिळतील गिळायला." अम्बल म्हणालें.

"पोटांत कांहीं गेलें कीं महिनाभर तें पडून राहातें. कोठेंतरी झोंपलें असेल. समज, नसेल झोंपलें आणि जर तें म्हणालें कीं कोणाला हव्या आहेत तुझ्या बकऱ्या तर तूं काय करणार?" वाघ आपली शंका व्यक्त करीत म्हणाला.

खरें बोलावयाचें तर काळ्या वाघाला काबा संबंधानें कांहींच माहीत नव्हतें.

"तुला काय वाटतें, आपण दोघे इतके का अज्ञान अबोध आहों?" अम्बल आपला खांदा वाघाच्या अंगाला घाशीत म्हणालें.

दोघे अजगराच्या शोधार्थ निघाले.

काबा त्यांना एका गरम दगडावर ऊन खात पडून असलेला दिसला. त्यानें दहा दिवसांपूर्वीच कात टाकली होती व त्याची नवी कात चकाकत होती. सहा हात लांब त्याचें शरीर आडवें तिडवें दगडावर पडलेलें होतें. त्याला खाद्य कोठें मिळेल याची चिंता त्यावेळीं होती व तें जिभेनें ओठ चाटीत होतें.

अम्बलानें काबाला पाहतांच ओळखलें व काळ्या वाघाला म्हणालें—"स्वारीला भूक लागली आहे. पोटांत कांहीं गेलेलें दिसत नाहीं. सावध बरें का! कात टाकली कीं त्याला बरोबर दिसत पण नाहीं. मग घाई पण फार करतें."

काबा विषारी नव्हता. त्याला विषारी सांपांचा रागपण फार होता. कारण ते भित्रे असतात. त्याची पकडपण सामान्य नसते. एकदां कोणी सांपडला कीं सुटणें अशक्य. [पुढील गोष्ट पुढील अंकीं]





# ७१. बैकाल सरोवर

सायबेरिया (रशिया) देशांतलें बैकाल हें सरोवर जगांतलें सर्वांत जुनें सरोवर आहे. इतर सरोवरें १०,१५ वर्षांपूर्वी बनलेलीं आहेत. परंतु हें २ कोटी वर्षांपूर्वी झालें. आकारानें जगांतील सरोवरांत याचा सहावा नंबर लागतो. याचें क्षेत्रफळ १२,१५० चौरस मैल आहे. परंतु या सरोवराहून खोल सरोवर दुसरें नाहीं. हें १६२० मीटर (जवळजवळ एक मैल) खोल आहे. यांत मिळणारे प्राणी समुद्रांतच आढळतात. यावरून हें कधीं काळीं उत्तर ध्रुवप्रदेशांतल्या समुद्राचा भाग होतें हें कळतें. या सरोवरांत १८०० प्राणी आहेत आणि यां पैकीं ७५ टक्के इतरत्र आढळत नाहींत. यांत समुद्रांतले प्राणी असले तरी याचें पाणी खारें नाहीं.

दरवर्षी या सरोवरांतून १० हजार टन मासे काढले जातात. कित्येक वैज्ञानिक येथें येऊन संशोधनाचें कार्य करीत असतात. हा प्रदेश फार सुंदर आहे. ३०० नद्या आसपासच्या प्रदेशांतून या सरोवराला मिळतात. परंतु अंगार नांवाची एकच एक नदी या सरोवरांतून निघते.

